ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैव-लिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ २५ वा.

# वीरमाहेश्वराचारसंग्रह.

भाग २ रा.

हा

( महाराष्ट्र तात्पर्यासह )

वेदमूर्ति, मणूर मठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं सोलापूर येथें

'श्रीदत्तप्रसाद' स्टीमप्रेसमध्यें छापवून प्रसिद्ध केला.

---

आवृत्ति १ ली प्रती १०००.

---

शके १८२८, सन १९०७.

---



---

किंमत २ रु.

# प्रस्तावना.

धर्म हा किती सूक्ष्म आहे व त्याला किती नाजुकपणें सांभाळावें लागतें हें धर्मनिष्ठ खऱ्या वीरांसच कळणार आहे. नाहींतर अनादिकालापासून चालत आलेल्या या वीरशैव धर्माच्या कालवशात झालेल्या ग्लानीकडे दुर्लक्ष करणाऱ्या नामधारी लोकांस काय कळेल तरें? या ग्रंथाच्या पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत धर्मासंबंधीं थोडी माहिती दिली आहे तिकडे रसिक लोकांनीं लक्ष दिलें असतां धर्मनिष्ठा कशी बाळगावी हें कळेल. या ग्रंथाचें वर्णन पहिल्या भागांत केलें आहे तथापि या दुसऱ्या भागांत जे कांहीं अनेक मनोरंजक विषय आहेत त्यांपैकीं "वीरशैव धर्मनिर्णय" या विषयाचें वर्णन करणें अत्यावश्यक वाटल्यावरून येथें थोडें त्याचें दिग्दर्शन करतों.

आचारहीनः पुरुषो लोके भवति निंदितः ॥
तस्मात्सर्वप्रयत्नेन सम्यगाचारवान् भवेत् ॥

**अर्थः**–जो मानव आचरण (स्वधर्मांत सांगितल्याप्रमाणें वागणूक) करीत नाहीं तो मानव जगांत निंद्य होतो याकरितां आपला आचार सर्व प्रयत्नांनीं चांगल्या रीतीनें पाळून जगांत कीर्ति मिळवावी.

याप्रमाणें प्रथम नुसती आचाराची दिशा दाखविली. पुढें ग्राह्य वस्तु कोणती व अग्राह्य वस्तु कोणती हें सांगितलें आहे. तात्पर्य हें कीं शुद्धाशुद्धाचा विचार करून ते ते पदार्थ घेतले पाहिजेत. वीरशैवांचा आचार किती सूक्ष्म आहे तो हा ग्रंथ वाचला म्हणजे सहज कळून येईल.

या ग्रंथाचें भाषांतर वे॥ शा॥ सं. रंगाचार्यशास्त्री मुधोळकर यांनीं केलें आहे. प्रूफतपास शुद्धाशुद्ध वगैरे कामें वे॥ मू॥ मल्लिकार्जुनशास्त्री जैनापूर वे॥ मू॥ जगदीशशास्त्री नालवार व वे॥ शा॥ सं. रंगाचार्य शास्त्री मुधोळकर यांनीं केलीं आहेत.

या ग्रंथाची ताडपत्री मूळप्रत संस्थान गलगली वीरभिक्षावती चरपट्टाधिकारी ब्रह्मश्रीराचोटी स्वामी यांनीं पाठवून दिली आहे याबद्दल यांचे व वरील शास्त्रीमंडळीचे आह्मी आभारी आहोंत.

प्रसिद्धिकर्ता.

---

## विनंति

उपयुक्त अशा वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखितप्रति कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद सोलापूर यांचेकडे पाठवून देण्याची मेहरबानी करावी; ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व पाठविणारांस धर्मोन्नतीच्या कामीं यथाशक्ति हातभार लावल्याचें श्रेयही मिळेल. त्या ग्रंथाचें काम संपतांच त्याची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं आपली मूळ प्रत परत मिळेल किंवा नाहीं याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचेकडे ग्रंथ पाठविण्याचें करावें.

मणूरमठाध्यक्ष मल्लिकार्जुनशास्त्री.

# वीरमाहेश्वराचारसंग्रह भाग २ रा

## विषयानुक्रमणिका

विषय पृष्ठ.



## अध्याय ३०



## अध्याय ३१



## अध्याय ३२

# संस्कृत शुद्धिपत्रक.

| पान. | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७ | १ | लिला | लीला |
| ८ | ७ | मेष्यति | मेष्यसि |
| ९ | ९ | च्छिन्नं | छिन्नं |
| १५ | ११ | पा | प्रा |
| २१ | ९ | कस्मात्रस्ता | कस्मात्त्रस्ता |
| ४० | १० | तिष्ठंत्युमा | तिष्ठत्युमा |
| ४१ | ६ | गिरं | गिरेः |
| ४१ | १२ | स्तिग्ध | स्निग्ध |
| ४६ | ६ | माहात्मना | महात्मना |
| ४७ | ९ | वात्सल्यः | वात्सल्यो |
| ४८ | ११ | षड्भि | षड्भि |
| ५५ | १० | हृष्टपुष्टा | हृष्टापुष्टा |
| ६० | ७ | रत्नैःर्वाह्ये | रत्नैर्वाह्ये |
| ६२ | ११ | प्रजल्पे | जजल्पे |
| ६७ | ११ | निष्टं | निष्ठं |
| ७१ | ८ | जुंगुप्सित | जुगुप्सित |
| ७२ | २ | विष्णुर्पुन | विष्णुःपुन |
| ८० | १३ | प्रंहृष्टात्मा | प्रहृष्टात्मा |
| ८५ | ४ | यद्व | यद्व |
| ८५ | ४ | वे | वै |
| ८५ | ५ | देब | देव |
| ८५ | ७ | द्विहस्य | द्विहस्य |
| ८८ | ७ | कांर्मुक | कार्मुक |
| ११२ | ५ | तुष्टस्पृष्टो | तुष्टःस्पृष्टो |
| १५१ | ६ | प्रजजनं | प्रजननं |
| १५३ | ५ | शंभुःघटो | शंभुर्घटो |
| १६४ | ६ | दर्घिरोमाणो | दीर्घरोमाणो |
| २१३ | ११ | सवं | सर्वं |

# मराठी शुद्धिपत्रक.

| पान. | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९ | २० | ओवलेंले | गोंवलेलें |
| १५ | ३० | ह्याप्रमाणें कोळम आणि | ह्याप्रमाणें |
| १९ | १९ | कोणी | कोण |
| १९ | २० | कोणी | कोण |
| १९ | २३ | कोणी | कोण |
| ७२ | १५ | स्वंतःच्याच | स्वतःच्याच |

॥ श्रीशिवाय नमः ॥

# ॥ अथ श्रीवीरमाहेश्वराचारसंग्रहे ॥

## ॥ द्वितीयभागप्रारंभः ॥

## ॥ अथ सप्तदशोऽध्यायः ॥

॥श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ कालिकाखण्डे ऋषय ऊचुः ॥ कथं देवो महादेवो विश्वसंहारकारकः ॥ शरभाख्यं महाघोरं विकृतं रूपमास्थितः ॥१॥ किमर्थं कीदृशं केन हेतुना लोकभीषणम् ॥ किं किं वीर्यं कृतं तेन ब्रूहि ब्रह्मन्नशेषतः ॥२॥

सूत उवाच ॥ श्रृणुध्वं ऋषयः सर्वे कथामाश्चर्यकारिणीम् ॥ सर्वपापप्रशमनीं सर्वदुःखनिवारिणीम् ॥३॥ पुरा सनत्कुमाराय नंदी चाख्यातवानिमाम् ॥ सनत्कुमाराच्छ्रुतवान् व्यासस्तस्मान्मुनेरहम् ॥४॥ केनापि हेतुना पूर्वं पुराणः पुरुषोत्तमः ॥ सहस्रमूर्तिर्विश्वात्मा जगत्सृष्ट्यादिकारकः ॥५॥ विकृतं भीषणं रूपमुग्रं वीर्योज्वलं मुखम् ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. स्कंदपुराणांतील कालिकाखंडांत अशी कथा आहे.

(१)ऋषि ह्मणतात–हे सूता, सर्व त्रैलोक्याचा संहार करणाऱ्या परमेश्वर महादेवानें शरभ नांवाचें अतिशय भयंकर आणि कुरूप असें रूप कसें घेतलें ? (२) तें असें सर्व जगाला भयंकर वाटणारें शरभ रूप कशासाठीं घेतलें ? तें स्वरूप कशाप्रकारचें होतें ? तें घेण्याचा उद्देश काय ? तें रूप घेऊन महादेवानें कोणकोणते पराक्रम केले ? तो सर्व प्रकार तूं आह्मांस सविस्तर रीतीनें सांग. असा ऋषीश्वरांचा प्रश्न ऐकून—

(३)सूत ह्मणतात–हे ऋषीश्वरहो, तुह्मी सर्वजण ही आश्चर्यकारक कथा ऐका ही कथा ऐकल्यानें सर्व पातकांचा नाश होतो, व आपलें सर्व प्रकारचें दुःख नाहींसें होतें. (४) पूर्वी हीच कथा नंदिकेश्वरांनीं सनत्कुमार मुनीला सांगितली, सनत्कुमार मुनीनें व्यासास सांगितली व श्रीव्यासाकडून मला समजली असो. (५) पूर्वी कांहींएक कारणानें जो अनादिकालापासून आहे, ज्याला पुरुषोत्तम असें ह्मणतात, ज्याचीं हजारों हजार स्वरूपें आहेत, जो त्रैलोक्यस्वरूप आहे, जो त्रैलोक्य उत्पन्न करणें वगैरें कामें करितो (६) त्या श्रीविष्णूनें विद्रूप भेसूर अतिशय वळकट, अकराळ विकराळ दाढा असल्यामुळें ज्याचेकडे पाह-

दंष्ट्राकरालदुर्दर्शमतिरौद्रं महाभयम् ॥६॥ नृसिंहरूपमास्थाय हिरण्याख्यं महासुरम् ॥ हन्तारं सर्वलोकानामवधीद्दर्पविव्हलम् ॥७॥ ततस्तु भगवान्विष्णुरतिरौद्रं महाबलम् ॥ नियन्तुमथवा सोढुं न शशाक विजृंभितम् ॥८॥ तेन रौद्रेण महता सर्वलोकाश्चकंपिरे ॥ चुक्षुभुः सागरास्सर्वे विनेशुः सर्वदेवताः ॥९॥ ततो ब्रह्मादयस्सर्वे संभूय परमेश्वरम् ॥ आत्मत्राणाय शरणं जग्मुः परमकारणम् ॥ १०॥ मंदरस्थं महादेवं क्रीडमानं सहोमया ॥ सेवितं गणगन्धर्वैः सिध्दैरप्सरसां गणैः ॥११॥ देवताभिः सह ब्रह्मा भीतभीतः सगद्गदः ॥ प्रणम्य दण्डवद्भूमौ तुष्टाव परमेश्वरम् ॥१२॥ नमस्ते कालकालाय नमस्ते रुद्रमन्यवे ॥ नमः शिवाय शर्वाय शंकराय शिवाय ते ॥१३॥ उग्रोऽसि सर्वदुष्टानां नियन्ताऽसि शिवोऽसि नः ॥ कालकूटादिव पुरा त्राहि नः शरणागतान्

---

ण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं, असें अतिशय भयंकर व क्रूर ( ७ ) नृसिंहाचें रूप घेऊन हिरण्यकशिपु नांवाच्या सर्व लोकांस अगदीं त्रासवून सोडणाऱ्या व गर्वानें फुगलेल्या दैत्यास मारिलें ( ८ ) त्यानंतर परमेश्वर श्रीविष्णूस तें अतिशय बळकट आणि क्रूर नृसिंहाचें स्वरूप सौम्यही करितां येईना व सहनही करवेना, वरचेवर तें स्वरूप जास्त उग्र होऊं लागलें. ( ९ ) त्या अतिशय मोठ्या भयंकर स्वरूपामुळें सर्व लोक थरथर कापूं लागले, सर्व समुद्र खवळून गेले, व सर्व देवता नाश पावल्या. ( १० ) तेव्हां ब्रह्मदेव वगैरे सर्व मुख्य मुख्य देव मिळून, आपलें संक्षरण व्हावें ह्या उद्देशानें, सर्व कारणांस कारण अशा श्रीशिवास शरण गेले ( ११ ) श्रीशंकर त्यावेळीं मंदर पर्वतावर पार्वतीसह सुखानें विलास करीत होते व त्यांची इतर शिवगण, गंधर्व, सिद्ध आणि अप्सरांचें समुदाय सेवा करीत होते. ( १२ ) त्याठिकाणीं घाबरलेला ब्रह्मदेव सर्व देवांस बरोबर घेऊन गेला व कंठ दाटून येऊन त्यांनें श्रीशिवापुढें साष्टांग नमस्कार घातला व तो श्रीशिवाची स्तुति करूं लागला ( १३ ) हे परमेश्वरा, तूं कालांचाही काल आहेस त्या तुला नमस्कार असो, तुझा राग फार भयंकर आहे, त्या तुला नमस्कार असो, तुला शिव, शर्व आणि शंकर, अशीं नांवें आहेत, तूं सर्वांचें कल्याण करणारा आहेस, त्या तुला नमस्कार असो. (१४) पृथ्वीवर जितके दुष्ट लोक आहेत, त्या सर्वांस तूं क्रूर आहेस तूं सर्व जगाचें रक्षण करितोस, तूं आमचें कल्याण करणारा आहेस, पूर्वीं कालकूटा ( विषा ) पासून जसा आमचा सर्वांचा तूं बचाव

॥१४॥ प्रबोधकोऽसि मे विष्णोरवलेपहरो हरः ॥ शुकवत्तव विश्वेश क्रीडायै केवलं वयम् ॥१५॥ तवोन्मेषनिमेषाभ्यामस्माकं प्रलयोदयौ ॥ उन्मीलिते त्वयि ब्रह्म विनाशो नास्ति नः शिव ॥१६॥ संतप्ताःस्मो वयं देव हरिणाऽमिततेजसा ॥ सर्वलोकोपकाराय तं च त्वं हन्तुमर्हसि ॥१७॥ एवमभ्यर्थितो देवैर्मतिं चक्रे कृपालयः ॥ तमजो नरसिंहाख्यं संहर्तुं परमेश्वरः ॥१८॥ तदर्थं स्मृतवान् रुद्रो वीरभद्रं महाबलम् ॥ आत्मनो भैरवं तत्वं महाप्रलयकारकम् ॥१९॥ आजगाम पुरः सद्यो गणानामग्रणीर्हसन् ॥ अट्टहासैर्गणवरैरुत्पतद्भिरितस्ततः॥२०॥ नृसिंहरूपैरत्युग्रैः कोटिकोटिभिरावृतः ॥ धावद्भिरभितो वीरैर्नृत्यद्भिश्चाप्युदायुधैः ॥२१॥ क्रीडद्भिश्च महावीरैर्ब्रह्माण्डैः कंदुकैरिव ॥ अदृष्टपू-

---

कैलास, तसा ह्यावेळींही कर. आह्मी सर्वजण तुला शरण आलों आहों. ( १५ ) श्रीशिवा, तूं मला ज्ञान देणारा आहेस, आणि श्रीविष्णूचा गर्व दूर करणारा आहेस, ह्मणून तुला हर असें नांव पडलें. हे विश्वेश्वरा, आह्मी हे सर्व देव तुझ्या घरीं बाळगलेल्या राघूंसारखे आहोंत. आमच्या आंगीं स्वतंत्रशक्ति नाहीं ( १६ ) हे परमेश्वरा, तूं आपल्या डोळ्यांच्या पापण्या उघडल्यास ह्मणजे सर्व जग उत्पन्न होतें; आणि तूं आपल्या डोळ्यांच्या पापण्या मिटल्यास ह्मणजे सर्व प्राणिमात्रांचा लय होतो. हे परब्रह्मस्वरूप श्रीशिवा तूं आह्मांस प्रसन्न झाल्यावर आमचा नाश होण्याची मुळींच भीति नाहीं. ( १७ ) हे परमेश्वरा, श्रीविष्णूनें अतिशय बलाढ्य असें नृसिंहाचें रूप घेतलें असल्यामुळें आह्मी सर्व देव त्रासून गेलों आहों. ह्यासाठीं सर्व लोकांस सुख व्हावें ह्मणून तूं त्यास मारून टाक. ( १८ ) जन्ममरण नसणाऱ्या श्रीशिवांनीं सर्व देवांची स्तुति ऐकून, लोककल्याणासाठीं नृसिंहास मारून टाकण्याचा विचार केला. ( १९ ) आणि ह्याचे कामासाठीं त्यांनीं महापराक्रमी वीरभद्राचें स्मरण केलें. वीरभद्र हा श्रीशिवाचें महाप्रलयकाळाच्या वेळचें भयंकर स्वरूप भैरवतत्व होता. ( २० ) श्रीशिवांनीं वीरभद्राचें स्मरण करितांच तो गणेश्वर आपले सर्व गण बरोबर घेऊन श्रीशिवापुढें येऊन हंसत उभा राहिला. वीरभद्राबरोबरचे गण कोणी मोठ्यानें टाळ्या वाजवून हंसत होते, व कोणी इकडे तिकडे मनास येईल तशा उड्या मारीत होते. ( २१ ) त्या सर्वांनीं नृसिंहाचीं रूपें घेतलेलीं होतीं व त्यांची संख्या कोट्यावधि होती, ते अतिशय क्रूर असून वीरभद्राबरोबर आपापल्या हातांत शस्त्रास्त्रें घेऊन भोंवतालीं धांवत पळत येत होते. ( २२ ) वीरभद्राबरोबर अस-

वैरन्यैश्च वेष्टितो वीरवंदितः ॥२२॥ कल्पान्तज्वलनज्वालाविलसन्लोचनत्रयः ॥ अंसस्रंसिजटाजूटगलद्बालेंदुमण्डितः ॥२३॥ बालेंदुद्वितयाकारतीक्ष्णदंष्ट्रांकुरद्वयः ॥ आखंडलधनुःखण्डसन्निभभ्रूलतायुगः ॥२४॥ महाप्रचण्डहुंकारबधिरीकृतदिङ्मुखः ॥ नीलमेघांजनाकारभीषणः सुबृहद्भुजः ॥२५॥ नादयन् डमरुं घण्टां भ्रामयंस्त्रिशिखं मुहुः॥ वीरभद्रोऽपि भगवान् वीरशक्तिविजृंभितः ॥२६॥ स्वयं विज्ञापयामास किं मम स्मृतिकारणम् ॥ आज्ञापय जगत्स्वामिन् प्रसादः क्रियतां मयि ॥२७॥

ईश्वर उवाच ॥ अकाले भयमुत्पन्नं देवानामतिभैरवम् ॥ ज्वलतो नरसिंहाग्नेः शमयैनं दुरासदम् ॥२८॥ सांप्रतं बोधय हरिं तेन चेन्नो-

---

लेले गणेश्वर इतके बळकट होते कीं, ते ब्रह्माण्डास चेंडूसारखें घेऊन उचलून फेकून देत; दुसरे असे कितीएक वीर होते कीं तसे वीर आजन्मांत कोणी पाहिलेही नसतील. ( २३ ) प्रलयकाळच्या अग्नीच्या जशा ज्वाला निघाव्या तशा वीरभद्राच्या तीन डोळ्यांतून ज्वाला निघत होत्या; त्याच्या खांद्यावर त्याच्या डोकीवरील जटा लोंबत असल्यामुळें जटेवरील द्वितीयेचा चंद्रही लोंबल्यासारखा दिसत होता. ( २४ ) वीरभद्राच्या तोंडांतील दोन पांढऱ्याशुभ्र दाढा द्वितीयेचे दोन चंद्रच आहेत कीं काय अशा चमकत होत्या. इंद्रधनुष्याच्या दोन तुकड्यांसारख्या त्याच्या दोन भोंवया दिसत होत्या. ( २५ ) त्यानें एक मोठा थोरला हुंकार केल्याबरोबर सर्व दिशा दणाणून जात असत. काळ्याभोर ढगासारखा व काजळाच्या पर्वतासारखा तो भयंकर असून त्याचे हात फारच लठ्ठ होते. ( २६ ) तो डमरु आणि घंटा वरचेवर वाजवून आपल्या आंगाभोवती गरगर त्रिशूल फिरवीत होता; व अशा रीतीनें तो परमेश्वर वीरभद्र आपली शक्ति लोकांस दाखवीत होता. ( २७ ) तो शंकराजवळ येतांच शिवास स्वतः ह्मणूं लागला, " माझें आपण कां स्मरण केलें ? मजजवळ आपलें काय काम आहे ? तें मला सांगा, आपण सर्व त्रैलोक्याचे अधिपति आहां, आपण मजवर कृपा करा. " असें वीरभद्राचें बोलणें ऐकून.—

( २८ ) शिव ह्मणाले—मुला, वीरभद्रा, नृसिंहरूप अग्नि फार भडकला आहे (श्रीविष्णूनें क्रूर नृसिंहाचें रूप घेतलें आहे), त्यामुळें देवांवर भलत्याचवेळीं मोठें संकट आल्यासारखें झालें आहे; तो नृसिंह फारच बलाढ्य आणि क्रूर आहे, तो कोणासच आटोपत नाहीं, त्याचा गर्व जिरवून त्यास शांत कर. ( २९ ) अगो:

पशाम्यति ॥ ततो मत्परमं भावं भैरवं संप्रदर्शय ॥२९॥ सूक्ष्मं सूक्ष्मेण संहृत्य स्थूलं स्थूलेन तेजसा ॥ वक्त्रमानय कृत्तिं च वीरभद्र ममाज्ञया ॥३०॥ इत्यादिष्टो गणाध्यक्षः प्रशांतं वपुरास्थितः ॥ जगाम रंहसा तत्र यत्रास्ते नरकेसरी ॥३१॥ ततस्तं बोधयामास वीरभद्रो हरो हरिम् ॥ वाग्भिर्वाचामधीशानः पिता पुत्रमिवौरसम् ॥३२॥

वीरभद्र उवाच ॥ जगत्सुखाय भगवन्नवतीर्णोऽसि माधव ॥ स्थित्यर्थं विनियुक्तोऽसि हरेण परमेष्ठिना ॥३३॥ जंतुचक्रं भगवता रक्षितं मत्स्यरूपिणा ॥ पृष्ठेनैवं समावध्य भ्रमन्नेकार्णवे पुरा ॥३४॥ बिभर्षि कूर्मरूपेण वराहेणोध्दृतां महीम् ॥ अनेन हरिरूपेण हिरण्यकशिपुर्हतः ३५॥ वामनेन बलिर्बध्दस्त्वया विक्रमता पुनः ॥ त्वमेव सर्वलोकानां भूतानां प्रभुरच्युत ॥३६॥ यदा यदा हि लोकस्य दुःखं किंचिच्च

---

दर त्यास शांतपणाच्या दोन गोष्टी सांग; व तो शांतपणानें नच वळला तर माझें शेवटचें प्रळयकाळच्या वेळचें भयंकर स्वरूप त्याला दाखव. ( प्रथमच भांडण्याचा प्रसंग आणूं नकोस. ) [ ३० ] तूं आपल्या सूक्ष्म तेजानें त्याच्या सूक्ष्मतेजास मार, व स्थूल तेजानें स्थूल तेजास मार, आणि वीरभद्रा, मी तुला असें सांगतों कीं, त्यास मारून त्याचें मस्तक आणि त्याचे अंगावरील कातडें मजकडे घेऊन ये. ( ३१ ) श्रीशिवांनीं असें सांगितल्यावर त्या वीरभद्र गणेश्वरानें अतिशय शांत असें स्वरूप घेतलें, व ज्याठिकाणीं तो नरसिंह होता तेथें तो घाईघाईनें गेला ( ३२ ) व त्या शंकराचा मूर्तिमन्त दुसरा अवतारच अशा वीरभद्रानें, बाप जसा आपल्या पोटच्या मुलाची गोड गोड शब्दांनीं समजूत घालतो, तशी नृसिंहाची समजूत घालण्याचा यत्न केला.

( ३३ ) वीरभद्र ह्मणाला—हे परमेश्वरा लक्ष्मीपते, तूं लोकांस सुख द्यावें ह्मणूनच उत्पन्न झाला आहेस, व परमात्म्या श्रीशिवांनीं तुला तूं जगाचें रक्षण करावें हाच अधिकार दिला आहे. [ ३४ ] पूर्वी समुद्रामध्यें सर्व पृथ्वी बुडूं लागली असतां तूं मत्स्यावतार घेऊन आपल्या पाठीवर पृथ्वी घेऊन ती वर काढिलीस आणि त्यामुळें हजारों जीव वांचविलेस. [ ३५ ] तसेंच तूं कूर्माचें आणि वराहाचें रूप घेऊन दैत्यांपासून पृथ्वीचें रक्षण केलेंस. फार लांब कशाला? आतांच तूं प्रत्यक्ष नृसिंहरूप घेऊन हिरण्यकशिपूस मारिलेंस. [ ३६ ] तूं वामन रूप घेऊन व त्याचवेळीं त्रिविक्रमरूप घेऊन बलीस पराजित करून बांधलेंस, हे अच्युता, श्रीविष्णो, तूंच सर्व लोकांचा ईश्वर आहेस. [ ३७ ] ज्या ज्या वेळीं

जायते ॥ तदा तदाऽवतीर्य त्वं करिष्यसि निरामयम् ॥३७॥ त्वया समो नास्त्यधिकः कुतः शिवपरायणः ॥ त्वया धर्माश्च वेदाश्च स्वे स्वे मार्गे प्रतिष्ठिताः ॥३८॥ यदर्थं त्ववतारोऽयं निवृत्तः सोऽपि केशव ॥ अतोऽतिघोरं भगवान्नारसिंहं वपुस्तव ॥ उपसंहर विश्वात्मन् त्वमेव मम सन्निधौ ॥३९॥

सूत उवाच ॥ इत्युक्तो वीरभद्रेण नृसिंहः सांप्रतं गिरा ॥ ततोऽधिकं प्रजज्वाल चुकोप च हसन् हरिः ॥४०॥

नृसिंह उवाच ॥आगतोऽसि कुतस्त्वत्र गच्छ त्वं मा हितं वद ॥ इदानीं संहरिष्यामि जगदेतच्चराचरम् ॥४१॥ संहर्तुर्न हि संहारस्त्वत्तो वा परतोऽपि वा ॥ शासितुर्मम सर्वस्य शास्ता कोऽपि न विद्यते ॥४२॥ मत्प्रसादेन सकलं समर्यादं प्रवर्तते ॥ अहं हि सर्वशक्तीनां प्रवर्तकनिवर्तकः ॥४३॥ यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ॥ तत्त-

---

लोकांस कांहींतरी संकटाचा प्रसंग येतो, त्या त्या वेळीं तूं अवतार घेऊन लोकांचें दुःख दूर करून त्यांस सुख देतोस. [ ३८ ] तूं मोठा शिवभक्त आहेस तुजसारखा किंवा तुझ्यापेक्षां जास्त असा दुसरा शिवभक्त कोणीही नाहीं. तूंच धर्म आणि वेद यांस आपआपल्या मार्गास लाविलेस. [ तूंच धर्माची व वेदाची स्थापना केलीस ] [३९] केशवा, ज्या करितां तूं हा अवतार धरिलास तें काम तर होऊन गेलें. ह्यासाठीं हे परमेश्वरा तूंच हें आपलें अतिशय भयंकर नारसिंह-रूप आतांचे आतां माझ्या देखत शांत कर. अरे, मला शांत करण्याचा प्रसंग आणूं नको.

[ ४० ] सूत ह्मणाले—ऋषीश्वरहो, वीरभद्रानें असें सरळपणानें [ मोकळ्यामनानें ] नृसिंहास समजाऊन सांगितल्यावर, नृसिंह पहिल्यापेक्षां जास्तच खवळला व मोठ्यानें हंसून.—

[४१]नृसिंह ह्मणाला—तूं जेथून आलास तेथें मुकाट्यानें परत जा, मला हिताच्या गोष्टी सांगत बसूं नकोस. ह्याचवेळीं मी ह्या सर्व स्थावरजंगम विश्वाचा नाश करून टाकीन. [४२] मी सर्व जगाचा संहार करणारा आहें; माझा संहार तुझ्याकडून किंवा आणखी दुसऱ्या कोणा कडूनही होणार नाहीं: मी ह्या सर्व जगांस शिक्षा करणारा आहें, मला शिक्षा करणारा दुसरा कोणीही नाहीं. [४३] माझ्या कृपेमुळेंच हें सर्व त्रैलोक्य आपापल्या रीतीप्रमाणें वागत आहे. मीच स्वतः ह्या सर्व शक्तींचा प्रवर्तक आणि निवर्तक [जास्त कमी करण्यास मुखत्यार] आहें. [४४] हे

द्धिद्धि गणाध्यक्ष मम तेजो विजृंभितम् ॥४४॥ देवता परमार्थज्ञा मामेव परमं विदुः ॥ मदंशशक्तिसंभूता ब्रह्मशक्रादयः सुराः ॥४५॥ मन्नाभिपंकजाज्जातः पुरा ब्रह्मा चतुर्मुखः ॥ तल्ललाटात्समुत्पन्नो भगवान् वृषभध्वजः ॥४६॥ रजसाधिऽष्ठितः स्रष्टा रुद्रस्तामस उच्यते ॥ अहं नियंता सर्वस्य मत्परं नास्ति दैवतम् ॥४७॥ विश्वाधिकः स्वतन्त्रश्च कर्ता हर्ताऽखिलेश्वरः ॥ इदं तु मत्परं तेजः कः पुमान्सोढुमर्हति ॥४८॥ अथो (तो) मां शरणं प्राप्य गच्छ त्वं विगतज्वरः ॥ अवेहि परमं भावं मदुद्भूतं महेश्वरम् ॥४९॥ वृत्तम् ॥ कालोऽस्म्यहं कालविनाशहेतुर्लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ॥ मृत्योर्मृत्युं विद्धि मां वीरभद्र जीवन्त्यन्ये मत्प्रसादेन देवाः ॥५०॥

सूत उवाच ॥ साहंकारमिदं श्रुत्वा हरेरमितविक्रमः ॥ विहस्यो-

---

गणाध्यक्षा वीरभद्रा, जगामध्यें जो कोणताही प्राणी ऐश्वर्यवान असेल, संपत्तिमान् असेल, किंवा बलवान् असेल, तो माझ्या सामर्थ्यातिशयांमुळें प्रसिद्धीस आला आहे, असें समज. [४५] देवांस मात्र खरें खोटें यथार्थ रीतीनें समजतें; ह्मणून ते सर्वजण मलाच सर्व देवांत श्रेष्ठ मानतात. हे ब्रह्मदेव, इंद्र, वगैरे सर्व देव माझ्या अंशानें माझ्याच शक्तीपासून उत्पन्न झाले आहेत. [ ४६ ] पूर्वी माझ्या नाभिकमलापासून चारमुखें असणारा ब्रह्मदेव उत्पन्न झाला, व त्या ब्रह्मदेवाच्या कपाळापासून परमेश्वर श्रीशंकर उत्पन्न झाला. [ ४७ ] ब्रह्मदेव हा रजोगुणी आहे, आणि रुद्र हा तमोगुणी आहे, असें सर्व लोक ह्मणतात. मी ह्या सर्व जगाचा अधिपति आहें. माझ्यापेक्षां श्रेष्ठ दैवत कोणीही नाहीं. [ ४८ ] मी सर्व त्रैलोक्यापेक्षां श्रेष्ठ आहें, मी स्वतंत्र आहें, मीच सर्व सृष्टि उत्पन्न केली, मीच सर्व सृष्टीचा संहार करितों, मी सर्व त्रैलोक्याचा अधिपति आहे, माझें हें अलौकिक सामर्थ्य कोणाच्यानें सहन करवेल ? माझें तेज कोणासही सहन करवणार नाहीं.[४९] ह्यासाटीं तूं मला शरण ये, आणि येथून खुशाल सुखरूप परत जा. तूं आपल्या मनांत हें पक्कें समज कीं, हा महेश्वर श्रीशंकर मजपासून उत्पन्न झाला आहे. [ ५० ] मी स्वतः काल आहें आणि कालाचा नाश करणाराही मीच आहें, मी लोकांचा संहार करावयास येथें आलों आहें; हें वीरभद्रा, मी मृत्यूचाही मृत्यु आहें असें समज. हे इतर सर्व देव माझ्या साह्यानेंच जीवंत राहिले आहेत.

[५१] सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, श्रीविष्णूचें तें गर्वाचें बोलणें ऐकून तो अलौकिक सामर्थ्यवान् वीरभद्र हंसला, आणि अतिशय संतापानें त्याचे ओंठ

वाच वै त्वङ्गं तं कोपस्फुरिताधरः ॥५१॥
वीरभद्र उवाच ॥ किं न जानासि विश्वेशं संहर्तारं पिनाकिनम् ॥ असद्वादोऽतिवादश्च विनाशाय हि केवलम् ॥५२॥ तवान्योन्यावताराणि कथाशेषाणि सांप्रतम् ॥ कृतानि येन तेनैतत्कथाशेषं भविष्यति ॥५३॥ दोषोऽत्र तस्य येन त्वमवस्थामीदृशीं गतः ॥ तेन संहारदक्षेण क्षणात्त्वं क्षयमेष्यति ॥५४॥ प्रकृतिस्त्वं पुमान्रुद्रस्त्वयि तद्वीर्यमाहितम् ॥ त्वन्नाभिपंकजाज्जातः पंचवक्त्रः प्रजापतिः ॥ मयि त्वयि ब्रह्मणि च स्थितः सर्वत्र शंकरः ॥५५॥ सृष्ट्यर्थं जगतः पूर्वं शंकरं नीललोहितम् ॥ ललाटेऽचिन्तयद्ब्रह्मा तपस्युग्रे व्यवस्थितः ॥ तल्ललाटादभूच्छंभुः सृष्ट्यर्थं तन्न दूषणम् ॥५६॥ अंशोऽहं देवदेवस्य महाभैरवरूपिणः ॥ त्वत्संहृतौ नियुक्तोऽस्मि विनयेन बलेन च ॥५७॥ एकं रक्षो विदार्य त्वं

---

थरथर कांपूं लागल्यावर त्या अज्ञान्यास [ विष्णूस तो ह्मणूं लागला.

[५२] वीरभद्र ह्मणाला—अरे श्रीविष्णो, तो सर्व जगाचा संहार करणारा पिनाक धनुष्य हातांत घेणारा शिव त्रैलोक्याचा अधिपति आहे, हें तुला माहित नाहीं काय? एखाद्यास भलते भलते अपशब्द बोलणें, किंवा अतिशय भांडत बसणें हें स्वतःचे नाशास कारण आहे. [५३] पूर्वी तुझे अवतार जितके झाले तितक्या अवतारांचा संहार करून ज्यानें तुझें तें चरित्र मात्र जगांत राहूं दिलें तोच आताहीं तुला मारून तुझी कंथा तेवढी जगांत ठेवील. [५४] ज्यानें तुला हल्लीं अशा स्थितीस आणलें आहे, त्या काळाचाच हा दोष आहे. आणि तुझा संहार करण्यास समर्थ असलेल्या काळामुळें तूं आतांच मरण पावशील. [५५] हे विष्णो, तूं प्रकृति असून श्रीरुद्र हा पुरुष आहे, त्यानें तुझ्यांत वीर्य स्थापन केलें. तुझ्या नाभिकमलापासून पांच तोंडें असणारा ब्रह्मदेव उत्पन्न झाला माझ्यांत, तुझ्यांत आणि ब्रह्मदेवांत सर्व ठिकाणीं शंकर व्यापून राहिलेला आहे. [५६] पूर्वी सृष्टि उत्पन्न करावयासाठीं खडतर तपश्चर्या करणाऱ्या ब्रह्मदेवानें आपल्या कपाळावर नीललोहित शंकराचें चिंतन केलें; त्यामुळें ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्याचें कामांत साह्य करण्याकरितां श्रीशंकर ब्रह्मदेवाच्या कपाळापासून उत्पन्न झाले. ह्यांत शंकरास कोणताही कमीपणा नाहीं. [५७] तो देवाधिदेव श्रीशिव महाभैरवस्वरूप आहे, त्याचा मी अंश आहें, त्यानें मला तुला मारून टाकण्याकरितां पाठविलें आहें. मी तुला प्रथम सामोपचारानें सांगून पाहतों; तूं ऐकिलें नाहींस तर मी बळजोरीनें तुला मारून टाकीन. [५८] तूं एका

१

तच्छक्तिकलया युतः ॥ अहंकारावलेपेन गर्जसि त्वमयंत्रितः ॥५८॥ उपकारोऽप्यसाधूनामपकाराय केवलम् ॥यन्निंदसि महेशानं त्वां पुनर्बहु मन्यसे ॥५९॥ न त्वं स्रष्टा न संहर्ता न स्वतंत्रोऽसि कुत्रचित् ॥ कुलालचक्रवच्छक्त्या प्रेरितोऽसि पिनाकिनः ॥६०॥ अद्यापि तव पश्य त्वं कपालं कूर्मरूपिणः ॥ हरहारलतामध्ये मुग्ध कस्मान्न बुध्यसे ॥६१॥ विस्मृतं तत्तदंशेन दंष्ट्रोत्पाटनपीडितः ॥ वराहविग्रहस्तेऽद्य साक्रोशस्तारकारिणा ॥६२॥ भृगुणा शपितं पूर्वं विस्मृतं तव दुर्मते ॥ शंकुकर्णगणेशेन च्छिन्नं ते केशसंचयम् ॥६३॥ दग्धोऽसि यस्य शूलाग्रे विष्वक्सेनच्छलाद्भवान् ॥ दक्षयज्ञे शिरश्छिन्नं मया ते यज्ञरूपिणः ॥६४॥ अद्यापि तव पुत्रस्य ब्रह्मणः पंचमं शिरः ॥ छिन्नमेव न केनापि संधितं

---

राक्षसास मारिलेंस, त्याची शक्ति तुझ्या अंगांत शिरली आहे. त्या गर्वामुळें उन्मत्त होऊन तूं मनास येईल तसे वाईट साईट शब्द बोलत आहेस. (५९) दुष्ट मनुष्यावर उपकार केला, तरी अपकार केल्यासारखेंच होतें. कां तर तूंच प्रत्यक्ष पहा कीं, तूं श्रीशिवाची निंदा करितोस, आणि आपली स्वतःची प्रशंसा करीत आहेस. (६०) तूं सृष्टि उत्पन्न करणाराहि नव्हेस, आणि सृष्टीचा संहार करणाराही नव्हेस. तूं कोणत्याही कामांत स्वतंत्र नाहींस. तूं अजगव धनुष्य धारण करणाऱ्या महादेवाच्या शक्तीमुळें कुंभाराच्या चाकाप्रमाणें नेहमीं फिरणारा आहेस. (६१) अरे वेड्या, शंकराच्या गळ्यांतील माळेंत अद्याप कूर्म अवतार धरणाऱ्या तुझें मस्तक तोडून ओंवलेलें आहे; तें तुला ओळखतां येत नाहीं काय? (६२) त्या शंकराचाच अंशभूत असणाऱ्या कार्तिकस्वामीनें, वराह अवतारांत तूं मोठमोठ्यानें आक्रोश करीत असतां तुझ्या दोन दाढा उपटून काढल्या; त्याची तुला आठवण नाहीं काय? (६३) दुष्टबुद्धे तुला पूर्वीं भृगुऋषीनें शाप दिला, त्याची तूं आठवण धरिली नाहींस काय? शंकुकर्णगणेंद्रानें तुझे सगळे केश उपटून टाकिले, तें तूं विसरलास काय? (६४) त्या परमेश्वर श्रीशिवाच्या शूलानें तूं विष्वक्सेन अवताराच्यावेळीं कापला गेलास; व प्रत्यक्ष दक्षप्रजापतीच्या यज्ञांत यज्ञाचें स्वरूप तूं घेतलें असतां मींच तुझें डोकें कापून टाकिलें, तें तूं विसरलास काय? (६५) अद्याप देखील ब्रह्मदेव तुझा प्रत्यक्ष मुलगा असतां त्याचें एक मस्तक तोडलें आहे, तें कोणींही आजपर्यंत सांधलें नाहीं; तुझा तूंच आपला पराक्रम काय आहे तो पहा; तें ब्रह्मदेवाचें

पश्य ते बलम् ॥६५॥ हरनेत्रानलेनैव दग्धोऽभून्मन्मथः क्षणात् ॥ समर्थश्चेदहो त्वं हि तस्यांगं किं न भावयेः ॥६६॥ निर्जितस्त्वं दधीचेन संग्रामे समरुद्गणः ॥ कंडूयमानः शिरसि कथं तद्विस्मृतं त्वया ॥६७॥ चक्रं विक्रमसाहाय्यं चक्रपाणे तव प्रियम् ॥ कुतः प्राप्यं कृतं केन त्वया-तदपि विस्मृतम् ॥६८॥ यत्तामसकलालेशगृहीतस्त्वं पयोनिधौ ॥ निद्रापरवशः शेते स कथं सात्विको भवान् ॥६९॥ त्वदादिस्तंभपर्यन्तं रुद्रशक्त्या विजृंभितम् ॥ शक्तिमान्परमो देवस्तयैव त्वं विमोहितः ॥७०॥ त्वच्चेतसोऽपि माहात्म्यं युवां द्रष्टुं न हि क्षमौ ॥ सूरयो यत्रपश्यन्ति तद्विष्णोः परमं पदम् ॥७१॥द्यावापृथिव्योरिंद्राग्न्योर्धियां तव यमस्य च ॥ वरुणस्य शशांकस्य जनिता परमेश्वरः ॥७२॥ कालोऽसि त्वं महाकालः कालकालो महेश्वरः ॥ अतस्तद्रुद्रकलया भृत्यो मृत्यु-

---

पांचवें तोंड तूं कां पूर्वीसारखें चिकटविलें नाहींस ? (६६) महादेवांनीं तिसरा डोळा रागानें वटारल्यामुळें त्यांतील विस्तवानें मदन एका क्षणांत जळून गेला. काय आश्चर्य आहे पहा ! जर तूंच सर्वांपेक्षां जास्त शक्तिमान आहेस तर त्या मदनाचें आंग तूं पूर्वीप्रमाणें कां करीत नाहींस ? (६७) दधीच मुनीनें तुला युद्धामध्यें देवांच्या समुदायासह जिंकलें, त्यावेळेस तूं आपलें डोकें खाजवीत होतास, तें तूं कसें विसरलास? (६८) तुझ्या सुदर्शनचक्रामुळें तुझ्या पराक्रमाची एवढी प्रसिद्धि झालेली आहे, व तें सुदर्शनचक्र तुला मनापासून आवडतें, तें तुला कोणाकडून मिळालें ? तें कोणी केलें हें देखील तूं विसरून गेलास काय ? (६९) तूं धडधडीत तामसगुणाच्या शक्तीनें पीडिला जाऊन, समुद्रामध्यें नेहमीं झोंप घेत पडतोस; त्या तुला सात्विक स्वभावाचा तरी कसा ह्मणावें ? (७०) तुझ्यापासून तों तहत एखाद्या लहान सहान खांबापर्यंत हें सर्व जग रुद्राच्या शक्तीनें ( मायेनें ) व्यापलेलें आहे; तो परमेश्वर महादेव सर्वांपेक्षां शक्तिमान आहे. त्याच्या मायेमुळें तूं अज्ञान झालास. [७१] विद्वान लोक ज्या शिवतत्वाला पाहतात तें विष्णूपेक्षां श्रेष्ठ आहे. त्या शिवाचें माहात्म्य तुला आणि ब्रह्मदेवाला ही यथार्थ रीतीनें समजत नाहीं. [७२] तो श्रीशिव पृथ्वीचा, आकाशाचा, इंद्राचा, अग्नीचा, बुद्धींचा, तुझा, यमाचा, वरुणाचा आणि चंद्राचाही उत्पन्नकर्ता आहे. [७३] हे विष्णो तूं काल आहेस, तर तो महेश्वर महाकाल आहे; फार काय परंतु तो कालाचाही काल आहे. ह्यासाठीं त्या रुद्राच्या सामर्थ्यामुळें ( कलेमुळें )

र्भवानसि ॥७३॥ स्थिरधन्वाक्षयद्वीरो रुद्रो विश्वाधिकः प्रभुः ॥ उप-
हर्तुं युवां भीमौ मृगपक्षी हिरण्मयः ॥७४॥ शास्ताऽशेषस्य जगतो न
त्वं नैव चतुर्मुखः ॥ इत्थं सर्वं समालोक्य संहरात्मानमात्मना ॥७५॥
नोचेदिदानीं क्रुध्दस्य महाभैरवरूपिणः ॥ वज्राशनिरिव स्थाणौ
त्वयि मन्युः पतिष्यति ॥७६॥

सूत उवाच ॥ इत्युक्तो वीरभद्रेण नृसिंहः क्रोधविव्हलः ॥ ननर्दो-
त्प्लुत्य वेगेन तं ग्रहीतुं प्रचक्रमे ॥७७॥ अत्रांतरे महाघोरं विपक्षक्षय-
कारकम् ॥ गगनव्यापिदुर्दर्शं शार्वं तेजः समुद्बभौ ॥७८॥ वीरभद्रस्तु
तद्रूपः क्षणाद्देवैरदृश्यत ॥ न तद्धिरण्मयं रौप्यं न सौरं नाग्निसंनिभम्
॥७९॥ न तडिचंद्रसदृशमभूतोपममैश्वरम् ॥ तदा तेजांसि सर्वाणि

---

तूं त्या शिवाचा दास आहेस, तूं मृत्यु आहेस, मुख्य काल नव्हेस. [७४] त्या श्रीशिवाचें धनुष्य नेहमीं स्थिर आहे, त्याचें शौर्य कधींही कमी होत नाहीं तो रुद्र त्रैलोक्यापेक्षां श्रेष्ठ आहे, तो परमेश्वर आहे, तुह्मी दोघांजणांनीं ( विष्णु आणि ब्रह्मदेव यांनीं ) एक जणानें भयंकर सूकराचें आणि एकजणानें सोन्याच्या हंसाचें रूप घेऊन, त्या शिवलिंगाचा अंत पहावयाचा यत्न केलात; त्याचा अंत तुह्मास लागला काय ? [७५] ह्या सर्व त्रैलोक्याचा रक्षणकर्ता तूं नव्हेस, आणि ब्रह्मदेव ही नव्हे; हें सर्व नीट लक्षांत आणून तूं आपले आपणच स्वतःचें क्रूरपण कमी करून शांत हो. [७६] नाहींपेक्षां त्या रागावलेल्या महाभैरवस्वरूपी शंकराचा राग, इंद्राचें वज्र जसें पर्वतावर पडावें, तसा तुजवर पडेल.

(७७) सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, वीरभद्रानें नृसिंहास असें नीट समजावून सांगितल्यावर त्या सांगण्यानें तो शांत न होतां, रागानें उलट जास्तच खवळला व त्यानें मोठ्यानें ओरडून मोठ्या आवेशानें वीरभद्रास धरण्याकरितां त्यावर उडी मारिली. (७८) इतक्यांत अतिशय भयंकर, शत्रूंचा एका क्षणांत नाश करणारें, आणि आकाश देखील भरून टाकणारे आणि न पाहवणारें शिव-तेज प्रकट झालें. [७९] तो वीरभद्र तत्काळ शिवतेजोरूप झालेला देवांनीं पाहिला. तें शिवतेज निव्वळ सोन्यासारखें नव्हें, रुप्यासारखें नव्हें, सूर्याच्या तेजासारखें नव्हें, अग्नीच्या तेजासारखें नव्हें (८०) किंवा विजेच्या तेजा सारखेंही नव्हें; असें तेज पूर्वीं कधींही उत्पन्न झालें नव्हतें. असें तें अलौकिक शिवतेज होतें. त्या शिवतेजांत तीं सर्व तेजें तत्काळ जाऊन

तस्मिन् लीलानि शांकरे ॥८०॥ नृसिंहवक्त्रनेत्राभ्यां सूक्ष्मं तेजो विनिर्गतम्॥ रक्तो हुताशने चैव क्षणाल्लीनं शिवात्मके ॥८१॥ तदव्यक्तं महत्तेजो व्यक्तं समभवत्ततः ॥ रुद्रसाधारणैश्चिन्हैश्चिन्हितं विकृताकृति ॥८२॥ ततः शरभरूपेण सुव्यक्तः परमेश्वरः ॥ पश्यतां सर्वदेवानां जयशब्दादिमंगलैः ॥८३॥ सहस्रबाहुर्जटिलश्चंद्रार्धकृतशेखरः॥ मृगस्त्वर्धशरीरेण पक्षाभ्यां चंचुना द्विजः ॥८४॥ अतितीक्ष्णमहादंष्ट्रो वज्रतुल्यनखायुधः ॥ कण्ठे कालो महापुच्छश्चतुष्पाद्वन्हिसन्निभः ॥८५॥ अधोगतचतुष्पाद उपरिष्ठाच्चतुष्पदः ॥ युगान्तोद्यतजीमूतभीमगंभीरनिस्वनः ॥८६॥ समसत्वप्रवृत्ताग्निव्यावृत्तनयनत्रयः ॥ स्पष्टदंष्ट्राधरोष्ठश्च हुंकारमुखरो हरः ॥८७॥ हरिस्तद्दर्शनादेव विनष्टबलविक्रमः ॥बभूवोद्यत्सहस्रांशुहतखद्योतवद्दृशम्॥८८॥ अथ प्रवृत्य पक्षाभ्यां नाभिपद्भ्यां

---

मिळालीं. (८१) नृसिंहाच्या तोंडांतून आणि डोळ्यांतून सूक्ष्म तेज बाहेर निघालें आणि अग्नींत जशी रक्ताची आहुती शिरावी तसें तें शिवतेजांत मिळून गेलें. [८२] त्यानंतर तें अव्यक्त ( गुप्त ) असणारें महत्तेज प्रकट झालें, त्याशिवरूपास, रुद्रास जीं जीं चिन्हें असतात, तीं तीं सर्व होतीं, त्याचा आकार विद्रूप होता. (८३) त्यानंतर तो परमेश्वर वीरभद्रगणेश्वर, सर्व देव त्याचेकडे पाहून आनंदानें जयजयकार करीत असतां, शरभरूपासारखा स्पष्ट दिसूं लागला. (८४) त्याला एक हजार हात होते, त्याच्या मस्तकावर जटा होत्या, त्याच्या मस्तकावर अर्ध चंद्र शोभत होता, त्याचें अर्ध शरीर मृगाचें ( पशूचें ) होतें, व त्याला दोहोंकडे दोन पंख असून चोंच होती. त्यामुळें तो पक्ष्यासारखा दिसत होता. [८५] त्याच्या दाढा फार तीक्ष्ण धारेच्या असून मोठमोठ्या होत्या, त्याचीं नखें वज्रासारखीं तीक्ष्ण होतीं, त्याचा गळा काळा होता, त्याचें शेंपूट फार मोठें असून, तो जनावरासारखा दिसत होता, (८६) त्याला खालीं चार पाय असून वर चार पाय होते, प्रळयकाळच्यावेळीं वृष्टि करणाऱ्या मेघाच्या गडगडण्यासारखा त्याचा अवाज होता. [८७] त्या परमेश्वर हराचे तीन डोळे, सारख्या तेजाच्या अग्नीच्या तीन ज्वाला फिराव्या तसें फिरत होते, त्याच्या दाढा आणि ओंठ स्पष्ट दिसत होते, व तोंडानें तो हुंकार करीत होता. (८८) त्या शरभास पाहिल्याबरोबर लागलेंच नृसिंहाचा पराक्रम आणि शौर्य पार नाहींसें झालें, आणि उगवलेल्या सूर्यापुढें काजवा जसा निस्तेज दिसावा तसा श्रीविष्णु ( नृसिंह निस्तेज दिसूं लागला. [८९] मग शरभानें आपल्या पंखांनीं नृसिंहाच्या बेंबीवर

विदारयत् ॥ पादावाबध्य पुच्छेन बाहुभिर्बाहुमंडलम् ॥८९॥ भिंदन्नुरश्च बाहुभ्यां तं जग्राह हरो हरिम् ॥ ततो जगाम गगनं सह देवैः सहर्षिभिः ॥९०॥ सहसैव हरन्विष्णुं हरः श्येन इवोरगम् ॥ उत्क्षिप्योत्क्षिप्य तं गृह्य निपात्य च निपात्य च ॥९१॥ उड्डीयोड्डीय भगवान्पक्षघातविमोहितम् ॥ विभेद पद्भ्यामाक्रम्य हृदयं नखरैः खरैः ॥९२॥ हरिं हरन्तं शरभं विश्वस्येशानमीश्वरम् ॥ नीयमानः परवशो दीनवक्त्रः कृतांजलिः ॥ तुष्टाव परमेशानं हरिस्तं लुठिताक्षरम् ॥९३॥

नृसिंह उवाच ॥ नमो रुद्राय रौद्राय महाग्रासाय जिष्णवे ॥ नम उग्राय भीमाय नमः क्रुद्धाय मन्यवे ॥९४॥ नमो भवाय शर्वाय शंकराय शिवाय ते ॥ कालाय कालकालाय महाकालाय मृत्यवे ॥९५॥ वीराय वीरभद्राय क्षयद्वीराय शूलिने ॥ महादेवाय महते पशूनां पतये

---

प्रहार केला. व पायांनीं त्याचें पोट फाडलें. आपल्या शेपटानें त्याचे पाय बांधून आपल्या हातांनीं नृसिंहाचे हात बांधून टाकिले. [९०] आणि वीरभद्रानें [ शरभानें ] आपल्या दोन हातांनीं नृसिंहाचा ऊर फाडीत फाडीत त्यास दाबून धरिलें आणि नंतर तो देवांसहित आणि ऋषीश्वरांसहित आकाशांत उंच उडाला. [९१] ज्याप्रमाणें बहिरीससाणा सापास उचलून एकदम आकाशांत नेतो त्याप्रमाणें शरभानें नृसिंहास आकाशांत उचलून नेलें व वर नेऊन खालीं जमिनीवर आपटावें पुनः उचलून नेऊन जमिनीवर आपटावें. [९२] वारंवार उडी मारून त्यास पंखांनीं जोरानें प्रहार करावा. अशा तऱ्हेनें श्रीनृसिंहास बेशुद्ध करून शरभानें आपल्या पायांखालीं त्यास दाबून धरून आपल्या हातांच्या तिखट नखांनीं त्याचें हृदय फाडिलें [९३] तो त्रैलोक्यपतिईश्वर शरभ आपणास घेऊन जात आहे असें पाहून अगदीं हताश ( निर्वीर्य ) झालेला नृसिंह लहान तोंड करून हात जोडून अडखळत अडखळत त्याची स्तुति करूं लागला:

[९४] नृसिंह ह्मणाला—तूं रुद्र आहेस. तुझा स्वभाव फार रागीट आहे, तुझा अधिकार फार मोठा आहे, तूं सर्वांस अजिंक्य आहेस, तुला नमस्कार असो. तुला उग्र, भीम, क्रुद्ध, मन्यु अशीं अनेक नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. [९५] तुला भव, शर्व, शंकर, शिव, काल, कालकाल, महाकाल आणि मृत्यु अशीं अनेक नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. [९६] तुला वीर, वीरभद्र, क्षयद्वीर, शूली, महादेव, महान् पशूंचा अधिपति, अशीं अनेक नांवें आहेत,

नमः ॥९६॥ एकाय नीलकण्ठाय श्रीकण्ठाय पिनाकिने ॥ नमोऽनन्ताय सूक्ष्माय नमस्ते मृत्युमृत्यवे॥९७॥ पराय परमेशाय परात्परतराय ते॥ परापराय विश्वाय नमस्ते विश्वमूर्तये ॥९८॥ नमो विष्णुकलत्राय विष्णुक्षेत्राय भानवे ॥ भैरवाय शरण्याय महाभैरवरूपिणे ॥९९॥ नमो नृसिंहसंहर्त्रे कालकालपुरारये ॥ नमः पाशौघसंहर्त्रे विष्णुमायांतकारिणे ॥१००॥ त्र्यंबकाय त्रियक्षाय शिपिविष्टाय मीढुषे ॥ मृत्युंजयाय शर्वाय सर्वज्ञाय मखारये ॥१०१॥ खषोल्काय वरेण्याय नमस्ते वन्हिरेतसे ॥ महाप्राणाय जीवाय प्राणापानप्रवर्तिने ॥१०२॥ त्रिगुणाय त्रिशूलाय गुणातीताय योगिने ॥ संसारयन्त्रवाहाय महायन्त्रप्रवर्तिने ॥१०३॥ नमश्चिद्व्योमसूर्याय मूर्तिवैचित्र्यहेतवे ॥ वरदाय विकाराय सर्वकारणहेतवे ॥१०४॥ कपालिने करालाय पतये पुण्यमूर्तये ॥ अघो-

---

त्या तुला नमस्कार असो. (९७) तूं एक आहेस. तुला नीलकंठ ह्मणतात, श्रीकंठ ह्मणतात, अनंत ह्मणतात, सूक्ष्म ह्मणतात, मृत्युमृत्यु असें ह्मणतात, त्या तुला नमस्कार असो. [९८] तूं परं आहेस, परमेश्वर आहेस, पराहूनही फारच श्रेष्ठ आहेस, तूं परापर आहेस, तूं विश्व असून विश्वमूर्ति आहेस, त्या तुला नमस्कार असो. [९९] विष्णु हा तुझी स्त्री आहे, विष्णु हा तुझें क्षेत्र आहे, तुला भानु, भैरव, आणि शरण्य अशीं अनेक नांवें आहेत, तूं महाभैरवस्वरूप आहेस, त्या तुला नमस्कार असो. [१००] तूं नृसिंहाचा संहार करणारा आहेस, तूं कालाचा काल असून त्रिपुरांचा शत्रु आहेस. तूं यमाचा नाश केलास, व तूं विष्णूच्या मायेचा नाश करणारा आहेस. [१०१] तुला त्रियंबक, त्रियक्ष, शिपिविष्ट, मीढुष्, मृत्युंजय, शर्व, सर्वज्ञ, मखारि ( दक्ष यज्ञाचा विध्वंस करणारा ), अशीं अनेक नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. [१०२] तूं आकाशांतील एक तेजस्वी ग्रह आहेस, तूं वरेण्य आहेस, अग्नि हा तुझें रेत आहे, तूं महाप्राण आहेस, तुला जीव ह्मणतात, तूंच प्राण आणि अपानवायूस चालण्याची शक्ति देतोस, त्या तुला नमस्कार असो. (१०३) तूं सत्वरजस्तमोगुणस्वरूप आहेस, तुझ्या हातांत त्रिशूल आहे, तूं त्रिगुणांहूनही पलीकडे आहेस. तूं योगी आहेस, तूं संसाररूप चक्राचा चालक असून महायंत्राचा प्रवर्तक आहेस. (१०४) तूं चैतन्यरूप आकाशांतील सूर्य आहेस, तूं अनेक तऱ्हेचे स्वभाव ( मूर्ति ) करण्यास मूलकारण आहेस, तूं वर देणारा आहेस, तूं विकारी ( देहधारण करणारा ) आहेस, तूं सर्व कारणाला मूलकारण आहेस, त्या तुला नमस्कार असो. [१०५] तुला कपाली ह्मण-

रायाग्निनेत्राय अकुलीशाय शंभवे ॥१०५॥ भिषक्तमाय चण्डाय द-ण्डिने घोररूपिणे ॥ मेघवाहाय देवाय पार्वतीपतये नमः ॥१०६॥ अव्यं-क्ताय विशोकाय स्थिराय स्थिरधन्विने ॥ स्थाणवे कृत्तिवासाय नमः पंचार्थहेतवे ॥१०७॥ विरजायैकपादाय नमश्चन्द्रार्धमौलये ॥ नम-स्तेऽध्वरराजाय वचसां पतये नमः ॥१०८॥ योगीश्वराय सत्याय नि-त्याय परमात्मने ॥ सर्वात्मने नमस्तुभ्यं नमः सर्वेश्वराय ते ॥१०९॥ एकद्वित्रिचतुःपंचकृत्वस्ते च नमो नमः ॥ दशकृत्वः शतकृत्व आस-हस्रं नमो नमः ॥११०॥ नमो परिमितं कृत्वोऽनन्तकृत्वो नमो नमः ॥ नमो नमो नमो भूयः पुनर्भूयो नमो नमः ॥१११॥

सूत उवाच ॥ नामाष्टकशतेनैवं स्तुत्वाऽमृतमयेन तु ॥ पुनस्तं पा-

---

तात, तुला कराल ह्मणतात, तुला पति ह्मणतात, तूं पुण्यमूर्ति आहेस, तूं शांत स्वरूपाचा आहेस, तुझ्या तिसऱ्या डोळ्यांत अग्नि आहे, ज्यांस कुल नाहीं अशा योगीजनांचा तूं ईश्वर आहेस, तुला शंभु ह्मणतात, त्या तुला नमस्कार असो. (१०६) तूं उत्तम वैद्य आहेस, तुला चंड [ अतिशय रागीट ] ह्मणतात, तुझ्या हातांत दंड आहे, तुझें स्वरूप भयंकर आहे, मेघ हा तुझें वाहन आहे, तूं परमेश्वर आहेस, आणि पार्वतीचा पति आहेस, (१०७) तूं अव्यक्त [गुप्त ] आहेस तूं शोकरहित आहेस, तूं स्थिर आहेस, तुला स्थिरधन्वा ह्मणतात ( तुझ्या धनुष्यास सर्वत्र विजय मिळत असल्यानें त्याची धांदल कधीं होत नाहीं ), तुला स्थाणु ह्मणतात, तुझे अंगावर हत्तीचें कातडें आहे, तूं सृष्टि, स्थितिलय ( संहार ), तिरोधान, आणि अनुग्रह ह्या पांच अर्थांचा मूल कारण आहेस. [१०८] तूं निर्दोष आहेस, तुला एकपाद ह्मणतात, तुझ्या मस्तकावर अर्धचंद्र आहे, त्या तुला नमस्कार असो. तूं यज्ञाचा अधिपति आहेस, तूं वाणींचा अधिपति आहेस त्या तुला नमस्कार असो. (१०९) तूं योगीलोकांचा ईश्वर आहेस, तुला सत्य ह्मणतात, नित्य ह्मणतात, परमात्मा ह्मणतात, तूं सर्वात्मा आहेस, तूं सर्वांचा ईश्वर आहेस, त्या तुला नमस्कार असो. [११०] एक वेळ, दोन वेळ, तीन वेळ, चार वेळ पांच वेळ तुला नमस्कार असो, शंभर वेळांपासून एक हजार वेळांपर्यंत तुला वरचेवर नमस्कार असो. (१११) तुला संख्या मोजून नमस्कार असोत, आणि असंख्य नमस्कार असोत, तुला वरचेवर नमस्कार असोत, आणखी पुनः नमस्कार असोत.

[११२] सूत ह्मणतात--- ऋषीश्वरहो, ह्याप्रमाणें कोळम आणि अमृताप्रमाणें

र्थयामास नृसिंहः शरभेश्वरम् ॥११२॥

नृसिंह उवाच ॥यदा यदा ममाज्ञानमत्यहंकारदूषितम् ॥ तदा तदा-पनोत्तव्यं त्वयैव परमेश्वर ॥११३॥ एवं विज्ञाप्य सव्रीडः शंकरं नरके-सरी॥ ततः संत्यक्तवान् विष्णुर्जीवितं स्वापराधतः॥११४॥ तद्वक्त्रशेषं तद्गात्रं हृत्वा शरभविग्रहः ॥अतींद्रियत्वमगमद्वीरभद्रः क्षणात्ततः॥११५॥

देवा ऊचुः ॥ अद्य ब्रह्मादयः सर्वे वीरभद्र त्वदोजसः ॥ जीविताःस्मो वयं देव पर्जन्येनैव पादपाः ॥११६॥ यस्माद्भीषा दहत्यग्निरुदेति च रविः शशी ॥ वातो वाति तु सोऽसि त्वं मृत्युर्धावति पंचमः ॥११७॥ यदव्यक्तं परं व्योम कालातीतं सदाशिवम् ॥ भवन्तमेव भगवन् वदन्ति ब्रह्मवादिनः ॥११८॥ के वयं तव माहात्म्यवेदने परमेश्वर ॥ नाधिक्रियेरन् जात्यन्धा रूपलावण्यवर्णने ॥११९॥ उपसर्गेषु सर्वेषु शा-

---

मधुर शब्दांनीं एकशें आठ नांवांनीं नृसिंहानें शरभेश्वराची स्तुति केली; आणि पुनः तो नृसिंह शरभाची प्रार्थना करूं लागला.

(११३) नृसिंह ह्मणाला--- हे परमेश्वरा, जेव्हां जेव्हां माझ्या बुद्धीला भ्रम पाडणारें अज्ञान माझ्या अंगांत येत जाईल, तेव्हां तेव्हां परमेश्वरा तूंच तें दूर केलें पाहिजेस. (११४) अशी शंकराची विनंति करून आणि आपल्या अपराधामुळें फारच लाजून त्या नृसिंहाचें स्वरूप घेतलेल्या श्रीविष्णूनें आपला प्राण सोडिला. (११५) मग शरभरूप घेणारा वीरभद्रही त्या नृसिंहाच्या डोकीचा भाग आणि त्याचे अंगावरील कातडें घेऊन तत्काळ सौम्य स्वरूपाचा झाला.

[११६] तेव्हां देव ह्मणाले--- हे पराक्रमी वीरभद्रा, तुझ्या सामर्थ्यामुळें आम्ही ब्रह्मदेव वगैरे सर्व देव, पावसामुळें जशीं झाडें सुरक्षित रहावीं, तसे सुरक्षित ( जिवंत ) राहिलों. [११७] ज्या परमेश्वराच्या सामर्थ्यानें अग्नीच्या अंगीं जाळण्याची शक्ति आहे, ज्याच्या सामर्थ्यानें सूर्य व चंद्र उगवतात, ज्याच्या आज्ञेनें वारा वाहतो, व ज्याचे आज्ञेंत मृत्यु वागतो, तो तूं आहेस. [११८] हे परमेश्वरा, तुलाच ब्रह्मवेत्तेलोक अव्यक्त ( प्रकट न दिसणारा ), पराकाश, कालातीत ( काळाची शक्ति ज्यावर चालत नाहीं असा ), आणि सदाशिव असें ह्मणतात. (११९) हें परमेश्वरा, तुझें माहात्म्य यथार्थरीतीनें वर्णन करावयाची आमची काय शक्ति आहे? जे लोक जन्मापासून आंधळे आहेत, त्यांच्या हातून सौंदर्याचें यथार्थ वर्णन कसें होईल? [१२०] हे वीरभद्र गणेश्वरा, श्रीशिवा,

२

तुमस्मान्गणाधिप ॥ एकादशात्मा भगवन् वर्तसे कृपया हर ॥१२०॥ ईदृशान्यवताराणि दृष्टाऽपि बहुशस्तव॥ कदाचित्त्वां न जानीमो वंचितास्तव मायया ॥१२१॥ गुंजाभिरिव रत्नानि तव रूपाणि सर्वदा ॥ अस्माभिः सह गण्यन्ते तत्क्षन्तव्यं परात्पर ॥१२२॥ द्वे तनू तव रूपस्य वेदज्ञा ब्राह्मणा विदुः ॥ घोराप्यन्या शिवाप्यन्या ते प्रत्येकमनेकधा ॥१२३॥ घोरा तनूस्तव ब्रह्मा सूर्यो विष्णुर्हुताशनः ॥ तथेतरा तनुः शंभो आपो धर्मश्च चन्द्रमाः ॥१२४॥ उभाभ्यां पाहि भगवन् भीतिभ्योऽस्मान्महाबल ॥ भवता हि जगत्सर्वं व्याप्तं स्वेनैव तेजसा ॥१२५॥ ब्रह्मविष्ण्वर्कशक्राग्निजलधर्मपुरोगमाः ॥ सुरासुराः संप्रसूतास्त्वत्तः सर्वे महेश्वर ॥१२६॥ ब्रह्माणमिंद्रं विष्णुं च यममन्यान्सुरासुरान् ॥

---

आह्मांवर हरएक प्रकारचीं संकटें आलीं असतां, त्या सर्व संकटांतून आह्मांस सोडविण्यासाठीं अकरा रुद्रांचीं रूपें घेऊन तूं नेहमीं सिद्ध असतोस. (१२१) अशा प्रकारचे तुझे अवतार आजपर्यंत आह्मी अनेक वेळ पाहिले आहेत, तरी पण तुझ्या मायेमुळें आह्मी अज्ञान झालों असल्यामुळें तुझें स्वरूप एक वेळ देखील आह्मांस यथार्थ रीतीनें ओळखतां येत नाहीं. [१२२] हे परमेश्वरा, तूं श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहेस; जसा एखादा जवाहिऱ्या एका ताजव्यांत गुंजा आणि एका ताजव्यांत रत्नें घालून त्यांचें वजन करितो, तसें अज्ञानपणानें इतर लोक तुला आणि आह्मांला सारखेच समजतात; त्या अपराधाची क्षमा कर. गुंजांची आणि रत्नांची योग्यता जशी सारखी नाहीं तशीच तुझी आमची योग्यता सारखी नाहीं. [१२३] हे परमेश्वरा, तुझीं दोन प्रकारचीं शरीरें आहेत, तीं शरीरें वेद जाणणारे ब्राह्मण जाणतात; त्यांपैकीं एका शरीरास "घोरा" असें ह्मणतात; आणि दुसऱ्या शरीरास "शिवा" असें ह्मणतात; त्या प्रत्येकाचे पुष्कळ भेद होतात. [१२४] हे परमेश्वरा, तुझी घोरा तनु ह्मटली तर ब्रह्मदेव, विष्णु, सूर्य आणि अग्नि हे होत, आणि शिवा तनु ह्मटली तर जल, धर्म आणि चंद्र हे होत. [१२५] हे परमेश्वरा, तूं मोठा पराक्रमी आहेस, तूं ह्या दोन प्रकारच्या शरीरांनीं आमचें सर्व संकटांपासून रक्षण कर. तूं आपल्या स्वतःच्या तेजानें सर्व जग व्यापून टाकिलें आहेस. [१२६] ब्रह्मदेव, विष्णु, सूर्य, इंद्र, अग्नि, जल आणि धर्म वगैरे मुख्य मुख्य देव, आणि बाकीचे सर्व देव दैत्य, तुझ्यापासूनच उत्पन्न झाले आहेत. तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस. [१२७] तूं ब्रह्मदेव, इंद्र, विष्णु, यम आणि दुसरे सर्व देव दैत्य ह्यांस शिक्षा करून त्यांस आपल्या

यतो निगृह्य हरसि हर इत्युच्यसे ततः ॥१२७॥ यतो बिभर्षि सकलं विभज्य तनुमष्टधा ॥अतोऽस्मान्पाहि भगवन्प्रसीद च पुनःपुनः॥१२८॥

सूत उवाच ॥ इति स्तुतो महादेवः प्रसन्नो भक्तवत्सलः ॥ सुराना-ल्हादयामास वरदानैरभीप्सितैः ॥१२९॥ उवाच स सुरान् देवो मह-र्षींश्च सनातनः ॥ एष विष्णुर्नृसिंहाख्यः सदर्पश्च महाबलः ॥१३०॥ ज-गत्संहारकरणे प्रवृत्तो लोकभीषणः ॥ संहृतः शंकरांशेन रुद्रेण शर-भात्मना ॥ वीरभद्रेण जगतां हितार्थं नापरेण च ॥१३१॥ एताव-दुक्त्वा भगवान् वीरभद्रो महाबलः ॥ पश्यतां सर्वदेवानां तत्रैवांत-रधीयत॥१३२॥ नृसिंहकृत्तिवसनस्तदाप्रभृति शंकरः॥ वक्त्रं तन्मुण्ड-मालायां नायकत्वेन कल्पितम् ॥१३३॥ ततो देवा निरातंकाः कीर्त-यन्तः कथामिमाम् ॥ विस्मयोत्फुल्लवदना जग्मुः सर्वे यथा-क्रमम् ॥१३४

---

ताब्यांत ठेवितोस; ह्मणून तुला हर ह्मणतात. [१२८] तूं आपलें शरीर आठ प्रकारांनीं विभागून सर्व जग धारण करितोस, त्यामुळें तुला अष्टमूर्ति असें ह्मण-तात. तूं आमचें रक्षण कर, अशी परमेश्वरा, आह्मी वरचेवर तुला विनंति करितों.

(१२९) सूत ह्मणतात— ऋषीश्वरहो, अशी सर्व देवांनीं श्रीशिवाची मनो-भावानें स्तुति केल्यावर, तो भक्तांविषयीं अतिशय दयाळु असा श्रीशिव प्रसन्न झाला; आणि त्यानें सर्व देवांच्या मनाप्रमाणें इच्छित वर देऊन त्यांस संतुष्ट केलें. (१३०) व तो अनादि परमेश्वर त्या देवांस आणि मोठमोठ्या ऋषींस उ-द्देशून ह्मणाला, हा विष्णु हल्लीं नृसिंहरूप झाल्यामुळें फार बलाढ्य होऊन ग-र्वानें फुगला होता; (१३१) आणि त्यामुळें सर्व जगाचा संहार करण्यास प्रवृत्त झाला होता. हा सर्व लोकांस अतिशय भयंकर वाटत होता. त्यास शंकराच्या अंशानें उत्पन्न झालेल्या, अतिशय रागीट व शरभरूप धारण करणाऱ्या ह्या मी वीरभद्रानें सर्व लोकांचें कल्याण करावयासाठीं मारिलें. दुसऱ्या कोणाची ह्यास मारावयाची शक्ति नव्हती. (१३२) इतकें बोलून तो पराक्रमी वीरभद्र सर्व देव पहात असतां, त्यांच्याच समक्ष तेथेंच गुप्त झाला. (१३३) तेव्हांपासून श्रीशिव नृसिंहाचें कातडें नेसूं लागले आणि त्यांच्या गळ्यांत जी मुंडमाळा होती त्यांत त्यांनीं नृसिंहाचें मस्तक मुख्य ठिकाणीं घातलें. (१३४) वीरभद्रानें शरभावतार घेऊन नृसिंहास मारल्यापासून सर्व देवांची काळजी दूर झाली; व तेव्हांपासून सर्वजण हंसतमुखानें ही कथा वरचेवर लोकांस सांगूं लागले.

सूत उवाच ॥ वृत्तम् ॥ शूलायुधाय सुरवृन्दकमौलिमालालीलायमानचरणांवुजपल्लवाय ॥ हेलावलेपपरिभूष्णुनृसिंहरंहोलीलापहारशरभाकृतये नमोऽस्तु ॥१३५॥ इदं तु शरभाख्यानं न प्रकाश्यं यतस्ततः ॥ प्रकाश्यं शिवभक्तेषु धीरेषु नियतेषु च ॥१३६॥ तैरेव पठितव्यं च श्रोतव्यं च शिवात्मभिः ॥ इदं तु शरभाख्यानं पुण्यं वेदैश्च संमतम् ॥१३७॥ पठतां शृण्वतां चैव सर्वदुःखविनाशनम् ॥ शिवलोकस्य सोपानं वांछितार्थैकसाधनम् ॥ मंगलार्थं पठेद्विद्वान् शिवभक्तो दृढव्रतः ॥१३८॥ इति सूतात्समाकर्ण्य मुनयः शंसितव्रताः ॥ प्रणम्य हृष्टमनसः प्रययुः स्वं स्वमाश्रमम् ॥१३९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने शरभलीला नाम सप्तदशोऽध्यायः॥

---

(१३५) सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, ज्या शरभाचें मुख्य आयुध शूल आहे, देवसमुदायांचीं मस्तकें त्याच्या पायावर नमस्कार घालीत असल्यामुळें ज्याचे दोन्ही पाय कमळांप्रमाणें शोभतात, क्रीडेच्या आवेशामुळें वरचेवर जास्त जास्त वाढणारा नृसिंहाचा आवेश ज्यानें शरभरूप घेऊन एका क्षणांत सहज रीतीनें नाहींसा करून टाकिला; त्या शरभावतार घेणाऱ्या श्रीशिवास नमस्कार असो. (१३६) हें शरभावताराचें चरित्र उगीच भलत्या सलत्या [ अंगीं योग्यता नसणाऱ्या ] मनुष्यास सांगूं नये. जे कोणी शिवभक्त असतील, जे कोणी धैर्यवान् असतील, व जे कोणी इंद्रियनिग्रहवान् असतील अशा लोकांसच सांगावें. (१३७) हें शरभचरित्र पवित्र असून वेदांस मान्य आहे जे लोक नेहमीं शिवचिंतन करितात, व ज्यांस आपलें कल्याण व्हावें असें वाटत असेल, त्यांनींच वाचावें व ऐकावें. (१३८) हें शरभचरित्र जे कोणी वाचतील, किंवा ऐकतील, त्यांचीं सर्व प्रकारचीं दुःखें नाहींशीं होतील. शरभचरित्र वाचल्यानें शिवलोकाची प्राप्ति होते, व वाचणाऱ्याच्या मनांतील सर्व इच्छा पूर्ण होतात. ह्यासाठीं दृढनिश्चयी व विद्वान् शिवभक्तानें आपलें कल्याण व्हावयासाठीं हें शरभचरित्र अवश्य वाचावें. [१३९] ह्याप्रमाणें सूताकडून हें शरभचरित्र ऐकिल्यावर, ते सदाचारी मुनीश्वर सूतास नमस्कार करून आनंदानें आपापल्या घरीं गेले.

ह्याप्रमाणें नीलकण्ठनागनाथ नांवाच्या विद्वच्छ्रेष्ठानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं शरभलीला नांवाचा सतरावा अध्याय संपला.

## ॥ अथाष्टादशोऽध्यायप्रारंभः ॥

॥ श्रीशिवाय नमः ॥ आदित्यपुराणे ॥ ऋषय ऊचुः ॥ श्रुतमस्मा भिरखिलं ज्ञानं माहेश्वरं महत् ॥ इदानीं श्रोतुमिच्छामो विवाहं गिरि जापते ॥१॥

सूत उवाच ॥ यदुवाच पुरा देवः पृष्टो मार्तंडसूनुना ॥ तदहं सं वक्ष्यामि श्रुणुध्वं मुनिसत्तमाः ॥२॥ आसीद्दक्षसुता देवी सती त्रैलो क्यपूजिता ॥ त्यक्त्वा दाक्षं शरीरं च बभूवाचलकन्यका ॥३॥ नाम्न कालीति विख्याता विश्वरूपा महेश्वरी ॥ जगच्चैतन्यरूपा या जगच्चै न्यबोधिनी ॥४॥ अधिष्ठितस्तया काल्या हिमवान्पर्वतोत्तमः ॥ पुण्य स्थानमभूद्विप्रा मोक्षदः सर्वदेहिनाम् ॥५॥ सिद्धानां च मुनीनां च ग न्धर्वाणां दिवौकसाम् ॥ आवासः किन्नराणां च स्मरणात् पुण्यदः

---

श्रीशिवास नमस्कार असो. आदित्यपुराणांत हा कथाभाग आहे. (१) ऋषि ह्मणतात— सूता आह्मीं सर्वांनीं महेश्वरासंबंधाचें श्रेष्ठ ज्ञान जें काय हों तें सर्व तुजपासून ऐकिलें, आतां शिवपार्वतीचें लग्न कसें झालें तें ऐकण्याचं इच्छा आहे. ह्यासाठीं तो कथाभाग तूं आह्मांस सांग. असा ऋषींचा प्रश्न ऐकू

२ सूत ह्मणाले— ऋषीश्वरहो, हाच प्रश्न पूर्वी मार्तण्डाच्या मुलानें [ य मानें ] परमेश्वरास विचारिला होता; त्यावेळीं त्यानें त्यास जें कांहीं सांगितं तेंच मी तुह्मांस सांगतों. हे मुनीश्वरहो, तें तुह्मीं नीट लक्ष्य देऊन ऐकून घ्या (३) सर्व त्रिभुवनांत चांगुलपणाविषयीं प्रसिद्ध असणारी देवी सती नांवाचं दक्ष प्रजापतीची मुलगी होती तिनें तें दक्ष प्रजापतीपासून उत्पन्न झा लेलें शरीर टाकून देऊन ती हिमालय पर्वताच्या पोटीं मुलगी होऊन जन्मली. (४) ती पुढें काली ह्या नांवानें प्रसिद्धीस आली, ती महेश्व त्रैलोक्यस्वरूप होय. ती सर्व जगाचें चैतन्यस्वरूप होय. ती सर्व जगा चैतन्याचा बोध करणारी होती. [५] ती काली त्याच्या पोटीं जन्मास आली ह्म णून तो हिमालय पर्वत सर्व पर्वतांत श्रेष्ठ पर्वत ह्मणून प्रसिद्ध झाला; ब्राह्मणहो, त्याचें स्थान पवित्र मानलें जाऊन तो सर्व प्राणिमात्रांस मोक्षप्राप्तीचें साधन असा झाला ( त्याचेवर जाऊन तपश्चर्या केल्यानें प्राणी मोक्षास जाऊं लागले) [६] त्या पर्वतावर सिद्ध लोक, मुनीश्वर लोक, गंधर्व लोक, देव आणि किन्न

नृणाम् ॥६॥ शिवं भर्तारमिच्छन्ती तस्मिन् गिरिवरोत्तमे ॥ तपस्तेपे-शिवा काली मातापित्रोरनुज्ञया ॥७॥ अथास्मिन्नन्तरे दैत्यस्तारको लोककंटकः॥ जातो दैत्यकुले बालो मृत्युरूपो दिवौकसाम् ॥८॥ ब्रह्माणं तपसा तोष्य वरं तस्मादवाप्य च ॥ देवाः पलायितास्तेन तारकेण बलीयसा ॥९॥ देवानां योषितो याश्च बलादपहृताश्च ताः ॥ दुःखाग्निना सुसन्तप्ताः शक्राद्याः प्रथितौजसः ॥१०॥ गता देवाः शरण्यं च ब्रह्माणं त्रिदशेश्वरम् ॥ आगतांश्च सुरान्दृष्ट्वा ततः प्रोवाच पद्मजः ॥११॥

ब्रह्मोवाच ॥ कस्मात्रस्ताः सुरा यूयमागता वै ममांतिकम् ॥ ब्रूत तत्सकलं देवा उपायं वच्मि तत्स्फुटम् ॥१२॥

देवा ऊचुः ॥ तारकाद्भयसन्त्रस्ताः शरणं वयमागताः ॥ यथा मृत्योर्भयं देव तस्मान्नस्त्रातुमर्हसि ॥ अपि क्षणं सुरश्रेष्ठ न लभामो वयं

---

रहात असत; त्याचें स्मरण केलें तरी मनुष्यास पुण्य लागे. [७] असो. पुढें ती काली त्याच हिमालयपर्वतावर, तो पर्वत सर्व पर्वतांत श्रेष्ठ आहे असें मानून, आईबापांच्या संमतीनें, आपणास शिव पति व्हावा ह्मणून तपश्चर्या करूं लागली. (८) त्याच सुमारास लोकांस कांट्यासारखें दुःख देणारा, व स्वर्ग लोकांत राहणाऱ्या देवांचा मूर्तिमन्त मृत्युच, असा तारक नांवाचा कोणी दैत्य दैत्यांच्या वंशांत जन्मला. [९] त्यानें ब्रह्मदेवाची तपश्चर्याकरून त्यापासून " तूं सर्व देवांस अजिंक्य होशील " असा वर मिळविला; आणि मग त्या पराक्रमी तारकासुरानें सर्व देवांस स्वर्ग लोकांतून पळवून लाविलें. [१०] देवांच्या बायका जितक्या होत्या तितक्या सर्व तारकासुरानें बळजबरीनें धरून नेल्या. इंद्रादिक देव मोठमोठे पराक्रमी होते, तरी त्या अपमानामुळें अगदीं त्रासून गेले. (११) मग ते सर्व देव मिळून शरणागतांचें रक्षण करणाऱ्या व सर्व देवांत मुख्य अशा ब्रह्मदेवास शरण गेले सर्व देव आपणास शरण आले आहेत असें पाहून त्यास ब्रह्मदेव ह्मणाला—

(१२) ब्रह्मदेव ह्मणाला—देवहो, तुह्मांस कोणापासून इतका त्रास झाला ह्मणून तुह्मी सर्वजण मजकडे आलां आहां ? तें सर्व मला निर्भयपणानें सांगा, ह्मणजे मी तुह्मांस त्याचा योग्य उपाय सांगतों. असें ब्रह्मदेवाचें आश्वासन मिळतांच—

(१३) देव ह्मणाले—आह्मांस तारकासुरापासून फारच त्रास झाला, ह्मणून तों आमचा त्रास चुकण्यासाठीं आह्मी सर्वजण तुला शरण आलों. परमेश्वरा, मृत्यूपासून जसें प्राण्याचें रक्षण करावें, तसें तारकासुरापासून तूं आमचें रक्षण कर. हे

सुखम् ॥१३॥ विंशद्वर्षसहस्राणि हरितारकयोस्तदा ॥ अहर्निशमविश्रान्तं युद्धमासीत्सुदारुणम् ॥१४॥ तथापि न जितस्तेन देवदेवेन चक्रिणा ॥ अवध्योऽयमिति ज्ञात्वा ययौ त्यक्त्वा महोदधिम् ॥ भ्रान्तचित्तस्तदा शंखी गतपूर्णमहाबलः ॥१५॥ वयमप्येवमेवं हि भीतास्त्वां शरणं प्रभो ॥ आगतास्त्राहि नस्तस्मात्सुखदो भव पद्मज ॥१६॥

ब्रह्मोवाच ॥ श्रुणुध्वममराः सर्वे युष्माकं सुखदं महत् ॥ योऽसौ दृप्तस्तारकाख्यस्तताप परमं तपः॥१७॥ तस्य दैत्यस्य तपसा दह्यमानं चराचरम् ॥ दृष्ट्वा तद्वरदानार्थं गतोऽहं तारकांतिकम् ॥१८॥ उक्तं मया वरं वत्स वरयेति महाऽसुरम् ॥ अब्रवीद्दैत्यराजो मामभिवंद्य कृतांजलिः ॥१९॥

---

देवश्रेष्ठा, फार काय सांगावें ? त्या तारकासुरामुळें आह्मांस एक क्षणभर देखील सुख मिळत नाहीं. [१४] वीसहजार वर्षेपर्यंत रात्रंदिवस, क्षणभर देखील विश्रांति न घेतां, श्रीविष्णूचें आणि तारकासुराचें मोठें भयंकर युद्ध चाललें होतें. (१५) तरीपण, श्रीविष्णु सर्व देवांत मुख्य देव असून, व त्याचे हातांत सुदर्शन चक्रासारखें तीक्ष्ण धारेचें चक्र असतांनाही, तारकासुर त्यास आटोपला नाहीं. व हा दैत्य आपल्या हातून मरत नाहीं असें पाहून पांचजन्य शंख हातांत असणारा विष्णु भ्रमिष्टासारखा झाला; व त्याचा पुरा मोड झाल्यामुळें क्षीरसमुद्रास सोडून देऊन तो दुसरीकडे पळून गेला. (१६) आमची सर्वांचीही पण तीच अवस्था झाली आहे; आह्मी सर्वजण तारकास भिऊन तुला शरण आलों आहों. ह्यासाठीं कमलोद्भवा, ब्रह्मदेवा, तूं आमचें रक्षण करून आह्मांस सुख दे. असें सर्व देवांचें ह्मणणें ऐकून—

(१७) ब्रह्मदेव ह्मणाला—हे सर्वदेवहो, मी तुमच्या हिताची गोष्ट तुह्मांस सांगतों, नीट लक्ष्य देऊन ऐका. तुह्मी जो तारकासुर उन्मत्त झाला ह्मणतां त्या दैत्यानें मोठी खडतर तपश्चर्या केली आहे. (१८) त्याच्या तपश्चर्येमुळें सर्व स्थावर जंगम विश्व जळून जाऊं लागलें, तें पाहून त्यास वर देण्यास मी त्या असुराजवळ गेलों. [१९] आणि मीं त्यास ह्मटलें मुला, मी तुला प्रसन्न होऊन वर द्यावयास आलों आहें. तुला वाटेल तो वर माग, तो द्यावयास मी तयार आहें, तूं सर्व दैत्यांत श्रेष्ठ आहेस. तें माझें बोलणें ऐकून तो दैत्यपति मला हात जोडून नम्रपणानें ह्मणाला—

तारक उवाच ॥ अवध्यो हि सुरैः सर्वैर्विष्ण्वाद्यैः पद्मसंभव ॥ भवाम्यहं यथा देव तथा त्वं देहि मे वरम् ॥२०॥

ब्रह्मोवाच ॥ एवमस्त्वित्यहं तस्मै वरं दत्वा सुरोत्तमाः ॥ अन्यच्चोक्तं हितार्थं वः कस्माद्वध्योऽसि तं वद ॥२१॥

तारक उवाच ॥ योऽयं देवाधिदेवेशः कपर्दी नीललोहितः ॥ तस्य रेतः सुराः पीत्वा सगर्भा विष्णुना सह ॥२२॥ भविष्यन्ति ततो जातान्मृत्युरिष्टं न चान्यतः ॥ तथास्त्विति ततश्चोक्त्वा गतोऽहं मेरुमूर्धनि ॥२३॥ गच्छध्वं शरणं तस्माच्छरण्यं सर्वदेहिनाम् ॥ विश्वेश्वरमुमाकांतं शंकरं लोकशंकरम् ॥२४॥ मुक्त्वा हरात्मजं देवं त्रैलोक्ये सचराचरे ॥ तं न पश्यामि भो देवास्तारकं यो वधिष्यति ॥२५॥ ब्रह्मणो वचनं श्रुत्वा सहस्राक्षः शचीपतिः ॥ कथं भविष्यतीत्येवमालोच्य

---

[२०] तारकासुर ह्मणाला हें कमलोद्भवा ब्रह्मदेवा, मी विष्णु वगैरे कोणत्याही देवाच्या हातून मरणार नाहीं, असा कृपा करून तूं मला वर दे. हें तारकासुराचें बोलणें ऐकून.—

(२१) ब्रह्मदेव ह्मणाले, " बरें आहे तसेंच होईल " असा त्यास वर देऊन हे देवश्रेष्ठ हो, तुमचें सर्वांचें कल्याण व्हावें ह्मणून त्यास मी पुनः असें विचारलें कीं, तुला कोणाच्या हातून मरण यावें असें वाटतें तें सांग ह्मणजे तसें होईल. असा माझा प्रश्न ऐकून—

[२२] तारकासुर ह्मणाला—जो देवाधिदेव श्रीशंकर आहे, ज्याला कपर्दी आणि नीललोहित असें ह्मणतात, त्याचें रेत सगळे देव पितील आणि त्यामुळें गरोदर [२३] होतील, त्या गर्भापासून होणाऱ्या मुलाच्या हातानें मला मरण यावें, दुसऱ्या कोणापासून नको. हें तारकासुराचें बोलणें ऐकून मी ही त्यास " बरें आहे तसेंच होईल " असें सांगून, तेथून मेरुपर्वताच्या शिखरावर निघून गेलों. (२४) ह्यासाठीं सर्व देवहो, तुह्मी सर्वजण त्या शरणागताचें रक्षण करणाऱ्या पार्वतीपति श्रीशिवास शरण जा, तो सर्व प्राणिमात्रांचा रक्षक आहे, त्याला त्रैलोक्यपति ह्मणतात, तो शंकर सर्व लोकांचें कल्याण करणारा आहे. (२५) त्या श्रीशिवाच्या मुला ( कार्तिक स्वामी ) खेरीज ह्या स्थावर जंगम त्रैलोक्यांत तारकासुरास जिवें मारील असा पराक्रमी वीर देवहो, मला तर कोणी दिसत नाहीं. [२६] हे ब्राह्मणहो, हें ब्रह्मदेवाचें बोलणें ऐकून हजार नेत्र असणारा शचीचा पति इंद्र हें कसें

मनसा द्विजाः ॥२६॥ गुरुणा दैवतैः सार्धं पुनरेव स देवराट्॥ हरस्यैव सुतोत्पत्तौ उपायश्चित्यतां सुराः ॥२७॥ इत्युक्त्वा प्रययुर्देवाः शक्राद्या ब्रह्मणा सह ॥ मेरोरुत्तरतः शृंगं यत्र तिष्ठति माधवः ॥२८॥ गुप्तो भीतः स विश्वात्मा तारकस्य भयाद्विजाः॥ सब्रह्मकान्सुरान् दृष्ट्वा हृष्टः प्रोवाच माधवः ॥२९॥ उपायश्चिन्तितः को वा वधार्थं तारकस्य हि ॥ अस्ति चेदुच्यतां देवाः शर्म नो जायते यथा ॥३०॥

सूत उवाच ॥ एवं विष्णोर्वचः श्रुत्वा ब्रह्माद्याः सुरसत्तमाः ॥ यथोक्तं ब्रह्मणा तस्मै तथोक्तं विष्णवे सुरैः ॥३१॥ किमिदानीं च कर्तव्यमिति संचिन्त्य देवराट् ॥ सस्मार मनसा काममजेयं ससुरासुरैः॥३२॥ शक्रस्य चिंतितं ज्ञात्वा कामो रतिपतिः स्वयम्॥ शचीपतिं समागत्य प्राह पुष्पधनुर्धरः ॥३३॥

काम उवाच ॥ किं कार्यं त्रिदशश्रेष्ठ कर्तव्यं किं मया विभो ॥ ती-

---

घडून येईल ह्मावद्दल आपले मनांत विचार करूं लागला. [२७] व बृहस्पतीला आणि इतर सर्व देवांस एकत्र जमवून देवहो शिवाला मुलगा होण्यासाठीं कांहीं तरी उपाय काढा [२८] असें ह्मणाला. नंतर ते इंद्रादिक सर्व देव ब्रह्मदेवास वरोबर घेऊन मेरुपर्वताच्या उत्तरेकडील शिखरावर जेथें श्रीविष्णु होता तेथें गेले. [२९] ब्राह्मणहो, श्रीविष्णु तारकाच्या भयानें विश्वात्मा असूनही तेथें लपून बसलेला होता. तो ब्रह्मदेव वगैरे सर्व देव आपले भेटीस आले आहेत असें पाहून आनंदानें त्यास ह्मणाला. (३०) हे देवहो, तुह्मी सर्वांनीं मिळून तारकासुराला मारण्याची कांहीं युक्ति योजिली आहे काय ? योजिलेली असेल तर सांगा, ह्मणजे त्यामुळें आमच्या मनास सुख वाटेल.

(३१) सूत ह्मणाला—ऋषीश्वरहो, असें श्रीविष्णूचें वोलणें ऐकून ब्रह्मदेवादि देवांनीं ब्रह्मदेवानें त्यांस जसें सांगितलें होतें तसें त्या श्रीविष्णूस सांगितलें. [३२] आतां त्यावेळीं ही गोष्ट होण्याला काय उपाय करावा. असा विचार मनांत आणून, ह्मा गोष्टींला मदनच एक समर्थ आहे कां तर तो देव दैत्यांस देखील अजिंक्य आहे, असें जाणून इंद्रानें मदनाची आठवण केली. (३३) इंद्रानें आपलें स्मरण केलें आहे असें अंतर्ज्ञानानें समजतांच रतीचा पति मदन स्वतः हातांत फुलाचें धनुष्य घेऊन इंद्राकडे आला, व त्यास ह्मणाला—

(३४) मदन ह्मणाला—हे देवाधिदेवा, सर्व शक्तिमान् इंद्रा मजजवळ आपलें कार्य काम आहे तें सांगा कोणी एखादा ऋषीश्वर खडतर तपश्चर्या करून तुझें राज्य

त्रेण तपसा को हि स्थानमीहति तावकम् ॥३४॥ किंवा काचित्तवा-
देशं कर्तुं नेच्छति चांगना ॥ तां कामिनीं करोम्यद्य तव ध्यानपराय-
णाम् ॥३५॥ न कश्चिदस्ति मे शूरो न मानी न च पण्डितः ॥ च्यव-
यामि जगत्कृत्स्नं ब्रह्माद्यं भवगोचरम् ॥३६॥ अथ किं बहुनोक्तेन दुर्वा-
साश्च महामुनिः ॥ योऽसौ पिनाकी विश्वेशस्तमपि च्यवयाम्यहम् ॥३७॥

इन्द्र उवाच ॥ जनाम्यहं रतीनाथ सामर्थ्यं पुष्पधन्वनः ॥ नूनं हि
सर्वकार्याणि त्वत्तः सिध्यंति नान्यथा ॥३८॥ यत्रास्ते भगवांच्छंभु-
र्ध्यानदृष्ट्या समाहितः ॥ गच्छ पार्श्वे महेशस्य सुराणां हितकाम्य-
या ॥ चित्तं हरस्य संक्षोभ्य पार्वत्या संगमं कुरु ॥३९॥ एतदेव हि म-
त्कार्यमेष एव मनोरथः ॥ एतस्मात्कारणात्त्वं हि स्मृतः पुष्पधनुर्धर
॥४०॥ एवं शक्रवचः श्रुत्वा बलवान्मकरध्वजः ॥ मधोः सखा रती-
युक्तः पंचबाणो मनोभवः ॥४१॥ यत्रास्ते भगवांच्छंभुर्ध्यानदृष्ट्या स-

---

मिळावें असें इच्छितो कीं काय ? (३५) किंवा कोणी एखादी बायको तुझ्या आज्ञेप्रमाणें वागण्यास तयार नाहीं किंवा काय ? त्या बायकोला, ती आतांचे आतां तुझेंच नेहमी चिंतन करीत राहील, असें करून सोडतों (३६) माझ्या पुढें कोणी पराक्रमी नाहीं, अभिमानी नाहीं किंवा विद्वान् नाहीं. मी आपल्या सामर्थ्यानें ब्रह्मदेवापासून तों तहत श्रीशिवापर्यंत सर्व त्रैलोक्य वश करीन; मग इतरांची तर काय कथा ? [३७] फार काय सांगूं ? तो दुर्वास ऋषि सर्व ऋषींत श्रेष्ठ आहे तरी त्यांस मी भ्रष्ट करीन. हा अजगव धनुष्य हातांत घेणारा श्रीशंकर त्रैलोक्याचा अधिपति आहे खरा, परंतु त्यास देखील मी भ्रष्ट करीन. हें मदनाचें बोलणें ऐकून (३८) इंद्र ह्मणाला. हे रतिनाथा मदना, तुझें धनुष्य फुलांचें आहे खरें तरी तुझा पराक्रम मला माहीत आहे. मी तुला खरेंच सांगतों कीं, माझीं सर्व प्रकारचीं कामें तुझ्यामुळें सिद्धीस जातात. ह्यांत कांहीं खोटें नाहीं. [३९] असो देवांच्या कल्याणासाठीं तूं आतां असें कर कीं, ज्या ठिकाणीं परमात्मा श्रीशंकर ध्यानदृष्टीनें बसला आहे, त्याठिकाणीं त्या महेश्वराच्या जवळ तूं जा, आणि त्याचें मनाला विकार करून, पार्वतीचा आणि त्याचा समागम होईल असें कर. [४०] हेंच कायतें एक माझें काम आहे, हीच कायती एक माझी इच्छा आहे, आणि ह्याच कारणामुळें कुसुमशरा, मीं तुझी आठवण केली. [४१] असें इंद्राचें बोलणें ऐकतांच त्या सामर्थ्यवान् मदनानें आपल्याबरोबर रतीस आणि वसंत-ऋतूस घेतलें. (४२) आणि ज्याठिकाणीं तो परमेश्वर श्रीशिव एकाग्र मनानें

माहितः ॥ निष्कम्पश्चात्मनात्मानं चिन्त्यमानो महेश्वरम् ॥ प्राप्य शं-
भोरायतनमपश्यन्मकरध्वजः॥४२॥शैलादिं द्वारदेशे तु मेरुशृंगमिवोच्छ्रि-
तम् ॥ सर्वाभरणसंयुक्तं सहस्रादित्यवर्चसम् ॥४३ शूलहस्तं त्रिनेत्रं
च चंद्रावयवभूषणम् ॥ वज्रपाणिं चतुर्बाहुं द्वितीयमिव शंकरम् ।
तं दृष्ट्वा मदनो विप्राश्चिताक्रांतस्तदाऽभवत् ॥४४॥ कथं प्रविश्य द्र-
क्ष्यामि शंभुं त्रिदशवन्दितम् ॥ कथं कार्यं करिष्यामि सुराणां प्रीति-
कारणम् ॥४५॥ चिंतयित्वा तु बहुधा वंचनार्थाय नन्दिनः ॥ वायुरूपं
ततः कृत्वा सुगन्धमृदुशीतलम् ॥ प्रविश्य च तदा कामो दक्षिणां दि-
शमाश्रयत् ॥४६॥ तेन याम्यां दिशं यो हि वायुर्वाति सुखावहः ॥ अ-
द्यापि कारणात्सोऽपि सुगन्धो मृदुशीतलः ॥४७॥ अपश्यत्तत्र मदनः
सूर्यकोटिमिवोदितम् ॥ सहस्रनयनं देवं सहस्रतनुमीश्वरम् ॥४८॥ नी-

---

ध्यान धरून निश्चलपणें बसलेला होता, आणि आत्म्याचें आपणच चिंतन करीत होता, त्याठिकाणीं जाऊन मदनानें शिवाचें राहण्याचें स्थान पाहिलें. [४३] त्या गृहाच्या पुढील दारांत जसें एखादें मेरुपर्वताचें उंच शिखर असावें तसा नंदिकेश्वर उभा होता. त्याच्या अंगावर सर्व प्रकारचे अलंकार होते, व एक हजार सूर्यांसारखा तो तेजस्वी होता. (४४) त्याचे हातांत त्रिशूल होता, त्याला तीन डोळे होते, त्याच्या मस्तकावर चंद्राची कला होती, त्याचे हातांत वज्र असून त्यास चार हात होते. तो प्रत्यक्ष दुसरा शंकरच आहे असें वाटत असे. हे ब्राह्मणहो, त्याला पाहिल्याबरोबर मदन अगदीं घाबरून गेला. (४५) आणि तो आपल्या मनांत ह्मणूं लागला, हा श्रीशिव सर्व देवांस मान्य आहे, ह्या शंकराला मी ह्या घरांत जाऊन कसा पाहूं? आणि मीं कबूल केल्याप्रमाणें माझ्या हातून देवांच्या उपयोगाचें काम कसें होईल? (४६) असा त्यानें बराच वेळ विचार करून नंदिकेश्वरास फसविण्याकरितां, त्यानें मंद, सुगंध आणि शीतल अशा वायूचें रूप घेतलें व वायुरूपानें शिवाच्या गृहांत शिरून तो दक्षिण दिशेकडे वळला. [४७] त्यामुळें दक्षिणदिशेकडून जो वारा वाहतो, तो सुखकारक असतो. अद्यापि देखील तो दक्षिणेचा वारा मंद सुगंध आणि शीतल असतो अशी लोकांत प्रसिद्धि आहे (४८) असो तेथें त्यानें श्रीशिवास पाहिलें. ते एक कोटि उगवलेल्या सूर्यांसारखें तेजस्वी होते. त्या परमेश्वराला एक हजार डोळे असून त्यांचीं एक हजार शरीरें होतीं. ते सर्व जगाचे परमेश्वर होत. (४९) त्यांचे

लकण्ठं सुधाभासं शुभ्रखण्डेंदुधारिणम् ॥ जगदुत्पत्तिसंहारस्थित्य-
नुग्रहकारणम् ॥४९॥ शुद्धस्फटिकसंकाशं विधूममिव पावकम् ॥ उडु-
मालांचितं देवं सूर्यमालाविभूषणम् ॥५०॥ अनौपम्यमसादृश्यमप्रमेय-
मनाकुलम् ॥ जगच्चक्षु र्जगद्बाहुं जगच्छीर्षं जगन्मयम् ॥५१॥ जगत्पादं
जगच्छ्रोत्रं स्थूलं सूक्ष्मं परात्परम् ॥ रुद्रं पशुपतिं चोग्रं भीमं शर्वं
भवं द्विजाः ॥५२॥ महादेवं महेशानमष्टमूर्तिं जगत्पतिम् ॥ व्यक्ताव्यक्तं
त्रिलोकेशं पूजितं च सुरासुरैः ॥५३॥ अथ दृष्ट्वा महादेवं प्रहृष्टो मक-
रध्वजः ॥ निष्कृष्य चापमापूर्य स्थितः पश्यन् भवोद्भवम् ॥५४॥ एवं
स्थितस्य कामस्य सहस्राण्ययुतानि षट् ॥ गतानि तस्य वर्षाणि मुनीं-
द्राश्चित्तजन्मनः ॥५५॥ ततः स भगवान्देवो नेत्रे उन्मील्य शंकरः ॥

---

गळा नीलरंगाचा होता, त्यांची अंगकांति अमृतासारखी असल्यामुळें त्यांस पाहणाऱ्यास फार सौख्य वाटे, त्यांच्या मस्तकावर पांढरी पांढरी शुभ्र चंद्राची कळा शोभत होती. ते सर्व जगांची उत्पत्ति, नाश, रक्षण आणि सर्व जगावर कृपा करण्यास समर्थ होते. (५०) पांढऱ्या पांढऱ्या शुभ्रस्फटिकासारखी त्यांची अंगकांति होती, धूर नसलेला जळजळीत निखारा जसा असावा तसे श्रीशिव शोभत होते. त्यांच्या गळ्यांत नक्षत्रमाला असून सूर्यमाला ही होत्या, त्यामुळें ते फारच शोभत होते. (५१) त्यांच्या स्वरूपास उपमा देण्यासारखा दुसरा पदार्थ नव्हता, त्यांची बरोबरी करील असा दुसरा पदार्थ नाहीं. त्यांस कोणत्याही प्रकारची व्याकुलता नाहीं, ते सर्व त्रैलोक्याचे नेत्र होत, त्रैलोक्य हेच त्यांचे हात होत, त्रैलोक्य हेंच त्यांचें मस्तक होय ते त्रैलोक्यरूपच होत. (५२) त्रैलोक्यच त्यांचे पाय असून त्रैलोक्यच त्यांचे कान होत. ते स्थूल असून सूक्ष्मही होते, ते श्रेष्ठाहून श्रेष्ठ होते. ब्राह्मणहो त्यास रुद्र, पशुपति, उग्र, भीम, शर्व भव (५३) महादेव, महेश्वर अष्टमूर्ति, अशीं अनेक नांवें असून ते प्रकट असून गुप्तही होते, ते सर्व त्रैलोक्याचे अधिपति असून त्यांची देवदैत्य देखील पूजा करीत. [५४] मग त्या महादेवाला पाहून मदनाला मोठा संतोष झाला, व तो आपल्या धनुष्यास बाण लावून धनुष्य कानापर्यंत ओढून शंकराकडे पाहत उभा राहिला. (५५) हे मुनीश्वरहो, अशा स्थितींत त्या मदनाची साठ हजार वर्षे होऊन गेलीं तरी तो तसाच शिवाकडे पाहत निश्चल उभा होता. [५६] मग पुढें शंकरांनीं आपली समाधि सोडून डोळे उघडून पाहिलें,

अपश्यद्गिरिजां देवीमग्रे विश्वेश्वरः शिवः ॥५६॥ उपेंद्रवज्रावृत्तम् ॥ गिरींद्रपुत्रीं तपसि प्रसक्तां लज्जान्वितां पूषरदांतकारी ॥५७॥ दृष्ट्वा किमत्रेति विकल्पबुध्द्या कामोऽयमत्रेति विचिंत्य शर्वः ॥ ज्ञात्वावलोक्य प्रतिकृष्टचापं नेत्राग्निनासौ मदनोऽपि दग्धः ॥५८॥

सूत उवाच ॥ दग्धे रतिपतौ शंभुरुवाचाचलकन्यकाम् ॥ किमहं तव देवेशि करोमि मनसि स्थितम् ॥५९॥ वरं ब्रूहि महादेवि दास्याम्यद्य सुरेश्वरि ॥ मयि प्रसन्ने देवेशि किं दुर्लभमिहास्ति ते॥६०॥

पार्वत्युवाच ॥ वृत्तम् ॥ हते तु कामे वद नीलकण्ठ वरेण किं देव करोमि तेऽद्य ॥ विनैव कामेन नचास्ति भावः स्त्रीपुंसयोर्भास्करकोटिकल्प ॥६१॥ भावस्य हीने सुखसन्निकर्षः कथं भवेद्ब्रूहि सुरेशवन्द्य ॥

---

तों आपल्या पुढें देवी पार्वती आहे असें त्या त्रैलोक्यपति श्रीशिवास दिसलें. [५७] सूर्याचे वत्तीसचे वत्तीस दांत पाडून टाकणाऱ्या श्रीशिवांनीं पाहिलें तों आपल्यापुढें तपश्चर्या करावयाचा हेतु मनांत धरून हिमालयपर्वताची मुलगी ( पार्वती ) लाजून उभी आहे. (५८) तिला पाहिल्याबरोबर शिवाचें मन चंचल झालें. असें होण्याचें कारण काय ह्याचा शिव विचार करूं लागले, तों हें मदनाचें कृत्य आहे असें समजलें. तेव्हां त्यांनीं इकडे तिकडे पाहिलें तों मदन हातांत धनुष्य घेऊन आपणावर बाण सोडीत आहे असें दिसतांच त्यांच्या तिसऱ्या डोळ्यांतून अग्नि निघून त्यानें मदन जळून देखील गेला.

[५९] सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, मदन जळून गेल्यावर श्रीशिव पार्वतीस ह्मणाले, मुली, मी तुझें कोणतें कल्याण करूं? तुझ्या मनांत काय इच्छा आहे, ती मला सांग. (६०) तूं माझ्याजवळ वर माग, मी तुला काय पाहिजे असेल तें देतों. तूं सर्व देवांच्या स्त्रियांत मुख्य आहेस, मी तुला प्रसन्न झाल्यावर तुला कमी काय आहे? असें शिवाचें भाषण ऐकून—

(६१) पार्वती ह्मणाली—प्रभो, नीलकंठा, तूं मदनाला जाळून टाकल्यावर मला आतां वर घेऊन काय करावयाचें आहे? पुरुषांस आणि स्त्रियांस विषय सुखासारखी कोणतीही इच्छा नाहीं, आपण एककोटि सूर्यासारखें तेजस्वी आहां. [६२] हे परमेश्वरा, सर्व देव देखील तुमची पूजा करितात, तुह्मींच सांगा कीं, ती इच्छा नाहींशी झाल्यावर स्त्रीपुरुषांस सुखाचा अनुभव कशानें येणार आहे? हें पार्वतीचें बोलणें ऐकून शिव पुनः ह्मणाले, हे कमलनेत्रे पार्वती मीं आपल्या शरीरांतलि

उवाच भूयो मदनान्तकारी देहेन चाहं मदनं सुनेत्रे ॥६२॥ नेत्रस्य देवि ज्वलनात्मकस्य स्वभावमेतद्वद किं करोमि ॥$\frac{१}{२}$॥६३॥

देव्युवाच ॥ वृत्तम् ॥ बालेति मत्वा भव भूतनाथ व्यामोहसे किं त्वमनिंद्यवर्ण ॥ स्वतन्त्रशक्तिर्यदि चक्षुषस्ते तथा दहेन्मामपि नाग्रसंस्थाम् ॥६४॥ $\frac{१}{२}+\frac{१}{२}=१$॥ यदि विश्वेश्वरो देवो ब्रह्मादीनां वरः शिवः॥ प्रतारणे प्रवृत्तश्चेत्को विचारयितुं क्षमः ॥६५॥ नाहं प्रतार्या भगवन् त्वामेव शरणं गता ॥ गतिर्नान्यास्ति मे देव तस्मान्मां त्रातुमर्हसि ॥६६॥ त्वमेव चक्षुर्जगतां त्वमेव वचसां पतिः ॥ त्वमेव धाता जगतो विधाता विश्वतोमुखः ॥६७॥ वृत्तम् ॥ नमास्यहं देवमजं पुराणमुपेंद्रवेधामरराजजुष्टम् ॥ शशांकसूर्याग्निमयं त्रिलोचनं ध्यानाधिगम्यं

---

मदनाचा नाश केला नाहीं. (६३) माझा तिसरा डोळा अग्निस्वरूप आहे. त्यामुळें कोणतीही वस्तु त्याचे पुढें आली कीं, ती जाळून टाकावी हा त्याचा धर्मच आहे. त्याप्रमाणें तो त्यांच्यापुढें आल्यामुळें जळून गेला, त्याला मी काय करूं तूंच सांग. हें शिवाचें बोलणें ऐकून—

(६४) पार्वती ह्मणाली—हे शिवा, आपण सर्व भूतांचे अधिपति आहां, आपली आकृतिही सौम्य आहे, असें असून मी लहान मुलगी आहें ह्मणून मला फसवितां कीं काय ? तुमची इच्छा नसतां त्याच्या दृष्टीपुढें येणारा पदार्थ त्यानें जाळून टाकावा अशी त्या डोळ्याची स्वतंत्र शक्ति असेल, तर त्याच डोळ्यापुढें हल्लीं मी देखील उभी आहें मग मी कां जळून जात नाहीं ? [६५] तुह्मी सर्व त्रैलोक्याचे अधिपति आहां, तुह्मी ब्रह्मदेव वगैरे देवांस देखील वरदान देतां, आपणास शिव ह्मणतात; आणि असें असून आपण स्वतः जर लोकांस फसवूं लागलां, तर ह्या गोष्टींचा विचार कोणी करावा ? [६६] हे परमेश्वरा, तुह्मी मला असें फसवूं नका, मी तुह्मांलाच शरण आले आहें. हे परमेश्वरा, तुमचे वांचून माझें कोणी रक्षण करणारा नाहीं, ह्यासाठीं तुह्मी माझें रक्षण करा. (६७) तूंच सर्व त्रैलोक्याचा नेत्र आहेस, तूंच सर्व लोकांचा बृहस्पति आहेस, तूंच सर्व सृष्टि उत्पन्न करणारा आहेस, चोहोंकडे तोंडें असणारा तूंच ब्रह्मदेव आहेस. (६८) मी तुला नमस्कार करित्यें, हे देवा तुला जन्म नाहीं, तूं अनादिकालापासून आहेस. विष्णु, ब्रह्मदेव व इतर तेहतीस कोटि देव तुह्मांस नमन करितात. सूर्य, चंद्र आणि अग्नि हे तीन तुमचे नेत्र आहेत, समाधीच्या साधनानें तुझें यथार्थ-

जगतः प्रकाशम् ॥६८॥ त्वां वाङ्मयाधारमनन्तवीर्यं ज्ञानार्णवं चैव गुणार्णवं च ॥ परापरं धामनिधिं सुसूक्ष्ममनादिमध्यान्तविहीनरूपम् ॥६९॥ हिरण्यगर्भं जगतः प्रसूतिं नमामि देवं हरिणांकचिन्हम् ॥ पिनाकपाशांकुशशूलहस्तं कपर्दिनं मेघसहस्रघोषम् ॥७०॥ तमालकण्ठं स्फटिकावभासं नमामि शंभुं भुवनैकसिंहम् ॥ विभुं पुराणं पुरुषं महान्तं शुभावहं भास्करकोटिभासम् ॥७१॥ आर्यावृत्तम् ॥ सुरभिं सुवर्तितरथं दशार्धवक्त्रं ससायकं ध्वजिनम् ॥ नरसिंहदारणं त्वां नमामि तं शरभरूपधरम् ॥७२॥ उरगेंद्रराजहारं चरणद्वयभूषणं हरं व-

---

स्वरूप समजतें, तूं त्रैलोक्याचें यथार्थज्ञान करून देतोस. [६९] तूंच सरस्वतीस ( वाचेस ) आश्रयभूत आहेस, तूं मोठा पराक्रमी आहेस, तुझ्या पराक्रमाचा अंत लागत नाहीं, तूं ज्ञानाचा आणि सद्गुणांचा समुद्र आहेस, तूं श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहेस, तूं तेजोनिधि ( तेजःपुंज ) आहेस, तूं फारच गुप्त आहेस, ( तुझें यथार्थ ज्ञान कोणास होत नाहीं. ) तुला जन्म नाहीं, तुला तरुणपणा नाहीं, तुला मरण नाहीं, तुला रूप देखील नाहीं, तूं निराकार आहेस, तुला नमस्कार असो. [७०] तूंच ब्रह्मदेव आहेस, तुझ्यापासून त्रैलोक्य उत्पन्न झालें, तुझ्या मस्तकावर चंद्र आहे, तुला मी नमस्कार करितें. तुझ्या हातांत अजगव धनुष्य, पाश, अंकुश, शूल इत्यादिक आयुधें आहेत, तुझ्या डोकीवर जटाजूट असून हजार मेघगर्जनेसारखा तुझा गंभीर शब्द आहे, मी तुला नमस्कार करितें. [७१] तुझा कंठ नीलवर्ण आहे, स्फटिकमण्यासारखी तुझी अंगकांति आहे, तुला शंभु ह्मणतात, तूं त्रैलोक्यांत सिंहासारखा पराक्रमी आहेस. तूं समर्थ आहेस, तूं अनादिकालापासून आहेस, तुला पुरुष ह्मणतात, तूं फार श्रेष्ठ आहेस, तूं कल्याणकरणारा आहेस, कोट्यावधि सूर्यासारखा तेजस्वी आहेस, तुला नमस्कार असो. [७२] तुझें शरीर सुगंधि आहे, तुझा रथ सर्व त्रिभुवनांत निष्प्रतिबंध रीतीनें फिरतो, तुला पांच मुखें आहेत, तुझ्या हातांत धनुष्य बाण असून तुझ्या ध्वजावर वृषभ आहे, तूं नृसिंहाचें पोट फाडलेंस, तूं शरभाचें रूप घेतलेंस, त्या तुला माझा नमस्कार असो. [७३] तूं मोठमोठ्या नागांच्या आपल्या गळ्यांत माळा करून घातल्या आहेस, त्या सर्पांचेंच तुझ्या पायांत अलंकार आहेत, तुला हर ह्मणतात, तूं वर देणारा आहेस असें ह्मणतात, देवांचा समुदाय तुला नमस्कार करतांना तुझ्या

रदम् ॥ विबुधमुकुटार्चितांघ्रिं नमामि हरिचर्मवसनं त्वाम् ॥७३॥ यदक्षरं निर्गुणमप्रमेयं यं ज्योतिरेकं प्रवदन्ति सन्तः ॥ दूरंगमं देवमनन्तमूर्तिं नमामि सूक्ष्मं परमं पवित्रम् ॥७४॥ नमामि रुद्रं प्रमथाधिनाथं धर्मासनस्थं प्रकृतिद्वयं च ॥ तेजोनिधिं बालशशांकमौलिं कालार्दनं वन्हिरवींदुनेत्रम् ॥७५॥

सूत उवाच ॥ प्रसन्नोऽथाब्रवीद्देवीं कालीं त्रिपुरहा हरः ॥ वरयस्व वरं देवि दद्म्यहं तव सुव्रते ॥७६॥

देव्युवाच ॥ जीवत्वयं महादेव कामो लोकप्रतापनः ॥ विना कामेन भगवन्नहं याचे कथं वरम् ॥७७॥

ईश्वर उवाच ॥ भवत्वनंगो मदनः प्रीत्यर्थं ते सुलोचने ॥ तेन रू-

---

दोन्ही पायांवर आपलीं डोकीं ठेवितो तेव्हां त्यांवरील मुकुटांमुळें ते पाय फारच सुशोभित दिसतात. तूं सिंहाचें कातडें नेसतोस, त्या तुला नमस्कार असो. (७४) तूं अविनाशी आहेस, तूं सत्वरजस्तमोगुणांहून भिन्न आहेस, ज्याला विद्वान लोक एक ज्योति ( तेज ) असें मानतात तेंच तेज तूं आहेस, तुझी कीर्ति दूरवर पसरलेली आहे, हे देवा, तुझीं अनेक शरीरें आहेत, तूं सूक्ष्म आहेस, आणि फारच पवित्र आहेस, त्या तुला माझा नमस्कार असो. (७५) हे रुद्रा, तूं प्रमथगणांचा अधिपति आहेस, तूं धर्मासनावर बसलेला आहेस, प्रकृति आणि पुरुष हे दोन्ही तूंच आहेस, तूं फारच तेजस्वी आहेस, शुक्लपक्षांतील द्वितीयेचा चंद्र तुझ्या मस्तकावर शोभतो तूं यमाला देखील शिक्षा केलीस, सूर्य, चंद्र आणि अग्नि हे तीन तुझे नेत्र आहेत, अशा तुला मी नमस्कार करितें.

[७६] सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, अशी पार्वतीची स्तुति ऐकून त्रिपुरांचा नाश करणारा श्रीशिव प्रसन्न होऊन त्या परमेश्वरी कालीस ह्मणाला, हे देवी तुला काय पाहिजे तो वर माग, तो देण्यास मी तयार आहें. तूं फार सदाचारी आहेस असें शिवाचें बोलणें ऐकून—

[७७]पार्वती ह्मणाली—हे महादेवा, सर्व त्रैलोक्यावर आपला पराक्रम गाजविणाऱ्या ह्या मदनाला पुनः जिवंत कर. परमेश्वरा, मदनाला जिवंत करण्या खेरीज दुसरा वर मी तुजजवळ मागत नाहीं. असा पार्वतीचा आग्रह पाहून—

[७८] शिव ह्मणाले—हे कमलनेत्रे पार्वति, तुझा आग्रहच आहे तर हा मदन पूर्वीप्रमाणेंच सजीव होवो, आणि आपल्या सुंदर शरीरामुळें पूर्वीप्रमाणें

पेण लोकस्य शोभनाय भवत्वलम् ॥७८॥ वृत्तम् ॥ ततोत्थितो वायुरिवाप्रमेयस्त्वनंगरूपो मकरध्वजः सः ॥ हरस्य वाक्यादुमयेरितस्य सचापबाणस्सरतिर्बभूव ॥७९॥ इति प्रीत्या महेशान्या वरं दत्वा हरः स्वयम् ॥ स्मरस्य पंचबाणस्य तत्रैवांतरधीयत ॥८०॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने कामदहनं नामाष्टादशोऽध्यायः ॥

---

सर्व लोकांत शोभा पावो. (७९) शंकरांनीं पार्वतीच्या आग्रहामुळें असा वर देतांच तो अलौकिक सामर्थ्यवान, तृतीयनेत्रांतील अग्नीनें जळून गेलेला मकरध्वज ( मदन ) तत्काळ उठून उभा राहिला, व आपल्या हातांत पूर्वींप्रमाणें धनुष्य बाण घेऊन रतीसहवर्तमान निघून गेला. [८०] ह्याप्रमाणें शिव संतुष्ट होऊन महेश्वरीला आणि मदनाला वर देऊन मग स्वतः तेथल्यातेथेंच गुप्त झाले.

ह्याप्रमाणें नीलकंठनागनाथ नांवाच्या महाविद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचार संग्रहांतील शिवाधिक्य कथनापैकीं कामदहन नांवाचा अठरावा अध्याय संपला.

---

## ॥ अथैकोनविंशोऽध्यायप्रारंभः ॥

श्रीशिवाय नमः ॥ सूत उवाच ॥ शंकराच्च वरं लब्ध्वा देवी त्रैलोक्यपूजिता ॥ उमा भगवती काली संप्राप्ता पितृमन्दिरम् ॥१॥ अपश्यद्गिरिराजस्तां चंद्रकोटिनिभाननाम् ॥ दीपयन्तीं जगत्सर्वं विद्युत्पुंजनिभप्रभाम् ॥२॥ अंके कालीं समाधाय शिरस्याघ्राय च द्विजाः ॥ उवाच परमप्रीत्या विश्वेशीं पर्वतेश्वरः ॥३॥

गिरिराज उवाच ॥ तपसा तोषितः शंभुरमेयात्मा सनातनः ॥ कीदृशश्च वरो लब्धस्त्वया देवान्महेश्वरात् ॥४॥

देव्युवाच ॥ तपसाराध्य विश्वेशं गोपतिं शूलपाणिनम् ॥ तमेवेशं पतिं लब्ध्वा कृतार्थास्मीति मे वरः॥५॥ भेदो नास्ति ततो राजन्मम देवान्महेश्वरात् ॥ सिद्धमेवावयोरैक्यं वेदांतार्थविचारणात् ॥६॥यदैतदैश्वरं तेजस्तन्मां विद्धि महेश्वरम् ॥अहं सर्वांतरा शक्तिर्माया मायी म-

---

श्रीशिवास नमस्कार असो. [१] सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, शंकरापासून वरदान मिळवून त्रैलोक्यांत पूज्य असणारी परमेश्वरी काली तेथून आपल्या बापाच्या घरीं आली. (२) पर्वतेश्वरानें तिला पाहिलें तों कोटिचंद्रासारखें तिचें तोंड सुशोभित दिसत होतें, ती आपल्या सौंदर्यानें सर्व त्रैलोक्यास दिपवून सोडीत होती. विजांच्या समुदायासारखी अंगकांति तिची दिसत होती. (३) ब्राह्मणहो, अशा त्या कालीस पाहतांच हिमालयानें उचलून आपल्या मांडीवर घेतलें, व तिचें मस्तक हुंगून मोठ्या संतोषानें तो त्या त्रैलोक्यजननीस ह्मणाला.

(४) पर्वतेश्वर ह्मणाला—मुली पार्वती, तूं तपश्चर्या करून तो त्रैलोक्यपति, व अनादिकालापासून असणारा असा शिव प्रसन्न करून घेतलासना ? त्या महेश्वरापासून तुला वरदान काय मिळालें तें मला सांग. असें बापाचें बोलणें ऐकून—

(५) पार्वती ह्मणाली—ताता, मी तपश्चर्या करून त्रैलोक्यपति व पशुपति असा शूलपाणी प्रसन्न करून घेतला, व त्या परमेश्वरालाच मीं आपला पति करून घेऊन आपल्या जन्माचें सार्थक्य केलें. हाच वर मला मिळाला [६] ह्यासाठीं ताता पर्वतेश्वरा, मजमध्यें आणि शिवामध्यें कांहीं भेद ( निराळेपणा ) राहिला नाहीं. वेदान्तशास्त्राच्या अर्थाचा विचार केला असतां आह्मां दोघांचें ( शिवपार्वतींचें ) ऐक्य सिद्ध होतें. [७] हें परमेश्वराचें तेज ह्मणून जें कांहीं आहे, तें तेजच मीं आणि श्रीशिव आहे असें जाण. मी सर्वान्तर्यामिनीशक्ति

हेश्वरः ॥७॥ अहमेव पराशक्तिरेक एव महेश्वरः ॥ आवयोर्विद्यते रा-जन् भेदो न परमार्थतः॥८॥ एकाहं सर्वगाऽनन्ता विश्वरूपा पुरातनी॥ पिनाकपाणेर्दयिता नित्यं गिरिवरोत्तम ॥९॥ ज्ञातुं न शक्या ब्रह्माद्या मत्स्वरूपं हि तत्वतः ॥ इच्छाशक्तिरहं तात ज्ञानशक्तिरहं पुनः ॥ क्रि-याशक्तिः प्राणशक्तिः शक्तिमान् भगनेत्रहा ॥१०॥ कूटस्थमचलं सूक्ष्मं सत्यं निर्गुणमव्ययम् ॥ आनंदमक्षरं ब्रह्म तात जानीहि तत्पदम् ॥११॥ शिवस्य परमा मूर्तिर्नित्यानन्दमयी ह्यहम् ॥ ब्रह्मणो वचनाद्राजन्नभवं दक्षकन्यका ॥१२॥ शूलिनो देवदेवस्य निंदकं परमेष्ठिनः ॥ विनिंद्य पितरं दक्षं जातास्मि तव कन्यका ॥१३॥ स्वेच्छयैवावतारो मे नैव चान्यवशात्पितः ॥ तस्मान्मां परमां शक्तिमिति ज्ञात्वा सुखी

---

आहें मला माया ह्मणतात, आणि महेश्वर हा मायी होय. [८] मीच कायती एक श्रेष्ठ शक्ति आहें, महेश्वर हा एक आहे. हे पर्वतेश्वरा, वास्तविक रीतीनें विचार करून पाहिला तर माझ्यांत आणि शिवांत कांहीं निराळेपणा नाहीं. (९) हे पर्वतेश्वरा, मी एक आहें, माझें गमन सर्व ठिकाणीं आहे, माझा अंत लागत नाहीं, मी त्रैलोक्यस्वरूप असून मी अनादिकालापासून आहें, नेहमीं अजगव-धनुष्य धारण करणाऱ्या श्रीशिवाची मी आवडती बायको आहें. (१०) माझें यथार्थस्वरूप जाणावयाला ब्रह्मादिकदेव देखील समर्थ नाहींत. हे ताता, मी इच्छाशक्ति असून पुनः ज्ञानशक्तिही आहें. क्रियाशक्ति आणि प्राणशक्तिही मीच आहें. भगनांवाच्या सूर्याचे डोळे उपडून काढणारा श्रीशिव सर्व त्रैलोक्या-पेक्षां शक्तिमान् आहे. (११) त्याला कूटस्थ ( साक्षी ), कधींही न हालणारा, सूक्ष्म, सत्य, निर्गुण आणि अव्यय अशा अर्थाचीं अनेक नांवें आहेत. हे ताता, त्याशिवाचें पद आनंद, अविनाशी आणि परब्रह्मस्वरूप आहे, असें तूं समज. (१२) श्रीशिवाची जी स्थूल मूर्ति नेहमीं आनंदस्वरूप आहे असें ह्मण-तात, ती मूर्ति मीच होय. पर्वतेश्वरा, ती मी ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें दक्षाची मुलगी झाल्यें. (१३) तो दक्षप्रजापति देवाधिदेव परमात्मा श्रीशिव ह्याचा मना-पासून द्वेष करी; त्यामुळें त्या शिवनिंदा करणाऱ्या दक्षाची निंदा करून देहत्याग करून मी तुझी मुलगी झाल्यें. [१४] हा जन्म मीं आपल्या इच्छेप्रमाणें घेतला आहें, मला हा जन्म घेण्यास कोणी भाग पाडलें नाहीं. ह्यासाठीं ताता, पर्वतेश्वरा, मी

भव ॥१४॥ नाशयामि तवाज्ञानं भवबन्धनकारणम् ॥दिव्यं ददामि ते ज्ञानं दुःखत्रयविनाशनम्॥१५॥एवं देव्याः प्रसादेन हिमवान् पर्वतेश्वरः॥ लब्ध्वा माहेश्वरं ज्ञानं जीवन्मुक्तस्तदाभवत् ॥१६॥ आस्थाय परमां भक्तिं शिवयोः पादपंकजे ॥ पित्रोर्हिरण्यगर्भस्य शार्ङ्गिणश्चापि सुव्रताः॥ अपश्यदखिलं विश्वमुमामाहेश्वरात्मकम् ॥१७॥ आज्ञापयत्ततो विश्वकर्माणं पर्वतेश्वरः ॥ विवाहमंटपं कर्तुं नानाश्चर्यविभूषितम् ॥१८॥ तेनाहूतस्ततः शीघ्रं विश्वकर्मा महामतिः ॥ पार्श्वं ययौ हिमवतः कुशलो विश्वकर्मणि ॥१९॥ दृष्ट्वा तं विश्वकर्माणं हृष्टः पर्वतराट् स्वयम् ॥स्वागतासनपाद्याद्यैः सादरं तमपूजयत् ॥ विधिवत्पूजयित्वा तु विश्वकर्माणमब्रवीत् ॥२०॥

गिरिराज उवाच ॥ विश्वकर्मन् महाप्राज्ञ सर्वशास्त्रविशारद ॥ य-

---

परमेश्वराची श्रेष्ठ शक्ति आहें असें जाणून तूं सुखी हो. [१५] मी तुझें अज्ञान दूर करित्यें, अज्ञान हें संसाराच्या फेऱ्यांत मनुष्यांस पाडितें. तुला मी दिव्यज्ञान देत्यें, त्यामुळें तुझ्या आधिदैविक, आधिभौतिक, आणि आध्यात्मिक अशा तिन्ही प्रकारच्या दुःखांचा नाश होईल. (१६) ह्याप्रमाणें पार्वतीच्या कृपेमुळें हिमालय पर्वत श्रेष्ठ माहेश्वरज्ञान झाल्यामुळें जीवन्मुक्त झाला. [१७] आणि हे सदाचारी ब्राह्मणहो, तेव्हांपासून तो शिवपार्वतीच्या चरणकमलांची मनापासून भक्ति करूं लागला हीं शिवपार्वती ब्रह्मदेवाचीं आईबापें आहेत, व श्रीविष्णूचींही आईबापें आहेत; आणि हें सर्व त्रैलोक्य उमामहेश्वरस्वरूप आहे, असें त्या पर्वतश्रेष्ठास पुरतेपणीं समजून आलें. [१८] असो. नंतर त्यानें शिवपार्वतीच्या लग्नाकरितां विश्वकर्म्याला अनेक प्रकारच्या अद्भुत पदार्थांनीं शोभणारा असा लग्नमंडप करावयास सांगितलें. [१९] हिमालयपर्वतानें बोलावल्याबरोबर कारागिरीच्या कामांत अतिशय कुशल असणारा तो बुद्धिमान विश्वकर्मा हिमालयाच्या जवळ येऊन पोहोंचला. (२०) आपण बोलावल्याबरोबर विश्वकर्मा आपल्या जवळ आला असें पाहतांच पर्वतेश्वराला मोठा आनंद झाला; त्यानें स्वतः आदरातिथ्य, आसन, पाद्य वगैरे देऊन सन्मानानें त्याची पूजा केली, व यथाविधि पूजा केल्यावर हिमालय विश्वकर्म्यास ह्मणाला.—

(२१) पर्वतेश्वर ह्मणाला—हे विश्वकर्म्या, तूं मोठा बुद्धिमान् आहेस, सर्व प्रकारचीं शास्त्रें तुला चांगल्या तऱ्हेनें अवगत आहेत. असो. मीं ज्या कामासाठीं तुला

त्कारणमिहाहूतो मया त्वं तद्ब्रवीम्यहम् ॥२२॥ विश्वेश्वरो महादेवो भगवान्नीललोहितः ॥आगमिष्यति देवेशीं परिणेतुं शिवः स्वयम् ॥२२॥ मण्टपं तत्र कर्तव्यं यज्ञार्थं तद्धिरण्मयम् ॥ योजनायुतविस्तीर्णमनेकाश्चर्यसंयुतम् ॥२३॥ दृष्टमात्रेण शर्वस्य प्रीतिर्भवति वै यथा ॥ तथा त्वं मण्टपं शीघ्रं कुरु विश्वेश्वरप्रियम् ॥२४॥ एवमुक्तस्तदा तेन गिरिणा विश्वकर्मकृत् ॥ वैवाहं मण्टपं शीघ्रमसृजद्रत्नविग्रहम् ॥२५॥ स्तंभैर्हेममयैश्चित्रैर्मणिभिः सूर्यसन्निभैः ॥ इन्द्रनीलमयैर्दिव्यैर्वैडूर्यैर्विद्रुमैरपि ॥२६॥ मौक्तिकैर्वज्रनीलैश्च चन्द्रकांतमयैरपि ॥ स्फाटिकैर्विद्रुमैश्चापि मुक्तादामविलंवितैः ॥२७॥ चामरालंकृतैरुच्चैर्दर्पणैर्विविधैरपि ॥ सूर्यबिंवप्रतीकाशैश्चन्द्रबिंबसमप्रभैः ॥२८॥ ध्वजमालाकुलं दिव्यपताकानेकशोभितम् ॥ रत्नजैः सिंहशार्दूलैर्गजैर्व्यालैर्निरन्तरम् ॥२९॥ रचितं

---

बोलाविलें तें काम मी आतां तुला सांगतों. [२२] विश्वेश्वर, महादेव परमात्मा, नीललोहित, श्रीशिव स्वतः पार्वतीशीं लग्न करण्यास येथें येणार आहे. (२३) त्या यज्ञासाठीं ( लग्न समारंभाकरितां ) तूं एक सोन्याचा मंडप तयार कर. तो चाळीसहजार कोस लांबी रुंदीचा असावा. त्याच्यांत अनेक प्रकारचें नकशीचें काम असाव. [२४] तो मंडप पाहिल्याबरोबर शंकराचें मन खुष होऊन जाईल, असा तूं शंकराला आवडण्यासारखा मंडप होतां होईल तितका लवकर तयार कर. (२५) हिमालयानें असें सांगितल्याबरोबर विश्वकर्म्यानें लवकरच रत्नजडित लग्नमंडप तयार केला. [२६] त्या मंडपास सर्व सोन्याचेच खांब असून, त्यावर चित्र विचित्र रंगांचीं रत्नें बसविली होतीं. तीं सूर्याप्रमाणें झळकत होतीं. त्या रत्नांत इंद्रनीलमणि, अतिशय तेजस्वी असे वैडूर्यमणि, आणि पोंवळीं शोभत होतीं (२७) मोत्यें, वज्र, नीलमणि, चंद्रकांतमणि, स्फटिकमणि आणि पोंवळीं जागोजाग बसविलेलीं होतीं मंडपांत जागोजाग मोत्यांच्या माळा लोंबत सोडलेल्या होत्या. (२८) जागोजाग चवऱ्या टांगल्या असल्यामुळें त्या फारच शोभिवंत दिसत होत्या. तेथें मोठमोठे उंच हजारों आरसे लावले होते; रत्नांचीं प्रतिबिंबें त्यांत पडल्यामुळें ते सूर्यबिंबासारखें दिसत होते, व ते चंद्रबिंबासारखे स्वच्छ होते. (२९) त्या मांडवावर जागोजाग ध्वज उभारलेले होते व त्यांवरील पताकांस अनेक प्रकारचीं उंची उंची मौल्यवान वस्त्रें लाविलीं होतीं. मांडवावर जागोजाग सिंह, वाघ, हत्ती साप, यांचीं निरनिराळीं चित्रें दाखविलीं होतीं. [३०] अशा तऱ्हेनें शंक-

मण्टपं दिव्यं प्रियं त्रिपुरविद्विषः ॥ रुद्राणां च तथारूपैर्गंधर्वाप्सरसां गणैः ॥३०॥ देवैश्चैव मनोहार्यैर्मर्त्यैश्चैव तथा परैः ॥ मालाभिः स्तवकैर्विप्रा रत्नजैः कुंकुमैर्भृशम् ॥३१॥कचिच्चामीकरैः सोऽथ हृद्यां भूमिं विनिर्ममे ॥ कचिद्बंधूकसंकाशां दीप्तां विद्रुमसप्रभाम् ॥३२॥ कचित्पद्मदलाकारामिंद्रायुधसमप्रभाम् ॥ कचिन्नीलोत्पलाभासां नीलजीमूतसप्रभाम् ॥३३॥ अनेकाकारविन्यासैस्ततो धात्रीं विनिर्ममे ॥ मनसैव यथा ब्रह्मा विश्वमेतद्विनिर्ममे ॥३४॥ कचित्कलशविन्यासैः कचित्स्वस्तिकभूषितैः ॥ हरिचंदनगन्धाढ्यैः कर्पूरोद्गारगंधिभिः ॥३५॥ जातिपाटलपद्मानां चंपकानां सुगन्धिभिः ॥ आसनैर्विविधैः पूतैश्चन्द्रजीमूतसन्निभैः ॥३६॥ उदयार्कसमाकारैर्मेरुशृंगोपमैर्भृशम् ॥ तमालचंपका-

---

रास आवडेल असा भव्य सुशोभित लग्नमंडप तयार केला. त्यावर रुद्रांचीं तशींच गंधर्वांचीं आणि अप्सरांचीं चित्रें काढलीं होतीं. (३१) तशींच सुंदर सुंदर देवांचीं, मनुष्यांचीं आणि दुसरींही अनेक प्रकारचीं चित्रें तेथें दाखविलीं होतीं. हे ब्राह्मणहो, त्या मंडपांत रत्नांच्या माला, रत्नांचे फुलांचे घोंस, व कोठें कोठें कुंकवाचे रंग दाखविले होते. (३२) कोठें कोठें विश्वकर्म्यानें मनोहर सुवर्णाची भूमि ( फरशी ) तयार केली होती. कोठें कोठें दुपारीच्या फुलासारखी तांबडी लाल पोंवळ्याची जमीन ( फरशी ) तयार केली होती. (३३) कोठें कोठें कमलाच्या पानाचे आकाराची जमीन केली होती, कोठें इंद्रधनुष्यासारखी सुशोभित दिसणारी जमीन केली होती, कोठें निळ्या कमळासारखी जमीन केलेली असून कोठें निळ्या रंगाच्या ढगासारखी जमीन केली होती. (३४) त्यानंतर पुढें कोठें अनेक प्रकारची चित्रविचित्र रीतीची जमीन केली होती. ज्याप्रमाणें ब्रह्मदेवानें आपल्या मनांत सृष्टि उत्पन्न करण्याचा विचार आणून अनेक प्रकारची सृष्टि उत्पन्न केली; त्याप्रमाणेंच त्या मंडपांत विश्वकर्म्यानें अनेक प्रकारची जमीन आणि नकशीचीं कामें केलीं. (३५) कोठें घागरी बसविल्या, कोठें स्वस्तिकें काढून त्या भागास शोभा आणली, कोठें कोठें उंची कृष्णागरु चंदनाचा सुवास येईल असें केलें, कोठें कापुराचा घमघमाट सुटेल असें केलें. (३६) कोठें जाई, जुई, चंपक, कमळें ह्यांचा मनोहर सुवास येईल अशी रमणीय बाग तयार केली होती; तशींच अनेक प्रकारचीं चंद्रासारखीं आणि ढगासारखीं पवित्र आसनें तयार केलीं होतीं. (३७) कोठें कोठें उगवलेल्या सूर्याचे देखावे दाखविले होते, कोठें कोठें मेरु पर्वताच्या शिखरासारखीं उंच उंच शिखरें दाखविलीं होतीं,

भैश्च इन्द्रनीलमयैस्तथा ॥३७॥ सिंदूरमयसंकाशैर्जपाकुसुमसन्निभैः ।
संध्याकालनिभैश्चान्यैर्दाडिमीकुसुमप्रभैः ॥३८॥ हिमकुन्दनिभैश्चान्यै
मुक्ताफलनिभैरपि ॥ तारकापुंजसंकाशैः पद्मनीलेंद्रनीलजैः ॥३९॥ त
त्रैव मंटपे दिव्ये तोयस्थानान्यकल्पयत् ॥ दीर्घिकां तोयपूर्णां तु क्षीर
पूर्णां तथैव च ॥४०॥ दधिप्रदान्यनेकानि सुधासंपूरितानि च ॥ घृत
पूर्णा महानद्योः रत्नसोपानमण्डिताः ॥४१॥ वृक्षांश्च कामितान्दिव्या
न्दीर्घिकाणां तटे तटे ॥ असृजत्क्रीडनार्थाय सदा पुष्पफलान्वितान् ।
भक्ष्यैर्नानाविधैर्दिव्यैः फलितान्मुनिपुंगवाः ॥४२॥ कदलीषंडमध्ये तु
तमालगहनेष्वपि ॥ क्रीडावाप्यः सुशोभाढ्यास्तथैवाशोकसंकुले॥४३॥
दीर्घिकाणां तटे रम्ये तरूणां चित्रशाखिनाम् ॥ दोलाश्च बद्धयामास
मुक्तादामभिरुज्वलैः ॥४४॥ रमणीयानि दिव्यानि मनस्तुष्टिकराणि

---

कोठें कोठें इंद्रनीलमण्यांचीं तमाल चंपक वगैरे झाडें तयार केलीं होतीं. [३८] कोठें कोठें शेंदुराचीं जास्वंदीच्या फुलांसारखीं हुबेहूब फुलें तयार करून दाखविलेलीं होतीं. कोठें संध्याकाळच्या वेळचे लालपणाचे देखावे दाखविले असून कोठें डाळिंबाच्या फुलांसारखीं फुलें तयार केलीं होतीं [३९] कोठें पांढऱ्या शुभ्र कुंदाचीं फुलें व कोठें कोठें मोत्यांचे घोंस दाखविले होते, कोठें नक्षत्रांचे समुदाय व कोठें कोठें इंद्रनीलमण्याचीं निळीं कमळें दाखविलीं होतीं. [४०] त्याच सुशोभित मंडपांत पाण्याचीं ठिकाणें केलीं होतीं; तशाच पाण्यानें आणि दुधानें भरलेल्या विहिरी तयार केल्या होत्या. [४१] दह्यानें भरलेल्या कितीएक विहिरी केल्या व कित्येक विहिरी अमृतानें भरलेल्या केल्या. तुपानें भरलेल्या मोठमोठ्या नद्या तयार केल्या. त्या नद्यांस रत्नांच्या पायऱ्या असल्यामुळें त्या शोभिवंत दिसत होत्या. (४२)सुखानें खेळण्याकरितां विहिरींच्या कांठांवर जागोजाग आपल्या मनांत इच्छा येईल अशीं फळें देणारीं झाडें लाविलीं. त्या झाडांस नेहमीं फळें व फुलें असत. मुनीश्वरहो नानाप्रकारचे गोड गोड खाण्याचे पदार्थ तेथें विश्वकर्म्यानें तयार करून ठेविले. [४३] केळींच्या दाट झाडींत, तमालवृक्षांच्या दाट झाडींत आणि तसेच अशोकाच्या झाडांच्या सांवलींत जागोजाग पोहण्यास सोईस्कर अशा विहिरी तयार केल्या. [४४] विहिरींच्या कांठावरील नानाप्रकारच्या झाडांस सुशोभित अशा मोत्यांच्या दोऱ्यांनीं विश्वकर्म्यानें झोळकुंबे बांधले. (४५) सुंदर आणि सुशोभित दिसणारी आणि मनास अतिशय सुख देणारीं उपवनें [बागा]

च ॥ उद्यानवरषंडानि स्थाने स्थाने ह्यकल्पयत् ॥४५॥ त्रिलोकतिलके तस्मिन् हेमपीठस्य मध्यगाम् ॥ सिंहैश्च विधृतां श्वेतैः सहस्रदलमण्डितैः ॥४६॥ पारिजातद्रुमाणां च मंजरीभिरलंकृताम् ॥ इंद्रनीलमयीं वेदिं चारुसोपानभूषिताम् ॥ शतयोजनविस्तीर्णां स्तंभैश्च कलशान्विताम् ॥४७॥ कोट्यनेकाप्सरसश्च रत्नजा दिव्यरूपिणीः ॥ पीनोरुजघनास्ताश्च पीनोन्नतपयोधराः ॥ चामराग्रकरास्तास्तु हारावलिविचित्रिताः ॥४८॥ वीणावेणुकराश्चान्याः कांचीगुणविराजिताः॥ चंचलायतनेत्राश्च तिलकालकमण्डिताः ॥४९॥ मध्ये क्षामाः सुबिंबोष्ठाः कमलोत्पलपाणिनीः ॥ अनेकाकारविन्यासैर्निर्ममे ताः पृथक् पृथक् ॥५०॥ वृत्तम् ॥ एवं हि दिव्यैः सुरसुंदरीभिर्नानाप्रयोगैर्विविधैश्च-

---

विश्वकर्म्यानें जागोजाग तयार केलीं. [४६] तो मंडप इतका सुंदर केला होता कीं, त्याचेसारखा जगांत दुसरा मंडपच नव्हता. त्या मंडपांत सुवर्णासनावर एक ओटा केला होता; तो ओटा पांढऱ्या पांढऱ्या शुभ्र दिसणाऱ्या चार सिंहांनीं चोहोंकडून उचलून धरलेला होता, त्या सिंहांच्या गळ्यांत सहस्रपत्रें असणाऱ्या कमळांच्या माळा होत्या. [४७] त्या ओट्यावर पारिजात वृक्षांच्या मंजरी घालून त्यास शोभा आणली होती; तो ओटा इंद्रनीलमण्यांचा केलेला असून त्यास शानदार पायऱ्या वसविलेल्या होत्या. तो ओटा शंभर योजनें [चारशें कोस]लांब रुंद होता. त्याला जागोजाग खांब वसविलेले असून त्यावर घागरी ठेवलेल्या होत्या. (४८) तेथें रत्नांच्या अनेक अप्सरा केलेल्या होत्या व त्या अतिशय सुस्वरूप होत्या, त्यांच्या मांड्या आणि पुढील भाग पुष्ट होते. त्यांचे स्तन उंच आणि पुष्ट होते. त्यांच्या हातांत चवऱ्या होत्या, व त्यांच्या गळ्यांत मोत्यांच्या माळा असल्यामुळें त्या फार सुंदर दिसत होत्या. [४९] त्यांपैकीं किती एकांच्या हातांत वीणा असून कितीएकांच्या हातांत वेणु [ पावा ] होता; त्यांनीं आपल्या कमरेस कमरपट्टा घातलेला होता, त्यांचे डोळे मोठे असून त्यांची दृष्टि चंचळ होती. त्यांच्या कपाळावरील कुंकवाचा टिळा आणि मस्तकावरील केश ह्यामुळें त्या शोभत होत्या. [५०] त्यांची कंबर बारीक होती, त्यांचे ओंठ तोंडल्यासारखे होते, कमळांच्या देंठासारखे त्यांचे नाजुक हात होते, त्या वेगवेगळ्या जागीं ठेवलेल्या होत्या. [५१] त्या ओट्यासभोंवतीं अप्सरांचीं जीं चित्रें काढलीं होतीं तीं फार मोहक होतीं, त्या अनेक प्रकारचीं कामें करण्यांत गुंतल्या आहेत

रित्रैः ॥ मनोभिरामैर्नयनाभिरामैर्युक्तां तु वेदिं त्वरितं चकार ॥५१॥
मण्टपं निर्मितं श्रुत्वा शंकरो विश्वकर्मणा ॥ शैलादिमब्रवीद्देवो वि-
श्वेशो विश्वपूजितः ॥५२॥

श्रीभगवानुवाच ॥ हितार्थं सर्वदेवानामस्माकं च विशेषतः ॥ वि-
वाहयज्ञ आरब्धो नगराजेनधीमता ॥५३॥ दानार्थमद्रिः कन्यायाः प्र-
स्थितो हिमवान् स्वयम् ॥ अहं तत्र गमिष्यामि सुरैर्ब्रह्मादिभिः सह
॥५४॥ त्वमिहावाहय सुरान् कालाग्न्यादीन् द्विजोत्तमान् ॥ द्वीपांश्च
सागरांश्चैव पर्वतांश्च नदीस्तथा ॥५५॥ मण्टपं निर्मितं यत्र विचित्रं
विश्वकर्मणा॥ तत्र तिष्ठत्युमादेवी मम ध्यानपरायणा ॥ विद्युल्लतेव भा-
स्वंती चंद्रकोटिनिभानना ॥५६॥ एवमुक्तो महेशेन नन्दी सूर्यायुतप्रभः
नत्वा विश्वेश्वरं शंभुं ध्यानरूढस्तदाभवत् ॥५७॥ ध्यातस्तेन समायातः
कालाग्निर्विश्वदाहकः ॥ रुद्रैः परिवृतो देवैः कोटिकोटिगणेश्वरैः ॥५८॥

---

असें दाखविलें होतें, त्यांचें सौंदर्य इतकें मोहक होतें कीं, त्यांस पाहिल्याबरोबर मन थक्क होऊन जाई. अशा त्या अप्सरांमुळें सुशोभित दिसणारा ओटा विश्वकर्म्यानें लागलाच तयार केला. (५२) विश्वकर्म्यानें लग्नाकरितां मंडप तयार केला असें समजल्यावर, त्रैलोक्य ज्याची पूजा करितें असे विश्वेश्वर शंकर नंदीस ह्मणाले.

(५३) शिव ह्मणाले—नंदिकेश्वरा, सर्व देवांचें कल्याण व्हावयासाठीं, आणि त्यांतलें त्यांत आह्मांस जास्त सुख लागण्यासाठीं, पर्वतश्रेष्ठ हिमालयानें लग्नसमारंभ आरंभिला आहे. [५४] पार्वतीचें कन्यादान करावयासाठीं स्वतः हिमालय पर्वत निघाला आहे, ह्यासाठीं ब्रह्मादिक देवांस बरोबर घेऊन मी तेथें जातों. [५५] तूंही देवांस, कालाग्निरुद्र वगैरे उत्तम उत्तम ब्राह्मणांस, द्वीपांस, समुद्रांस, पर्वतांस, तसेंच नद्यांस येथें हाक मार. [५६] ज्याठिकाणीं विश्वकर्म्यानें सुशोभित मंडप केला आहे, त्याच ठिकाणीं देवी पार्वती माझें एकाग्र मनानें ध्यान करीत उभी आहे; ती विजेसारखी तेजःपुंज असून कोट्यावधि चंद्रांसारखें तिचें मुख सुशोभित आहे. [५७] श्रीशिवांनीं नंदिकेश्वरास असें ह्मटल्यावर, तो दहा हजार सूर्यांसारखा तेजस्वी नंदिकेश्वर श्रीशिवास नमस्कार करून ध्यान करावयास बसला. [५८] नंदिकेश्वरानें ध्यान केल्याबरोबर सर्व त्रैलोक्यास एका क्षणांत जाळून टाकणारा कालाग्नि लागलाच तेथें आला, त्याचेबरोबर कोट्यावधि

ततोऽब्रवीत्स कालाग्निः सर्वज्ञं नन्दिकेश्वरम् ॥ किमर्थमहमाहूतो देव-
देवेन शंभुना ॥५९॥ उपस्थितो वा प्रलयः संहरिष्यामि तत्क्षणात् ॥
एवमुक्तस्तदा तेन शैलादिस्तमथाब्रवीत् ॥६०॥

श्रीनन्दिकेश्वर उवाच ॥ प्रलयार्थे न चाहूतस्त्वं विशेषेण शंभुना ॥
ग्रहिष्यति गिरेः पुत्रीं पत्नीत्वेन महेश्वरः॥६१॥तदर्थं त्वमिहाहूतः ब्रह्मा-
द्याश्च दिवौकसः ॥ नन्दिनो वचनं श्रुत्वा कालाग्निरिदमब्रवीत् ॥६२॥

कालाग्निरुवाच ॥ द्रष्टुकामा वयं सर्वे ब्रह्माद्याः शूलपाणिनम् ॥शीघ्रं
दर्शय शैलादे निर्वृत्ताः स्म यथा वयम् ॥६३॥ विज्ञापय महादेवं ब्र-
ह्माद्याश्चागता इति ॥ सर्वे तध्याननिरतास्सर्वे तद्दर्शनोत्सुकाः ॥६४॥
कालाग्निप्रमुखानां च वचः श्रुत्वा गणाग्रणीः ॥ प्राह विश्वेश्वरं देवं
स्निग्धगंभीरया गिरा ॥६५॥

---

देव शिवगण आणि रुद्रगण होते. (५९) त्यानंतर तो कालाग्नि सर्व कांहीं ज्याला समजत आहे अशा नंदिकेश्वरास ह्मणाला, अरे नंदिकेश्वरा, देवाधिदेव श्रीशिवांनीं माझें कां स्मरण केलें ? (६०) प्रळयकाळाची वेळ आली किंवा काय ? तसें असेल तर मला सांग, सर्व त्रैलोक्याचा मी एका क्षणांत नाश करीन. असें कालाग्नीचें बोलणें ऐकून नंदिकेश्वर त्यास ह्मणाला—

(६१) नंदिकेश्वर ह्मणतो, प्रलयकाळ प्राप्त झाला ह्मणून श्रीशिवांनीं तुझें स्मरण केलें नाहीं. मुख्यत्वेंकरून तुला अशासाठीं बोलाविलें आहे कीं, महादेवाचें पार्वतीबरोबर लग्न व्हावयाचें आहे. [६२] त्यासाठीं तुला आणि ब्रह्मदेव वगैरे सर्व प्रमुख प्रमुख देवांस येथें बोलाविलें आहे. असें नंदीचें बोलणें ऐकून कालाग्नि नंदीस ह्मणाला—

(६३) कालाग्नि ह्मणाला— असें असेल तर आह्मी ब्रह्मादिक सर्व देव शंकराच्या भेटीविषयीं फार उत्सुक आहों; ह्यासाठीं आमची आणि शिवांची अगोदर भेट करीव. त्यामुळें आह्मांस फार संतोष होईल. [६४] तूं महादेवाजवळ जाऊन त्यांस अशी विनंति कर कीं, ब्रह्मादिक सर्व देव बाहेर आले आहेत, सर्वजण मनापासून तुमचें ध्यान करितात, आणि सर्वजण तुमचे भेटीविषयीं उत्सुक झाले आहेत. (६५) असें कालाग्नि वगैरे मुख्य मुख्य देवांचें बोलणें ऐकून, तो प्रमथगणाधीश नंदिकेश्वर श्रीशिवाकडे गेला आणि शिवास गंभीरतेनें नम्रतापूर्वक ह्मणाला—

नन्दिकेश्वर उवाच ॥ ब्रह्माद्याश्चागताः सर्वे शूलपाणे त्वदाज्ञया । द्रष्टुमिच्छन्ति ते सर्वे त्वामनन्ततनुं हरम् ॥६६॥ दिशादेशं पुरारे मां किं वक्ष्यामि सुरासुरान् ।वारिता द्वारमूले तु द्रष्टुकामाश्च संस्थिताः । स्थितं ते रूपमपरं तेजोमयमनिन्दितम् ॥६७॥ एवमुक्त्वा ततो नन्दी प्राप्यानुज्ञां स शूलिनः ॥ प्रावेशयत्ततो देवान् ब्रह्मविष्णुपुरोगमान् ॥६८॥य अधोभागमाश्रित्य रुद्रः कालाग्निसंज्ञितः॥ तं चैव पशुभूतेशं शूलहस्तं सदोज्वलम् ॥६९॥ ततो विवेश कालाग्निर्विष्णुर्ब्रह्मा शतक्रतुः। अन्ये च देवा गन्धर्वा मुनयो मनवस्तथा ॥७०॥ सर्वे कोलाहलं कृत्वा देवासुरमहोरगाः ॥ विविशुश्च हसन् स्थानं वार्योघा इव सागरम् ॥७१॥ प्रविश्य भवने रम्ये नानाधातुविचित्रिते ॥ गणकोटिशताकीर्णे रुद्रकोटिसुसेविते ॥७२॥ आदौ जगाम तं पूर्वं रुद्रैर्देवैर्वृतस्तथा ॥ ...

---

[६६] नंदिकेश्वर ह्मणाला—शूल धारण करणाऱ्या श्रीशिवा, तुमच्या आज्ञे-प्रमाणें ब्रह्मदेव वगैरे सर्व देव बाहेर येऊन उभे आहेत, आणि ते सर्व अनेक शरीरें असणाऱ्या तुला [ परमेश्वराला ] भेटूं इच्छितात. [६७] ह्यासाठीं हे त्रिपुरांतका, मी देवदैत्यांस जाऊन काय सांगूं तें मला सांगा; त्यांस एकदम आंत न येऊं देतां सर्वांस बाहेर उभे केलें आहे. ते सर्वजण तुझ्या दर्शनाकरितां बाहेर उभे आहेत. तुझें सौंदर्य अलौकिक आहे, तें तेजःपुंज असून निर्दोष आहे. [६८] नंदीनें असें सांगितल्यावर, शंकरांनीं सर्व देवांस आंत येऊं दे अशी नंदीस आज्ञा केली; नंतर नंदीनें ब्रह्मदेव वगैरे सर्व मुख्य मुख्य देवांस शिवाजवळ नेलें. (६९) सर्व पशूंचे आणि प्राणिमात्रांचे अधिपति, शूल धारण करणारे व तेजस्वी असे जे शिव, त्यांच्या आज्ञेनें पाताल लोकांचा आश्रय करून राहिलेला तो (७०) कालाग्निरुद्र, ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देव, आणि इतर तेहतीस कोटि देव, गंधर्व, मुनीश्वर, मनु, (७१) देव, दैत्य, नाग वगैरे सर्वजण एकदम मोठी गर्दी आणि कोल्हाळ करून, पाण्याचे लोट जसे समुद्रांत शिरावे, तसे श्रीशिवाच्या मंदिरांत शिरले. (७२) श्रीशिवाचें मंदिर फार सुशोभित होतें, तेथें अनेक प्रकारचे धातु असल्यामुळें तें चित्रविचित्र दिसत होतें, तेथें शेकडों कोटि प्रमथगण उभे होते, व कोट्यावधि रुद्रगण तेथें उभे होते. (७३) त्या शिवालयांत प्रथम रुद्रगणांस बरोबर घेऊन नंदिकेश्वर सर्वांच्या पुढें गेला आणि त्यानें संसारदुःखाचा नाश करणाऱ्या, अंधकासुर आणि यमधर्म...

वारिमंधकालारिमपश्यन्नन्दिकेश्वरः ॥७३॥ मुक्ताचलप्रतीकाशं शशांकचयसन्निभम् ॥ नीलकंठं त्रिनेत्रं च शूलिनं सर्वतोमुखम् ॥७४॥ कोटिसूर्यप्रतीकाशं जगदानन्दकारिणम् ॥ कपालमालिनं देवं कपर्दकृतभूषणम् ॥७५॥ दशबाहुं दशार्द्धास्यमनन्तं तेजसां निधिम् ॥ जगदुत्पत्तिसंहारस्थित्यनुग्रहकारणम् ॥ ७६॥ अप्रमेयमनाकारमप्रपंचमनाकुलम् ॥ सिंहासनस्थमचलं चराचरविभूतिदम् ॥ क्षीरोदमिव निष्कम्पं त्रैलोक्यप्रभवं शिवम् ॥७७॥ सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ॥ सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य संस्थितम् ॥७८॥ सुरासुरैर्वंद्यमानं ध्यायमानं मुमुक्षुभिः ॥ इदं रूपं समालोक्य देवदेवस्य

---

ह्यांस शिक्षा करणाऱ्या महादेवास पाहिलें. (७४) श्रीशिव जसा एखादा मोत्यांचा पर्वत शोभावा तसे शोभत होते, किंवा हजारों चंद्र एकत्र केले असतां जसें तेज दिसावें, तसे तेजःपुंज दिसत होते. त्यांचा कंठ नील रंगाचा असून, त्यांस तीन डोळे होते. त्यांच्या हातांत शूल असून त्यांस चोहोंकडे तोंडें होतीं. [७५] ते कोट्यावधि सूर्यासारखे तेजःपुंज होते, ते सर्व त्रैलोक्याला सौख्य देणारे होते; त्यांच्या गळयांत नृकपालांच्या माळा होत्या, व डोकीवरील जटाजूट अलंकारासारखा दिसत होता. (७६) त्यांस दहा हात असून पांच तोंडें होतीं, त्यांचा अंत कोणासही लागत नाहीं इतके ते अलौकिक सामर्थ्यवान् होते, ते तेजःपुंज असून, सृष्टि उत्पन्न करणें, सृष्टीचें रक्षण करणें, सृष्टीचा संहार करणें, व जगावर कृपा करणें, इतक्या गोष्टी करण्यास ते सर्वतोपरी समर्थ होते, (७७) त्यांच्या स्वरूपाशीं तुलना करितां येईल असा जगांत दुसरा पदार्थच नव्हता ( नाहीं. ) त्यांस आकार नाहीं, त्यांस प्रपंच नसून त्यांस कोणत्याही प्रकारची व्याकुळता नाहीं, तें सिंहासनावर बसलेले असून पर्वतासारखे स्थिर होते. ते स्थावरजंगम जीवांस सुख देण्यास समर्थ होते. ते क्षीरसमुद्रासारखे शांत दिसत होते, सर्व त्रैलोक्याचे ते उत्पन्नकर्ते असून सर्वांचें कल्याणकर्ते होते. (७८) त्या शिवास चोहोंकडे हात आणि पाय होते, त्यांस चोहोंकडे डोळे मस्तकें आणि तोंडें होतीं त्यांस चोहोंकडे कान होते, ते सर्व त्रैलोक्य आपल्या शक्तीनें व्यापून राहिलेले होते. (७९) त्यांस देव आणि दैत्य मनापासून वंदन करीत होते, व आपणास मोक्षप्राप्ति व्हावी अशी इच्छा करणारे लोक त्यांचें ध्यान करीत होते. त्या देवाधिदेव श्रीशिवाचें असें अलौकिक सौंदर्य पाहून, तो कालाग्नि मेरु-

शूलिनः॥ अग्रे स्थितः स कालाग्निर्मेरोर्मेरुरिवापरः ॥७९॥अथोवाच शैलादिः प्रणिपत्य सनातनम् ॥ नरकाणामधोभागे पुरं यत्र प्रतिष्ठितम् ॥८०॥ शतकोटिप्रविस्तीर्णं कामदं शुभलक्षणम् ॥यस्य चोर्ध्वं शिरालम्बं कोटियोजनमायतम् ॥८१॥ ज्वालामालाकुलं दिव्यं सर्वलोकभयंकरम् ॥ प्राकाराट्टालकैर्युक्तं गोपुरैस्तोरणान्वितम् ॥८२॥ रक्तनीलसमानाभैः भीमघोषदुरासदैः ॥ वृतं रुद्रसहस्रैस्तु सिंहरूपैर्महाबलैः ॥८३॥ नियम्य च स्वयं तेजः प्रीत्यर्थं तेऽधुना गतः ॥ धौतचामीकराभासश्चन्दनागरुगन्धयुक् ॥८४॥ नीलकण्ठस्त्रिनेत्रश्च वृषकेतुर्महाबलः॥ द्वीपिचर्मपरीधानः पंचवक्त्रेंदुभूषणः ॥८५॥ अनन्तमेखलाधारी कुण्डलीकृततक्षकः॥ दशबाहुर्महातेजा पीनवक्षा महातनुः ॥८६॥ आगत

पर्वतापुढें जसा मेरु पर्वत उभा रहावा, तसा श्रीशिवापुढें उभा राहिला. (८०) मग अनादिकालापासून असणाऱ्या श्रीशिवास नमस्कार करून नंदी ह्मणाला— महाराज, नरकांच्या पुढील बाजूस जें नगर वसलेलें आहे. [८१] तें शंभर कोटि योजनें विस्तीर्ण असून तेथें मनांतील सर्व इच्छा पूर्ण होतात. तें नगर दिसण्यांत फार सुंदर दिसतें, त्याच्यावर एक कोट योजन औरस चौरस पोकळ आहे. [८२] त्या नगरासभोंवतीं हजारों ज्वाला पेटल्यासारख्या दिसतात. तें नगर रमणीय असून सर्व लोकांस फारच भयंकर आहे असें वाटतें. त्या नगराभोंवतीं मोठमोठाले तट आणि ओटे आहेत. त्या शहराला मोठमोठ्या वेशी आणि दरवाजे आहेत. (८३) लाल रंगाचे आणि नील रंगाचे, भयंकर आरोळ्या मारून लोकांस घाबरून टाकणारे, मोठे बळवान् आणि सिंहाचीं रूपें घेणारे, असे हजारों रुद्रगण त्या नगराचें रक्षण करितात. [८४] त्या नगराचा अधिपति स्वतः आपलें स्वरूप सौम्य करून तुझ्या संतोषाखालीं हल्लीं येथें आला आहे, बावनकशी सोन्यासारखी त्याची अंगकांति आहे, कृष्णागरु चंदनाच्या उटीचा त्याच्या अंगास सुवास येतो. (८५) त्याचा कंठ नीलवर्ण असून त्यास तीन डोळे आहेत, त्याच्या ध्वजावर वृषभ असून तो मोठा बळकट आहे. तो वाघाचें कातडें नेसलेला असून त्यास पांच तोंडें आहेत, व त्याचे मस्तकावर चंद्राचें भूषण आहे. [८६] त्याच्या कमरेला शेष नांवाच्या नागाचा कमरपट्टा आहे, त्यानें आपल्या कानांत कुंडलासारखा तक्षक लोंबत सोडलेला आहे. त्याला दहा हात असून तो मोठा तेजःपुंज आहे, त्याची छाती रुंद असून तो शरीरानें धिप्पाड आहे. [८७] परमेश्वरा, देवाधिदेवा, त्रैलोक्यपते तोच हा

सौम्यरूपेण तव देव समीपतः ॥ पश्यैनं मृदुभावेन देवदेव जगत्पते ॥८७॥ एते चैव महावीर्या कालाग्नेश्च समीपतः ॥ तिष्ठन्ति ज्वलमानाभा रुद्राश्च शतकोटयः ॥८८॥ त्वन्नियोगान्महादेव कालाग्न्यादेशकारिणः ॥ तिष्ठन्ति स्वपुरे रम्ये क्रीडमाना मनोहरैः ॥८९॥ तवानुज्ञांगता ह्येते शशांकामलमौलयः ॥ शुद्धस्फटिकसंकाशाः पद्मरागसमप्रभाः ॥९०॥ तडिद्भ्रमरसंकाशाः वज्रशूलधनुर्धराः ॥ नीलकंठास्त्रिनेत्राश्च शार्दूलाजिनवाससः ॥९१॥ सर्वाभरणसंपन्ना अनंतबलविक्रमाः ॥ जरारुक्शोकसंत्यक्ताः सुखदुःखविवर्जिताः ॥ इमानपि महादेव पश्य प्रीतिकरो भव ॥९२॥ हरिचंदनलिप्तांगा अशोककमलार्चिताः ॥ दैत्याधिपतयश्चैते प्रल्हादाद्या महाबलाः ॥ समागता महादेव नागाः शेषा यशस्विनः ॥९३॥ सर्वाः पातालवासिन्यो रूपयौ-

---

कालाग्नि सौम्य स्वरूप घेऊन तुजजवळ येऊन उभा राहिला आहे. ह्याच्याकडे तूं शांतपणानें पहा. (८८) ह्या कालाग्नीच्या जवळच मोठमोठे पराक्रमी आणि अग्नीसारखे तेजस्वी कोट्यावधि रुद्रगण उभे आहेत. (८९) हे महेश्वरा, तुमच्या सांगण्याप्रमाणें हे सर्वजण कालाग्नीची आज्ञा मानतात. आणि आपल्या मनोहर नगरांत अनेक प्रकारचे खेळ खेळत सुखानें राहतात. [९०] ते हे सर्व रुद्रगण तुझ्या आज्ञेप्रमाणें येथें आले आहेत, ह्यांच्या मस्तकांवर चंद्राप्रमाणें पांढरे शुभ्र मुकुट आहेत, ह्यांची अंगकांति निर्मळ स्फटिकमण्यासारखी आहे, व ह्यांचे अंगावर पद्मरागमण्यासारखी लाली आहे. [९१] हे विज़ेसारखे आणि भुंग्यासारखे शोभत आहेत, ह्यांचे हातांत वज्र, शूल आणि धनुष्य हीं आयुधें आहेत. ह्यांचे कंठ नीलवर्ण असून ह्यांस तीन नेत्र आहेत. ह्यांच्या अंगावर वाघाचीं कातडीं वस्त्रांप्रमाणें शोभत आहेत. (९२) ह्यांच्या अंगावर सर्व प्रकारचे अलंकार आहेत. ह्यांचें शौर्य आणि पराक्रम अलौकिक आहेत. ह्यांस ह्मातारपण, रोग आणि दुःख हीं नाहींत, ह्यांस सुख नाहीं, आणि दुःखही नाहीं. ह्यांचेकडे पाहून श्रीशिवा, आपण आनंद माना. [९३] हे प्रल्हाद वगैरे मोठमोठे दैत्यपति आपले भेटीस आले आहेत. ह्यांनीं आपल्या अंगास सुगंधि चंदनाची उटी लाविली आहे, व गळ्यांत अशोकाच्या फुलांच्या आणि कमळांच्या माळा घातलेल्या आहेत. हे मोठे बलवान् आहेत. हे महेश्वरा, हे शेष वगैरे मोठमोठे प्रख्यात नाग तुमच्या भेटीस आलेले आहेत. [९४] परमेश्वरा, ह्या सर्व-

वनगर्विताः ॥ आगता देवदेवेश हाटकेश्वरकन्यकाः ॥९४॥ एते पर्वत- राजानः कैलासाद्या महाबलाः ॥ आगता देवदेवेश द्वीपैश्च सह सागराः ॥९५॥ गन्धर्वाः किन्नरा यक्षा सिद्धा विद्याधराः शिव ॥ ऊर्वश्या- द्याश्चाप्सरसो नद्यः पापहराः शुभाः॥९६॥ एते च मुनयो देवा भृग्वा- द्याः प्रथितौजसः ॥ संप्राप्तानि पुराणीह शक्रादीनां माहत्मनाम् ॥९७॥ एते लोकाः समायाताः सत्यान्ता सप्त शंकर ॥ मूर्तयस्तव देवेश भ- वाद्याश्च समागताः ॥ ९८ ॥ आदित्या वसवो रुद्रास्साध्याश्चैव मरुद्ग- णाः ॥ सनकाद्या महात्मानः सत्यलोकनिवासिनः ॥९९॥ पद्मरागनि- भो देवो बंधूककुसुमद्युतिः ॥ जटाभिस्तु शिरोनद्धो रत्नमालाविभू- षितः ॥ १०० ॥ कमण्डलुधरः श्रीमान् दण्डहस्तः सुलोचनः ॥ कृष्णा- जिनोत्तरीयेण रक्तमाल्यांबरेण च ॥१०१॥ सुवर्णमेखलाधारी रौक्म-

---

जण पातालांत राहणाऱ्या अतिशय सुस्वरूप हाटकेश्वर रुद्राच्या मुली [रुद्रकन्या] आल्या आहेत. [९५] हे कैलास वगैरे मोठमोठे पर्वत आले आहेत. हे मोठे बलवान् आहेत. हे देवाधिदेवा, हे समुद्र द्वीपांसहित येथें आले आहेत. (९६) श्रीशंकरा, गंधर्व आले आहेत, किन्नर आले आहेत, यक्ष आले आहेत, सिद्ध आले आहेत, विद्याधर आले आहेत, ऊर्वशी मेनका वगैरे अप्सरा आल्या आहेत, पातक नाश करणाऱ्या ह्या चांगल्या चांगल्या नद्या आल्या आहेत. [९७] परमेश्वरा, हे भृगु वगैरे मोठमोठे तपस्वी आले आहेत, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देवांचीं नगरें आलीं आहेत. [९८] शंकरा, भूलोकापासून तों तहत सत्यलोकांपर्यंत सात लोक आले आहेत. देवाधिदेवा, भव वगैरे तुझ्या ज्या मूर्ति आहेत त्या सर्व आल्या आहेत. [९९] आदित्य, वसु, रुद्र, साध्य, मरुद्गण, सनकादिक मोठमोठे ऋषीश्वर व सत्यलोकांत राहणारे सर्वजण आले आहेत. [१००] परमेश्वरा हा ब्रह्मदेव आला आहे ह्याकडे पहा पद्मरागमण्यासारखी ह्याची अंगकांति आहे, व ह्याचे अंगावर जास्वंदीच्या फुलासारखें तेज आहे. ह्यानें आपल्या डोक्यावर जटा आंवळून बांधलेल्या आहेत, ह्याच्या गळ्यांत रत्नांच्या माळा आहेत; त्यामुळें हा सुशोभित दिसतो. (१०१) ह्यानें एका हातांत कमंडलु धरि- लेला आहे, व एका हातांत दण्ड धरिला आहे. ह्याचे डोळे फार सुरेख आहेत. ह्यानें हरिणाचें कातडें आपल्या अंगावर घेतलें आहे, ह्याच्या गळ्यांत तांबड्या फुलांच्या माळा असून हा तांबड्या रंगाचें वस्त्र नेसला आहे. (१०२) ह्याच्या कमरे-

कुंडलमंडितः ॥ हंसध्वजश्चतुर्बाहुः सुरासुरनमस्कृतः ॥ सावित्र्या सहितो देवः पद्मयोनिरिहागतः ॥१०२॥ अतसीपुष्पसंकाशस्तमालदलवर्चसः ॥ पीतांबरधरः श्यामः पीतगन्धानुलेपनः ॥१०३॥ शंखचक्रगदाधारी शार्ङ्गी पक्षीशवाहनः ॥ किरीटकुण्डली हारी कौस्तुभाभरणान्वितः ॥१०४॥ चामीकरसुमालाभिर्दीप्यमानो विराजितः ॥ सूर्यायुतप्रतीकाशो नीलोत्पलदलेक्षणः ॥१०५॥ क्षीरोदार्णवशायी च नीलजीमूतनिःस्वनः ॥ रमामृदितसर्वांगः शेषपर्यंकलालसः ॥१०६॥ वरदो भक्तवात्सल्यः दैत्यकोटिक्षयंकरः॥ आगतोऽयं महादेव विष्णुः प्रियतमस्तव ॥१०७॥ तप्तचामीकरप्रख्यो वज्रहस्तो महाबलः ॥ पट्टांशुक-

---

सोन्याचा कमरपट्टा आहे, व ह्याच्या कानांत सोन्याचीं कुंडलें आहेत. ह्याच्या ध्वजावर हंस असून, ह्यास चार हात आहेत. व देव दैत्य देखील ह्याला नमस्कार करितात. तो हा ब्रह्मदेव सावित्रीस बरोबर घेऊन येथें आला आहे. (१०३) हा श्रीविष्णु आला आहे अळशीच्या निळ्या फुलासारखी व तमालाच्या पानासारखी ह्याची अंगकांति आहे, हा पीतांबर (पिंवळ्या रेशमाचें वस्त्र) नेसला असून हा काळसर रंगाचा आहे, पिंवळ्या गंधाची ह्यानें आपल्या अंगास उटी लाविलेली आहे. [१०४] ह्याचे हातांत शंख, चक्र, गदा अशीं आयुधें आहेत. ह्याचे हातांत शार्ङ्ग धनुष्य आहे. ह्याचें वाहन गरुड आहे. ह्याच्या मस्तकावर मुकुट असून कानांत कुंडलें आहेत, व गळ्यांत मोत्यांच्या माळा आहेत. ह्याच्या उरावर कौस्तुभ नांवाचा मणि आहे. [१०५] ह्याच्या गळ्यांत आणखी सोन्याचा गोफ, कंठी वगैरे अलंकार असल्यामुळें हा फार शोभतो. हा दहा हजार सूर्यांसारखा तेजस्वी असून निळ्या कमळांच्या पानांसारखे ह्याचे डोळे आहेत. (१०६) हा नेहमीं क्षीरसमुद्रांत राहतो व पावसाच्या ढगाच्या गडगडण्यासारखा ह्याचा शब्द गंभीर आहे. ह्याचें सर्व अंग लक्ष्मीनें आपल्या हातानें चेपलें आहे. ह्याला शेषाच्या पलंगावर निजण्याची मोठी हौस आहे. (१०७) हा वर देणारा असून आपल्या भक्तांविषयीं मोठा दयाळू आहे. ह्यानें आजपर्यंत कोट्यावधि दैत्यांस मारिलें. हा तुझा अतिशय जिवलग मित्र आहे, हा तुझ्याजवळ येऊन उभा आहे. ह्या विष्णूकडे पहा. [१०८] हा समोर इंद्र उभा आहे, हा तापविलेल्या सोन्यासारखा तेजस्वी आहे. ह्याच्या हातांत वज्र आहे, हा मोठा बलवान् आहे, हा पट्टावली नांवाचें [ जरीकांठी ] वस्त्र पांघरला

परीधानो हेममालाविभूषितः ॥१०८॥ वृत्तम् ॥ प्रख्यातवीर्यो वलवृत्रहन्ता वालार्कभासो हरिचन्दनांकः ॥ पुन्नागनागैर्वकुलैश्च जुष्टो मुक्ताफलालंकृतकण्ठदेशः ॥१०९॥ अयं समागतः शक्रो वह्निर्वैवस्वतो यमः ॥ निऋतिर्वरुणो वायुः कुबेरश्च समागतः ॥११०॥ ईशानश्च महाभाग त्रिंशत्कोटिगणैर्वृतः॥ आगतस्त्रिजगद्योने पिनाकी च गणेश्वरः ॥१११॥ दशकोटिगणैर्युक्तः कालकण्ठस्तथैव च ॥ सप्तकोटिगणैर्युक्तो घण्टाकर्णो महाबलः ॥११२॥ दशकोटिगणैर्युक्तो सुघोषश्च महावलः ॥ चतुःकोटिगणैर्दण्डी शिखंडी दशकोटिभिः ॥११३॥ षड्भिर्मयूरवदनः सिंहास्यो दशकोटिभिः ॥ सप्तकोटिगणैर्युक्तः किरीटी च समागतः ॥११४॥ कालांतकस्तु दशभिर्लाकुली दशकोटिभिः ॥ षड्भिश्च मुण्ड-

---

असून ह्याच्या अंगावर सोन्याचे अनेक प्रकारचे अलंकार आहेत. त्यामुळें हा शोभत आहे. [१०९] हा मोठा पराक्रमी आहे अशी ह्याची ख्याति आहे, ह्यानें वलदैत्याला आणि वृत्रासुराला मारिलें. सकाळच्या सूर्यासारखी ह्याची अंगकांति आहे ह्याच्या कपाळीं चंदनाचा टिळा आहे. ह्याच्या गळ्यांत पुन्नाग, चांफा आणि वकुळ ह्यांच्या फुलांच्या माळा आहेत; व गळ्यांत आणखी मोत्यांच्याही माळा असल्यामुळें हा फार शोभतो. (११०) अशा ह्या इंद्राकडे पहा. हा अग्नि आला आहे, हा वैवस्वत यम आला आहे, हा निर्ऋति आला आहे, हा वरुण आला आहे, हा वायु आला आहे, हा पहा कुबेर देखील आला आहे. (१११) हे भाग्यशाली श्रीशंकरा, हा ईशानदेव तीस कोटि गण वरोवर घेऊन आला आहे, हे त्रैलोक्याचें मूलकारण असणाऱ्या श्रीशिवा, हा पिनाकी नांवाचा गणेश्वर आला आहे [११२] त्याचेवरोवर दहा कोटि गणेश्वर आहेत. हा कालकंठ नांवाचा गणेश्वर आला आहे पहा, ह्याचेवरोवर सात कोटि गण आहेत. हा अतिशय वलवान् घण्टाकर्ण गणेश्वर आला आहे पहा. [११३] ह्याचेवरोवर दहा कोटि गण आहेत. हा वलवान् सुघोप नांवाचा गणेश्वर आपल्यावरोवर चार कोटि गण घेऊन आला आहे. हा शिखंडी आपल्यावरोवर दहा कोटि गण घेऊन आला आहे. [११४] हा मयूरवदन नांवाचा गणेश्वर आपल्यावरोवर सहा कोटि गण घेऊन आला आहे. हा सिंहास्य नांवाचा गणेश्वर आपल्यावरोवर दहा कोटि गण घेऊन आला आहे. व आपल्यावरोवर सात कोटि गण घेऊन हा किरीटी गणेश्वर आला आहे. [११५] हा कालांतक गणेश्वर आपल्यावरोवर दहा कोटि गण घेऊन आला असून, लाकुली गणेश्वरही

माली च त्रिशूली पंचकोटिभिः ॥ अष्टभिर्विश्वमाली च त्रिमूर्तिर्नव कोटिभिः ॥११५॥ एते गणेश्वराः सर्वे तथा चान्ये गणेश्वराः ॥ तेषां संख्यां न जानन्ति ब्रह्माद्या देवतागणाः ॥ आगतानां महादेव श्रुणु कोलाहलं विभो ॥११६॥ अमरेशः प्रभासश्च पुष्करो नैमिषस्तथा ॥आ-षाढी दण्डिमुण्डाद्याः पावका दिव्यमूर्तयः ॥११७॥ एते दिव्याष्टका देव कामरूपा महाबलाः ॥ त्वदाज्ञयाऽऽगता रुद्रा जलावरणवासिनः ॥ को-टिकोटिगणैर्युक्ता देवदेव महेश्वर ॥११८॥ विश्वेश्वरजटोद्भूता सिंधु-श्चैव सरस्वती॥ यमुना गण्डकी रुक्मा विपाशा नर्मदा शिवा ॥११९॥ रुक्मघण्टा च निर्विंद्या देविका च दृषद्वती ॥ शतरुद्रा पयोष्णी च चंद्रभागा च गौतमी ॥१२०॥ चर्मण्वती च कावेरी शरयूश्च शरावती॥ धूतपापा चं सारथ्या मणिमाला सुगंधिका ॥१२१॥ जंबूकाऽपि च नि-

---

दहा कोटि गण घेऊन आला आहे. हा मुण्डमाली गणेश्वर सहा कोटि गण बरोबर घेऊन आला असून, हा त्रिशूली पांच कोटि गण बरोबर घेऊन आला आहे. हा विश्वमाली गणेश्वर बरोबर आठ कोटि गण घेऊन आला असून, हा त्रिमूर्ति नांवाचा गणेश्वर आपलेबरोबर नऊ कोट गण घेऊन आला आहे. (११६) हे सर्व मुख्य मुख्य गणेश्वर आणि दुसरे बाकीचेही सर्व गणेश्वर आले आहेत. ते इतके आहेत कीं, त्यांची गणती ब्रह्मादिक देवांच्या हातूनही होणार नाहीं. हे परमेश्वरा महादेवा, तुझ्या दर्शनास आलेल्या ह्या सर्व लोकांचा कल-कलाट कसा होतो आहे पहा. (११७) हा अमरेश, हा प्रभास, हा पुष्कर हा नैमिष, हा आषाढी, हा दण्डी, हा मुण्डी वगैरे हे अतिशय तेजस्वी अग्नि आले आहेत. (११८) हे आठजण रुद्र मोठे पराक्रमी आहेत. परमेश्वरा, हे पाहिजे त्यावेळीं पाहिजे तशीं रूपें घेतात. हे सर्वजण तुझ्या आज्ञेप्रमाणें तुजजवळ आले आहेत. हे पाण्यांत राहतात. ह्यांच्याबरोबर आणखी कोट्यावधि गण आहेत. हे देवाधिदेवा, महेश्वरा, तूं ह्या सर्वांकडे पहा. [११९] हे विश्वेश्वरा, तुमच्या जटाजूटांतून उत्पन्न झालेली ही गंगा नदी आली आहे पहा, ही सिंधु, ही सरस्वती, ही यमुना, ही गण्डकी, ही रुक्मा, ही विपाशा, ही नर्मदा, ही शिवा, (१२०) रुक्मघण्टा, निर्विंद्या, देविका, दृषद्वती, शतरुद्रा, पयोष्णी, चंद्रभागा, गौतमी, [१२१] चर्मण्वती, कावेरी, शरयू, शरावती, धूतपापा, सारथ्या, मणिमाला, सुगंधिका, (१२२) जंबूका, निश्चारा, कौशिकी, कुमुदाकरा, मंदा-

श्वारा कौशिकी कुमुदाकरा ॥ मन्दाकिनी चन्द्रलेखा पंकजामोदवाहिनी ॥१२२॥ ऐरावती कामवेगा प्रेंखा वै कामचारिणी ॥ पूर्णभद्रा मदामोदा गम्भीरावर्तका स्मृता १२३॥ मेघघोषा मेघवर्णी सदानीरा च नन्दिनी ॥ वेदा वेदावती तीर्णा सिता चित्रोत्पला तथा ॥१२४॥ वेत्रावती च वृत्रघ्नी पिप्पला जंजला तथा ॥ सरजा कुमुदा शिक्षा कौशी च निषधा सिता ॥१२५॥ वैतारिणी सिनीवाली वेगवंती तथैव च ॥ गौरी कृष्णा तथा दुर्गा तुंगभद्रोत्पलावती ॥ स्वर्णा भीमरथी शुद्धा कृतमाला तरंगिणी ॥१२६॥ एता देव महानद्यः पावनाः कल्मषापहाः ॥ मूर्तिमत्यस्तवेशान उत्सवेष्विह आगताः ॥१२७॥ सर्वा एता महादेव पश्य कारुण्यवारिधे ॥ भवंत्याकृतिनः सर्वे त्वयि दृष्टे महेश्वर ॥१२८॥ एवमुक्त्वा तथा नन्दी देवदेवस्य चाग्रतः ॥ पपात दण्डवद्भूमौ भक्त्या परमया द्विजाः ॥१२९॥ नन्दिनं तं महात्मानं दृष्ट्वा विश्वेश्वरः प्रभुः ॥ प्रीतोभवत्स कालारिर्मन्दरे चारुकंदरे ॥१३०॥ अथासौ हिमवान् विप्रा देवीमात्मसुतामुमाम् ॥ प्रदानार्थं

---

किनी, चंद्रलेखा, पंकजामोदवाहिनी; (१२३) ऐरावती, कामवेगा, प्रेंखा, कामचारिणी, पूर्णभद्रा, मदामोदा, गंभीरावर्तका, (१२४) मेघघोषा, मेघवर्णी, सदानीरा, नंदिनी, वेदा, वेदावती, तीर्णा, सिता, चित्रोत्पला, (१२५) वेत्रावती, वृत्रघ्नी, पिप्पला, जंजला, सरजा, कुमुदा, शिक्षा, कौशी, निषधा, सिता,[१२६] वैतारिणी, सिनीवाली, वेगवंती, गौरी, कृष्णा, दुर्गा, तुंगभद्रा, उत्पलावती, स्वर्णा, भीमरथी, शुद्धा, कृतमाला, तरंगिणी या नद्या आल्या आहेत. (१२७) हे परमेश्वरा, ह्या मोठमोठ्या नद्या फार पवित्र असून पातक नाश करणाऱ्या आहेत, हे श्रीशिवा, ह्या सर्वजणी प्रत्यक्षरूपानें तुझ्या लग्नसमारंभाकरितां येथें आल्या आहेत. [१२८] आणि ह्या सर्व तुजपुढें हल्लीं उभ्या आहेत. हे दयासमुद्रा, श्रीशंकरा, तूं त्यांजकडे कृपादृष्टीनें पहा. हे महेश्वरा, तुझें दर्शन झाल्याबरोबर त्या सर्वजणी देवतारूप होतील [१२९] हे ब्राह्मणहो, ह्याप्रमाणें लग्नसमारंभाकरितां आलेल्या सर्वांची माहिती श्रीशिवास देऊन, नंदिकेश्वरानें भक्तिभावानें शिवापुढें साष्टांग नमस्कार घातला. [१३०] चांगल्या चांगल्या गुहा असणाऱ्या मंदर पर्वताच्या ठिकाणीं त्रैलोक्यपति परमात्मा यमधर्मास शिक्षा करणारा श्रीशिव, त्या महात्म्या नंदिकेश्वरानें सांगितलेली हकीकत ऐकून व नंदिकेश्वरानें साष्टांग नमस्कार घातलेला पाहून, संतुष्ट झाला. (१३१) ब्राह्मणहो,

महेशाय संप्राप्तो मन्दरं क्षणात् ॥१३१॥ आह दृष्ट्वा गिरिं नन्दी देवदेवं पिनाकिनम् ॥ वक्तुकामः समायातो भगवन्पर्वतेश्वरः ॥१३२॥ श्रुत्वा तु वचनं श्लक्ष्णं च्युतं नन्दिमुखात्तथा ॥ मेघगंभीरया वाचा महादेवोऽब्रवीदिदम् ॥१३३॥ वदत्वयं गिरिश्रेष्ठो हृदये यत्प्रतिष्ठितम् ॥ कामस्तदाऽचिरात्तस्य भविष्यति न संशयः ॥१३४॥ एवमुक्ते तदा विप्रा देवदेवे महेश्वरे ॥ उवाच गिरिशार्दूलो भूत्वाऽग्रे च कृतांजलिः ॥१३५॥

हिमवानुवाच॥ याऽऽसीत्पूर्वं च ते पत्नी साऽवतीर्णा गृहे मम॥ तामेव तव दानार्थमागतोऽस्मि महेश्वर ॥१३६॥ अमी ब्रह्मादयो देवा त्वत्समीपमिहागताः॥ किं गोत्रमिति पृच्छामि एषामग्रे विभो वद॥१३७॥ श्रुत्वा तु भारतीं तस्य विश्वेशो विश्ववन्दितः॥ किं गोत्रमिति संचित्य नोत्तरं च ससर्ज ह॥ दृष्ट्वा निरुत्तरं शंभुं जहसुर्देवदानवाः ॥१३८॥ एवं

---

मग तो हिमालय पर्वतही आपली मुलगी पार्वती शिवाला दान करण्याकरितां तत्काळ मंदर पर्वतावर गेला. [१३२] हिमालय पर्वत आलेला पाहून, नंदी अजगवधनुष्य हातांत असणाऱ्या त्या देवाधिदेव श्रीशिवास ह्मणाला, परमेश्वरा, तुझ्याबरोबर कांहीं बोलण्याकरितां पर्वतश्रेष्ठ हिमालय तुजकडे आला आहे. [१३३] नंदीच्या तोंडून निघालेले असे शब्द ऐकून मेघगर्जनेसारख्या गंभीर शब्दानें महादेव नंदीस असें ह्मणूं लागले. (१३४) नंदिकेश्वरा, ह्या पर्वतश्रेष्ठाच्या मनांत काय असेल, तें त्यानें खुशाल बोलावें. त्याच्या मनांत जी कांहीं इच्छा असेल ती लागलीच पूर्ण होईल. ह्यांत कांहीं संशय नाहीं. (१३५) ब्राह्मणहो, त्यावेळीं त्या देवाधिदेव महादेवानें असें ह्मटल्यावर तो पर्वतश्रेष्ठ हिमालय पुढें होऊन हात जोडून श्रीशिवास ह्मणाला.—

(१३६) हिमालय ह्मणतो—हे महेश्वरा, जी तुझी पूर्वजन्मींची सती नांवाची बायको होती, ती माझे घरीं माझे पोटीं जन्मास आली आहे. तीच तुला देण्याकरितां हल्लीं मी तुजकडे आलों आहे. [१३७] हे ब्रह्मादिक देव तुझ्याजवळच येथें उभे आहेत; परमेश्वरा, ह्यांच्यासमक्ष मी तुला विचारितों तुझें गोत्र काय आहे, तें मला सांग. [१३८] तें हिमालयाचें बोलणें ऐकून तो त्रैलोक्यपति व त्रैलोक्य ज्याला नमस्कार करितें असा श्रीशिव, आतां मी आपलें काय गोत्र सांगावें, असा विचार करीत मुकाट्यानें बसला. श्रीशिव हिमालयानें त्यांचें गोत्र विचारिलें असतां कांहींएक उत्तर न देतां मुकाट्यानें बसले असें पाहतांच सर्व देव व दैत्य हंसूं लागले, (१३९) व त्या पर्वतश्रेष्ठ हिमालयास ह्मणूं लागले,

एव जगद्योनिर्गोत्रमस्य कथं भवेत् ॥ इत्यूचुर्विबुधास्सर्वे हिमव
नगोत्तमम् ॥१३९॥ देवतानां वचः श्रुत्वा गिरिराजोऽब्रवीदिदम् ॥ वि
श्वेश्वरं परं धाम परमात्मानमव्ययम् ॥१४०॥ शाश्वतं गिरिशं स्था
विश्वाकारं सनातनम् ॥ दत्ता दत्ता पुनर्दत्ता उमा सत्येन ते प्र
॥१४१॥ततो महान्रवो विप्रा जयशब्दादिमंगलैः॥ दुन्दुभीनां च वाद्य
नामभवत्सागरोपमः॥१४२॥ गृहीतेति शिवः प्राह पार्वती पर्वतेश्वरम्
तद्धस्ते भगवाञ्छम्भुरंगुलीयं प्रवेशयत् ॥१४३॥ इमं च कलशं है
मादाय त्वं नगोत्तम ॥ याहि गत्वा अनेनैव तामुमां स्नापय त्वरा
॥१४४॥ अन्येषां परिहारार्थमेष एव विधिःसदा ॥ जगत्त्रयेऽपि नूनं स
व्रज तूर्णं नगाधिप ॥१४५॥ ततस्तुष्टो महाशैलो नमस्कृत्य महेश्वरम्

---

अरे पर्वतेश्वरा, हा शिव परमात्माच सर्व त्रैलोक्याचा मूलपुरुष आहे,
ह्याला आणखी गोत्र कोठून असणार ? ह्याचेपासूनच सर्व गोत्रें उत्पन्न झा
[१४०] हें सर्व देवांचें बोलणें ऐकून हिमालय ह्मणाला, देवहो, असें
तर ऐका– हा महादेव त्रैलोक्याचा अधिपति आहे, हाच श्रेष्ठ तेज आहे,
परमात्मा आहे, हा अविनाशी आहे, (१४१) हा चिरकाल राहणारा आहे,
कैलासपर्वतावर नेहमीं राहतो, हा त्रैलोक्यस्वरूप असून अनादिकालापासून
त्या ह्या परमेश्वराला मी आपली मुलगी दिली, मी आपली मुलगी दिली.
खरोखर असें सांगतों कीं, परमेश्वरा, शिवा, तुला मी आपली मुलगी दि
[१४२] ब्राह्मणहो, हिमालयानें मीं आपली मुलगी शिवास दिली, असें वा
तीन वेळ उच्चारल्यावरोबर लागलीच मंगलकारक शब्द होऊन वाद्यें
लागलीं. आणि त्यामुळें दाहीदिशा दणाणून गेल्या. दुंदुभि ( नगारे ) वाद्यां
शब्द तर असा झाला कीं, त्यापुढें खवळलेल्या समुद्राचा शब्द कांहींच
(१४३) शिव ह्मणाले, पर्वतेश्वरा हिमालया, मीं ही पार्वती ग्रहण केली.
महादेवांनीं पार्वतीच्या हाताच्या बोटांत एक आंगठी घातली. [१४४]
ते हिमालयास ह्मणाले— पर्वतेश्वरा, तूं ही सोन्याची घागर घेऊन जा
ह्या घागरींतील पाण्यानेंच या पार्वतीला अगोदर लवकर स्नान घाल. (१४
इतर लोकांस माहिती होण्यासाठीं हा प्रकार आपण केलाच पाहिजे.
असा प्रकार केला ह्मणजे पुढें खात्रीनें तो सर्व त्रैलोक्यांत प्रसिद्धीस येईल.
साठीं पर्वतेश्वरा, तूं आतां लवकर जा. (१४६) हें शिवाचें बोलणें ऐकून हि
लयास मोठा संतोष झाला. आणि तो महादेवास नमस्कार करून निघा

ययौ दत्वा तु तां देवीं दृष्ट्वा चैव तु ऋत्विजः ॥ स्नापयत्कलशेनैव पार्वतीं परमेश्वरम् ॥१४६॥ एवं यज्ञरतो विप्रास्तर्पणाय चराचरम् ॥ अभवद्देवमुद्दिश्य शंकरं स गिरिस्तदा ॥१४७॥ अथास्मिन्नन्तरे देवो धर्मकेतुर्महेश्वरः ॥ उत्थितो मुनिशार्दूलाः समालोक्य च शार्ङ्गिणम् ॥१४८॥ अभवज्जयशब्दानां तुमुलो हि महांस्तदा ॥ पुष्पवृष्टिः पपातोच्चैः सत्यलोकाद्द्विजोत्तमाः ॥१४९॥ वनानामधिपाश्चैव ऋतवश्च मुदान्विताः ॥ कुसुमैर्दिव्यगंधाढ्यैर्ववृषुर्मेघवृन्दवत् ॥१५०॥ वीणावेणुमृदंगानां दुंदुभीनां ततो रवैः ॥ विरिंचिहरिशक्राद्याः पूरयन्तः सुरासुराः॥ त्रैलोक्यमिव नादेन देवा घोषं प्रचक्रिरे ॥१५१॥ गायत्री चैव सावित्री शची लक्ष्मीः सरस्वती ॥ अदितिश्च दितिः कद्रुर्विनताद्यास्तथापराः ॥१५२॥ अमावास्या कुहूश्चैव सिनीवाली धृतिर्मतिः ॥ गंगाद्याः सरितः सर्वाः कृत्स्नशो देवयोषितः ॥१५३॥ रंभाद्यप्सरसो दिव्या रुद्रकन्यास्तथैव च ॥ विद्याधर्योऽथ नागिन्यो दैत्यानां पत्नयस्तथा ॥१५४॥ रुद्र-

---

त्यानें ती घागर ऋत्विजाजवळ (उपाध्यायाजवळ) देऊन त्या घागरींतील पाण्यानेंच महादेवास आणि पार्वतीस स्नान घातलें. (१४७) ब्राह्मणहो, ह्याप्रमाणें हिमालय पर्वत स्थावरजंगमविश्वास सुख लागण्यासाठीं विवाहयज्ञ (शंकराबरोबर पार्वतीचें लग्न) करण्यास तयार झाला. (१४८) हे मुनिश्रेष्ठहो, त्याचवेळीं परमात्मा वृषभेश्वर महादेव श्रीविष्णूच्या तोंडाकडे पाहून उठला. (१४९) त्यावरोवर मोठा जयजयकार ध्वनि झाला, व ब्राह्मणहो, सत्यलोकांतून महादेवाच्या अंगावर फुलांची मोठी वृष्टि झाली. (१५०) वनांच्या अधिपतींस शिवाचें पार्वतीबरोबर लग्न होतें असें समजतांच त्या सर्वांस मोठा आनंद झाला. आणि त्यांनीं आकाशांतील ढगांतून अतिशय सुगंधि अशा स्वर्गांतील फुलांचा महादेवावर वर्षाव केला. (१५१) त्यावेळीं जिकडे तिकडे वीणा, वेणु, मृदंग आणि दुंदुभि वगैरे मंगलकारक आणि सुस्वरवाद्यें ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देव वाजवूं लागले. व इतर तेहतीस कोटि देवांनीं असा जयजयकार केला कीं, त्या जयजयकाराच्या ध्वनीनें त्रैलोक्य दणाणून गेलें. [१५२] गायत्री, सावित्री, शची, लक्ष्मी, सरस्वती, आदिति, दिति, कद्रु, विनता, तशाच आणखी दुसऱ्या[१५३] अमावास्या, कुहू, सिनीवाली, धृति, मति, गंगा वगैरे सर्व नद्या आणि देवांगना ( देवस्त्रिया ), [१५४] रंभा वगैरे अप्सरा उत्तम उत्तम रूपवान् रुद्रकन्या, विद्याधरांच्या बायका, नागिणी, दैत्यांच्या बायका, (१५५) रुद्रकन्या, मनाला

कन्या मनोहर्षा यक्षकन्यास्तथैव च ॥ मातरः सप्त याश्चैव याश्च नक्षत्र-
मातरः ॥१५५॥ गिरीणां पत्नयो याश्च समुद्राश्च सरांसि च ॥ मंगलं
गायमानास्तु अर्घ्यमष्टांगसंयुतम् ॥ सम्प्रहृष्टा ददुः सर्वा देवदेवस्य
पादयोः ॥१५६॥ एतस्मिन्नंतरे विप्रा गिरिराजप्रचोदितः ॥ मैनाक-
स्तत्र संप्राप्तो हेमकुंभकरः शुचिः ॥१५७॥ शालंकायनपौत्रस्य गत्वा
तस्याग्रतः स्थितः ॥ तेनापि देवदेवस्य ज्ञापितो गिरिराट्सुतः॥१५८॥
अथासौ भगवान्देवो मंगलेशो जलाशयः॥ असिंचद्ब्रह्मसा युक्तः समुद्रैः
शूलपाणिनम् ॥१५९॥ स्नाप्यमाने तदा देवे नद्यो वै सागरा द्विजाः॥
बभूवुः सलिलैर्मुक्ताः कृशांगाः स्वेदसंयुताः ॥१६०॥ अथ ते त्रिदशाः
सर्वे सनारायणका द्विजाः ॥ परं विस्मयमापन्ना भवं पश्यन्ति
चाद्भुतम् ॥१६१॥ ततो निरीक्ष्यमाणास्तु शरीरे शंकरस्य च ॥ नदीः
सर्वाः समुद्रांश्च प्रपश्यंति सुविस्मिताः ॥१६२॥ योगमायावृतं वीक्ष्य

---

अतिशय सुख झालेल्या यक्षकन्या तशाच सात माता आणि नक्षत्रांच्या माता
[१५६] पर्वतांच्या बायका, समुद्रांच्या वायका आणि सरोवरांच्या बायका तेथें
जितक्या जमल्या होत्या त्या सर्वांनीं मंगलकारक गीतें गात आठ प्रकारचीं सुगंधि
द्रव्यें घालून तयार केलेलें अर्घ्य मोठ्या आनंदानें देवाधिदेव परमेश्वर श्रीशि-
वाच्या पायांवर ओतलें. (१५७) हे ब्राह्मणहो त्याचवेळीं हिमालयानें मैनाकास
पुढें येण्यास सांगितलें तेव्हां हिमालयाच्या सांगण्याप्रमाणें तो निष्पाप स्वभावाचा
मैनाकपर्वत सोन्याची घागर हातांत घेऊन पुढें आला. [१५८] आणि नंदिके-
श्वरापुढें येऊन उभा राहिला. नंतर नंदिकेश्वरानेंही हिमालयपर्वताचा पुत्र हा
मैनाकपर्वत आपल्या पुढें उभा आहे असें श्रीशिवास कळविलें. [१५९] मग
नेहमीं समुद्राच्या पाण्यांतच राहणाऱ्या त्या महात्म्या मैनाकपर्वतानें ब्रह्मदेवाच्या
सांगण्याप्रमाणें समुद्राच्या जलानें शिवास अभिषेक केला. (१६०) ब्राह्मणहो
काय आश्चर्य सांगावें? मैनाकपर्वतानें शिवास अभिषेक घातला त्यामुळें सर्व नद्या
आणि समुद्र ह्यांतील पाणी अगदीं नाहींसें होऊन त्यांच्या अंगावर घामाचे थेंब
आले. [१६१] अभिषेक होत असतां शिवाची मूर्ति इतकी सुशोभित दिसली
कीं, ती पाहून ब्रह्मादिक तेहतीस कोटि देव आणि श्रीविष्णु देखील आश्चर्यानें
थक्क झाले. [१६२] सर्व देव त्या शिवाच्या शरीराकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागले
तों त्यांस शंकराच्या शरीरांत सर्व नद्या, समुद्र आणि सरोवरें दिसूं लागल्यामुळें
सर्वांस मोठें नवल वाटलें. [१६३] व ते सर्वजण आपआपसांत ह्मणूं लागले

यत्तोयं जगति स्थितम् ॥ अस्तुवन् पशुभर्तारं ब्रह्माद्या देवतागणाः ॥१६३॥ ततस्तैस्तु स्तुतो देवः प्रहस्य भगवान्भवः॥ विसृज्य च तथा तोयमभवत्पूर्वरूपधृक् ॥१६४॥ एवं सम्यक् स्थिते तस्मिन् देवदेवे पिनाकिनि ॥ स्नापितोऽसौ विरिंच्याद्यैस्त्रिमूर्तिर्भगवान्भवः ॥१६५॥ मैनाकोऽथांजलिं कृत्वा देवदेवस्य चाग्रतः॥ संस्थितो हर्षसंयुक्तो निधिं लब्ध्वा यथाऽधनः ॥१६६॥ विसर्जितः स्वतस्तेन देवदेवेन शंभुना ॥ त्रैलोक्यतिलके तस्मिन्ययौ तूर्णं नगात्मजः ॥१६७॥ ततः शुक्लं परीधाप्य देवीं तामरसेक्षणाम् ॥ स्नापयत्तेन कुंभेन हरांघ्रिस्नापितेन च ॥१६८॥ ततो भगवती देवी हृष्टपुष्टा तपोमयी ॥ पितुरभ्यासगा भूत्वा विवेश परमासने ॥१६९॥ अथायान्तं शिवं दृष्ट्वा हिमवान्पर्वतेश्वरः ॥ मेरुश्चैव यथासंख्यैरग्निचंद्रदिवाकरैः ॥ तथा देवं

---

" हा परमेश्वर योगमायेचा अधिपति आहे त्यामुळें सर्व त्रैलोक्यांत जितकें कांहीं पाणी आहे तितकें सर्व ह्याच्या शरीरांत आपणांस दिसत आहे. " असें ह्मणून ब्रह्मादिक तेहतीस कोटि देवांनीं त्या पशुपति श्रीशिवाची स्तुति केली. [१६४] सर्व देवांनीं केलेली स्तुति ऐकून परमेश्वर श्रीशिव हंसले आणि त्यांनीं तें सर्व पाणी जेथल्या तेथें सोडून देऊन पुनः पूर्वीप्रमाणें ते दिसूं लागले. [१६५] असो ह्याप्रमाणें त्या अजगवधनुष्य धारण करणाऱ्या देवाधिदेव श्रीशिवास तीर्थाभिषेक केल्यावर ब्रह्मदेव वगैरे मुख्य मुख्य देवांनीं श्रीशिवास उत्तम आसनावर बसविलें. (१६६) जसा एखाद्या दरिद्री मनुष्याला फार मोठा. द्रव्याचा निधि सांपडला, ह्मणजे त्यास आनंद होतो तसा मैनाकपर्वतास आनंद होऊन तो दोन्ही हात जोडून श्रीशिवाच्या समोर उभा राहिला. (१६७) मग शिवांनीं त्यास आपल्या बापाजवळ जा ह्मणून सांगितल्यावर तो मैनाक लगलाच सर्व त्रिभुवनांत श्रेष्ठ अशा त्रैलोक्यतिलक नांवाच्या आपल्या नगरास परत गेला. [१६८] शिवास तीर्थाभिषेक झाल्यावर कमलाप्रमाणें नेत्र असणाऱ्या पार्वतीस पांढरी पडदणी नेसण्यास देऊन तिलाही शिवाच्या चरणोदकाच्या जलानें त्याच घागरीनें अभिषेक केला. [१६९] त्यामुळें तपश्चर्येची केवळ मूर्तीच अशी ती परमेश्वरी पार्वती मोठी संतुष्ट झाली, व ती तीर्थाभिषेक झाल्यावर आपल्या बापाजवळ जाऊन उत्तम आसनावर बसली. [१७०] मग हिमालय पर्वतानें पाहिलें तों जसा मेरुपर्वत अनेक अग्नि अनेक सूर्य व अनेक चंद्र ह्यांस बरोबर घेऊन आपल्याकडे यावा तसा श्रीशिव अनेक देवांसहवर्तमान व मस्तकावरील छत्रा-

सदेवाद्यैर्वृतं छत्रेण शोभितम् ॥१७०॥ जयेत्युक्त्वा नगेंद्रस्तु गन्धमा-
ल्याम्बरैर्युतः उत्थितः सहसा विप्राः पुष्पहस्तो महेश्वरम् ॥१७१॥
मेनया परया युक्तो भक्त्या चानन्यया द्विजाः ॥ वस्त्रैर्ना-
विधैश्चक्रे मार्गशोभां तथा गिरिः ॥१७२॥ पताकाभिर्विचित्राभिः
स्रग्दामैर्दिव्यगंधिभिः॥ध्वजैश्च विविधाकारैः पंचवर्णैर्मनोहरैः ॥१७३॥
चामरैश्चंद्ररश्म्याभैर्नाटकैश्च समन्ततः ॥ मुक्तानां प्रकरैश्चैव पुष्पा-
च तथैव च॥१७४॥एवमाद्यैरनेकैश्च शोभां कृत्वा नगोत्तमः॥ स्थितः
वीक्ष्यमाणोऽसौ विश्वव्यापिनमीश्वरम् ॥१७५॥संपूर्णचंद्रवदना मद-
नलदीपिकाः ॥ शतकोट्यप्सरौघाश्च निर्ययुः सुमुखास्तदा ॥ हेमपा-
करासक्ताः पद्मेंदीवरहस्तकाः ॥१७६॥ मणिपात्राणि पूर्णानि दू-

---

मुळें अतिशय शोभिवंत दिसणारा आपलेकडे येत आहे (१७१) असें म्ह-
तांच तो पर्वतश्रेष्ठ शिवाची पूजा करण्याकरितां गंध, फुलें आणि रेशमी
हातांत घेऊन उभा राहिला व त्यानें शंकराची पूजा करण्याकरितां हातांत फु-
लांची माळ घेतली. (१७२) हिमालयावरोबर त्याची वायको मेनकाही नम्र
उठून उभी राहिली. हिमालयपर्वतानें शिव ज्या मार्गानें येत होते, त्या मार्गा-
जागोजाग नाना प्रकारच्या उंची उंची कापडाचे मांडव घालून तो मार्ग सुशो-
भित केला; (१७३) जागोजाग चित्रविचित्र रंगाच्या पताका उभारल्या व जागो-
जाग सुवासिक फुलांच्या माळा घातल्या, अनेक प्रकारचे ध्वज उभे केले
जागोजाग पंचरंगी रांगोळ्या घातल्या. (१७४) चांदण्याप्रमाणें पांढऱ्या शु-
दिसणाऱ्या चवऱ्या जागोजाग बांधल्या, जागोजाग नाच सुरू केले. तशाच जागो-
जाग मोत्यांच्या माळा व फुलांच्या माळा लोंबत सोडल्या. (१७५) अशा अ-
णखी दुसऱ्या अनेक प्रकारच्या उपायांनीं तो मार्ग सुशोभित केला व ह्या मार्गा-
शंकर केव्हां येतात ही मार्गप्रतीक्षा करीत हिमालय उभा राहिला. (१७६) शं-
राला सामोरें जाण्याकरितां शंभर कोटि अप्सरा निघाल्या, त्यांचीं तोंडें पौर्णि-
मेच्या संपूर्ण चंद्राप्रमाणें शोभत होतीं, त्या मदनरूप विस्तवाच्या दिवटी सारख्या
दिसत होत्या, व त्यांचीं तोंडें फार सुशोभित दिसत होतीं. त्यांच्या हातांत सु-
वर्णाचीं पात्रें होतीं, त्यांचे हात सूर्यविकासिनी आणि चंद्रविकासिनी कमलांप्रमाणें
नाजूक होते. (१७७) कितीएकांच्या हातांत रत्नांचीं ताम्हनें असून त्यांत दू-
पांढऱ्या मोहऱ्या, अक्षता, दहीं, गोरोचन, व्रीहि आणि यव ह्यांचे लहान लहान

सिद्धार्थकाक्षतैः ॥ दधिरोचनमाधाय व्रीहिभिः स्तवकैर्यवैः ॥१७७॥ हरिचंदनलिप्तांगा हरिचंदनहस्तकाः ॥ विद्रुमांकुरहस्ताश्च तथैवोत्पलशेखराः ॥१७८॥ चूतमंजरिहस्तान्याः पारिजातांकुराः पराः॥सुस्वादुतोयसंपूर्णा भृंगारकरपल्लवाः ॥१७९॥ हावभावविलासिन्यो मदनातुरविव्हलाः॥मदनारिं प्रणेमुस्ता गायमानास्त्रिलोचनं ॥१८०॥ अथासौ भगवांच्छूली अन्तर्यामी महेश्वरः ॥ त्रैलोक्यतिलके तस्मिन्क्षणादाविर्बभूव ह ॥१८१॥ ततोऽर्चनैर्बहुविधैः पूजयामास पर्वतः ॥ स्तुत्वा च पूजयित्वा च नामोच्चारणतः पुनः ॥ गीतैश्च विविधैर्वाद्यैः प्रविवेश हरस्तदा ॥१८२॥ देवोऽभवत्तदा वालो द्व्यष्टवर्षाकृतिः प्रभुः॥ हेमाभो भगवांच्छंभुः किरीटी कुण्डली हरः ॥१८३॥ सुरासुराश्च विप्रेंद्रा

---

ढीग करून घेतले होते. (१७८) त्यांनीं आपल्या सर्व अंगाला उंची चंदनाच्या उट्या लाविल्या होत्या. कितीएकींनीं हातांत हरिचंदन घेतलें होतें, कितीएकींनीं हातांत पोंवळ्यांचे अंकुर घेतले होते व त्यांतील कितीएकजणींनीं आपल्या केशांत कमळें खोंवलेलीं होतीं. (१७९) कितीएकजणींनीं आपल्या हातांत आंब्याच्या झाडांच्या मंजुळ्या घेतल्या होत्या व कितीएकजणींनीं आपल्या हातांत पारिजातांचे कोवळे कोवळे अंकुर घेतले होते, कितीएकजणींच्या हातांत गोड आणि स्वच्छ पाणी भरून घेतलेल्या सोन्याच्या झाऱ्या होत्या. (१८०) त्या स्वतः तरुण असल्यामुळें व मदनास लाजविणारें शिवाचें सौंदर्य पाहून त्या मदनातुर झाल्यामुळें हावभाव वगैरे विलासाचे प्रकार करीत त्या सामोऱ्या जात होत्या. त्या गाणें गात गात शिवाजवळ गेल्या आणि त्यांनीं शिवास भक्तिभावानें नमस्कार केला. (१८१) मग अशा समारंभानें हा परमात्मा, शूल हातांत घेणारा, सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत राहणारा महेश्वर लवकरच त्रैलोक्यतिलक नांवाच्या नगरास येऊन पोहोंचला. (१८२) शंकर तेथें येऊन पोहोंचतांच हिमालयानें अनेक प्रकारांनीं त्यांची पूजा केली, स्तुति केली व वरचेवर शिवांच्या नामांचा उच्चार करून पूजा केली आणि अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत मोठ्या समारंभानें हिमालयानें शिवास नगरांत आणलें. (१८३) श्रीशिवांनींही त्या प्रसंगास अनुसरून शोभेल असें सोळावर्षें वयाचें रूप घेतलें त्यामुळें त्यांची कांति बावनकशी सोन्यासारखी तेजःपुंज दिसत होती त्यांच्या मस्तकावर मुकुट असून त्यांच्या कानांत कुंडलें होतीं, (१८४) ब्राह्मणहो, देव आणि दैत्य त्यावेळीं तें शिवाचें सोळा वर्षांच्या वयास शोभेल असें अलौकिक रूप

दृष्ट्वा रूपं पिनाकिनः ॥ अवलोक्यास्यमन्योन्यं जहसुस्ते मुदान्विता
॥१८४॥ आसनैर्हैमजैर्विप्रा नानारत्नैश्च भूषिताम्॥प्राविशन्मण्डपांच्छुभ्रं
सभां देवो जगत्पतिः ॥१८५॥ हरस्य दक्षिणे वेधा वामभागे जनार्दनः
शैलादिः पार्श्वगः शंभोः कालरुद्रश्च सुव्रताः ॥१८६॥ रुद्रैर्गणेश्वरैर्देवैः
सिद्धैश्च मुनिभिस्तथा ॥ उपविष्टेषु देवेषु गंधर्वाद्याः समन्ततः
जगुर्गीतं च देवाग्रे तुंबरुर्नारदादयः ॥१८७॥ मत्तमातंगगामिन्यो गेय
तालल्यान्विताः ॥ रंभाद्यप्सरसः सर्वाः किन्नर्यो नर्तुर्द्विजाः ॥१८८
वीणावल्लरिवेणूनां दुंदुभीनां विशेषतः ॥ ध्वनिभिर्मनसस्तुष्टिर्जा
सुमनसां तथा ॥१८९॥ अथ विश्वेश्वरः शंभुर्भूषणं नभसि स्थितम्
प्रायच्छद्गिरिजायै तत्समाहूय नगात्मजाम् ॥१९०॥ अनेनालंकृता देवि
मम योग्या भविष्यसि ॥ पितुर्दक्षस्य तत्कोपं पूर्वजस्य वरांगने

---

पाहून संतोषानें एकमेकांकडे पाहून हंसूं लागले. (१८५) ब्राह्मणहो, हि
ल्यानें लग्नसमारंभाच्या वेळीं सर्व मंडळींस बसण्याकरितां त्या मांडवांत जो दि
णखाना तयार केला होता त्यांत सोन्याचीं आसनें पसरलेलीं असून त्यांवर जा
जागा अनेक प्रकारचीं रत्नें जडलीं होतीं, त्या सभेंत (दिवाणखान्यांत) परमे
श्वर, त्रिशूलधारी त्रैलोक्यपति श्रीशिव गेले. (१८६) हे सदाचारी ब्राह्मणहो, त
दिवाणखान्यांत महादेवाच्या उजव्या हाताकडे ब्रह्मदेव बसले, डाव्याहाताकडे
श्रीविष्णु बसले, नंदिकेश्वर आणि कालाग्नि हे दोघेजण महादेवाच्या दोन बाजूं
उभे राहिले. [१८७] त्यानंतर रुद्र, शिवगण, देव, सिद्ध, मुनि हे आपापल्या
योग्यतेप्रमाणें शिवासमोर येऊन आपापल्या जागेवर बसले, सर्व देव भोंवतां
आपापल्या जागेवर बसतांच गंधर्व आणि नारद वगैरे ऋषि परमेश्वराचीं स्तुति
पर स्तोत्रें (गाणीं) गाऊं लागले. (१८८) ब्राह्मणहो, ज्यांच्या चालण्याची गति
उन्मत्त झालेल्या हत्तीसारखी मंद मंद होती, व गाण्याकडे आणि तालाकडे
ज्यांचें सारखें लक्ष्य लागलें होतें त्या रंभा वगैरे अप्सरा आणि किन्नरकन्या नाचू
लागल्या. (१८९) त्यावेळीं वीणा, वल्लरि, वेणु, दुंदुभि वगैरे सुस्वर वाद्यें वाज
लागलीं व त्यांच्या मंजुलध्वनींनीं सर्व देवांचीं मनें आनंदानें प्रसन्न झालीं.(१९०
मग त्रैलोक्यपति श्रीशिवांनीं पार्वतीस हांक मारिली आणि आकाशांत तिला दे
ण्याकरितां ह्मणूनच ठेवलेले अलंकार तिच्या स्वाधीन केले. (१९१) आणि ह्मटलें
देवी पार्वती, हे अलंकार तूं घातलेस ह्मणजे तूं माझी बायको होण्यास योग्य
झालीस. हे सौंदर्यशालिनी पार्वती, पूर्व जन्मांतील तुझ्या पित्यावर (दक्षप्रजापती

जहिष्यसि तमेवाशु भावं चैव तु तामसम् ॥१९१॥ ततः सा पार्वती देवी गृहीत्वाकाशमंडलात्॥पितुः समीपमगमद्वस्त्राभरणमुत्तमम्॥१९२॥ महताऽभ्युत्सवेनाशु भूषयित्वा शिवां गिरिः॥वस्त्रैराभरणैर्दिव्यैर्देवेशीं सिंहवाहिनीं ॥१९३॥ ततोत्संगगता भूयश्चंद्रलेखेव तोयदे ॥ वनिताभिर्वृता देवी बभौ तामरसेक्षणा ॥१९४॥ अथ देवैः परिवृतो विष्णवाद्यैस्त्रिपुरान्तकः ॥ बभ्राम मुनिशार्दूलाः क्रीडास्थानानि कृत्स्नशः ॥१९५॥ भगवत्यायमाने तु विश्वेशेऽन्धकसूदने॥प्रणम्य परया भक्त्या शैलादिरिदमब्रवीत् ॥१९६॥

नंदिकेश्वर उवाच ॥ देवेयमिंद्रनीलाभा भाति विश्वंभरा शिवा ॥ सेयं जलमयी नाथ निर्मिता विश्वकर्मणा ॥१९७॥ या चेयमपरा रम्यतोयानां च प्रधारिणी ॥ सेयं भाति महादेव रत्नानामीदृशी प्रभा ॥१९८॥ इदं यद्द्वारसंस्थानं दृश्यते लंबकैर्वृतम् ॥ कुड्यस्य रत्नवि-

---

वर) जो तुझा मोठा राग झाला होता त्यामुळें तुझ्या अंगीं आलेला तामसपणा हे अलंकार तूं घातल्यानें नाहींसा होईल. (१९२) नंतर शिवाच्या सांगण्याप्रमाणें पार्वतीनेंही ते आकाशांतलि अलंकार घेतले आणि ते लुगडें चोळी व अलंकार घेऊन ती आपल्या बापाकडे गेली. (१९३) हिमालयपर्वतानेंही सिंहवाहन असणाऱ्या त्या पार्वतीस मोठ्या समारंभानें त्या वस्त्रांनीं आणि त्या अलंकारांनीं तात्काल देवस्त्रियांकडून शृंगार करविला. (१९४) त्यामुळें ढगाच्या ओळीजवळ जशी चंद्राची कोर शोभावी तशी कमलाप्रमाणें डोळे असणारी पार्वती त्या देवस्त्रियांमुळें शोभली (१९५) मग मुनीश्वरहो, त्रिपुरांचा नाश करणारा श्रीशिव, विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांस बरोबर घेऊन त्या ठिकाणीं जितकीं कांहीं क्रीडास्थानें होतीं तितकीं सर्व पाहण्यास निघाला. (१९६) परमेश्वर विश्वेश्वर अंधकासुरास मारणारे श्रीशिव क्रीडास्थानें पाहण्यास निघाले तें पाहून त्यांस मोठ्या भक्तिभावानें नमस्कार करून—

(१९७) नंदिकेश्वर असें ह्मणाला—परमेश्वरा ही इंद्रनीलमण्यासारखी निळ्या रंगाची दिसणारी जमीन पहा, ही कशी सुशोभित दिसत आहे ! परमेश्वरा ही विश्वकर्म्यानें केलेली जलभूमि कशी दिसते आहे ती पहा. [१९८] दुसरी जी ही जमीन दिसते ती जमीन नसून तेथें स्वच्छ आणि गोड पाण्याचे प्रवाह वाहत आहेत त्यामुळें ती जमीन रत्नांच्या कांतीसारखी सुशोभित दिसत आहे. (१९९) ही जी येथें दाराची जागा दिसत आहे त्यावर लोलक लोंबत असल्यामुळें व

न्यासाल्लक्ष्यते द्वाररूपतः ॥१९९॥ इदं चैत्ररथाकारं दृश्यते वनमुत्त-
मम् ॥ प्रतिबिंबं महादेव रत्नभूमेर्न संशयः ॥२००॥ इदं च मंदिराकारं
सोपानार्गलमंडितम् ॥ प्रतिबिंबमिदं चैव दृश्यते न च मंदिरम्॥२०१॥
या चेयं सागराकारा लक्ष्यते तोयरूपिणी ॥ एषाऽपि परमेशान रत्न-
भूमिर्जलान्विता ॥२०२॥ यदिदं गगनाभासं मूर्तद्रव्यैरिवोज्झितम् ।
क्रीडामंटपमेतस्मिन्प्रदेशे देव तिष्ठति ॥२०३॥ अंबराभैर्महारत्नैःबहि-
र्देशे विनिर्मितम् ॥ अन्तर्हैममयं रम्यं विद्रुमाद्यैरलंकृतम् ॥२०४॥
शैलादेर्वचनादेव विश्वकर्मविनिर्मितम् ॥ अनेकचोद्यसंयुक्तं रमणीय-
यौ हरः॥२०५॥एवं क्रीडति देवेशे सुरासुरमहोरगाः॥विद्याधरास्तथा
यक्षा गन्धर्वाप्सरसादयः ॥२०६॥ दीर्घिकासु तटाकेषु सरसीषु ऱ्हदेषु
च ॥ क्रीडावापिषु ते रेमुर्यन्त्रैर्नानाविधैर्भृशम् ॥ बभूवुर्देवतास्सर्वा

---

भिंतीला जागोजाग रत्नें जडविलेलीं असल्यामुळें दारासारखें दिसतें(२००)हें समोर
उपवन दिसतें तें कसें कुबेराच्या चैत्ररथ नांवाच्या उपवनासारखें सुशोभित
दिसत आहे पहा. महादेवा, हें खरें उपवन नव्हे तें ह्या रत्नखचित जमिनीचें
प्रतिबिंब आहे ह्यांत संशय नाहीं. (२०१) हें पहा दुसरीकडे एक मोठा थोरला
वाडा असल्यासारखा दिसत आहे त्याला पायऱ्या आणि अडसर वगैरे असल्या-
सारखें दिसतें हें तरी प्रतिबिंबच आहे खरा वाडा नाहींच. (२०२) हें जें एकी-
कडे लांबच्यालांब समुद्रासारखें पाणी पसरलेलें दिसतें तें तरी परमेश्वरा खरोखर
पाणी नव्हेच ती नुसती रत्नांची फरशी आहे तेथें पाण्याचा थेंब देखील नाहीं.
(२०३) हे परमेश्वरा समोर जें हें आकाशासारखें दिसत आहे, तेथें प्रत्यक्ष वस्तु
कांहींच दिसत नाहीं, त्याठिकाणींच क्रीडागृह ( मंडप ) आहे. (२०४) त्या
क्रीडागृहाची रचना अशा चमत्कारिक रीतीनें केली आहे कीं, त्याला बाहेरच्या
बाजूस आकाशाच्या रंगाचीं निळीं रत्नें लाविलीं आहेत आणि आंतील सर्व बाजू
सोन्यानें तयार करून त्यावर पोंवळीं बसवून ती सुशोभित केली आहे. (२०५)
तें क्रीडामंदिर स्वतः विश्वकर्म्यानें तयार केलें असल्यामुळें त्यांत जागोजाग अनेक
प्रकारचीं कलाकुसरीचीं कामें केलीं होतीं त्या मनोहर ठिकाणीं नंदिकेश्वराच्या
सांगण्याप्रमाणें सर्व शोभा पाहत पाहत श्रीशिव जाऊं लागले. [२०६] ह्याप्रमाणें
तो परमेश्वर क्रीडा करूं लागलेला पाहून देव, दैत्य, सर्प, विद्याधर तसेच यक्ष,
गंधर्व, अप्सरा वगैरे (२०७) विहिरींत, तलावांत सरोवरांत, डोहांत आणि
क्रीडावापींत ( पोंहोण्याच्या हेतूनें बांधलेल्या सोयस्कर विहिरींत ) मनास वाटेल

क्रीडारतिषु लालसाः ॥२०७॥ अथ संक्रीड्य विश्वात्मा निवृत्तस्तत्प्रदेशतः ॥ देव्याः समीपमगमत्स्तूयमानो मुनीश्वरैः ॥२०८॥ वृत्तम् ॥ प्राप्यारुरोह प्रसभं सुरेशस्तमिंद्रनीलामलवेदिकान्तम् ॥ सहस्रपत्रैर्वकुलैश्च नागैः कीर्णं हि यत्कांचनपारिजातैः ॥२०९॥ तत्रोपविष्टो हरिणांकचिन्हे सरश्मिजालाकुलवेदिकान्ते ॥ विवेश सूर्यायुतसप्रभासो वृते विरिंच्यादिसुरैः समंतात् ॥२१०॥ अथोपविष्टं संवीक्ष्य विश्वेशं पर्वतेश्वरः॥तस्य संस्थाप्य पुरतो देवेशीमब्रवीद्भवम् ॥२११॥

हिमवानुवाच ॥ त्वमेवैकः परं धाम अर्द्धनारीश्वरः स्मृतः ॥ देवतानां हितार्थाय जातोस्यर्धतनुः पृथक् ॥२१२॥ दक्षस्य दुहिता देवी जगद्धात्री ह्युमा सती ॥ विनिंद्य च ततो दक्षं त्यक्त्वा देहं

---

तसे खेळ खेळूं लागले, आणि तें पाहून आपणही अशीच क्रीडा करावी असें सर्व देवांस वाटूं लागलें. [२०८] मग परमेश्वरानेंही त्या क्रीडागृहांत मनास वाटेल तितका वेळ क्रीडा केली, आणि मग तेथून निघून पुनः ते पार्वतीजवळ आले त्यावेळीं मुनीश्वरांनीं परमेश्वराची स्तुति केली. (२०९) श्रीशिव पार्वतीजवळ आल्यावर पार्वतीसमक्ष त्या मंडपांतील ओट्यावर ( बहुल्यावर ) चढले. तें बहुलें निवळ इंद्रनीलमण्यांचें तयार केलेलें होतें आणि त्यास शोभा येण्यासाठीं त्यावर सहस्रपत्रें ( कमळें ) बकुलांचीं फुलें, चांफ्याचीं फुलें, आणि सोन्याच्या पारिजातांचीं फुलें पसरलेलीं होतीं. (२१०) त्या वेदीवर एक कृष्णाजिन पसरलें होतें तें इतकें सुशोभित होतें कीं त्याचे किरण चोहोंकडून त्या ओट्यावर पडल्यामुळें त्या ओट्यालाही अलौकिक शोभा आली होती, त्या आसनावर दहा हजार सूर्यांसारखे तेजस्वी दिसणारे श्रीशिव जाऊन बसले. आणि मग त्यांच्यापुढें व सभोंवतीं ब्रह्मदेव वगैरे मुख्य मुख्य देव येऊन बसले. (२११) श्रीशिव बहुल्यावरील कृष्णाजिनावर बसलेले पाहून हिमालयानें त्यांच्यापुढें पार्वतीस आणून बसविलें आणि मग शिवास ह्मटलें—

(२१२) हिमालय ह्मणाला— हे परमेश्वरा, तूंच एक श्रेष्ठ तेज आहेस. तुला लोक अर्धनारीश्वर असें ह्मणतात, तूं देवांचें कल्याण करावयासाठींच अर्धशरीर पुरुष आणि अर्धशरीर बायको असा वेगवेगळा झाला आहेस. (२१३) सर्व त्रैलोक्याची आदिमाता दक्षप्रजापतीची मुलगी सती अपमानामुळें आपल्या बापाची निंदा करून व आपला देहत्याग करून माझे पोटीं जन्मास आली; ती ही उमा

निजं पुनः ॥ तवैव पत्नी देवेश जाता मम सुता सती ॥२१३॥ तत्
श्रुत्वा गिरींद्रस्य वचस्त्रिभुवनेश्वरः ॥ प्रसन्नो वरदः शंभुरब्रवीत्
र्वतेश्वरम् ॥२१४॥

ईश्वर उवाच ॥ वृत्तम् ॥ जानाम्यहं येन ममैव माया शक्तिः परै
नगराजराज ॥ संत्यज्य देहं तव धाम्नि जाता योगात्स्वयं चारु
शांकवक्त्रा ॥२१५॥ आचारार्थं गिरिश्रेष्ठ दत्तां गृण्हामि पार्वतीम्।
अदत्तां यदि गृण्हामि तथा लोकोऽपि वर्तते ॥२१६॥ अथ दिव्योद
पूर्णमादाय कलशं गिरिः ॥ परिपूर्णस्य नित्यस्य नित्यानुग्रहरूपिण
॥२१७॥ वृत्तम् ॥ प्रक्षाल्य पादौ शिरसा प्रणम्य भृंगारमादाय च शै
लराजः ॥ मुमो च तोयं भवपाणिपद्मे दत्तेति दत्तेति तथा प्रजल्
॥२१८॥ ततो मंगलनिर्घोषः समभूत्त्रिदिवौकसाम् ॥ वीणावेणुमृदंगा
काहलानां च निःस्वनः ॥२१९॥ वृत्तम् ॥ सा हारकण्ठी कटिसूत्रदा

---

तुजपुढें बसली आहे, देवाधिदेवा ही तुझीच पूर्वजन्मांतील स्त्री सती आहे आं
हल्लीं ही माझी मुलगी आहे. (२१४) असें हिमालयाचें बोलणें ऐकून सं
होऊन भक्तांस इच्छित वर देणारे त्रैलोक्याधिपति श्रीशंकर, ह्मणाले

(२१५) श्रीशंकर ह्मणाले–हे पर्वतश्रेष्ठा, मी, ही कोण आहे, हें सर्व जाणतों, 
माझीच मायाशक्ति आहे, ही फार सामर्थ्यवान् ( श्रेष्ठ ) आहे, ही आपला दे
त्याग करून तुझ्या घरीं आपल्या योगसामर्थ्यानें तुझी मुलगी ह्मणून जन्म
आली आहे. पौर्णिमेच्या चंद्रासारखें हिचें तोंड सुशोभित आहे. (२१६) हे पर्व
श्रेष्ठा, तूं लौकिकरीतीस अनुसरून मला पार्वती दिलीस तिचा मी स्वीकार करितो
तूं आपल्या संतोषानें मला न देतां मीं तशीच बळजोरीनें तुजपासून हिला प
वून नेलें असतें, तर लोकांत देखील तशीच वाईट चाल पडली असती, (२१
मग हिमालयानें स्वच्छ पाण्यानें भरलेली घागर उचलून पहिल्यानें त्या घागरी
तील पाण्यानें परिपूर्ण, नित्य आणि भक्तांवर नेहमीं कृपादृष्टि करणाऱ्या श्रीशि
वाचे (२१८) पाय धुतले व त्यांस शिरसाष्टांग नमस्कार केला. मग हिमालयानें
आपल्या हतांत सोन्याची झारी घेऊन त्यांतील पाणी महादेवाच्या हातावर घाल
तुह्मांस मीं आपली मुलगी पार्वती दिली, दिली, दिली असें तीन वेळ शब्द उच्चा
रले. (२१९) नंतर लागलीच देवांनीं वीणा, वेणु, मृदंग, काहल वगैरे मंगलका
रकवाद्यें वाजविलीं त्यामुळें दाहीदिशा मंजुलध्वनीनें दुमदुमून गेल्या. (२२०) मग

सुभ्रूलता चारुविलोलनेत्रा ॥ मेरोर्यथा भाति शशांकलेखा शर्वांकसंख्या शुशुभे भवानी ॥२२०॥ ततो देवाः सगंधर्वाः सिद्धाश्च मुनयस्तथा ॥ पिशाचा दानवा दैत्याः किन्नराश्च महोरगाः ॥२२१॥ विद्याधराश्चाप्सरसस्तथाऽन्ये च चराचराः ॥ प्रहृष्टाः सर्व एवैते पार्वत्या हरसंगमात् ॥२२२॥ वृत्तम् ॥ वृष्टिं ससर्जू ऋतवः सुतुष्टाः पुष्पैरनेकैर्भ्रमराकुलैश्च ॥ वाद्यैर्विचित्रैर्वरशंखनादैः संगीतगीतैर्वरमंगलैश्च ॥ वीणारवैर्दुंदुभिवेणुनादैः समंततः कर्णसुखं प्रजज्ञे ॥२२३॥ वृत्तम् ॥ आनृत्यतीभिः सुरसुंदरीभिः जेगीयतीभिर्वरकिन्नरीभिः ॥ दैत्यांगनाभिश्च तदा नटीभिः काम्यायतेऽतीव हरोत्सवश्च ॥२२४॥ होमावसाने मधुपर्कयुक्तं देवाय तस्मै मणिभाजनं च ॥ ततो निवेद्य प्रमथाधिपाय चकार तुष्टिं परमां गिरीशः ॥२२५॥ अथ देवेषु विश्वेशो वरदोऽभूद्द्विजोत्तमाः ॥ वरांश्च विविधान्दत्वा ब्रह्मादिभ्यो महेश्वरः ॥२२६॥

---

शंकरांनीं पार्वतीस उचलून आपल्या मांडीवर बसविलें त्यावेळीं मेरुपर्वताजवळ चंद्राची कोर शोभावी, तशी गळ्यांत मोत्यांच्या माळा, कमरेला कमरपट्टा असणारी सुंदर भोंवया आणि चंचल नेत्र असणारी पार्वती शिवाच्या मांडीवर बसल्यामुळें शोभूं लागली. (२२१) पार्वतीचें शिवाबरोबर लग्न लागलेलें पाहून देव, गंधर्व, सिद्ध, मुनीश्वर, पिशाच, दानव, दैत्य, किन्नर, महोरग, (२२२) विद्याधर, अप्सरा, तसेच दुसरे स्थावरजंगम जीव होते त्या सर्वांसच मोठा आनंद झाला. (२२३) त्यावेळीं सहा ऋतूंनीं मकरंद घेण्याकरितां ज्यांवर भुंगे बसले आहेत अशा सुगंधित फुलांचा शिवपार्वतीवर आकाशांतून वर्षाव केला. चोहोंकडे अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. उत्तम उत्तम शंखाचे नाद होऊं लागले कोणी कोणी चांगल्या चालीवर उत्तम उत्तम मंगलकारक गाणीं गाऊं लागले, जागोजाग विणें वाजूं लागले, दुंदुभि वाजूं लागले, वेणु वाजूं लागले त्यामुळें तो ध्वनि कानास फारच गोड लागूं लागला. (२२४) त्या शिवपार्वतीच्या लग्नसमारंभांत जागोजाग आनंदानें देवांगना नाचूं लागल्या; किन्नरी सुस्वर गाणें गाऊं लागल्या, व दैत्यांच्या स्त्रियाही तशाच आनंदामुळें नाचूं लागल्यानें तो समारंभ फारच प्रेक्षणीय (पाहण्यासारखा) झाला. (२२५) मग होम झाल्यानंतर हिमालयानें त्या प्रमथेश्वर श्रीशिवास मधुपर्क घातलेलें रत्नाचें पात्र देऊन फार संतुष्ट केलें. (२२६) हे ब्राह्मणहो, इतकें झाल्यावर परमेश्वर श्रीशिव देवादिकांस वर देण्यास तयार झाले आणि त्यांनीं ब्रह्मादिक देवांस त्यांचे इच्छेप्रमाणें अनेक वर

विसर्जयामास ततः सर्वान् स्थावरजंगमान् ॥ विसर्जिताः प्रणम्येशं प्रीतिं ते परमां गताः ॥२२७॥

सूतः ॥ एवं संक्षेपतो विप्रा विवाहो गिरिजापतेः ॥ कथितो रविणा पूर्वं यथावत्समुदीरितः ॥२२८॥

इति श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने गिरिजाविवाहविस्तारो नामैकोनविंशोऽध्यायः ॥

---

देऊन (२२७) सर्व स्थावरजंगम जीवांस आपापल्या स्थानांस (गांवांस) जाण्याची आज्ञा दिली. मग परमेश्वराची आज्ञा मिळतांच सर्व प्राणिमात्र श्रीशिवास मोठ्या संतोषानें नमस्कार करून आपापल्या गांवास गेले.

(२२८) सूत ह्मणतात— ब्राह्मणहो, पूर्वीं सूर्यानें जो हा शिवपार्वतीच्या लग्नाचा कथाभाग सांगितला होता तो मीं तुह्मांस थोडक्यांत सांगितला.

ह्याप्रमाणें नीलकण्ठ नागनाथ नांवाच्या विद्वद्वर्यानें केलेल्या वीरमाहेश्वराचार-संग्रहांतील शिवाधिक्य [ शिवाचें श्रेष्ठपण ] कथनापैकीं शिवपार्वतीच्या लग्नाचें सविस्तर वर्तमान नावांचा एकोणिसावा अध्याय संपला.

## ॥ अथ विंशोऽध्यायप्रारंभः ॥

॥ श्रीशिवाय नमः ॥ आदित्यपुराणे ॥ सूत उवाच ॥ विवाह्याद्रि-
सुतां शंभुर्ययौ कैलासपर्वतम्॥क्रीडां वै वर्षसाहस्रमकरोत्तत्र शंकरः॥
॥१॥ गणैर्नानाविधैश्चैव सिंहास्यैः शरभाननैः ॥ कैश्चिद्व्याघ्रमुखैर्भीमैः
कैश्चिद्रौद्रमुखैरपि ॥२॥ कैश्चिद्गजमुखैरन्यैः कैश्चिन्मृगमुखैस्तथा ॥
कैश्चिदुष्ट्रमुखैर्दीर्घैः कैश्चिद्रुरुमुखैरपि ॥३॥ कैश्चित्क्रोष्टृमुखैरन्यैः कैश्चि-
द्वृकमुखैरपि ॥ मूषिकास्यैस्तथा चान्यैर्मार्जारवदनैरपि ॥४॥ सर्पा-
स्यैर्नकुलास्यैश्च जंबुकास्यैस्तथा परैः ॥ शिंशुमारमुखैश्चान्यैर्झषवक्त्रै-
स्तथापरैः ॥५॥ मयूरवदनैरन्यैः कैश्चित्तत्र शुकाननैः ॥ उलूकवदनैरन्यै-
र्बकवक्त्रैस्तथापरैः ॥६॥ शाखामृगमुखैश्चान्यैः कैश्चिदश्वाननैरपि ॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. आदित्यपुराणांत असा कथाभाग आहे— (१) सूत ह्मणतात— ऋषीश्वरहो, शंकरांनीं पार्वतीशीं लग्न केल्यावर तिला बरोबर घेऊन ते तेथून कैलासपर्वतावर गेले आणि तेथें त्यांनीं एक हजार वर्षेपर्यंत सुखानें पार्वतीबरोबर कालक्रमणा केली. (२) शिवाबरोबर अनेक प्रकारचे गण होते त्यांत कितीएकांचीं सिंहासारखीं तोंडें होतीं, कितीएकांचीं शरभांसारखीं तोंडें होतीं, कितीएकांचीं वाघासारखीं भयंकर तोंडें होतीं, कितीएकांचीं तोंडें तर फारच अक्राळविक्राळ होतीं. (३) कितीएकांचीं हत्तींसारखीं तोंडें होतीं, कितीएकांचीं हरणांसारखीं तोंडें होतीं, कितीएकांचीं उंटांसारखीं लांबट तोंडें असून कितीए-कांचीं तोंडें रुरुजातीच्या हरिणांसारखीं होतीं. (४) कितीएकांचीं तोंडें कोल्ह्यांसा-रखीं असून कितीएकांचीं तोंडें लांडग्यांसारखीं होतीं. कितीएकांचीं तोंडें उंदरां-सारखीं असून कितीएकांचीं तोंडें मांजरांच्या तोंडांसारखीं होतीं. (५) कितीए-कांचीं तोंडें सापांसारखीं असून कितीएकांचीं तोंडें मुंगसांसारखीं होतीं, दुसऱ्या आणखी कितीएकांचीं तोंडें कोल्ह्यासारखीं असून कितीएकांचीं सुसरीसारखीं तर कितीएकांचीं माशांसारखीं तोंडें होतीं. (६) तशींच तेथें कितीएकांचीं मोरांसारखीं तोंडें असून कितीएकांचीं तोंडें राघूंच्या चोंचीसारखीं होतीं, कितीएकांचीं तोंडें दिवाभीतांसारखीं असून कितीएकांचीं तोंडें बगळ्यांसारखीं होतीं. (७) कितीएकांचीं तोंडें वानरांसारखीं असून कितीएकांचीं तोंडें घोड्यांसारखीं होतीं आणखी अशाच प्रकारचे कोट्यावधि शिवगण तेथें होते त्यांस जन्म आणि मरण मुळींच नव्हतें.

अन्यैरसंख्यैः प्रमथैर्जरामरणवर्जितैः ॥७॥ नित्यतृप्तैर्निरातंकैः काल
संहरणक्षमैः ॥ सहस्रकोटिसंख्यातैः स्वच्छंदगतिचारिभिः ॥८॥ क्रीडां
विधाय भगवान् कैलासे पर्वतोत्तमे ॥ तपसा महता शंभुरनुगृह्य
मंदरम् ॥९॥कैलासं संपरित्यज्य मंदरे चारुकंदरे ॥तत्रापि रममाणस्य
गते वर्षसहस्रके ॥१०॥ देवतानां हितार्थाय प्रकृत्या सह शूलभृत्
क्रीडतीति हि विश्वात्मा कामासक्तो न सर्वदा ॥११॥ प्रार्थितोऽहं सुरैः
पूर्वं तारकस्य वधेप्सया ॥ मद्रेतसः समुत्पन्नस्तारकं स हनिष्यति॥१२॥
इति मत्वा महादेवे रममाणे सहोमया ॥ उत्पाताश्च महा घोराः सं-
वृत्ताः सुदारुणाः ॥१३॥ रुधिरास्थीनि वर्षन्तो नदन्तो मेघसंकुलाः
वायवश्च महावेगाः पर्वतांश्चालयंति ते ॥१४॥ विमानानि सुराणां

---

(८) ते नित्यतृप्त असून त्यांस कशाचीही काळजी नव्हती, यमधर्मास शि-
करतील, इतकी त्यांच्या अंगांत शक्ति होती, त्यासर्व प्रमथगणांची संख्या ह-
हजार कोटि असून ते सर्व मनास वाटेल तेथें जाण्या येण्यास समर्थ होते. (९)
त्या सर्व शिवगणांसहवर्तमान राहून शिवांनीं त्या पर्वतश्रेष्ठ कैलासावर पार्वती-
बरोबर सुखानें कालक्रमणा केली, नंतर आपणास कृपा करून शिवपार्वतींनी
आपल्या शिखरांवर येऊन रहावें ह्या हेतूनें मंदर पर्वतानें अनेक काळपर्यंत त-
श्चर्या केली ह्मणून श्रीशंकर (१०) कैलासपर्वत सोडून चांगल्या चांगल्या गुहा
असलेल्या मंदरपर्वतावर गेले आणि तेथेंही एक हजार वर्षेपर्यंत (११) सर्व देवांचें
कल्याण व्हावयासाठीं शिवांनीं पार्वतीबरोबर सुखानें कालक्रमणा केली. श्रीशि-
हा त्रैलोक्यपति असल्यानें त्यानें पार्वतीबरोबर केलेले विलास विषयीपुरुषांप्रमा-
कामासक्त होऊन केले नाहींत, सर्व लोकांच्या कल्याणासाठीं केले. (१२) शिवाच्या
मनांतील हेतु असा कीं, तारकासुराला मारण्यासाठीं सर्व देवांनीं माझी पूर्वी
प्रार्थना केली आहे ह्मणून माझ्या रेतापासून जो मुलगा उत्पन्न होईल तो तारका-
सुराला मारील, (१३) अशा विचारानें महादेव पार्वतीबरोबर विलास करी-
असतां मोठमोठे भयंकर आणि सर्व लोकांस अनिष्ट सुचविणारे असे उत्पात होऊ
लागले. (१४) ते असे—आकाशांत मोठमोठ्यानें गडगडाट होऊं लागले व
ढगांतून पृथ्वीवर रक्ताचा व हाडांचा वर्षाव होऊं लागला. पर्वत देखील थरथर
कांपतील अशा रीतीनें वारे सोसाट्यानें वाहूं लागले (१५) देवांचीं आकाशमार्गानें
चालणारीं विमानें जमिनीवर पडलीं. हे ब्राह्मणहो, जिकडे तिकडे आकाशांत

निपेतुर्वसुधातले ॥ उल्काभिर्गगनं व्याप्तं पतंतीभिर्द्विजोत्तमाः ॥१५॥ केतवश्चोदिताः सर्वे ज्वलंत इव पावकाः ॥ दिग्दाहाश्च महाघोरा ज्वालाग्नेरिव संक्षये॥१६॥मृत्युकाले यथा जंतुर्नैव सौख्यमवाप्नुयात्॥ जगत्त्रयमिदं कृत्स्नं नैव लेभे तथा सुखम् ॥१७॥न वेदाः प्रतिभांति स्म न विप्रा जजपुर्जपम् ॥ त्रैलोक्यमभवन्नूनं कंपयुक्तं महातुरम् ॥१८॥ कालाग्निः क्षुभितो देवो विरिंचो मुनिभिः सह ॥ चक्रायुधोऽपि चात्यर्थमिंद्राद्यैः परिवारितः॥१९॥ ये केचिद्देवगंधर्वाः सिद्धा गगनचारिणः॥ विद्याधराश्च यक्षाश्च संप्राप्ताश्च वसुंधराम् ॥२०॥ एतस्मिन्नंतरे प्राप्तो शक्रं देवऋषिस्तथा ॥ यथावन्मधुपर्काद्यैः शक्रस्तमभिपूजयत् ॥२१॥ अब्रवीद्देवराजस्तमुपविष्टं महामुनिम् ॥ त्रिकालदर्शिनं शांतमात्मनिष्ठं तपोनिधिम् ॥२२॥

शक्र उवाच ॥ उत्पाताश्च महाघोराः प्राप्ता अतिभयंकराः ॥ कारणं

---

उल्कापात होऊं लागले, तारे तुटून जमिनीवर पडूं लागले. (१६) आकाशांत जिकडे तिकडे धूमकेतु जसे विस्तव पेटावे तसे दिसूं लागले, व प्रळयकाळाच्या-वेळीं जशा प्रळयाग्नीच्या ज्वाला पेटाव्या तशा दाहीदिशांतून अतिशय कढत कढत वाफा येऊं लागल्या. (१७) एखादा प्राणी मरावयास टेंकला म्हणजे त्यास कांहीं केलें तरी जसें सुख लागत नाहीं तशी त्यावेळीं सर्व त्रैलोक्याची स्थिति झाली होती. कोणालाही कोणत्याही प्रकारें सुख होईना. (१८) वेद पहिल्याप्रमाणें सतेज दिसेनासे झाले, ब्राह्मणलोक पूर्वींप्रमाणें जप करीनात, खरोखर सर्व त्रैलोक्य अतिशय घाबरून जाऊन थरथर कांपूं लागलें. (१९)प्रलयाग्नि जास्त भडकला, ब्रह्मदेव सर्व मुनीश्वरांसहित घाबरून गेला व सुदर्शनचक्र धारण करणारा विष्णु देखील इंद्रादिकदेवांसहवर्तमान घाबरून गेला. [२०] जे कोणी आकाशांत फिरणारे देव, गंधर्व, सिद्ध, विद्याधर, यक्ष वगैरे जितके होते तितके सर्वजण पृथ्वीवर आले. [२१] ह्याच सुमारास देवर्षि नारद इंद्राच्या भेटीस आले. तेव्हां इंद्रानें मधुपर्कानें नारदाची यथाविधि पूजा केली. [२२] मग नारद आसनावर बसल्यावर महामुनि, त्रिकालज्ञानी, शांत ब्रह्मनिष्ठ आणि तपःसमुद्र अशा नारदास—

[२३] इंद्र ह्मणाला— देवर्षे हल्लीं जिकडे तिकडे मोठमोठाले भयंकर उत्पात होतात. ह्याचें कारण काय तें मला सांग. आणि त्यांस उपाय काय आहे तो सांग.

वद मे सर्वं शान्तिश्चैव यथा भवेत् ॥२३॥

नारद उवाच ॥ उमया सह विश्वेशः परंज्योतिर्महेश्वरः ॥ अहर्नि मविश्रान्तो युक्त एव प्रवर्तते ॥२४॥ तस्माद्धेतोः प्रवर्तन्त उत्पा वृत्रहन् किल ॥ विघ्नं तस्य प्रकर्तव्यं यदिच्छसि सुखं परम् ॥२ उमागर्भसमुत्पन्नः सर्वस्माद्धिको हि सः ॥ न तं धारयितुं श ब्रह्माद्याः ससुरासुराः॥२६॥जगत्त्रयमिदं कृत्स्नं धारणे न भविष्यति न वेद्मि धारणे शक्तान् संजातं शिवयोः खलु ॥२७॥ नारदस्य व श्रुत्वा शक्रो विस्मयमागतः ॥ तदा चिंतार्णवे मग्नो देवैः सह पुरं ॥२८॥ पंके गौरिव सीदन्तं तथाऽभ्येत्य जनार्दनः ॥ उवाच श्लक्ष्ण वाचा देवानां हितकाम्यया ॥२९॥

विष्णुरुवाच ॥ शृणुध्वं देवताः सर्वाः कामासक्तो न शंकरः युष्माकं हितकाम्याय योगयुक्तोऽभवच्छिवः ॥३०॥ स्वतंत्रशक्ति

---

ह्मणजे त्यामुळें सर्व लोकांचें कल्याण होईल. असा इंद्राचा प्रश्न ऐकून—

(२४) नारद ह्मणाले—देवेंद्रा, तो त्रैलोक्यपति परंज्योति ( श्रेष्ठ तेज ) म देव पार्वतीबरोबर रात्रंदिवस एक क्षणमात्र देखील अंतर पडूं न देतां सा विषयोपभोग घेत आहे. (२५) त्यामुळेंच हे उत्पात होत आहेत. ह्यासाठीं तु जर सर्वांस सुख व्हावें असें वाटत असेल तर ह्या शिवपार्वतीच्या विला कांहींतरी विघ्न कर. (२६) पार्वतीच्या पोटीं जो मुलगा होईल तो सर्व त्रैलो पेक्षां देखील ज्यास्त शक्तिमान् होईल त्याचा पराक्रम सहन करण्याची ब्रह्मादि देवांची व दैत्यांची तर शक्ति रहाणार नाहींच. [२७] हें सर्व त्रैलोक्य ल जिंकण्यास समर्थ होणार नाहीं, फार तर काय परंतु तो शिवपार्वतीला दे आटोपेल किंवा नाहीं ह्याची मला शंका आहे. (२८) असें नारदाचें बो ऐकून इंद्रास मोठें आश्चर्य वाटलें. आणि आतां ह्यास उपाय काय करावा! अ त्यास मोठी काळजी पडून तो सर्व देवांसहित विचार करूं लागला. [२९] खलांत गाय सांपडली ह्मणजे ती जशी घाबरी होते तशीच इंद्राची स्थिति हो गेली त्यावेळीं श्रीविष्णु त्याजवळ येऊन देवांचें कल्याण करण्याच्या इच्छेनें इं धीर देऊन गोड शब्दानें ह्मणाले.

(३०) विष्णु ह्मणतात— हे देवहो, तुह्मी सर्वजण नीट लक्ष्य देऊन ऐ श्रीशिव हा इतर पुरुषांप्रमाणें विषयलोलुप झाला नाहीं, तो तुमचें हित करण्या इच्छेनेंच पार्वतीबरोबर विलास करीत आहे. [३१] त्या परमेश्वराची शक्ति स्व

ह्यात्मा हितकामः स्वभावतः ॥ संपूर्णकामः स विभुः कथं कामेन बाध्यते ॥३१॥ तद्रेतसा समुत्पन्नस्तारकं स वधिष्यति ॥ एतस्मात्कारणाद्देवो देव्या युक्तोऽभवत्सुराः ॥३२॥ किंतु देव्याः समुत्पन्नं सेंद्रैरपि सुरासुरैः॥तेजो धारयितुं तस्य न शक्यमिति निश्चितम् ॥३३॥ इदं यत्कार्यमुत्पन्नं व्याधिरूपं दिवौकसाम् ॥ उपेक्षितं न संदेहो हन्यान्नूनं जगत्त्रयम् ॥३४॥ यदि तत्केवलं तेजो भविष्यति सुरास्तदा ॥ असह्यो दुर्धरो घोर इति सत्यं न संशयः॥३५॥स एव विष्णुर्बलवानिंद्रश्चैव प्रजापतिः ॥ स चादित्यः कुबेरश्च ईशानो वरुणस्तथा ॥३६॥ स यमः स च सोमश्च स वायुः स्वर्गवासिनः॥ स एव सर्वं भवति भवद्भिर्यद्युपेक्षितः ॥३७॥ दृश्यतेऽत्राप्युपायश्च कार्यस्यास्य सुरोत्तमाः॥ यस्मादग्निमुखा यूयं तस्मादग्निर्हि नान्यथा॥३८॥ यद्दुर्गं गहनं

---

आहे, तो त्रैलोक्यस्वरूप आहे. लोकांचें कल्याण करावें हाच त्याचा देहस्वभाव आहे. त्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत, तो समर्थ आहे तो इतर सामान्य मनुष्यांप्रमाणें विषयलंपट कसा होईल ? [३२] हे देवहो, त्याच्या रेतापासून उत्पन्न होणारा मुलगा तारकासुरास मारील आणि ह्याच उद्देशानें परमेश्वर महादेव पार्वतीबरोबर विलास करीत आहे इतकेंच. [३३] तरीपण ह्या श्रीशिवापासून पार्वतीच्या पोटीं जन्मास येणारा मुलगा इंद्रादिक देवांस व दैत्यांस आटोपणार नाहीं ही गोष्ट अगदीं खरी आहे (३४) देवांना हें रोगरूपी कार्य जें उत्पन्न झालें आहे; त्या गोष्टीकडे आपण दुर्लक्ष्य केलें तर आपणच खरोखर सर्व त्रैलोक्याचा नाश केला असें होणार आहे. [३५] हे देवहो, जर तें शुद्धसत्व तेज उत्पन्न होईल तर तो मुलगा फारच बलाढ्य होऊन कोणासच आटोपणार नाहीं आणि असें झालें ह्मणजे सर्व जगावर भयंकर प्रसंग येईल ह्यांत संशय नाहीं. (३६) मग तोच विष्णु होईल तोच शक्तिमान् स्वतः इंद्र होईल, तोच ब्रह्मदेव होईल, तोच सूर्य होईल, तोच कुबेर होईल, तोच ईशान होईल तोच वरुण होईल. [३७] आतां जर तुह्मी सर्वजण ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य कराल तर तोच यम होईल तोच चंद्र होईल व तोच वायु होईल हे देवहो सर्व देवांचे अधिकार तो एकटाच चालवूं लागेल. तो मग कोणासच जुमानणार नाहीं. [३८] हे देवहो, ह्या गोष्टीला एक मात्र उपाय दिसतो तो असा ज्याअर्थीं तुह्मां सर्वांचें अग्नि हाच तोंड आहे त्याअर्थीं हें काम अग्नीच्या हातूनच होईल इतरांच्या हातून होणार नाहीं. [३९] तुमच्या मनांत जें काम

घोरमप्रधृष्यमगोचरम् ॥ हृदि यद्भवतां कार्यमग्निस्तत्साधयिष्यति
॥३९॥ एवमुक्त्वा तु विश्वादिः शंखचक्रगदाधरः ॥ अब्रवीत्कृष्णवर्त्मानं देवानां सदसि स्थितम् ॥४०॥

विष्णुरुवाच ॥ शृणु मद्वचनं वन्हे देवानां यदुपस्थितम् ॥ त्वया त्साधनीयं हि हितार्थं त्रिदिवौकसाम् ॥४१॥ योऽसौ देवः परंज्योति र्नीलग्रीवो विलोहितः ॥ रमते पार्वतीं शश्वच्चराचरपतिः शिवः ॥४२॥ भयं तस्मात्समुद्भूतं कारणाच्च दिवौकसाम् ॥ तस्माद्धिताय गच्छ त्वं महादेवस्य सन्निधिम् ॥ मुखं त्वमेव सर्वेषां कार्याणां चैव साधकः ॥४३॥ इत्येवं वचनं श्रुत्वा पावकः केशवं तदा ॥उवाचेदं मुनिश्रेष्ठाः श्रीवत्सांकितवक्षसम् ॥४४॥

॥ अग्निरुवाच ॥ यदुक्तं भवता देव किंत्वयुक्तं सनातन ॥ महेशस्य रहःस्थस्य प्रवेष्टुं नैव सांप्रतम् ॥४५॥ ध्यानयुक्तोऽथ यः कश्चिन्मां

---

अवश्य झालेंच पाहिजे असें आहे तें जरी संकटकारक आहे, कठीण आहे, भयंकर आहे, शक्तीचें आहे व गुप्तरीतीचें आहे, तरी तें अग्नीच करील. दुसऱ्या कोणाच्या हातून होणार नाहीं. [४०] असें सर्व देवांस आश्वासन देऊन त्रैलोक्याच्या आधीं जन्मास आलेला व हातांत शंख चक्र गदा वगैरे आयुधें धेणारा श्रीविष्णु देवांच्याच सभेंत बसलेल्या अग्नीस ह्मणाला—

[४१] विष्णु ह्मणाले—हे अग्ने, माझें बोलणें ऐकून घे. देवांस एक कार्य करणें अवश्य झालें आहे, तें तुझ्या हातूनच होण्यासारखें असल्यामुळें तें तूं केलें पाहिजे. त्यापासून सर्व देवांचें कल्याण होणार आहे. [४२] तें काम असें, जो हा परंज्योतिरूप महादेव देव आहे, ज्याचा कंठ निळा असून ज्याला विलोहित ह्मणतात तो स्थावर जंगम प्राणिमात्रांचा अधिपति श्रीशिव फार दिवसपर्यंत रात्रंदिवस पार्वतीबरोबर क्रीडा करीत आहे. [४३] त्या कारणामुळेंच देवांवर संकट गुदरलें आहे, तर ह्यासाठीं तूं आतां त्या महादेवाजवळ जा. कारण तूं सर्व देवांचें तोंड आहेस व तुझ्या हातूनच सर्व कामें होणारीं आहेत. [४४] मुनीश्वरहो, असें श्रीविष्णूचें बोलणें ऐकून वक्षःस्थलावर श्रीवत्साचें चिन्ह असणाऱ्या विष्णूस अग्नि ह्मणाला—

(४५) अग्नि ह्मणाला— देवा, तूं अनादिकालापासून आहेस तुला सर्व कांहीं समजत आहे ही गोष्ट खरी आहे. तरीपण तूं जें सांगितलेंस तें योग्य नाहीं, श्रीशंकर एकांतांत असतां त्यांकडे तेथें जाणें योग्य नाहीं. (४६) कोणी ध्यान करीत

भोजनतत्परः॥रहःस्थो यश्च दारास्थस्तदाऽयुक्तं प्रवेशनम् ॥४६॥कार्यालोचनयुक्तो वा होमयुक्तोऽथवा भवेत्॥अर्चनाभिरतः कश्चित्तदाऽयुक्तं प्रवेशनम् ॥४७॥ प्राकृतस्यापि देवेश रहस्थस्य रमापते ॥ तस्मिन्काले सुरेशान गर्हितं यत्प्रवेशनम् ॥४८॥ किं पुनर्भगवान्भर्गस्तिग्मरश्मिर्महेश्वरः ॥ देवानां च हितार्थाय प्रकृत्या सह संगतः ॥४९॥ नाहं तत्र विशे नूनं बिभेमि मधुसूदन ॥ आगतं मां समालोक्य क्षणाच्छंभुर्दहिष्यति ॥५०॥ जुगुप्सितमिदं कार्यमतिकष्टं भयावहम् ॥ विवस्त्रां जननीं देवीं कथं द्रक्ष्यामि केशव ॥५१॥ किं वक्ष्यति प्रविष्टस्य ब्रवीमि किमहं विभो॥जल्पयिष्यति मां देवो धिङ्मूर्खोऽयमिति ध्रुवम्॥यद्भाव्यं तद्भवत्वद्य न करोमि सुनिंदितम् ॥५२॥ अग्निना चैवमुक्तश्च विष्णुर्दानवसूदनः ॥ भयदं मोहदं श्रुत्वा वाक्यं हृदयकंपनम् ॥५३॥ उवाच

---

असेल, मंत्र ह्मणत असेल, जेवण्यांत गुंतला असेल किंवा कोणी पुरुष एकांतांत बायकोबरोबर कांहीं बोलत असेल तर अशावेळीं परकीय मनुष्यानें तेथें जाऊं नये. (४७) कोणी एखाद्या महत्वाच्या कामाचा विचार करीत असेल, होम करीत असेल किंवा देवपूजा करीत असेल तर अशा वेळीं परकीयमनुष्यानें तेथें जाऊं नये, [४८] देवाधिदेवा, श्रीविष्णो, यःकश्चित् सामान्य मनुष्य जरी बायकोबरोबर एकांतांत असला तरी तेथें कोणी जाऊं नये, [४९] मग परमेश्वर श्रीशिव तर बोलून चालून रागीटस्वभावाचा आणि त्रैलोक्याचा ईश्वर आहे, आणि तो देवांच्या कल्याणा करितांच पार्वतीबरोबर विषयोपभोग करीत आहे तर तेथें कसें जावें? [५०] मधुसूदना, मी तेथें जाण्यास खरोखर फार भितों मी तेथें जाणार नाहीं, मी तेथें आलें असें पाहतांच एका क्षणांत श्रीशिव मला जाळून टाकील. [५१] हें असें करणें अतिशय निंद्य आहे अतिशय त्रासदायक असून अतिशय धोक्याचें आहे, तेथें त्रैलोक्यमाता देवीपार्वती नग्न असेल तिजकडे मी कसें पाहूं? (५२) परमेश्वरा, मला तेथें आलेला पाहून श्रीशिव काय ह्मणेल? मला तो खचित असें ह्मणेल कीं, " मूर्खा अशा वेळीं तूं तेथें आलास तुला कांहीं अक्कल नाहीं तुला धिक्कार असो. " जें काय आतां व्हावयाचें असेल तें होवो परंतु हें भलतेंच काम मी करणार नाहीं. (५३) दैत्यांचा नाश करणाऱ्या श्रीविष्णूस अग्नीनें मी साफ जाणार नाहीं ह्मणून सांगितल्यावर अग्नीचे काळिजाचा थरकांप करणारें, भयदर्शक व अज्ञानपणाचें बोलणें ऐकून (५४) परमात्मा श्रीविष्णु निर्दोष स्वभावाच्या त्या

भगवान्विष्णुर्पुनर्वन्हिमनिंदितम् ॥ त्रैलोक्यरक्षणार्थाय शक्रादीनां च सन्निधौ ॥५४॥

विष्णुरुवाच ॥ यदुक्तं भवता वन्हे सत्यमेतदसंशयः ॥ आत्महेतोर्विरुद्धं स्यात्परार्थं नैव दूष्यति ॥५५॥ प्रारब्धं देवदेवेन संहारं कपर्दिना ॥ प्रविश त्वमणोरूपमादाय न हनिष्यति ॥५६॥ प्रस्तुताप्रस्तुतं नास्ति तेजोमूर्तेस्तवानघ ॥ सर्वदा सर्वगस्त्वं हि न कचित्प्रतिहन्यसे ॥५७॥ भूतग्रामः समस्तश्च त्वामेव व्याप्य तिष्ठति ॥ उदरस्थः पचस्यन्नं प्राणिनां मेषवाहन ॥५८॥ त्वयैकेन जगत्सर्वं गोप्यते यदि पावक ॥ किं न प्राप्तं त्वया ब्रूहि को दोषः स्याध्दुताशन ॥५९॥ जुगुप्साऽस्मिन्न कर्तव्या न वहिर्हव्यवाहन ॥ उत्पन्नस्यास्य कार्यस्य काल एष तवानघ ॥६०॥ त्रिदशाः शरणं प्राप्ता हुतभुक् त्वं विभावसो ।

---

अग्नीस त्रैलोक्याचें रक्षण होण्यासाठीं इंद्रादिक देवांच्या समक्ष पुनः ह्मणाला-

(५५) विष्णु ह्मणाले— अग्ने, तूं ह्मणतोस ती गोष्ट अगदीं खरी आहे, पण असें निंद्य काम स्वतःच्याच उपयोगाकरितां करणें असेल तर करूं नये पण दुसऱ्यांच्या उपयोगाकरितां करण्यास कोणतीही हरकत नाहीं. (५६) देवाधिदेव श्रीशंकरानें हल्लीं जें कृत्य आरंभिलें आहे त्यापासून लोकांचा उपयोग तर कांहीं एक न होतां लोकांचा नाश होण्याची मात्र वेळ आली आहे, ह्यासाठीं तूं अगदीं सूक्ष्मरूप घेऊन त्याच्याकडे जा, तो तुला मारणार नाहीं. (५७) तूं स्वतः तेजोरूप आहेस, तुला अमुकएक चांगलें आणि अमुकएक वाईट असें कांहींच नाहीं, तुला नेहमीं पाहिजे त्या ठिकाणीं जाण्यायेण्याची मोकळीक आहे, तुझ्या जाण्येण्याला कोठेंही प्रतिबंध होत नाहीं. (५८) सर्व प्राणिमात्रांचा समुदाय तुला व्यापून राहत आहे. हे मेषवाहना अग्ने, तूं प्रत्येक प्राणिमात्राच्या पोटांत राहून त्यानें खाल्लेलें अन्न पचवितोस. (५९) तुझ्या एकामुळेंच जर सर्व जगाचें रक्षण होत आहे तर तुला कायएक मिळालें नाहीं? ( तुला कोठें जातां आलें नाहीं?) आणि ह्या साठींच हे अग्ने, तूं हें काम केलें तर तुला काय कमीपणा आहे? सांग. (६०) हे हविर्द्रव्य भक्षण करणाऱ्या अग्ने, हें काम निंद्य आहे, अशा सबबीनें ह्याची हयगय करूं नकोस, तुला आंत बाहेर असें कांहींच नाहीं, देवांवर हल्लीं संकटाचा प्रसंग गुदरला आहे; ह्यासाठीं निष्पाप स्वभावाच्या अग्ने, त्यांतून त्यांची सुटका करण्याची तुला हीच वेळ आहे. (६१) हे हुताशना, हे विभावसो, हे सर्व देव तुला शरण आले आहेत, जर तूं हें काम करशील तर तुझी मोठी कीर्ति

अहो धन्यतरश्चासि श्लाघ्यो यदि करिष्यसि ॥ कुरु कार्यं सुराणां त्वं-मग्नानां करुणां कुरु ॥६१॥सर्वकाले यथा मर्त्या वीक्ष्यमाणास्तु भास्क-रम् ॥ तथा तवाननं वन्हे वीक्ष्यंते सुरपुंगवाः ॥६२॥ चारुचन्द्रप्रती-काशं कुण्डलाभ्यामलंकृतम् ॥ अनेन किं न पर्याप्तं वद नूनं विभावसो ॥६३॥ एवं संचोद्यमानोऽग्निर्विष्णुना मुनिपुंगवाः ॥ हृदयं चिंतितं तेन यामीति हरसन्निधौ ॥६४॥ ततो मनोगतं ज्ञात्वा अग्नेर्देवास्तदाऽनघाः ॥ सेंद्राः सवरुणादित्याः सयक्षोरगराक्षसाः ॥ तुष्टुवुस्ते शुभैर्वाक्यैः पा-वकं द्विजसत्तमाः ॥६५॥

देवा ऊचुः ॥ तमोहर महाहार स्वाहाभर्तर्नमोऽस्तु ते ॥ हव्यवाहन सप्तार्चिश्चित्रभानो महाद्युते॥६६॥अनलाग्ने यज्ञमुख जय पावक सर्वग॥

---

होईल; तुझ्या जन्माचें खरोखर सार्थक्य होईल. ह्यासाठीं देवांचें तूं हें काम कर, हे सर्व देव संकटांत पडले आहेत ह्यांच्यावर कृपा कर. (६२) सर्व लोक जसे नेहमीं सूर्याकडे उत्सुकतेनें पाहतात, तसेच हे सर्व देव तुझ्याच तोंडाकडे पाहत आहेत, तुझ्याखेरीज ह्यांचें रक्षण करण्यास दुसरा कोणी समर्थ नाहीं. (६३) तुझें मुखही पौर्णिमेच्या सुंदर चंद्रासारखें सुशोभित आहे, त्याला दोन्हीं कानांतील कुंडलांमुळें तर अलौकिक शोभा आली आहे, त्या तुझ्या ह्या मुखाकडे सर्व देव मोठ्या उत्कण्ठेनें पाहत आहेत; ह्यापेक्षां आणखी तुझें महत्व काय व्हावयाचें राहिलें ? सांग. (६४) हे मुनिश्रेष्ठहो, अशा रीतीनें श्रीविष्णूंनीं युक्तिप्रयुक्तीनें अग्नीचें मन वळवून त्यास उमेद आणल्यावर त्यानें " मीं श्रीशिवाकडे जावें " असा विचार आपल्या मनांत आणिला. (६५) हे ब्राह्मणश्रेष्ठहो, अग्नीचा विचार शिवाकडे जाण्याचा आहे असें सर्वांस समजतांच इंद्र, वरुण, आदित्य, यक्ष, आणि नाग ह्या सर्वांस मोठा आनंद झाला. त्या सर्वांनीं मधुर मधुर शब्दांनीं अग्नीची स्तुति केली—

(६६) देव ह्मणाले—हे अग्ने, तूं अंधाराचा (अज्ञानाचा) नाश करितोस, तुझा आहार फार जबर आहे, तूं पाहिजे ते पदार्थ खाऊं शकतोस, आणि ते पचविण्याची तुझ्या अंगांत शक्ति आहे; तूं स्वाहेचा पति आहेस, तुला नमस्कार असो, तूं आहुतीचे पदार्थ भक्षण करितोस, तुझ्या सात ज्वाला आहेत तुला चित्रभानु ह्मणतात, तूं मोठा तेजस्वी आहेस, तुला नमस्कार असो. (६७) तुला अनल ह्मणतात, हे अग्ने, तूं यज्ञाचें मुख आहेस, तुला पावक ह्मणतात, तुझी गति सर्व ठिकाणीं आहे. (तुला पाहिजे तेथें जातां येतां येतें) तुझा जय असो.

विभावसो महाभाग्य वेदभाष्यार्थभाषण ॥ शरणं भव देवा
विश यत्र महेश्वरः ॥६७॥ एवं संस्तूयमानोऽसावुत्थाय ज्वलनस्तदा
देवान्प्रदक्षिणीकृत्य ययौ शम्भोर्गृहं तदा ॥६८॥ ततोऽपश्यत्प्रती
महादेवसमं बले ॥ पूजितं सेंद्रकैर्देवैर्महादेवदिदृक्षुभिः ॥६९॥ कपि
वदनं देवं कुलिशोदात्तपाणिनं॥शूलहस्तं महावीर्यं सूर्यायुतमिवोदि
॥७०॥ नंदिनं तु ततो दृष्ट्वा पावकस्य द्विजोत्तमाः ॥ वेगस्तस्याशु
स्तीक्ष्णः सहसैव व्यहन्यत ॥७१॥ तत्राग्निश्चिंतयामास पश्यामि
कथं हरम् ॥ नंदिना द्वारसंस्थेन कः पुनः प्रविशेद्गृहम् ॥७२॥ पश्य
नस्य शैलादेः प्रविशे यद्यहं गृहम् ॥ फलसिद्धिर्न गच्छेत नंदि
कुपितेन च ॥७३॥ एवं चिंतार्णवे मग्नो यावत्तिष्ठत्यसौ कविः॥ द्वि
न्नानाविधांस्तावद्भ्रममाणांश्च दृष्टवान् ॥७४॥ तान्दृष्ट्वा चिंतयाम

---

तुला विभावसु ह्मणतात, तूं मोठा दैवशाली आहेस. तुझें बोलणें वेदभाष्या
रखें महत्वाचें आहे. तूं देवांचा रक्षक हो, आणि देवांचें कल्याण करावयास
ज्या ठिकाणीं श्रीशिव आहे तेथें जा. (६८) सर्व देवांनीं अग्नीची अशी स्तु
केल्यावर अग्नि आपल्या जागेवरून उठला आणि सर्व देवांस प्रदक्षिणा क
श्रीशिवाचे घरीं जाण्यास निघाला. (६९) शिवाच्या वाड्याजवळ जाऊन प
तों दारांत नंदिकेश्वर उभा होता, तो ल्हान सहान नसून महादेवासारखा
पराक्रमी होता. महादेवाच्या दर्शनास इंद्रादिक लोक गेले तर ते देखील अं
दर त्या नंदिकेश्वराची पूजा करीत; इतका तो सामर्थ्यवान् होता. (७०) वा
रासारखें त्या नंदीचें तोंड असून त्यानें आपल्या एका हातांत इंद्रवज्र घेतलें
होतें, आणि दुसऱ्या हातांत शूल होता, त्याचा पराक्रम अलौकिक असून दहा ह
सूर्यासारखा तो तेजस्वी होता. (७१) त्या नंदीला समोर पाहिल्याबरोबरच ब्रा
णहो, अग्नीच्या मनांतील उत्साह नाहींसारखा झाला. (७२) मग अग्नि तेथेंच आप
मनांत चिंता करूं लागला कीं आतां माझी आणि शिवाची भेट कशी होई
महादेव माझ्या दृष्टीस तरी कसा पडेल? नंदी जर येथें दारावर पाहरा करीत उ
आहे तर आंत जाण्याची कोणाची प्राज्ञा आहे? (७३) नंदीच्या समक्ष जर अ
आंत जाईन तर कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं. कां तर एकवेळ नंदी रागा
ह्मणजे काय करील ह्याचा नेम नाहीं. (७४) असा विचार करीत जों ज्ञान
अग्नि उभा आहे तोंच त्यानें अनेक जातींचीं पांखरें तेथें फिरतांना पाहिलीं. (७
त्या पांखरांस पाहून मग अग्नीस कल्पना सुचली आपण आतां हंसाचें रूप घे

हंसस्य हरसन्निधौ ॥ रूपं कृत्वा प्रवेक्ष्यामीत्युपायमपि चिंतयन् ॥ आदाय हंसरूपं तु प्रविष्टः पावकस्तदा ॥७५॥ प्रविश्य तत्पुनस्त्यक्त्वा सूक्ष्मरूपो व्यवस्थितः ॥ पार्वत्या वाहनं सिंहमुदपश्यद्विभावसुः ॥७६ गोक्षीरधवलाभासं महालांगूलशोभितम् ॥ जाज्वल्यमाननयनं चंद्रकोटिसमप्रभम् ॥७७॥ प्रसारितसटाटोपं हुंकारकृतभीषणम् ॥ दानवानां क्षयकरं देवानामभयप्रदम्॥७८॥हुंकारेण ततस्तस्य ज्वलनो बधिरीकृतः ॥ अहो दुःखमिदं प्राप्तमिति संचिंत्य चेतसा ॥७९॥ यदि जीवन्गमिष्यामि सिंहादस्मादहं तदा ॥ तेन पर्याप्तकामोऽहमिति संचिंत्य निर्गतः ॥८०॥ यत्र देवा उपेंद्राद्यास्संस्थिता मेरुमूर्धनि ॥ देवाः सर्वे च संहृष्टाः प्रोचुस्तं जातवेदसम् ॥८१॥

देवा ऊचुः ॥ अस्मत्कार्यं त्वया वन्हे गत्वा तत्र यथा कृतम् ॥ तत्सर्वं ब्रूहि नः क्षिप्रं शमोऽस्माकं यथा भवेत् ॥८२॥

---

महादेवाजवळ जावें असा विचार करून त्यानें हंसाचें रूप घेतलें व नंदीस न कळतां तो महादेवाचें अंतःपुरांत शिरला. (७६) आणि आंत गेल्यावर त्यानें हंसाचें रूप टाकून दिलें आणि अगदीं लहान रूप घेऊन तेथें तो उभा राहिला. इतक्यांत त्यानें पार्वतीचें वाहन अशा सिंहास पाहिलें. (७७) तो सिंह गाईच्या दुधासारखा पांढरा पांढरा स्वच्छ होता, त्याला भलें मोठें थोरलें लांब शेंपूट होतें त्यामुळें तो शोभत होता; त्याचे डोळे लालभडक असून एक कोटि चंद्रांसारखा त्याचा शुभ्रवर्ण होता. (७८) त्यानें आपल्या मानेवरील आयाळ पिंजारलें होतें, त्यानें एकवेळ सहज मोठ्यानें गर्जना केली. तो दैत्यांचा समूळ नाश करणारा असून देवांचें भय घालविणारा होता. (७९) असो, सिंहाची ती आरोळी ऐकिल्याबरोबर अग्नीच्या कानठळ्या बसल्या सारख्या झाल्या, तो आपल्या मनांत ह्मणूं लागला कीं, हें एक संकटच उपस्थित झालें, आतां काय करावें? (८०) ह्या सिंहाच्या तडाक्यांतून जर मी जिवंत राहिलों तर मिळविली. माझें कर्तव्य पुरें झालें असें समजून तो तेथूनच माघारा फिरला. [८१] व जेथें इंद्रादिकदेव त्याची मार्गप्रतीक्षा करीत होते त्या मेरुपर्वतावर परत गेला. त्यांस पाहतांच सर्व देवांस मोठा आनंद झाला, व ते सर्वजण अग्नीस विचारूं लागले—

(८२) देव ह्मणाले— अग्ने, तूं आमच्या कामाकरितां शंकराकडे गेला होतास, तेथें जाऊन तूं आमचें काय काम केलेंस तें आह्मांस सविस्तर सांग. ह्मणजे आह्मांस मोठा संतोष होईल. असें देवांचें बोलणें ऐकून—

अग्निरुवाच ॥ हंसरूपं ततः कृत्वा प्रविश्यान्तःपुरं सुराः ॥ ने
सूक्ष्मवपुर्भूत्वा यावत्क्षणमहं स्थितः ॥८३॥ तावत्पंचमुखो दृष्टो गि
जायास्तुवाहनः ॥ अतिरौद्रो महाकायः प्रलयान्तकसन्निभः ॥८
भीत्याहं निर्गतस्तस्माददृष्ट्वैव पिनाकिनम् ॥ यस्मात्कार्यमकृत्वै
संप्राप्त इह भो सुराः ॥ पुनर्विचिंत्यतां कार्यं सर्वेषां वो यथासुख
॥८५॥ एवं वन्हेर्वचः श्रुत्वा देवा विष्णुपुरोगमाः॥ययुर्मुनिगणैः सा
मंदरं चारुकंदरम् ॥८६॥ तमासाद्य गिरिश्रेष्ठं प्रियं देवस्य शूलिनः
कृतांजलिपुटाः सर्वे अस्तुवन् वृषभध्वजम् ॥८७॥

देवा ऊचुः ॥ ॐ नमः परमेशाय त्रिनेत्राय त्रिशूलिने ॥ विरू
सुरूपाय पंचास्याय त्रिमूर्तये ॥८८॥ नीलकंठाय विश्वाय मण्डलेश्व
ते नमः ॥ विश्वनाथाय विश्वाय विश्वेशायात्मरूपिणे ॥८९॥ कालभ

---

(८३) अग्नि ह्मणाला— देवहो, मी तुमचा निरोप घेऊन शिवाकडे गेल हंसाचें रूप घेऊन नंदिकेश्वरास न कळतां शिवाच्या अंतःपुरांत शिरलों, आं तेथें जाऊन सूक्ष्म शरीर घेऊन उभा राहिलों इतक्यांत (८४) पार्वतीचें वा सिंह माझ्या नजरेस पडला, तो अतिशय भयंकर असून त्याचें शरीर फार मो होतें, तो मला तर प्रलयकाळच्या यमासारखा भयंकर दिसला. [८५] त्या पाहून मी इतका भ्यालों कीं, शिवाची भेट घेण्याचे भरीस न पडतां, जि राहिलों तर मिळविली असें समजून देवहो, तुमचें काम कांहींएक न करितां शंकराची माझी भेट न होतां तेथून मी तसाच परत आलों. ह्यासाठीं आतां तु काय करावें ह्मणजे सर्वांस सुख होईल ह्याचा पुनः आणखी विचार करा. (८ असें अग्नीचें बोलणें ऐकून श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देव इतर तेहतीस को देवांस आणि मुनीश्वरांचे समुदायास बरोबर घेऊन उत्तम उत्तम गुहा असणाऱ्या मंदर पर्वतावर गेले. (८७) मंदर पर्वत शंकरास कैलास पर्वतासारखा फारच प्रि होता तेथें जाऊन सर्वजण हात जोडून शंकराची स्तुति करूं लागले—

(८८) देव ह्मणतात— हे परमेश्वरा, तूं ॐकारस्वरूप आहेस, तुला नमस्का असो, तुला तीन नेत्र आहेत, तुझ्या हातांत त्रिशूल आहे, तूं विरूप असून सु रूपही आहेस, तुला पांच मुखें असून तूं त्रिमूर्ति आहेस, तुला नमस्कार अ (८९) तुझा कंठ नीलवर्ण आहे, तूं विश्वस्वरूप आहेस, तूं मंडलेश्वर आहेस, विश्वांचा अधिपति आहेस आणि विश्वस्वरूप आहेस, तूं विश्वाचा आत्मा अ आत्मस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. (९०) तूं मार्कण्डेय मुनीचा प्रा

मखघ्नाय ह्यंधकघ्नाय वै नमः ॥ ईशोऽनीशस्त्वमेवेश अन्तोऽनंतस्त्वमेव हि ॥९०॥ व्ययस्त्वमव्ययश्चैव जन्माजन्मा त्वमेव हि ॥ नित्योऽनित्यस्त्वमेवेश धर्मोऽधर्मस्त्वमेव च ॥९१॥ गुरुस्त्वमगुरुर्देव बीजं वाऽबीजमेव च ॥ कालस्त्वमेव लोकानामकालः परिगीयते ॥९२॥ बलस्त्वमबलश्चैव प्राणश्चाप्राण एव च ॥ साक्षी त्वं कर्मणां देव तथाऽसाक्षी महेश्वर ॥९३॥ शास्ताऽशास्ता विरूपाक्ष ध्रुवमध्रुव एव च ॥ संसारी त्वं हि जंतूनामसंसारी त्वमेव च ॥९४॥ गोप्ता त्वं सर्वभूतानां नास्ति गोप्ता तवेश्वर ॥ जीवस्त्वं जीवलोकस्य जीवस्तेऽन्यो न विद्यते ॥९५॥ देहिनां शंकरस्त्वं हि न चान्यस्तव शंकरः ॥ अरुद्रस्त्वं महारुद्रो घोरस्त्वं घोरकर्मणाम्॥९६॥देवानां त्वं महादेवो महांस्त्वत्तो न विद्यते ॥ कामस्त्वं भविता सर्वनिष्कामस्त्वं जगत्पते॥९७॥ अजेयो

---

वांचविण्याच्या वेळीं यमास मारिलेंस, दक्षप्रजापतीच्या यज्ञाचा विध्वंस केलास, तूं अंधकासुरास जिवें मारिलेंस तुला नमस्कार असो. हे ईश्वरा, तूं ईश असून अनीशही आहेस. तूं अंत आहेस आणि अनंतही तूंच आहेस. (९१) हे ईश्वरा, व्ययही तूंच असून अव्ययही तूंच आहेस. जन्म असणारा तूं असून जन्म नसणाराही तूंच आहेस, हे ईश्वरा, तूं नित्य असून अनित्यही आहेस, तूं धर्म आहेस आणि अधर्मही तूंच आहेस. (९२) परमेश्वरा, गुरु तूं असून लघुही तूंच आहेस, बीज तूं असून अबीजही तूंच आहेस. तूं लोकांचा संहारकर्ता असून रक्षकही मानला आहेस ( तूं जगाचा रक्षणकर्ताही आहेस. ) (९३) बलवान् तूं असून निर्बलही तूंच आहेस. प्राण तूं असून अप्राणही तूंच आहेस. महेश्वरा, तूं कर्मांचा साक्षी असून साक्षीही नाहींस. (९४) हे विरूपाक्षा, तूं शास्ता असूनही शास्ता नाहींस. ध्रुवही तूंच आहेस आणि अध्रुव ( अनित्य ) ही तूंच आहेस. प्राणिमात्रांचा संसारी तूंच असून संसार नसणाराही तूंच आहेस. (९५) महेश्वरा, तूं सर्व प्राणिमात्रांचा रक्षक आहेस तुला दुसरा कोणी रक्षक नाहीं. तूंच सर्व जीवसमूहांचा जीव आहेस, तुजवांचून जीव दुसरा नाहीं. (९६) तूं सर्व जगांचें कल्याण करणारा आहेस, तुजखेरीज दुसरा कोणी कल्याण करणारा नाहीं. तूं रुद्र नसून ( शांत असून ) महारुद्रही आहेस. भयंकर कर्मे करणारे जितके लोक आहेत त्या सर्वांपेक्षां तूं जास्त भयंकर कर्में करणारा आहेस. (९७) हे महादेवा, तूं सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहेस तुझ्यापेक्षां श्रेष्ठ देव दुसरा नाहीं. तूंच काम ( इच्छा करणारा ) असून निष्कामही आहेस. तूं सर्व त्रैलोक्याचा अधिपति आहेस.(९८) तूं

जयिनां श्रेष्ठो जयरूपस्त्वमेव हि ॥ पुराणपुरुषस्त्वं हि पुराणोऽन्यो
विद्यते ॥९८॥ व्यालंयज्ञोपवीताय सरोजान्ताय ते नमः ॥ नमोऽस्तु नील
ग्रीवाय शितिकंठाय मीढुषे ॥९९॥ नमः कपालहस्ताय पाशहस्ता
दंडिने ॥ नमो देवाधिदेवाय नारायणनुताय च ॥१००॥ ऊर्ध्वमा
प्रणीताय नमस्ते ह्यूर्ध्वरेतसे ॥ क्रोधिने वीतरागाय गजचर्मावगुंठि
॥१०१॥ नमो ब्रह्मशिरोघ्नाय नमस्ते रुक्मतेजसे ॥ नमश्चंद्राय धीरा
कमण्डलुनिषंगिणे ॥१०२॥ नमः प्रचंडदेवाय चण्डक्रोधाय ते नमः
वरेण्याय शरण्याय ब्रह्मण्यायांबिकापते ॥१०३॥ सर्वानुग्रहकर्ता
ज्ञानदाय नमो नमः ॥ नमः संसारघोराय ह्यणिमादिप्रदायिने ॥१०
ज्येष्ठसामादिसंस्थाय रथान्तररवाय च ॥ शक्तित्रयविहीनाय शक्ति

---

सर्वांस अजिंक्य आहेस, तुला जिंकण्याची कोणाची शक्ति नाहीं, जगांत
कोण विजयी लोक आहेत त्या सर्वांपेक्षां तूं श्रेष्ठ आहेस. तूं सर्वांहून प्राचं
काळचा आहेस, तुझ्या अगोदरपासून असणारा कोणी नाहीं (९९) तुझ्या गळ्
सर्पाचें यज्ञोपवीत आहे, चोळ देशांतील पांड्यराजानें केलेल्या सरोवरांत उ
झालेल्या मत्स्यावताराचा नाश केलास. त्या तुला नमस्कार असो, तुला नील
शितिकंठ, मीढुष, अशीं नांवें आहेत त्या तुला नमस्कार असो. (१००) तुझ्
हातांत कपाल आहे, तुझ्या हातांत पाश आहे, तुझ्या हातांत दंड आहे,
देवांचा मुख्य देव आहेस तुझी श्रीविष्णु स्तुति करितो त्या तुला नमस्कार अ
(१०१) तूं मोक्षमार्गाचा दर्शक आहेस, तुला ऊर्ध्वरेता असें ह्मणत
तूं मोठा रागीट आहेस, तूं वैराग्यवान् असून तूं आपल्या अंगावर ह
कातडें पांघरण्यास घेतलें आहेस. (१०२) तूं ब्रह्मदेवाचें मस्तक कापिलेंस, तु
अंगकांति सोन्यासारखी आहे, तूं चंद्रासारखा तेजस्वी असून तूं धैर्यवान् आहे
तुझ्या हातांत कमण्डलु आहे त्या तुला नमस्कार असो. (१०३) तूं सर्व देवांपेक्षां
वान् आहेस, तुझा रागही मोठा कठीण आहे ( तूं फार रागीट आहेस ) तु
नमस्कार असो, तूं सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहेस, तूं शरणागतांचें रक्षण कर
आहेस. तूं ब्रह्मण्य ( ब्रह्मस्वरूप ) असून पार्वतीचा पति आहेस. (१०४) तूं
देवांवर कृपा करणारा आहेस, तूं ज्ञान देणारा आहेस. तुला नमस्कार अ
तुला नमस्कार असो. तूं संसाराचा ताप दूर करणारा आहेस, अणिमा
अष्टमहासिद्धि प्राप्त करून देणारां आहेस, तुला नमस्कार असो. (१०५)
सामगायनांत वास्तव्य करणाऱ्या शंकरा तुला नमस्कार असो. तुला रथान्तर

ययुताय च ॥१०५॥ शक्तित्रयात्मरूपाय शक्तित्रयधराय च॥योगीशाय विनिघ्नाय विजयाय नमो नमः ॥१०६॥ नमस्ते हरिकेशाय योगीशाय त्रिदंडिने ॥ हरीशायाप्रमेयाय कुण्डलीशाय चक्रिणे ॥ नमो विंदुविसर्गाय नादायानंदधारिणे॥१०७॥नमो गायत्रिनाथाय गायत्रिहृदयाय ते ॥ नमो गायत्रिगोप्त्राय गायत्र्याय नमो नमः ॥१०८॥ य इदं पठते स्तोत्रं गीर्वाणैः समुदीरितम्॥यावज्जीवकृतैः पापैर्मुक्तो याति परां गतिम् ॥१०९॥ एवं स्तुतः सुरैः शंभुः प्रसन्नो वरदोऽभवत् ॥ वरं वृणीध्वं हे देवा इत्युवाच महेश्वरः ॥११०॥ अथ तं वरदं ज्ञात्वा शंभुं विष्णुमुखाः सुराः ॥ ऊचुः प्रांजलयः सर्वे भयं त्यक्त्वा द्विजोत्तमाः ॥१११॥

देवा ऊचुः ॥ यदि तुष्टोऽसि विश्वेश देहीमं वरमुत्तमम् ॥ गिरिजा-

---

असें ह्मणतात, तुझ्या अंगीं तीन प्रकारच्या शक्ति नाहींत तरी तीन प्रकारच्या शक्तिरूप तूं आहेस त्या तुला नमस्कार असो. (१०६) तूं तीन शक्तीचें मूळस्वरूप आहेस. तुझ्या अंगीं तीन प्रकारच्या शक्ति आहेत. तूं योगी लोकांचा अधिपति आहेस, तूं नम्र स्वभावाचा असून विजय मिळविणारा आहेस, त्या तुला नमस्कार असो. [१०७] तुला हरिकेश ह्मणतात, तूं योगी लोकांचा ईश्वर आहेस, तुला नमस्कार असो. तूं त्रिदंडी आहेस, तूं विष्णूचा अधिपति आहेस, तुझ्या योग्यतेचा मनुष्य ह्या जगांत कोणी नाहीं, तूं सर्पांचा अधिपति आहेस, तुझ्या हातांत चक्र आहे. तूं विंदूचा विसर्ग केलास, तूं नादस्वरूप आहेस, तूं आनंदी आहेस, (१०८) तूं गायत्रीचा मुख्य देव आहेस, तूं गायत्रीमंत्राचें हृदय आहेस, तूं गायत्रीचा रक्षक असून तूं गायत्रीस्वरूप आहेस. त्या तुला नमस्कार असो, नमस्कार असो. (१०९) जो कोणी मनुष्य हें देवांनीं केलेलें शिवाचें स्तोत्र पठन करील; त्यानें ह्या जन्मांत जितकीं कांहीं पापें केलीं असतील त्या सर्व पापांचा नाश होऊन तो उत्तम गतीला जाईल (११०) असो, देवांनीं अशी श्रीशिवाची स्तुति केल्यावर देव [श्रीशिव] प्रसन्न झाला व वर देण्यास तयार होऊन ह्मणाला, देवहो, मी तुह्मांस वर देण्यास तयार आहें, तुह्मांस पाहिजे असेल तो वर मागा. (१११) ब्राह्मणहो, श्रीशिव प्रसन्न होऊन वर देण्यास तयार झाला असें पाहून श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देव आपल्या मनांतील भीति सोडून देऊन श्रीशिवास हात जोडून ह्मणाले.—

(११२) देव ह्मणाले—तूं जर आह्मांस प्रसन्न होऊन वर देण्यास तयार आहेस, तर पार्वतीच्या पोटीं तुझा मुलगा जन्मास येऊं नये हा वर दे. हाच वर आह्मांस

कुक्षिसंभूतः पुत्रोऽमाभूत्तवानघ ॥११२॥ एवमस्त्वित्यसौ शंभुस्त
प्राह पुनर्वचः ॥ नाहं रेतो वृथा स्कन्दे त्रैलोक्यक्षयकारकम् ॥ श
शुक्रे मदीये तु त्रैलोक्यं भस्मसाद्भवेत् ॥११३॥ हिताय तस्माल्लोक
मम रेतो दिवौकसः ॥ शांत्यर्थं चैव युष्माभिः शीघ्रमेवोपयुज्यता
॥११४॥ एवं शंभोर्वचः श्रुत्वा देवास्ते भयविव्हलाः ॥ सलोकेशाः
गोविंदा न किंचिच्चाब्रुवन् द्विजाः ॥११५॥ अथ देवेषु सीदत्सु व
गौरिव कर्दमे ॥ प्रसार्य स्वांजलिं शंभो रेतो मुंचेति चाब्रवीत् ॥११
देवदेवामृतं दिव्यं हस्ताभ्यां मम शंकर ॥ शीघ्रमेव प्रयच्छ त्वं
वन्तु सुरपुंगवाः ॥११७॥ ततो लिंगाद्विनिष्क्रांतं चंद्रबिंबसुनिर्मलम्
जातिनीलोत्पलामोदं पाणौ वन्हेर्ददौ शिवः ॥११८॥ करयोः प
रेतो ह्यभवत्पावनं शनैः॥पपौ वन्हिस्ततः शुक्रं ज्वलन्तं भास्करप्र
सुधेति मनसा मत्वा प्रहृष्टात्मा मुदान्वितः ॥११९॥ अथ पीते त

---

बरा वाटतो. (११३) "बरें तसेंच होईल" असें शिवांनीं देवांस आश्वासन दे
पुन्हा श्रीशिव देवांस ह्मणाले. मी आपलें रेत फुकट जाऊं देणार नाहीं.
झालें तर सर्व त्रैलोक्याचा क्षय होईल. (११४) ह्यासाठीं देवहो, सर्व लो
कल्याण व्हावयासाठीं व हल्लीं होत असलेले उत्पात बंद होण्याकरितां तु
आतांचे आतां कांहीं तरी उपाय योजावा. (११५) असें शिवाचें बोलणें ऐ
तांच सर्व देव अगदीं घाबरून गेले ब्राह्मणहो, लोकपाल घाबरले, श्रीविष्णु
घाबरला कोणीच कांहीं बोलेना. (११६) चिखलांत रुतलेली गाय जशी तळ
करिते तसे सर्व देव घाबरलेले पाहून मग अग्नि पुढें झाला, आणि आ
दोन्ही हातांची ओंजळ शिवापुढें करून ह्मणाला, परमेश्वरा ह्या माझ्या ओंजळ
तूं आपलें वीर्य टाक (११७) देवाधिदेवा श्रीशंकरा, हें तुझें वीर्य ह्मणजे प्रत्य
दुसरें अमृतच आहे असें मानतों, तूं लवकर माझ्या हातांत वीर्य टाक,
आतांचे आतां सर्व देव पिऊन टाकतील. (११८) असें अग्नीचें बोलणें चा
आहे तोंच शिवाच्या इंद्रियांतून रेत बाहेर पडलें, तें चंद्रबिंबासारखें पांढरें पां
शुभ्र होतें. त्याला मोगऱ्याच्या फुलांसारखा आणि निळ्या कमळांसारखा सुवा
होता तें रेत शिवांनीं अग्नीच्या ओंजळींत घातलें. (११९) शिवांनीं अग्नीच्या
हातांत ओतलेलें रेत कांहीं वेळानें थोडें थंड झालें तेव्हां तें सूर्यासारखें रसरशी
रेत अग्नीनें पिऊन टाकिलें. (१२०) हे मुनिश्रेष्ठहो अग्नीनें शिवाचें रेत पि

शुक्रे वन्हिना मुनिपुङ्गवाः॥ रेतःपानेन संतर्प्य देवान् हि सुरपूजितः ॥ विसृज्य तांस्तु भगवांस्तत्रैवान्तरधीयत ॥१२०॥ तदा हविर्भुजं देवं सेंद्रा ब्रह्मपुरोगमाः ॥ यथागता ययुस्तत्र पूजयित्वा दिवौकसः ॥१२१॥ रेतसा दह्यमानोऽग्निः पातालं सुतलं गतः ॥ ततो विवेश विश्वेशो यत्रास्ते पार्वती शिवः॥१२२॥उवाच पार्वतीं शंभुः प्रहसन्कमलेक्षणाम्॥ श्रुणु देवि महाभागे यद्वृत्तं तद्ब्रवीम्यहम् ॥१२३॥ स्वतंत्रकामः शिश्ये वै तदाऽहं वरवर्णिनि॥ देवा नु शरणं प्राप्ताः स चाहं शरणं त्यजे ॥१२४॥ गोप्याः सदा मया कान्ते मद्भक्तास्ते यतः स्मृताः ॥ भविष्यति महाभागे पुत्रस्तव षडाननः ॥१२५॥ किं त्वौरसस्तु सुश्रोणि देवैर्नेष्टस्तवांबिके ॥ तस्माध्दुतं मया रेतो मुखे वै जातवेदसः ॥१२६॥ वन्हिकुक्षिगतं रेतो गतं देवान् विभागशः ॥ यच्छेषमुदरे वन्हिर्गंगायां स प्रदास्यति ॥१२७॥ ततः साऽपि विदह्यन्ती मम रेतःप्रतापतः॥कृत्तिकाः

---

टाकिलें, व अशा रीतीनें सर्व देवांस मान्य असणाऱ्या अग्नीनें देवांस सुख दिलें. मग श्रीशिवांनीं सर्व देवांस आपापल्या स्थानास जाण्याची आज्ञा दिली व आपण तेथेंच गुप्त झाले. (१२१) त्यावेळीं ब्रह्मदेव, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देवांनीं अग्नीची स्तुति केली, व सर्वजण आपापल्या मार्गानें गेले. (१२२) शिवाचें रेत पोटांत गेल्यामुळें अग्नीच्या अंगाची आग झाली, त्यामुळें तो घाबरा होऊन दाह शांत होण्यासाठीं पाताळांत गेला आणि विश्वेश्वर श्रीशिव जेथें पार्वती होती तेथें गेले. (१२३) व तेथें जाऊन कमळांप्रमाणें नेत्र असणाऱ्या पार्वतीस हंसत हंसत ह्मणाले. हे भाग्यशालिनी पार्वती, मी जेथें गेलों होतों तेथें काय प्रकार झाला तो ऐक. मी तुला सांगतों. (१२४) हे प्रिये, मी स्वस्थपणानें येथें निजलों होतों, इतक्यांत सर्व देव मला शरण आले ह्मणून मी घर सोडून बाहेर गेलों. (१२५) प्रिये, मी जर त्यांस आपले भक्त ह्मणवितों तर त्यांचें रक्षण मला केलें पाहिजे. असो, पार्वती, तुला आतां सहा तोंडांचा एक मुलगा होईल; (१२६) तरी पण पार्वती, तो मुलगा तुझ्या पोटीं जन्मावा हें देवांस आवडलें नाहीं, ह्मणून मीं आपलें रेत अग्नीच्या मुखांत ओतलें (१२७) अग्नीच्या पोटांत गेलेलें माझें रेत क्रमाक्रमानें वांटणीप्रमाणें सर्व देवांच्या पोटांत गेलें व जें कांहीं अग्नीच्या पोटांत शिल्लक राहिलें तें रेत त्यानें गंगानदींत नेऊन टाकिलें. [१२८] ती गंगानदी देखील माझ्या रेताच्या उष्णतेनें होरपळून गेली; इतक्यांत सहा

षट् समाख्याता गंगायां स्नातुमागताः ॥१२८॥ तासु गंगाविनिर्गि मम रेतस्तदद्भुतम् ॥ तास्तप्ताः कृत्तिकाः सर्वा देवि मां शरणं ग ॥१२९॥ अनुग्रहात्तदा तासामिदमुक्तं मया शिवे ॥ ममादेशात्ग सर्वाः शरदानवनं शुभम् ॥१३०॥ मोचयिष्यंति तं गर्भं देवाश्च क क्षणे ॥ वचनान्मम सुश्रोणि गर्भशल्यबहुस्तदा ॥१३१॥ ततस्ते भ पुत्र एकीकृत्य स्वतेजसा ॥ बालसूर्यायुतप्रख्यो बालेंदुभ्रूलतांकित ॥१३२॥ आग्नेयो वन्हिजो दैवश्चोभौ गांगेयकार्तिकौ॥स्कन्दो गुहस्त पुत्रो नामभिस्ते भविष्यति ॥१३३॥ एवं शंभोर्वचः श्रुत्वा प्राह दे गिरींद्रजा ॥ मम कुक्षिसमुत्पन्नं यतो नेच्छंति पुत्रकम् ॥ अतः पुत्र हीनास्ते भविष्यन्ति सुरादयः ॥१३४॥ योऽसौ नंदी महावीर्यः सुरा महाबलैः ॥ दुर्जयः सर्वभूतानां योगी योगबलान्वितः ॥१३५॥ प्र श्यान्तःपुरे वन्हिर्दृष्टो मां वस्त्रवर्जिताम् ॥ यस्मादुपेक्षितस्तस्मा

---

कृत्तिका तेथें स्नान करण्यास आल्या. (१२९) त्यांच्या पोटांत तें गंगानदींत लेलें माझें रेत शिरलें; काय आश्चर्य सांगावें? पार्वती, त्या कृत्तिका देखील रेताच्या उष्णतेनें तापून जाऊन मला शरण आल्या. (१३०) तेव्हां मीं त्यांवर करण्यासाठीं पार्वती, त्यांस असें सांगितलें कीं, तुम्ही आतां शरदान वनांत जा तेथें हा गर्भ टाकून द्या "त्यावरून त्या साहीजणी शरदान वनाकडे गेल्या. (१३ हे कमलनेत्रे पार्वती, देवांच्या पोटांतही तें रेत खिळ्यासारखें टोंचत होतें, सर्व देवांनीं ह्या संकटांतून आमची मुक्तता करावी अशी विनंति केल्या त्यांसही तो गर्भ शरदान वनांत टाकण्यास सांगितलें आहे; ते तसें कर (१३२) असें झाल्यावर तें सर्व रेत आपल्या सामर्थ्यानें एकत्र होऊन तेथें पुत्र जन्मास येईल. दहालक्ष सूर्यांसारखा तो तेजस्वी होईल, द्वितीयेच्या चं सारख्या त्याच्या भोंवया दिसतील. (१३३) त्या तुझ्या मुलाला आग्नेय, वन्हि दैव, गांगेय, कार्तिक, स्कंद आणि गुह अशीं नांवें लोकांत प्र होतील. (१३४) असें शिवाचें बोलणें ऐकून पर्वतकन्या ( पार्वती ) ह्मणा ज्याअर्थी माझ्यापोटीं मुलगा जन्मणें देवांस आवडत नाहीं, त्याअर्थी ते देव निपुत्रिक होतील. (१३५) हा नंदिकेश्वर मोठा पराक्रमी आहे, देवांचें दैत्यांचें सामर्थ्य ह्याचेपुढें चालत नाहीं, हा सर्व प्राणिमात्रांस अजिंक्य आ हा योगी असून ह्याच्या अंगीं योगसामर्थ्य आहे, (१३६) आणि स्वतः दा पहारा करीत उभा असतां अग्नि ह्याला न कळत अंतःपुरांत आला आणि

ज्यत्वं प्रयातु सः ॥१३६॥ शापं श्रुत्वा तु शैलादिर्वज्रेणेव हतो गिरिः॥ न्यपतद्योगिनामग्र्यो ज्ञानमूर्तिधरो द्विजाः॥१३७॥ पुनश्च शंभोर्वचनाच्छैलादिमनुगृह्य च ॥ समालिंग्य महादेवं स्थिता देवीति नः श्रुतम् ॥१३८॥

इति श्रीनीलकंठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने स्कंदोत्पत्तिसूचनं नाम विंशोऽध्यायः

---

नग्न असतांना त्यानें मला पाहिलें. इतकें देखील ह्याला समजलें नाहीं. ह्या निष्काळजीपणामुळें ह्या मृत्युलोकीं मनुष्य कुळांत जन्मेल. (१३७) ब्राह्मणहो ह्या पार्वतीचा शाप ऐकतांच इंद्रवज्रानें छिन्नभिन्न होऊन पर्वत जसा जमिनीवर पडावा तसा नंदी ज्ञानस्वरूप असून जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला. (१३८) पुनः शंकरांनीं नंदीविषयीं पार्वतीजवळ भीड खर्चून त्याला उःशाप देवविला व पार्वतीचें मन शांत झाल्यावर पार्वती पुनः शंकरावरोवर प्रेमभावानें वागूं लागली, असें आह्मीं ऐकिलें आहे.

ह्याप्रमाणें नीलकंठनागनाथनांवाच्या विद्वद्वर्यानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं कार्तिकस्वामीच्या जन्माचा वृत्तांत नांवाचा विसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथैकविंशोऽध्यायप्रारंभः ॥

॥ श्रीशिवाय नमः ॥ आदित्यपुराणे ॥ ऋषय ऊचुः॥वन्हौ संतर्पि
सूत रेतसा त्रिदिवौकसः ॥ सगर्भाः खलु संजाता देवदेवेन शंभुना॥
सौख्यं कथमवाप्नुस्ते ह्युदरस्थेन रेतसा ॥ किमकुर्वंस्तदा सर्वे ना
यणपुरोगमाः ॥२॥ गर्भनिष्क्रमणं तेषामुत्पन्नेन च यत्कृतम् ॥ एतत्
समासेन ब्रूहि नः सूत पृच्छताम् ॥३॥

सूत उवाच ॥ वन्हौ संतर्पिते तेन रेतसा त्रिदिवौकसः ॥ रेत
चोदरस्थेन संतप्तास्ते सुरादयः ॥४॥ दश पंच सहस्राणामतीतां
द्विजोत्तमाः ॥ वर्षाणां तु तदाष्टौ च मूढगर्भा दिवौकसः॥५॥दुःखि
पार्वतीकान्तं शंकरं शरणं ययुः ॥ ऊचुः प्रांजलयः सर्वे सूर्यको
समप्रभम् ॥६॥

देवा ऊचुः ॥ भगवन्यदिदं दुःखं गर्भजं देहशोषणम् ॥ व

---

श्रीशिवास नमस्कार असो. आदित्यपुराणांत असा कथाभाग आहे—(
ऋषि ह्मणतात—सूता, देवाधिदेव महादेवानें आपले रेत अग्नीस पिण्यास लं
त्यामुळें सर्व देवं गरोदर झाले; (२) त्यांच्या पोटांत तें प्रखर शिवाचें
गेल्यावर ते मनस्वी दुःखी झाले असतां पुनः त्यांस सुख कसें झालें? व त्यां
श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांनीं काय केलें? (३) त्यांच्या पोटांतून गर्भ क
बाहेर पडला? पुढें त्या जन्मास आलेल्या मुलानें काय काय पराक्रम केले? हें
आह्मांस ऐकावयाचें आहे. तर, सूता, तूं आह्मांस हें सर्व थोडक्यांत सांग. अ
ऋषींचा प्रश्न ऐकून—

(४) सूत ह्मणाले– ऋषीश्वरहो, त्या श्रीशिवाचें रेत अग्नि प्याला अ
तो सर्व देवांचें तोंड असल्यामुळें, तें रेत सर्व देवांच्या पोटांत जाऊन ते सर्व
गरोदर झाले; आणि त्या शिवाच्या प्रखर तेजामुळें अगदीं होरपळून गेले. (
हे ब्राह्मणहो, अशा स्थितींत त्या देवांचीं चार लक्ष वर्षें गेलीं. तो गर्भ त्यां
पोटांत तसाच सल होऊन राहिला, वाढीस लागला नाहीं. (६) त्यामुळें सर्व
अगदीं त्रासून गेले आणि त्या दुःखांतून आपली मुक्तता करून घेण्याकरितां
कोटि सूर्यांसारख्या तेजस्वी असणाऱ्या पार्वतीपति शिवाला शरण गेले; आ
हात जोडून शिवाची प्रार्थना करूं लागले—

(७) देव ह्मणाले—भगवन्, हें जें गर्भारपणाचें दुःख आहे, त्यामुळें आम

नश्यति देवेश तमुपायं कुरु प्रभो ॥७॥ वन्हिना पीतमात्रेण रेतसा तव शंकर ॥ वयं सगर्भाः संजाता गर्भकालेस्त्रियो यथा ॥ उपहास्या- वयं देव पुंसां यद्गर्भसंभवः ॥८॥ सर्वे वै भृशसंविग्नास्तव तेजोवशा- द्विभो ॥ दह्यमाना महादेव नरके पापिनो यथा ॥९॥ शरणं भव देवा- नां करालंवं ददस्व नः ॥ दुःखोदधौ दुरुत्तारे प्रणतार्तिविनाशन॥१०॥ एवं श्रुत्वा तु वचनं देवानां पार्वतीपतिः ॥ ईषद्विहस्य भगवानुवा- चेदं सुरेश्वरान् ॥११॥

शिव उवाच ॥ भवद्भिरीदृशं कार्यमिष्टं वै सुरपुंगवाः ॥ नेष्टं देव्युदरस्थं हि तस्माद्गर्भदशां गताः ॥१२॥ इदानीं यत्प्रकर्तव्यं श्रुणुध्वं तत्सुरोत्तमाः ॥ वन्हिं यूयं पुरस्कृत्य मेरुं व्रजत मंदरात् ॥१३॥ शर- दानवने यूयं ऱ्हदोत्संगे प्रसूयत ॥ निष्क्रमिष्यत्यसंदेहस्ततः सौख्य-

---

शरीर अगदीं करपून गेलें आहे; देवाधिदेवा, परमेश्वरा, हें आमचें दुःख ज्या रीतीनें दूर होईल अशी तजवीज कर. (८) हे श्रीशिवा, तुझें रेत अग्नि प्याल्या- बरोबर, त्यामुळें आह्मी सर्वजण गर्भार झालों. ऋतुमती बायकोला तिच्या नव- ऱ्यापासून जसा गर्भ राहावा, तशी आमची सर्वांची स्थिति झाली. परमेश्वरा, पुरुषांस गर्भ राहणें ही लाजिरवाणी गोष्ट असल्यामुळें आह्मी सर्वजण उपहासास पात्र झालों. आह्मांस लोकांत तोंड देखील दाखवितां येत नाहीं. (९) हे परमेश्वरा, तुझ्या रेताच्या अतिशय उष्णतेमुळें आह्मी अगदीं त्रासून गेलों आहों, हे महा- देवा, जसें पातकीलोक नरकांत दुःख भोगतात तशी आमची स्थिति झाली आहे. (१०) हे परमेश्वरा, तुला शरण आलेल्या लोकांची तूं पीडा दूर करितोस, आह्मी सर्वदेव तुला शरण आलों आहों, तूं आमचें रक्षण कर. हा दुःखरूप समुद्र फारच अफाट आहे, त्यांत आह्मी बुडत आहोंत, त्यांतून आह्मांस तूं हात देऊन वर काढ. (११) असें त्या सर्व देवांचें दीनवाणें बोलणें ऐकून परमेश्वर पार्वती- पति कांहीं थोडें हंसून ब्रह्म विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांस ह्मणाले—

(१२) शिव ह्मणाले—हे प्रमुख देवहो, तुह्मांला हें असें गर्भार राहणेंच बरें वाटलें, पार्वतीनें गर्भार रहावें ही गोष्ट तुह्मांस आवडली नाहीं. त्यामुळें तुह्मांस स्वतःसच गर्भारपणाचें दुःख भोगावें लागत आहे. (१३) हे देवश्रेष्ठहो, झालें तें झालें, आतां पुढें ह्यास उपाय काय करावयाचा तें सांगतों, ऐका. तुह्मी अग्नीला बरोबर घेऊन ह्या मंदरपर्वतावरून निघून मेरुपर्वतावर जा. (१४) आणि तेथें तुह्मी शरदान नांवाच्या वनांत डोहाच्या जवळ बाळंत व्हा. तसे तुह्मी बाळंत

मवाप्स्यथ ॥१४॥ ततः शंभोर्वचः श्रुत्वा नारायणपुरोगमाः ॥ अग्निमन्विष्य च ययुर्मेरुं गिरिवरोत्तमम् ॥१५॥ तस्य चोत्तरदिग्भागे शरदानवने शुभे ॥ उपविश्य महात्मानो मध्ये संस्थाप्य वेधसम् ॥ नारायणं पुरस्कृत्य प्रसूताः सर्वदेवताः ॥१६॥ गर्भशल्यविनिर्मुक्ता जातास्ते सुखिनो द्विजाः ॥ शार्वेण तेजसा तेन रंजितो मेरुपर्वतः॥१७ अथ कांचनतां प्राप्तस्सशैलवनकाननः॥ शार्वं तेजो धृतं यस्माद्देवैश्चक्रिपुरोगमैः ॥ तस्माज्जरादिनिर्मुक्ता ह्यमराश्च सुरोत्तमाः ॥१८॥ सिद्धाश्च मुनयश्चैव ये केचित्तत्र संस्थिताः॥तृणगुल्मलताश्चैव जलस्थलरुहाश्च ये ॥ सर्वे कांचनसंकाशाः संजातास्तत्प्रभावतः ॥१९॥ पार्श्वं मेरोर्विनिर्भिद्य शंभोस्तेजो विनिर्गतम् ॥ गंगायां विहितं यच्च तदेकत्वमभूद्द्विजाः ॥२०॥ अथ देवो महादेवस्तेजोराशिरुमापतिः ॥ गोपयामास तत्तेजः पिंगलं प्रेक्ष्य शंकरः ॥२१॥ गोप्यमाने तदा तस्मिन्मेरौ सूर्या-

---

झालां ह्मणजे तुमच्या शरीराचा दाह नाहींसा होऊन तुह्मी पूर्वीप्रमाणें सुखी व्हाल. (१५) हें शिवाचें बोलणें ऐकून श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देव अग्नीचा शोध करून व त्यास बरोबर घेऊन, सर्व पर्वतांत श्रेष्ठ असणाऱ्या मेरुपर्वताकडे (वर) गेले. (१६) आणि त्या पर्वताच्या उत्तरेकडील बाजूस शरदान नांवाचें वन आहे तेथें जाऊन नारायणास पुढें करून ब्रह्मदेवास मध्यभागीं घेऊन सर्वजण बसले, व बाळंत झाले. (१७) ब्राह्मणहो, तेव्हां त्यांच्या पोटांतील खिळ्यासारखा टोंचणारा गर्भ बाहेर पडल्यामुळें ते पूर्वीप्रमाणें सुखी झाले. तें शिवाचें रेत त्या पर्वतावर पडल्यामुळें तो मेरुपर्वत सोन्यासारखा शोभूं लागला. (१८) त्यावरील दगड झाडें उपवनें वगैरे सर्व सोन्याचीं झालीं. विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांनीं शिवाचें वीर्य पोटांत इतके दिवस वागविलें होतें, त्यामुळें त्यांच्या ह्मातारपण वगैरे व्यथा नाहींशा होऊन ते अमर (मरणाचें भय नसणारे) झाले (१९) त्या मेरुपर्वतावर जे सिद्ध रहात होते, व जे मोठमोठे तपस्वी रहात होते, व जीं झाडें, वेली, पाण्यांत उगवणारीं झाडें आणि जमिनीवर उगवणारीं झाडें होतीं, तीं सर्व त्या शिववीर्याच्या सामर्थ्यानें सोन्याचीं झालीं. (२०) शिवाचें जितकें रेत मेरुपर्वताच्या पोटांत शिरलें होतें, तितकें सर्व मेरुपर्वताचें पोट फाडून बाहेर निघालें. तसेंच ब्राह्मणहो, अग्नीनें गंगेंत जितकें टाकलें होतें तितकें बाहेर येऊन तें सर्व एकत्र झालें. (२१) मग पुढें त्या परमेश्वर देवाधिदेव, पार्वतीपति श्रीशंकरांनीं आपलें पिंगट वर्णाचें रेत एकत्र जमलेलें पाहून त्याचें रक्षण केलें(२२) तें

युतप्रभे ॥ वर्षाणां तु सहस्रेण तद्रेतः स्कंदतां गतम् ॥२२॥ स्कन्द इत्युच्यते तेन तदा प्रभृति सुव्रताः ॥ हराज्जातो यतस्तेन कुमार इति कथ्यते ॥२३॥ स्कंदः कुमारः षड्वक्त्रस्तथाष्टादशलोचनः॥भुजैर्द्वादशभिश्चैव शोभमानोऽभवत्तदा ॥२४॥ ईशादेशात्पुनस्तास्तु कृत्तिकाः परमोज्वलाः ॥ ताभिः क्षीरं यतो दत्तं कार्तिकेय इति स्मृतः ॥२५॥ गर्भपंकविलिप्तांगो गंगायां स्नापितः प्रभुः ॥ तप्तचामीकराभासः शरदानवने तथा ॥ नाम्नां सहस्रेण तदा कुमारो वेधसा कृतः ॥२६॥ मुमोच नादमुत्थाय सर्वभूतभयंकरम् ॥ पातालं भेदयित्वा तु तच्छृंगं शतधा कृतम् ॥ सिंहादयोऽपि तत्रस्थास्तेन नादेन सूदिताः॥२७॥ततः संक्रीडमानं तु दृष्ट्वा देवं शिवात्मजम् ॥ पिंगलो देवदेवेशं ज्ञापयामास शंकरम् ॥२८॥ पश्य त्वं देवदेवेश क्रीडमानं कुमारकम् ॥ सूर्यायुतप्रती

---

रेत दहा हजार सूर्यांसारखें तेजस्वी होतें. मेरुपर्वतावर एक हजार वर्षें पर्यंत त्याचें असें रक्षण केल्यावर तें परिपक्व होऊन पाझरलें. (त्यांतून मूल बाहेर पडलें). (२३) हे सदाचारी ब्राह्मणहो, त्यामुळें त्या दिवसापासून त्या मुलास स्कंद असें नांव पडलें. तो मुलगा हरापासून झाला ह्मणून त्यास कुमार असें नांव पडलें. (२४) याप्रमाणें त्याला स्कंद आणि कुमार अशीं दोन नांवें पडलीं. त्याला सहा तोंडें होतीं, अठरा डोळे होते, आणि बारा हात होते. त्यामुळें तो मुलगा फारच सुस्वरूप दिसत होता. (२५) परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें त्या सुस्वरूप अप्सरांनीं तेथें जाऊन त्या मुलास दूध पाजलें, त्यामुळें त्यास कार्तिकेय असें नांव पडलें. (२६) गर्भसंबंधीं मलानें त्याचें अंग भरलें होतें, तें गंगानदींत नेऊन धुतलें; त्यामुळें तो तापविलेल्या सोन्यासारखा तेजःपुंज दिसूं लागला. शरदान वनामध्यें ब्रह्मदेवानें स्वतः येऊन कार्तिकेयाचीं हजार नांवें ठेविलीं. (२७) तो मुलगा उठून बसला आणि त्यानें सहज एक किंकाळी मारिली त्या बरोबर सर्व लोक थरथर कांपूं लागले. पाताळ तर दुभंग होऊन पर्वताचीं शिखरें कोसळून खालीं जमिनीवर पडलीं. सिंह, वाघ, वगैरे हिंसक रानटी जनावरें इतकीं घाबरलीं, कीं तीं त्या आवाजाबरोबर घाबरून जाऊन मरण पावलीं. (२८) पुढें तो मुलगा तेथल्या तेथेंच आपल्याशींच लहानपणाचे खेळ खेळूं लागला, तें वर्तमान पिंगलानें शंकरास जाऊन सांगितलें. (२९) पिंगल ह्मणाला—देवाधिदेवा, शिवा, दहा हजार सूर्यांसारखा तेजस्वी दिसणारा हा तुमचा मुलगा कार्तिकेय तेथें

काशमात्मसूनुं षडाननम् ॥२९॥ ज्ञापितः पिंगलेनेशो वाक्यं देव्यै मुदावहम् ॥ वरो वरेण्यो वरदो विश्वाकार उवाच ह ॥३०॥

ईश्वर उवाच ॥ गच्छाव एव देवेशि मेरौ यत्र सुतस्तव ॥ पश्यावस्तं वरारोहे कुमारं वै षडाननम् ॥३१॥ वृत्तम् ॥ पुरा तवेष्टं कनकावभासं पश्याद्रिजे मानसराजहंसम् ॥ तं भासमानं शतसूर्यकल्पं षडाननं कार्मुकपाणिमग्रे ॥३२॥ समागतौ स ज्वलनोऽथ दृष्ट्वा त्रैलोक्यनाथौ जगतः प्रदीपौ ॥ उवाच वन्हिर्वरदं कुमारं हरांबिके द्वौ पितरौ तवैतौ ॥३३॥ त्वामागतौ द्रष्टुमनंतवीर्यं प्रजाश्रयौ तौ प्रमथाधिनाथौ॥ गतोऽथ वन्हेर्गदितं निशम्य ततस्तु नत्वा गिरिजांकगोऽभूत् ॥३४॥ तं सा चुचुंबे मुहुरंकसंस्थमाकृष्यमाणा कलहंसभाषिणी ॥ उमांकसंस्थो

---

कसा खेळ खेळत आहे, हें पहा तर खरें ! (३०) पिंगलाचें असें बोलणें ऐकून तो श्रेष्ठ, वर देणारा, त्रैलोक्यस्वरूप शंकर पार्वतीला हें आनंदाचें वर्तमान सांगूं लागला.—

(३१) शिव ह्मणाले—देवी पार्वती, जेथें तुझा मुलगा आहे तेथें मेरुपर्वतावर जाऊं. हे प्रिये, त्या सहामुखें असणाऱ्या कुमाराला पाहूं चल. (३२) असें ह्मणून तीं दोघें शिवपार्वती मेरुपर्वतावर गेल्यावर, शिव पार्वतीला पुनः ह्मणाले. पार्वती, मानससरोवराला ज्याप्रमाणें राजहंसपक्षी असावा असें वाटतें, त्याप्रमाणें पूर्वी तुझ्या मनाला मुलगा असावा असें वाटत होतें. तो सोन्यासारखी अंगकांति असणारा, दहा हजार सूर्यांसारखा तेजःपुंज दिसणारा, हा षडानन हातांत धनुष्य घेऊन कसा उभा राहिला आहे पहा. (३३) सर्व त्रैलोक्याचीं मातापितरें व सर्व त्रैलोक्यास ज्ञान प्राप्त करून देणारीं तीं दोघें शिवपार्वती तेथें आलेलीं पाहून, अग्नी त्या श्रेष्ठ कार्तिकेयाजवळ जाऊन ह्मणाला, मुला कार्तिकेया, हीं शिवपार्वती आलीं आहेत, ह्यांकडे पहा. हीं दोघेंजण तुझींच आईबापें आहेत. (३४) तुझें सामर्थ्य अलौकिक आहे. त्या तुला पाहण्याकरितां हीं दोघेंजण आलीं आहेत. हे सर्व प्रजांस आश्रयभूत असून प्रमथ गणांचे अधिपति आहेत. अग्नीचें असें बोलणें ऐकून कार्तिकेय शिवपार्वतीजवळ गेला, आणि त्या दोघांस नमस्कार करून पार्वतीच्या मांडीवर जाऊन बसला. (३५) कलहंसाप्रमाणें मधुर भाषण करणाऱ्या पार्वतीनें, आपल्या मांडीवर येऊन बसलेल्या कार्तिकेयास प्रेमानें दृढ-आलिंगन देऊन, त्याच्या गालाचा मुका घेतला. कार्तिकस्वामीही पार्वतीच्या

मदनारिसूनुः करेण तस्यास्तिलकालकौ तु ॥ ममर्द शंभोस्तु भुजंगहारं जग्राह चंद्रं च कपर्दसंस्थम् ॥३५॥ पंचम्यां स्नापितः सोऽथ षष्ठ्यां षष्ठिप्रियो गुहः ॥ चतुष्पादगतिं त्यक्त्वा त्रैलोक्यं हंतुमुद्यतः ॥३६॥ अबाधयत्तदा बालो जंतूंस्स्थावरजंगमान् ॥ क्वचिच्छृंगं गिरेश्चूर्णं नयेत्पांसुसमानताम् ॥३७॥ क्वचित्सिंहान्समागृह्य करेण सहसा गुहः॥तत्पृष्ठमारुरोहाथ येन तान्भ्रामयत्प्रभुः॥३८॥क्वचिन्नागौ गृहीत्वा तु कराभ्यां संमुखावुभौ ॥ आस्फालयत्तदान्योन्यं कुंभाभ्यां सह लीलया ॥३९॥ खमुत्प्लुत्य समादाय खेचराणामुमासुतः॥चिक्षेप सहसा भूयो विमानान्यवनीतले ॥४०॥ पुनरुत्प्लुत्य वेगेन प्रेंखमाणः खमण्डले॥ मार्गं रुरोध सूर्येन्द्वोर्ग्रहाणां च तथैव च ॥ उत्पाट्य मेरुशृंगाणि इतश्चेतश्च संक्षिपेत् ॥४१॥ ततस्ते भृशमुद्विग्नाः शक्रं शत्रुप्रतापनम् ॥

---

मांडीवर बसून तिच्या कुंकवावरून आणि केंशावरून हात फिरवूं लागला. त्यानें शंकराच्या गळ्यांतील सर्पांची माळ मुरगाळली व त्याच्या जटाजूटावर चंद्र होता, तो खालीं काढून आपल्या हातांत घेतला. (३६) असो पुढें पंचमीं तिथीस त्यास स्नान घातलें, त्यास षष्ठी तिथी मनापासून आवडत होती. दोन हातांनीं आणि दोन पायांनीं रांगण्याचे दिवस निघून जातांच, तो त्रैलोक्यास मारील इतका बलाढ्य झाला. (३७) आणि तेव्हांपासून तो त्रैलोक्यांतील स्थावर जंगम प्राण्यांस त्रास देऊं लागला. एखादेवेळीं त्यानें एखाद्या पर्वताचें एखादें मोठें थोरलें शिखर उपडून आणावें आणि तें बुक्यांनीं फोडून फोडून त्याचा चुरा करून टाकावा. (३८) एखादेवेळीं कार्तिकेयानें एकदम पुष्कळसे सिंह धरून आणावे, आणि त्यांच्या पाठीवर चढून बसावें, आणि त्यांस चोहोंकडे नेऊन फिरवून आणावें. (३९) एखाद्यावेळीं त्यानें दोन मोठमोठाले हत्ती धरून आणावे आणि त्या दोघांस समोरासमोर उभे करून मौजेनें त्यांचीं गंडस्थळें एकमेकांवर आपटावीं. (४०) एखादेवेळीं पार्वतीच्या मुलानें (कार्तिकेयानें) उडी मारून आकाशांत जावें, आणि एकदम तेथील विमानें धरून जमिनीवर भराभर फेंकून द्यावीं (४१) पुनः त्यानें उडी मारून आकाशांत जावें आणि रांगत रांगत जाऊन सूर्यांचा चंद्राचा आणि ताऱ्यांचा मार्ग अडवून धरावा. एखाद्यावेळीं मेरुपर्वताचीं शिखरें उपटून इकडे तिकडे फेकून द्यावीं. (४२) हे ब्राह्मणहो, कार्तिकेयाच्या अशा प्रकारच्या दांडगेपणाच्या वर्तनामुळें सर्व प्राणिमात्र अगदीं त्रासून

ऊचुर्गत्वा द्विजश्रेष्ठा भूतवाक्यमिदं तदा ॥४२॥ अयमर्कायुतप्रख्यो वालो वर्धति वृत्रहन् ॥ तवैष राज्यहर्ता वै भविष्यति न संशयः॥४३॥ पराक्रमाद्बलात्तत्र तथोत्साहाच्च तेजसः ॥ नूनं शतगुणेनायमधिकस्ते ह दृश्यते ॥४४॥ यदि सूदयसे नाद्य न त्वं सुखमवाप्स्यसि ॥ करिष्यसि वचोऽस्माकं तव राज्यं भविष्यति ॥४५॥ उपेक्षा नैव कर्तव्या शिशुं मत्वा पुरंदर ॥ एतद्विचार्य यत्नेन ततो बालं निषूदय ॥४६॥ एवमुक्तस्तदा तैस्तु भूतव्रातैः पुरंदरः ॥ उवाच वचनं श्लक्ष्णं तेषां धर्मपरायणम् ॥४७॥

इंद्र उवाच ॥ कष्टमुक्तमिदं भूता बालस्य हननं प्रति ॥ धर्मघ्नं पापसंघातं कीर्तिघ्नं सचराचराः ॥४८॥ श्रूयतामभिधास्यामि धर्मशास्त्रार्थनिश्चयम् ॥ ऋषिभिस्तु पुरा ख्यातं पुराणेषु चराचराः ॥४९॥ आतुरं भीतमुद्विग्नमन्तःस्थं शरणागतम् ॥ स्त्रियमप्यथ वा बालमन्धं

---

गेले, आणि मग ते सर्वजण शत्रूंस त्रास देणाऱ्या इंद्राकडे जाऊन ह्मणाले. (४३) इंद्रा, हा मुलगा दहा हजार सूर्यांसारखा तेजस्वी आहे, हा वरचेवर जास्त जास्त बलाढ्य होत आहे, आणि हा असाच बलाढ्य झाला तर निःसंशय तुझें राज्य घेईल. (४४) आह्मांस तर असें वाटतें कीं, हा मुलगा पराक्रमानें, बळानें, उत्साहानें आणि तेजानें तुझ्यापेक्षां शंभरपटीनें जास्त आहे हें अगदीं खरें आहे. (४५) ह्यावेळीं तूं जर ह्याला मारून टाकणार नाहींस तर तुला पुढें खचित सुख मिळणार नाहीं. आणि आमच्या ह्मणण्याप्रमाणें करशील तर तुझें राज्य अबाधित चालेल इंद्रा, (४६) हा लहान मुलगा आहे अशा समजुतीनें तूं ह्याची उपेक्षा करूं नकोस; ह्याचा नीट विचार करून हर प्रयत्नानें ह्या मुलास मारून टाक. (४७) ह्याप्रमाणें त्या सर्व प्राणिमात्रांच्या समुदायांनीं इंद्रास कार्तिकेयाचें वर्तमान सांगितल्यावर इंद्र त्यांस धर्मसंबंधाच्या गोष्टी सांगूं लागला.—

(४८) इंद्र ह्मणाला— हे स्थावरजंगम प्राणिमात्रहो, तुह्मी मला जें लहान मुलाला जिवें मारण्याविषयीं सांगत आहां, ते अतिशय वाईट आहे. अशी गोष्ट केली तर धर्माचा नाश होऊन पाप लागेल, व दुर्लौकिक होईल. (४९) हे स्थावरजंगम जीवहो, पूर्वी ऋषींनीं देखील लहान मुलांस मारल्यानें काय काय दोष घडतात तें पुराणांत सांगितलें आहे; तोच धर्मशास्त्राचा सारांश मी सांगतों, नीट लक्ष्य देऊन ऐका. (५०) जो मनुष्य रोगानें पीडिला असेल, जो कोणी भ्याला असेल, जो कोणी उदासीन असेल, जो कोणी अंतःपुरांत असेल, जो कोणी

पंगुं तपस्विनम् ॥५०॥ विलपन्तं मदोन्मत्तं वित्रस्तं ब्राह्मणं तथा ॥ पतितं प्रपलायन्तं कामासक्तं निरायुधम् ॥५१॥ नग्नं दीनं तथा वृद्धं हाहेत्यभ्याशमागतम् ॥ मुक्तकेशं तथा मत्तं सुप्तं च भुवने तथा ॥५२॥ सूदयिष्यन्ति ये मूढा नूनं ते नरकार्णवात् ॥ अनुत्थाना भविष्यन्ति गर्भस्थाः कुंजरा यथा॥५३॥व्रजध्वं शरणं यत्र स्थितं शंभुसुतं गुहम् ॥ नाहं बालवधं कर्तुमुत्सहे सचराचराः ॥५४॥ एवमुक्ते तु शक्रेण भूतास्ते भृशदुःखिताः ॥ क्रोधसंदीपनं वाक्यमिदमूचुश्चराचराः ॥५५॥ ॥ भूता ऊचुः ॥ गर्भोऽदितेर्यदा शक्र त्वत्वरं सूदितस्त्वया ॥ इदानीं निर्गतः कुत्र दारुणो गर्भपातकः ॥५६॥ अशक्यमिति मत्वैव नीतिमा-

---

शरण आला असेल, जी स्त्री असेल, जें लहान मूल असेल, जो कोणी आंधळा असेल, जो पांगळा असेल, जो कोणी तपस्वी असेल, (५१) जो कोणी रडत असेल, जो कोणी मदोन्मत्त ( उन्मत्त ) असेल, जो कोणी त्रासला असेल, जो कोणी ब्राह्मण असेल, तसाच जो कोणी पळत असेल, जो कोणी पडला असेल, जो कोणी विषयासक्त असेल, ज्या कोणीं हातांत शस्त्र घेतलें नसेल, (५२) जो कोणी नागवा असेल, जो कोणी दीन असेल, जो कोणी वृद्ध ( म्हातारा ) असेल, जो कोणी आक्रोश करीत आपल्याकडे आला असेल, ज्या कोणाचे केंस सुटले असतील, तसाच जो कोणी वेडा झाला असेल, किंवा जो कोणी आपल्या घरांत निजला असेल, (५३) त्याला म्हणजे अशा वर सांगितल्या स्थितींत असणाऱ्या मनुष्याला जे मूर्ख मारतात, ते जसे चिखलांत रुतलेले हत्ती चिखलांतून कधीं वर येत नाहींत, तसे नरकसमुद्रांतून कधींही वर येत नाहींत, ( ते अक्षयकाळ नरकांत पडून राहतात. ) (५४) हे चराचर जीवहो, तुमचा त्रास चुकावा असें जर तुम्हांस वाटत असेल तर तुम्ही त्या शिवाच्या मुलाला ( कार्तिकेयाला ) शरण जा, म्हणजे झालें. त्या मुलाचा जीव घेणें निंद्यकर्म करणें मला बरें वाटत नाहीं. (५५) इंद्रानें असें म्हटल्यावर त्या स्थावरजंगम प्राणिमात्रांस अतिशय वाईट वाटलें; व ते सर्वजण इंद्रास राग येऊन तो ह्या कामास तयार होईल अशा रीतीचें चेतविणारें भाषण बोलूं लागले.—

(५६) भूतगण म्हणाले— इंद्रा, मागें तूंच स्वतः दितीच्या पोटांत शिरून तिचा गर्भ चिरून टाकलास, आणि आतां मात्र गर्भहत्या करणें अतिशय पाप आहे, हा धर्मशास्त्राचा विषय तुला कसा आठवला? (५७) हे इंद्रा, तूं सन्मान करण्यास पात्र आहेस. हें काम आपल्या हातून होण्यासारखें नाहीं, असें समजून प्रथमपा-

नसि मानद ॥ अशक्ये कर्मणि विभो नीतिमान्पुरुषो भवेत् ॥५७॥ कश्च नाम नरः शूरो यो बालं योधयेद्रणे ॥ अपि शक्रशतैस्तस्य वज्रकोटिनिपातनैः ॥ अप्येकमपि रोमाग्रं शासितुं नैव शक्यते ॥५८॥ एवमुक्तस्ततस्तैस्तु भूतव्रातैः पुरंदरः ॥ आज्यधाराभिषिक्तोऽग्निर्यथैव प्रज्वलंस्तदा ॥५९॥ उवाचेदं वचस्तान्स क्रोधवन्हिप्रदीपितः ॥ वज्रमुद्यम्य हस्तेन वृत्रहा कुलिशायुधः ॥६०॥

इंद्र उवाच ॥ पूर्वं मया यथा गर्भो घातितश्च चराचराः ॥ दितेः कोष्ठं समाविश्य तथेदानीं नियम्यते ॥६१॥ अथ गत्वा हनिष्यामि पतंगमिव वन्हिना ॥ वज्रहस्तं पतंतं मामाहवे प्रसहेत कः ॥६२॥ एवमुक्त्वा ततः शक्रः क्रोधानलसमीरितः ॥आज्ञापयत्तदा विप्राः साध्यान् देवान् दिवाकरान् ॥ शरदानं गमिष्यामि वधार्थं बालकस्य च ॥६३॥

---

सूनच्च तूं ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगत आहेस व असा एक साधारण नियम आहे कीं, मनुष्याच्या हातून काम होण्यासारखें नसलें, ह्मणजे आपला अशक्तपणा झांकण्याकरितां तो शास्त्रार्थांच्या गोष्टी सांगूं लागतो. (५८) ह्या मुलाबरोबर युद्धभूमीवर युद्ध करील असा पराक्रमी पुरुष तरी कोण आहे? त्या मुलाचें अंगावर तुझ्यासारखें शंभर इंद्र धाऊन गेले तरी काय? किंवा त्याच्या अंगावर कोट्यावधि वज्रें टाकिलीं, तरी त्याचें काय होणार आहे? अशानें त्याचा एक केस देखील वांकडा होणार नाहीं. (५९) असो, अशा तऱ्हेनें प्राणिमात्रांच्या समुदायांनीं इंद्रास ह्मटल्यावर, विस्तवावर तूप ओतलें ह्मणजे तो जसा जास्त भडकतो, तसा इंद्र रागानें फारच खवळला. (६०) व डोळे रागानें लाल करून वज्र आयुध असणारा वृत्रासुराचा शत्रु ( इंद्र ), आपला हात वर करून सर्व प्राणिमात्रांस उद्देशून ह्मणाला—

(६१) इंद्र ह्मणाला— हे स्थावरजंगम प्राणिमात्रहो, पूर्वी मी दितीच्या पोटांत शिरून जसा तिचा गर्भ कापून टाकिला तसाच ह्यावेळीं ह्या मुलाचाही बंदोबस्त करितों, तुह्मी कांहीं चिंता करूं नका. (६२) मी त्याकडे जातो, आणि जसा विस्तव काजव्याला जाळून टाकितो, तसा त्या मुलास आतांचे आतां मारून टाकितों. मी युद्धभूमीवर हातांत वज्र घेऊन युद्धास उभा राहिल्यावर माझ्या पुढें कोण टिकणार आहे? (६३) हे ब्राह्मणहो, मग इंद्रानें रागारागानें साध्यदेव आणि आदित्य ह्यांस आज्ञा केली कीं, मला त्या शिवाच्या मुलास मारण्यास मेरुपर्वता-

हंसकुंदेन्दुवर्णाभं चतुर्दन्तं महागजम् ॥ आनयध्वं ममाग्रे तु करिणं भ्रमुवल्लभम् ॥६४॥ तदादेशात्सुरैस्तूर्णं सर्वायुधसमन्वितः ॥ निवेदितश्च शक्राय तमारुह्य पुरंदरः ॥६५॥ विश्वेदेवैःससाध्यैश्च वसुभिश्च मरुद्गणैः ॥ आदित्यैरश्विनीभ्यां च ययौ स्कन्दवधाय सः ॥ वियन्मण्डलमासाद्य स्तूयमानश्चराचरैः ॥६६॥ वृत्तम् ॥ दोधूयमानश्चमरैश्च दिव्यैर्जगीयमानः किल वंदिभिश्च ॥ पेपीयमानः सुरसुंदरीभिः कामातुराभिर्नयनैरजस्रम् ॥६७॥ संपूज्यमानः सुरसिद्धसंघैर्मुदान्वितो वज्रधरः किरीटी ॥ कुमारमुद्दिश्य गतोऽथ वेगाद्धरिर्वधेप्सुर्दनुजान्यथैव ॥६८॥

सूत उवाच ॥ एवं गत्वा सहस्राक्षो यत्रास्ते पार्वतीसुतः ॥ बालसूर्यायुतप्रख्यं तमपश्यच्छचीपतिः ॥ प्रलयाग्निचयाकारं दृष्ट्वा नारदमब्रवीत् ॥६९॥

---

वर शरदानवनांत जावयाचें आहे; (६४) ह्यासाठीं हंसासारखा आणि कुंदाच्या फुलांसारखा पांढरा पांढरा शुभ्र असणारा, चार दांत असणारा, अभ्रमु हत्तिणीचा पति माझा मोठा ऐरावत आणून तुह्मी मजपुढें उभा करा. (६५) मग लागलीच इंद्राच्या आज्ञेप्रमाणें सर्व शस्त्रास्त्रें त्याच्या पाठीवर घालून तो ऐरावत इंद्रापुढें आणून उभा केला. त्यावर बसून, (६६) आपल्याबरोबर विश्वेदेव, साध्यदेव, अष्टवसु, मरुद्गण, आदित्य आणि अश्विनीकुमार यांस घेऊन, इंद्र कार्तिकेयास मारण्याकरितां शरदानवनांत जाण्यास आकाशमार्गानें चालला. त्यावेळीं स्थावरजंगम प्राणिमात्रांनीं इंद्राची स्तुति केली. (६७) तसेच इतर देवांनीं इंद्रावर चवऱ्या वारल्या, स्तुतिपाठक लोकांनीं इंद्राचे गुणानुवाद गायिले, आणि कामातुर झालेल्या तरुण, सुंदर स्वरूपाच्या देवांगनांनीं इंद्राकडे सप्रेम दृष्टीनें पाहिलें. (६८) देवांच्या समुदायांनीं आणि सिद्धांच्या समुदायांनीं इंद्राची पूजा केली; त्यामुळें इंद्राचे मनास मोठा संतोष वाटला. आणि अशा समारंभानें हातांत वज्र घेऊन व मस्तकावर मुकुट घालून, श्रीविष्णु जसा दैत्यांस मारण्याकरितां जावा, तसा इंद्र कार्तिकेयावर धांवून गेला.—

(६९) सूत ह्मणाले—अशा समारंभानें इंद्र, जेथें कार्तिकेय होता तेथें गेला; आणि सकाळच्या वेळच्या दहा हजार सूर्यांसारखा तेजस्वी, व प्रलयकाळासारखा तेजःपुंज दिसणारा तो धिप्पाड मुलगा दृष्टीस पडतांच इंद्र नारदास ह्मणूं लागला—

इंद्र उवाच ॥ किमिदं भाति देवर्षे मेरोः शतगुणोच्छ्रयम् ॥ तेजसा व्याप्य भुवनं सर्वभूतभयंकरम् ॥७०॥ एवं शक्रवचः श्रुत्वा भगवान् ब्रह्मणः सुतः ॥ ऐरावतसमारूढं नारदस्तमथाब्रवीत् ॥७१॥

नारद उवाच ॥ योऽसौ देवस्त्वया न्यस्तो गर्भश्चैव सहामरैः ॥ तस्य एष प्रभावोऽयं नूनं देव शतक्रतो ॥७२॥ भास्कराणां न पुंजोऽयं नैव पर्वतसंचयः ॥ बालेनोत्पद्यमानेन मेरुर्देव स रंजितः ॥७३॥ अधोयोजनसंख्याभिः सहस्राण्येव षोडश ॥ चतुराशीतिरुत्सेधो द्वात्रिंशद्विस्तरः स्मृतः ॥७४॥ स गिरिः सकलो जन्तुर्मेरुः कांचनतां गतः ॥ तत्तेजः स्कंदतां याति सहस्राब्देन मानद ॥७५॥ चतुर्थ्यामाकृतिर्देव पंचम्यामंगवांस्ततः ॥ षष्ठ्यां पद्भ्यां जगामैष त्रैलोक्यं विजयिष्यति ॥७६॥ त्वया सहाथ सप्तम्यां पालयिष्यति नः सुरान् ॥ त्वं हि नूनं न

---

(७०) इंद्र ह्मणाला— देवर्षे नारदा, हे माझ्या समोर मेरुपर्वतापेक्षां शंभरपटीनें जास्त उंच असें तेजःपुंज काय दिसत आहे? ह्याच्या तेजानें सर्व त्रैलोक्य व्यापून गेलें असून, तें सर्व प्राणिमात्रांस भयंकर वाटत आहे. (७१) असें इंद्राचें बोलणें ऐकून तो महात्मा ब्रह्मदेवाचा पुत्र नारदऋषि ऐरावत गजावर बसलेल्या इंद्रास ह्मणाला—

(७२) नारद ह्मणतात— हे महासमर्था शतक्रतो ( इंद्रा ), तूं पूर्वीं सर्व देवांसहित मेरुपर्वतावर जो गर्भ टाकलास, त्या गर्भाचा हा मुलगा झाला आहे. आणि मी तुला खरोखर सांगतों कीं, त्या मुलाचाच हा प्रभाव आहे. (७३) हा सूर्यांचा समुदाय नव्हे, किंवा पर्वतांचा ढीग नव्हे. हे महाभागा इंद्रा, हा मुलगा जन्मल्याबरोबर ह्यानें हा सर्व मेरुपर्वत सोन्याचा केला. त्यामुळेंच हा पर्वत इतका सुशोभित दिसत आहे. (७४) हा पर्वत खालीं सोळा योजन खोल असून वर चौऱ्याशीं योजन उंच आहे. आणि बत्तीस योजनें ह्याचा विस्तार आहे. (७५) तरी हा एवढा मोठा अवाढव्य पर्वत त्यावरील जीवजंतूंसुद्धां सोन्याचा झाला आहे. इंद्रा तुह्मी सर्व देवांनीं पूर्वीं येथें जो गर्भ टाकला- तें शिवाचें रेत एक हजार वर्षांनीं पाझरून त्यापासून हा मुलगा झाला. (७६) चवथ्या दिवशीं त्याला आकृति आली आणि पांचव्या दिवशीं त्याला सर्व अवयव आले. हा सहाव्या दिवशीं चालूं लागेल आणि सर्व त्रैलोक्य जिंकील. (७७) आणि सातव्या दिवशीं हा मुलगा तुझ्यासहित आह्मां सर्व देवांचें रक्षण करील, तूं ह्या मुलाबरोबर स्नेह

शक्नोषि जेतुं वर्षशतैरपि॥७७॥कुमारं वरदं देवं पार्वत्यानंदवर्द्धनम्॥
नानाप्रहरणोपेतं नानाभरणभूषितम् ॥ मातृभिर्गणवृन्दैश्च सेव्यमान-
मुमासुतम् ॥७८॥ एवं संजल्पमानोऽसौ जंभारिर्बालकं प्रति ॥ वज्रं
मुमोच वृत्रारिः स्फुलिंगोद्गारि भीषणम् ॥७९॥ तृणवन्मन्यमानोऽसौ
वज्रं तत्पार्वतीसुतः ॥ शरेणैरावतं जघ्ने पपात स च मूर्च्छितः ॥८०॥
पुनरन्यं समादाय शरं ज्वलनसन्निभम् ॥ छत्रं ध्वजं पताकं च हरे-
श्चिच्छेद षण्मुखः ॥८१॥ बिभेदान्येन तीक्ष्णेन हस्तं वै वज्रिणो गुहः ॥
शरेणादित्यतुल्येन पुरं शंभुर्यथाहवे ॥८२॥ पुनर्बाणं समादाय तं ज-
घान शतक्रतुं ॥ अपरेण सुतीक्ष्णेन मुकुटं च तथा हरेः ॥८३॥ यमं च
पंचभिर्बाणैर्निर्ऋतिं दशभिर्गुहः ॥ दशपंचशरैराशु वरुणं च विभेद
सः ॥८४॥ विंशद्भिर्वायुदेवं तु रविं वै दशपंचभिः ॥ त्रिंशद्भिः सोम-

---

कर, वैर करूं नकोस; तूं ह्याचे बरोबर युद्ध करूं ह्मणशील, तर शेंकडों वर्षे तूं युद्ध करीत राहिलास तरी तुला हा आटोपणार नाहीं, (७८) ह्या मुलाला कुमार ह्मणतात, हा आपल्या भक्ताला इच्छित वर देणारा आहे. हा प्रभु पार्वतीच्या मनाला संतोष देणारा आहे. ह्याच्याजवळ अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें आहेत. ह्याच्या अंगावर अनेक प्रकारचे अलंकार असल्यानें हा सुशोभित दिसत आहे. मातृगण आणि प्रमथगण ह्याची सेवा करितात. हा पार्वतीचा मुलगा आहे. (७९) असें नारद इंद्रास सांगत आहे तोंच इंद्रानें कार्तिकेयाच्या अंगावर ज्यांतून ठिणग्या निघत आहेत असें आपलें भयंकर दिसणारें वज्र टाकिलें. (८०) पार्वतीच्या मु-लानें ( कार्तिकेयानें ) त्या इंद्राच्या वज्रास कसपटासारखें मानलें, आणि त्यास काडीमात्र न जुमानतां त्यानें एक बाण इंद्राच्या ऐरावतास मारला. तो बाण लागतांच ऐरावत बेशुद्ध होऊन धाडकन जमिनीवर पडला. (८१) पुनः कार्ति-केयानें एक अग्निसारखा तेजस्वी बाण इंद्रावर सोडून इंद्राचें छत्र, ध्वज आणि पताका, तोडून जमिनीवर पाडलीं. (८२) पुनः आणखी एक लखलखीत सूर्या-सारखा तेजस्वी बाण मारून इंद्राचा हात कार्तिकेयानें तोडून टाकिला. आणि पूर्वी शंकरांनीं युद्धांत जशी त्रिपुराची अवस्था केली होती, तशीच ह्यावेळीं कार्तिकेयानें इंद्राची केली. (८३) कार्तिकेयानें आणखी एक बाण इंद्रास मारला व एक तीक्ष्ण धारेचा बाण मारून इंद्राच्या डोकीवरील मुकुट फोडून टाकिला. (८४) कार्तिकेयानें लागलेच यमास पांच बाण मारलें, निर्ऋतीस दहा बाण मारले आणि वरुणास पंधरा बाण मारून घाबरवून सोडलें. (८५) वीस बाण वायुदे-

राजं च ताडयित्वा रणे पुनः ॥ शक्रं पंचाधिकैराशु शतैश्च प्राणहारिभिः ॥८५॥ अन्यानपि सुरान् स्कंदस्त्रिंशद्भिः पंचभिः शरैः ॥ भूयो नादं प्रमुंचंस्तं शक्रं दुद्राव शंभुजः ॥८६॥ वसुभिश्च तथादित्यैर्मरुद्भिश्च महाबलैः ॥ वृतः शतृशतैर्बालः सिंहैः शरभराडिव ॥८७॥ ततस्तानागतान् दृष्ट्वा देवांश्छंकरपुत्रकः ॥ केसरीव मृगान् क्षुद्रान् दुद्राव च दिवौकसः ॥८८॥ पुनः क्रुद्धः सहस्राक्षो वज्रेण तमताडयत् ॥ ताडिते तु ततस्तस्मादुत्पन्नाश्चारुमूर्तयः ॥ त्रिदेवाश्च त्रयो वेदा लोकाश्चाग्निदिवाकराः ॥८९॥ वचश्चेदं सहस्राक्षं बृहद्बुद्धिर्बृहस्पतिः॥ देवमंत्रिर्महाप्राज्ञो भारतीपतिरब्रवीत् ॥९०॥ अलं युद्धेन देवेश महादेवस्य सूनुना ॥ हितं वचश्चोपदेश्यं सहस्राक्ष शृणुष्व तत् ॥९१॥ यदीच्छसि सुखं भोक्तुं कुरुष्व वचनं मम ॥ अनेन सह संप्रीतिं कृत्वा

---

वास मारले, पंधरा बाण सूर्यास मारले आणि युध्दांत चंद्रास तीस बाण मारून पुनः इंद्रांवर प्राण घेऊं शकणारे एकशेपांच बाण सोडले. (८६) दुसऱ्या देवांवरही पसतीस पसतीस बाण सोडून, पुनः सिंहनाद करीत कार्तिकेय इंद्राच्या अंगावर धांवला. (८७) एकटा शरभ जसा अनेक सिंहांबरोबर सारखा झुंजत असतो, तसाच एकटा कार्तिकेय त्या देवांचे मदतीस आलेल्या मोठमोठ्या पराक्रमी वसूंबरोबर आदित्यांबरोबर आणि मरुद्गणांबरोबर युद्ध करीत त्यांचे अंगावर हजारों बाण मारूं लागला. (८८) सर्व देव आपले अंगावर येतात असें पाहतांच निर्बळ अशा हरिणांच्या कळपावर सिंहानें जशी झांप घालावी तसें कार्तिकेयानें त्या देवांच्या अंगांवर धांवून जाऊन त्यांस पळवून लाविलें. (८९) असा कार्तिकेयाचा अलौकिक पराक्रम पाहून इंद्रानें पुनः त्यावर वज्राचा प्रहार केला. तें वज्र कार्तिकेयास लागतांच त्यापासून सुस्वरूप असे तेहतीस कोटि देव, तीन वेद, सात लोक, सात अग्नि, आणि बारा सूर्य उत्पन्न झाले. (९०) असें पाहतांच मोठा बुद्धिमान्, देवांचा प्रधान, व वाणीचा अधिपति असा तो विद्वान् बृहस्पति इंद्रास ह्मणाला–(९१) देवाधिदेवा, सहस्रनेत्रा ( इंद्रा ), ह्या महादेवाच्या मुलाबरोबर ( कार्तिकेया बरोबर ) युद्ध करणें बंद कर. मी तुला हिताची गोष्ट सांगतों ती ऐक. (९२) जर तुला अनायासानें सुख भोगण्यास मिळावें असें वाटत असेल तर माझ्या सांगण्याप्रमाणें कर. तूं ह्या कार्तिकेयाबरोबर युद्ध करण्याच्या भरीस पडूं नकोस. तूं ह्याचे बरोबर सख्य कर. आणि अबाधित रीतीनें

राज्यमकण्टकम् ॥ भुंक्ष्व त्वं निश्चयं कृत्वा दानवांश्च निषूदय ॥९२॥ यस्य वज्राभिघातेन नार्तिस्तस्य प्रजायते ॥ हंतुं च स कथं शक्यः शतपंचैर्भवादृशैः ॥९३॥

सूत उवाच ॥ श्रुत्वा तस्य वचः शक्रस्तदा सुरगुरोर्द्विजाः ॥ तमेव शरणं प्रायात्कुमारं पार्वतीसुतम् ॥९४॥ वृत्तम् ॥ प्रसीद मे त्वं शरणागतस्य पादौ तवाहं शिरसा वहामि ॥ सुराधिपस्त्वं भव शर्वसूनो गृहाण राज्यं मम शंभुकल्प ॥९५॥ एषोऽञ्जलिः पंकजचारुनेत्र कृतोत्तमांगे जहि मन्युमुग्रं ॥ सतां हि कोपः प्रणतेषु नित्यं विनाशमेत्यार्तमनस्सु सिद्धम्॥९६॥अथेंद्रवचनं श्रुत्वा भगवान्षण्मुखस्तदा ॥ अब्रवीत्करुणाविष्टः शक्रं प्रति मुनीश्वराः ॥९७॥

स्कंद उवाच ॥ करोमि किमहं राज्यं भोगैश्च प्राकृतैरलम् ॥ अपर्याप्तं न मे किंचिदस्ति पित्रोः प्रसादतः ॥९८॥ निष्कण्टकं त्वमेवेह

---

राज्याचा उपभोग घेऊन दैत्यांचा पराभव करून त्यांस मारून टाक. (९३) तूं ह्या कार्तिकेयावर प्रत्यक्ष आपलें वज्र टाकिलेंस तरी त्याला कांहीं एक पीडा झाली नाहीं. तुझ्यासारखे पांचशें इंद्र त्याचे बरोबर युद्धास आल्यास तो डगमगेल काय ?

(९४) सूत ह्मणतात—ब्राह्मणहो, असें बृहस्पतींचें हितोपदेशाचें बोलणें ऐकून, कार्तिकेयाबरोबर युद्ध करणें बंद करून इंद्र त्यालाच शरण गेला. (९५) आणि कार्तिकेयास हात जोडून ह्मणाला—हे कार्तिकेया, मी तुला शरण आलों आहें, मी तुझे दोन्ही पाय आपल्या मस्तकावर घेतों. तूं मला प्रसन्न हो. हे शिवपुत्रा, तूंच सर्व देवांचा अधिपति हो, माझें राज्य मी तुला देतों, त्याचा तूं स्वीकार कर. तूं आह्मांला शिवासारखाच मान्य आहेस. (९६) हे पहा, मी आपले दोन्ही हात जोडून आपल्या मस्तकास लाविले मीं तुझा अपराध केल्यामुळें तूं मजवर रागावला असशील तर तो राग सोडून दे. ज्यांच्या अपराधामुळें राग आलेला असतो ते अपराधी त्यास शरण आले ह्मणजे सज्जन लोकांचा राग नाहींसा होतो; ही गोष्ट तर प्रसिद्धच आहे. (९७) हे मुनीश्वरहो, असें इंद्राचें नम्रतेचें बोलणें ऐकून कार्तिकेयाच्या मनांत इंद्राविषयीं दया येऊन तो इंद्रास ह्मणाला—

(९८) कार्तिकेय ह्मणाला—इंद्रा, मला तुझें राज्य घेऊन काय करावयाचें आहे ? मला हे सामान्य लोकांचे विषयोपभोग मुळींच नकोत. मला माझ्या आईबापांच्या कृपेनें कांहींच कमी नाहीं. (९९) हे इंद्राणीपते, तूंच स्वतः स्वर्ग-

राज्यं कुरु शचीपते ॥ एवं स्कंदवचः श्रुत्वा पुनः प्राह शचीपतिः ॥९९॥ भगवन्नापरः कश्चिद्देवानां विद्यते बली ॥ तस्मात्कुरु त्वमेवेह राज्यमीश्वरनंदन ॥१००॥ क्व बालः क्व च संग्रामः क्व नीतिः क्व पराक्रमः ॥ क्व ज्ञानमतुलं देव क्व मतिः क्व च साम्यता ॥१०१॥ क्व दया क्व च दाक्षिण्यं क्व क्षांतिः क्व प्रसादता ॥ आहुस्त्वमेव राज्यस्य गुणैरेभिरुदीरितैः ॥१०२॥ स्वरूपस्थैर्गुणैस्त्वं हि वंदिभिश्चारणैस्तथा ॥ विद्याधरैश्च यक्षैश्च विविधैर्गणकोटिभिः ॥ ह्वयमानोऽमरैः सिद्धैर्गन्धर्वाप्सरसां गणैः ॥१०३॥ अहं सेनापतिर्देव भवामि भवनंदन ॥ निश्चलोपलवत्कृत्स्नं त्रैलोक्यं भुंक्ष्व षण्मुख॥१०४॥सर्वगः सर्वपूज्यस्त्वं यथा देवो महेश्वरः ॥ एवं शक्रवचः श्रुत्वा पुनः प्राहांबिकासुतः ॥१०५॥

स्कंद उवाच॥अभयं शक्र मा भैषीः कुरु राज्यमकंटकम् ॥ इंद्रस्त्वं

---

लोकाचें निष्कंटकराज्य कर. असें कार्तिकेयाचें बोलणें ऐकून इंद्र ह्मणाला. (१००) परमेश्वरा कार्तिकेया, तुजपेक्षां देवांत कोणी जास्त बलवान् नाहीं. ह्यासाठीं तूंच ह्या स्वर्गलोकाचें राज्य कर. तूं प्रत्यक्ष परमेश्वराचा मुलगा आहेस. (१०१) तूं लहान मुलगा कोणीकडे, हें युद्ध कोणीकडे, तुझी नीति कोणीकडे, तुझा पराक्रम कोणीकडे, तुझें अलौकिक ज्ञान कोणीकडे, परमेश्वरा, तुझी बुद्धि कोणीकडे, (१०२) तुझी दया कोणीकडे, तुझा चतुरपणा कोणीकडे, तुझा शांत स्वभाव कोणीकडे, व तुझी कृपा कोणीकडे; तुझे सर्व गुण अलौकिक आहेत, तुझी बरोबरी कोण करूं शकेल ? हे वर सांगितलेले सर्व गुण तुझ्या अंगीं परिपूर्ण असल्यामुळें तूंच ह्या स्वर्गाच्या राज्याचा अधिकारी होण्यास योग्य आहेस; असें सर्व लोक मानतात. (१०३) तुझें अलौकिक सौंदर्य आणि तुझ्या आंगचे अलौकिक गुण ह्यांची हे स्तुतिपाठक लोक, हे चारणलोक, हे विद्याधर लोक, हे यक्षलोक आणि हे अनेक कोट्यावधि शिवगण प्रशंसा करितात. तुला देव, सिध्द, गंधर्व आणि देवांगना स्वर्गाचा अधिपति होण्यास बोलावीत आहेत. त्यांची विनंति तूं मान्य कर. (१०४) हे शिवपुत्रा कार्तिकेया, मी तुझा सेनापति होतों. तूं कांहींएक दगदग न करितां सुखानें पडून सर्व स्वर्गलोकाचे राज्याचा उपभोग घे. (१०५) तुला पाहिजे तेव्हां पाहिजे तेथें जाण्याची शक्ति आहे, जसा श्रीशिव सर्व लोकांस पूज्य आहे तसा तूं सर्व लोकांस पूज्य आहेस. असें इंद्राचें बोलणें ऐकून पुनः पार्वतीपुत्र ( कार्तिकेय ) इंद्रास ह्मणाला—

(१०६) कार्तिकेय ह्मणाला— इंद्रा माझें तुला अभय आहे, तूं भिऊं नकोस,

देवराजस्त्वं त्वमेव जगतः प्रभुः ॥१०६॥ दर्पगर्वबलोदीर्णा दानवा ये
च तांस्तदा ॥ तैः पराजीयसेऽत्यर्थं सूदयेऽहं त्वया स्मृतः ॥१०७॥
अलं चातिप्रसंगेन गदितेन पुनः पुनः ॥ निश्चयेन सखाऽहं ते भवा-
म्यसुरसूदन ॥१०८॥ अथोवाच महादेवपुत्रं संवीक्ष्य निस्पृहम् ॥ नेष्टं
त्वया यदींद्रत्वं भव सेनापतिर्गुह ॥ एवमस्त्विति तं प्राह कार्तिकेयः
शचीपतिं ॥१०९॥ ततः सर्वैः सुरैर्विप्रा आदेशात्परमेष्ठिनः ॥ अभिषि-
क्तोऽथ विधिवत्सैनापत्ये तदा गुहः ॥११०॥ यावद्दत्तं कुमाराय सैना-
पत्यं हराज्ञया ॥ हंतुमभ्यागतस्तूर्णं कुमारं तारकस्तदा ॥१११॥ आगतं
तं तथा वीक्ष्य लीलया पार्वतीसुतः ॥ ददाहाशु महादैत्यं तूलं वन्हि-
रिवाहवे॥११२॥दग्ध्वा तु तारकं घोरं पतंगमिव पावकः॥ततः प्रीत-
मनाः स्कंदो मातुरंक उपाविशत्॥११३॥महादेवोऽपि भगवान्ब्रह्मादीन्

---

तूं अबाधितपणानें स्वर्गाचें राज्य कर. इंद्रा, तूंच देवांचा राजा आहेस, तूंच त्रैलोक्याचा अधिपति आहेस. (१०७) गर्वानें आणि शक्तीनें कोणी दैत्य उन्मत्त होऊन तुला आणि त्रैलोक्याला त्रास देऊं लागतील तेव्हां तूं माझें स्मरण कर. ह्मणजे मी त्यांस तत्काळ ठार मारीन. (१०८) आतां वरचेवर तेंच तें बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं, मी तुला खचित सांगतों कीं, आजपासून मी तुझा मित्र आहे. तूं माझ्या सहाय्यानें दैत्यांचा नाश कर. (१०९) मग इंद्र त्या निरिच्छ स्वभावाच्या कार्तिकेयाकडे पाहून ह्मणाला— कार्तिकेया, तुला स्वर्गाचा अधिपति व्हावयाचें नसेल तर सेनापति तरी हो, असें इंद्रानें ह्मटल्यावर तें इंद्राचें ह्मणणें कार्तिकेयानें बरें आहे असें ह्मणून मान्य केलें. (११०) मग ब्राह्मणहो, सर्व देवांनीं मिळून ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें यथाविधीनें अभिषेक करून देवसेनेच्या सेनापतीच्या अधिकारावर कार्तिकेयाची स्थापना केली. (१११) शिवाच्या आज्ञेप्रमाणें सर्व देवांनीं मिळून कार्तिकेयास सेनापतीचा अधिकार दिला न दिला तोंच हें वर्तमान तारकास समजलें. व तो लागलाच कार्तिकेयास मारण्याच्या उद्देशानें कार्तिकेयावर धांवून आला. (११२) तारकासुर आपणावर धांवून आलेला पाहून कापसाच्या ढिगास जसा विस्तव जाळून टाकितो, तसें त्या दैत्यास कार्तिकेयानें मारून टाकिलें. (११३) अग्नि जसा टोळास जाळून टाकितो तसेंच कार्तिकेयानें तारकासुरास मारल्यावर कार्तिकेयास मोठा आनंद वाटला व तशाच आनंदानें तो पार्वतीच्या जवळ गेला व पार्वतीच्या मांडीवर बसला. (११४) परमे-

विष्णुना सह ॥ विसृज्य गणपैः सार्धं क्षणादंतर्हितोऽभवत् ॥११४॥

इति श्रीनीलकंठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने स्कंदोत्पत्तितारकवधो नाम एकविंशोऽध्यायः ॥

---

श्वर महादेवही श्रीविष्णुसहित ब्रह्मदेव वगैरे मुख्य मुख्य देवांस आपापल्या स्थळास जाण्याची आज्ञा देऊन आपल्या सर्व प्रमथ गणांसहित तत्काळ गुप्त झाले.

ह्याप्रमाणें श्रीनीलकण्ठनागनाथ नांवाच्या विद्वद्वर्यानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्य कथनांपैकीं स्कंदोत्पत्ति आणि तारकाचा वध नांवाचा हा एकविसावा अध्याय संपला.



## ॥ अथ द्वाविंशोऽध्यायः प्रारंभः॥

श्रीशिवाय नमः ॥ लैंग्ये ॥ ऋषय ऊचुः ॥ मयस्य तपसा पूर्वं सुदुर्गं निर्मितं पुरम् ॥ हैरण्यं राजतं दिव्यमयस्मयमनुत्तमम् ॥१॥ सुदुर्गं देवदेवेन दग्धमित्येव वै श्रुतम् ॥ कथं ददाह भगवान्भगनेत्रनिपातनः ॥२॥ पुरस्य संभवः सर्वो वरलाभः पुरा श्रुतः ॥ इदानीं दहनं सर्वं वक्तुमर्हसि सुव्रत ॥३॥ तेषां तद्वचनं श्रुत्वा सूतः पौराणिकोत्तमः ॥ यथा श्रुतं तथा प्राह व्यासाद्विश्वार्थसूचनात् ॥४॥

सूत उवाच ॥ निहते तारके दैत्ये तारपुत्रे सबांधवे ॥ स्कंदेन चाप्रयत्नेन तस्य पुत्राः पलायिताः॥५॥ विद्युन्माली तारकाक्षः कमलाक्षश्च वीर्यवान् ॥ तपस्तेपुर्महात्मानो महाबलपराक्रमाः ॥६॥ तप उग्रं समास्थाय प्रदेशे परमे स्थिताः ॥ तपसा कर्षयामासुर्देहान्स्वान्दानवो-

---

श्रीशिवास नमस्कार असो. लिंगपुराणांत पुढील कथाभाग आहे. (१) ऋषि ह्मणतात— पूर्वीं मयासुराच्या तपश्चर्येनें बळकट तीन किल्ले उत्पन्न झाले त्यांतील एक सोन्याचा एक रुप्याचा आणि एक लोखंडाचा होता. (२) हे तीनही किल्ले अतिशय बळकट होते तरी ते देवाधिदेव श्रीशंकरानें जाळून टाकिले असें आह्मी ऐकिलें ते किल्ले परमात्मा सूर्याचे डोळे उपडून काढणाऱ्या श्रीशिवानें कसें जाळलें? (३) ते किल्ले पूर्वीं निर्माण कसे झाले? त्या मयासुरास ब्रह्मदेवाचा वर कसा मिळाला? वगैरे सर्व कथाभाग आह्मीं पूर्वीं ऐकिला आहे. आतां ते किल्ले जळून कसे गेले हा कथाभाग ऐकण्याची आमची इच्छा आहे तर तो कथाभाग तूं आह्मांस सांग, (४) असें ऋषींचें बोलणें ऐकून उत्तम पुराण सांगणारा सूत, त्रैलोक्याचें यथार्थज्ञान असणाऱ्या श्रीव्यासापासून त्यानें हा कथाभाग जसा ऐकिला होता, तसाच सांगूं लागला—

(५) सूत ह्मणाला— कार्तिकेयानें तारदैत्याचा मुलगा तारकासुर यास त्याच्या भाऊबंदासुद्धां मारून टाकिलें त्यावेळीं तारकासुराचे तीन मुलगे पळून गेले, (६) त्यांचीं नांवें १ विद्युन्माली २ तारकाक्ष आणि ३ कमलाक्ष अशीं होतीं. ते मोठे धैर्यवान्, बलवान् आणि पराक्रमी होते, ते तेथून पळून गेल्यावर तपश्चर्या करूं लागले (७) ते एका पुण्यकारक क्षेत्रांत जाऊन राहिले, आणि त्या दैत्यश्रेष्ठांनीं आपलीं शरीरें झिजवून खडतर तपश्चर्या केली. तेव्हां त्यांच्या तपश्चर्येमुळें ब्रह्मदेव

त्तमाः ॥ तेषां पितामहः प्रीतो वरदः प्रददौ वरम् ॥७॥ अवध्यत्वं च सर्वेषां सर्वभूतेषु सर्वदा ॥ सहिता वरयामासुस्सर्वे लोकपितामहम् ॥८॥ तानब्रवीत्ततो देवो लोकानां प्रभुरव्ययः ॥ नास्ति सर्वामरत्वं वै निवर्तध्वमथासुराः ॥ अन्यं वरं वृणीध्वं वै यादृशं संप्ररोचते ॥९॥ ततस्तु सहिता दैत्यास्संप्रधार्य परस्परम् ॥ ब्रह्माणमब्रुवन्दैत्याः प्रणिपत्य जगद्गुरुं ॥१०॥ वयं पुराणि त्रीण्येव समास्थाय महीमिमां ॥ विचरिष्यामो देवेश त्वत्प्रसादाज्जगद्गुरो ॥११॥ तथा वर्षसहस्रेषु समेष्यामः परस्परम् ॥ एकीभावं गमिष्यंति पुराण्येतानि चानघ ॥१२॥ यथासमानि चैतानि यो हन्याद्भगवंस्तदा ॥ एकेनैवेषुणा देव स नो मृत्युर्भविष्यति ॥१३॥ एवमस्त्विति तान्देवः प्रत्युक्त्वा प्राविशद्दिवम् ॥ ततो मयः स्वतपसा चक्रे त्रीणि पुराण्यथ ॥१४॥ कांचनं दिवि त

---

प्रसन्न झाला. आणि त्यांस वर देण्यास त्यांचे जवळ आला. (८) ब्रह्मदेव आपणांस प्रसन्न होऊन वरदान देण्यास आलेला पाहून ते सर्वजण मिळून त्या ब्रह्मदेवास ह्मणाले कीं, आह्मांस कोणत्याही प्राण्यापासून मरण नसावें असा वर दे. (९) असें त्या तिघां दैत्यांचें बोलणें ऐकून ब्रह्मदेव ह्मणाला— दैत्यहो, कोणापासूनच मरण नसावें असा अमरपणाचा अधिकार कोणालाच नाहीं ( ह्या जगांत अमर कोणीच नाहीं ). प्रत्यक्ष मला देखील मरण आहे, मग मी दुसऱ्यांस अमर कसें करणार? ह्यासाठीं हा दुराग्रह सोडून द्या. आणि ह्याखेरीज दुसरा कोणताही तुमच्या मर्जीस येईल तो वर मागा, मी देण्यास तयार आहें (१०) नंतर त्या तिघां दैत्यांनीं एकमेकांत अगोदर कोणता वर मागावा ह्याचा विचार केला; आणि मग ते तिघेजण त्या त्रैलोक्यपति ब्रह्मदेवांस नमस्कार करून ह्मणाले. (११) त्रैलोक्यपते ब्रह्मदेवा, आह्मांला अशीं तीन नगरें तयार करून दे कीं, त्यांचे सभोंवतीं मजबूत तटबंदी असावी. आणि तीं तीन नगरें आह्मी बरोबर घेऊन ह्या पृथ्वीवर तुझ्या कृपेनें पाहिजे तिकडे हिंडूं. (१२) आणि अशा रीतीनें फिरत असतां एक हजार वर्षांनीं आह्मी आपापलीं नगरें घेऊन एके ठिकाणीं येऊं. (१३) अशा वेळीं जो कोणी शक्तिमान मनुष्य आपल्या एका बाणानें तिन्ही नगरें एकदम मोडून टाकील, त्याचे हातून आह्मांस मरण यावें (१४) बरें आहे, तुमच्या ह्मणण्याप्रमाणेंच होईल, असा ब्रह्मदेवांनीं त्या तिघा दैत्यांस वर देऊन ते स्वर्गलोकांस निघून गेले. मग मयासुरानें आपल्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें तीन नगरें उत्पन्न केलीं. (१५) त्या तीन नगरांपैकीं सोन्याचें नगर स्वर्गलोकांत होतें,

त्रासीदन्तरिक्षे च राजतम् ॥ आयसं चाभवद्भूमौ पुरं तेषां महात्मनां ॥ एकैकं योजनशतं विस्तारायामतः शुभम् ॥१५॥ कांचनं तारकाक्षस्य कमलाक्षस्य राजतम् ॥ विद्युन्मालेश्चायसं तु त्रिविधं दुर्गमुत्तमम् ॥१६॥ मयश्च तत्र बलवान् दैत्यदानवपूजितः ॥ हैरण्ये राजते चैव कृष्णायसमये तथा ॥आलयं चात्मनः कृत्वा तत्रास्ते बलवांस्तदा ॥१७॥ एवं बभूवुर्दैत्यानामिति दुर्गाणि सुव्रताः ॥ पुराणि त्रीणि विप्रेंद्रास्त्रैलोक्यमिव चापरम् ॥१८॥ पुरत्रयं तदा जाते सर्वे दैत्या जगत्त्रये ॥ पुरत्रयं प्रविश्यैव बभूवुस्ते बलाधिकाः ॥१९॥ कल्पद्रुमसमाकीर्णं गजवाजिसमाकुलम् ॥ नानाप्रासादसंकीर्णं मणिजालैस्समावृतम् ॥२०॥ सूर्यमण्डलसंकाशैर्विमानैर्विश्वतोमुखैः ॥ शोभितं त्रिपुरं तेषां पृथक् पृथगनुत्तमैः ॥२१॥ दिव्यस्त्रीभिः सुसंपूर्णं गंधर्वैः सिद्धचारणैः॥ वापीकूपतटाकैश्च दीर्घिकाभिश्च

---

रुप्याचें नगर आकाशमार्गांत होतें, आणि महापराक्रमी दैत्यांचें तिसरें नगर जमिनीवर होतें, एकेक नगर चारशें कोस लांब आणि चारशें कोश रुंद इतकें मोठें होतें. (१६) त्यांतील सोन्याचें नगर तारकाक्षाचें असून रुप्याचें नगर कमलाक्षाचें होतें; आणि विद्युन्मालीचें नगर लोखंडाचें होतें. त्या प्रत्येक नगरासभोंवतीं त्या त्या धातूचा मजबूत कोट होता.(१७) असो अशा रीतीचीं सोन्याचें, रुप्याचें, लोखंडाचें अशीं तीन नगरें तयार करून तो बलवान् मयासुर त्या तिन्हीही नगरांत आपलें घर करून सुखानें राहत होता. (१८) हे सदाचारी ब्राह्मणहो, हीं तीन नगरें ह्मणजे सर्व दैत्यांस, मजबूत असे तीन किल्लेच मिळाले; आणि तीं तीन नगरें स्वर्ग मृत्यु पाताल ह्या तीन लोकांसारखीं शोभत होतीं. (१९) हीं तीन नगरें तयार झाल्यावर त्रैलोक्यांतील सर्व दैत्य त्या तीन नगरांत जाऊन राहिले. आणि त्यामुळें ते सर्व त्रैलोक्यास अजिंक्य झाले. (२०) त्या त्रिपुरांत ( तीन नगरांत ) जागोजाग कल्पवृक्षाचीं झाडें होतीं, हत्ती आणि घोडे तेथें पुष्कळ होते, मोठमोठे वाडे तेथें पुष्कळ असून जिकडे तिकडे रत्नें चमकत होतीं. (२१) सूर्यमंडलासारखीं सुशोभित दिसणारीं विमानें तेथें वेगवेगळ्या ठिकाणीं ठेविलेलीं होतीं; त्यांस चोहोंकडे तोंडें असून तीं त्रिपुरांस शोभवीत होतीं. (२२) त्या नगरांत सुस्वरूप अशा अनेक बायका होत्या; गंधर्व, सिद्ध आणि चारण तेथें राहत होते, तेथें आंत उतरण्यास पायऱ्या असलेल्या विहिरी, आड, सरोवरें, आणि आंत

सर्वशः ॥२२॥ मत्तमातंगयूथैश्च तुरंगैश्च सुशोभनैः ॥ रथैश्च विविधाकारैर्विमानैर्विश्वतोमुखैः ॥२३॥ सभाप्रपादिभिश्चैव क्रीडास्थानैः पृथक् पृथक् ॥ व्यूढोरस्कैर्वृषस्कन्धैः सर्वायुधधरैस्तदा ॥२४॥ सर्वथा क्षुभितैश्चैव दावाग्निसदृशेक्षणैः ॥ प्रशान्तैः कुपितैश्चैव कुब्जैर्वामनकैस्तथा ॥२५॥ नीलोत्पलदलप्रख्यैर्नीलकुंचितमूर्धजैः ॥ नीलाद्रिमेरुसंकाशैर्नीरदोपमनिःस्वनैः ॥२६॥ मयेन रक्षितैः सर्वैः शिक्षितैर्युद्धलालसैः ॥ अधृष्यैर्मनसाप्यन्यैर्मयस्येव च मायया ॥२७॥ वृत्तम् ॥ अथ समररतैस्सदा समंतादजपदपूजनया सुलब्धवीर्यैः ॥ रविमरुद-

---

उतरण्यास पायऱ्या नसलेल्या विहिरी पुष्कळ आणि जागोजाग होत्या. (२३) अतिशय उन्मत्त झाल्यामुळें गंडस्थलांतून मदाच्या धारा वाहणारे हत्ती, आणि अतिशय देखणे व जलद चालणारे घोडे पुष्कळ होते; अनेक प्रकारचे चित्रविचित्र रथ आणि विमानें तेथें पुष्कळ होतीं; त्या विमानांस चोहोंकडून तोंडें होतीं. (२४) जागोजाग दिवाणखाने आणि पाणपोया होत्या, आणि थोड्या थोड्या अंतरावर क्रीडास्थानें होतीं. तेथें अनेक पराक्रमी वीर रहात होते, त्या लोकांची छाती रुंद होती, आणि खवाटे बैलांच्या वशिंडासारखे लठ्ठ होते, व त्यांच्याजवळ सर्व प्रकारचीं शस्त्रास्त्रें होतीं. (२५) ते जर एखादे वेळेस रागावले तर त्यांचें डोळे प्रळयाग्नीसारखे लालभडक होत, तसेंच तेथें शांत स्वभावाचे आणि रागीट स्वभावाचेही लोक होते, कोणी कुबडे आणि कोणी ठेंगणे असे लोक तेथें होते. (२६) कितीएक लोक निळ्या कमळाच्या पानांसारखे दिसत असत; त्यांचे मस्तकांवरील केश निळ्या रंगाचे असून कुरळे होते. कितीएकजण नीलपर्वताएवढे आणि मेरुपर्वता एवढाले धिप्पाड होते त्यांचा आवाज मेघगर्जनेसारखा होता. (२७) त्या सर्वांचें मयासुर रक्षण करीत असून त्यांस शिक्षणही मयासुरानें च स्वतः दिलें असल्यामुळें, ते युद्ध करण्यास नेहमीं सिद्ध होते; ते युध्दाच्या कामांत कधींही माघार घेत नसत. मयासुराच्या शिक्षणामुळें त्यांच्या अंगांत इतकी कांहीं अलौकिक शक्ति आली होती कीं, त्यांच्याकडे नुसतें डोळे उघडून पाहण्याचा विचार देखील त्यांच्या शत्रूंच्या मनांत कधीं येत नसे. (२८) त्या त्रिपुरांतील दैत्य युध्दाच्या कामांत फार प्रवीण होते. ते नेहमीं एकनिष्ठपणानें शिवपूजा करीत होते त्यामुळें त्यांचे अंगीं अलौकिक सामर्थ्य आलें होतें. सूर्य इतर प्रमुख प्रमुख देव आणि इंद्र ह्यांसारखे ते तेजस्वी होते. देवांची खोड

मरेंद्रसन्निकाशैः सुरमथनैः सुदृढैः सुसेवितं तत् ॥२८॥ सेंद्रा देवा द्विजश्रेष्ठा द्रुमा दावाग्निना इव ॥ पुरत्रयाग्निना दग्धा ह्यभवन्दैत्यवैभवात् ॥२९॥ अथैवं ते तथा दग्धा देवा देवेश्वरं हरिं॥ अभिवंद्य तदा प्राहुस्तमप्रतिमवर्चसम् ॥३०॥ सोऽपि नारायणः श्रीमांश्चिंतयामास चेतसा॥ किं कार्यं देवकार्येषु भगवानिति स प्रभुः ॥३१॥ कृतार्थं इति देवेशो देवैः सार्धमुमापतिं। तपसा प्राप्य देवेशं तुष्टाव पुरुषोत्तमः॥३२

विष्णुरुवाच ॥ महेश्वराय देवाय नमस्ते परमात्मने ॥ नारायणाय शर्वाय ब्रह्मणे ब्रह्मरूपिणे ॥३३॥ एवं स्तुत्वा महादेवं दण्डवत्प्रणिपत्य च ॥ जजाप रुद्रं भगवान् कोटिवारं जले स्थितः ॥ देवाश्च सर्वे देवेशं तुष्टुवुः परमेश्वरम् ॥३४॥

देवा ऊचुः॥ नमस्सर्वात्मने तुभ्यं शंकरायार्तिहारिणे ॥ रुद्राय नील-

---

मोडण्यापुरती त्यांच्या अंगांत शक्ति होती. (२९) हे ब्राह्मणहो, त्या तीन नगरांत राहण्यास आश्रय मिळाल्यामुळें दैत्य लोक फारच प्रबळ झाले. त्यामुळें वणव्यानें ज्याप्रमाणें झाडें जळावीं त्याप्रमाणें त्रिपुरांचा आश्रय करणाऱ्या दैत्यामुळें देवांस दुःखें भोगावीं लागलीं. (३०) मग ते त्रासलेले देव सर्व देवांचा मुख्य देव आणि अलौकिक सामर्थ्य अंगीं असणारा असा जो श्रीविष्णु त्याकडे गेले, आणि त्यास नमस्कार करून ह्मणूं लागले. (३१) त्यावेळीं परमात्मा नारायण देखील काय केलें असतां देवांचें दुःख कमी होईल, ह्याचा मनांत विचार करूं लागला. (३२) मग त्याला विचार सुचला कीं, ह्याकामीं शंकराचें साह्य मिळण्यास शिवाची आराधना केली पाहिजे. असा विचार सुचतांच आपण कृतार्थ झालों असें विष्णूस वाटलें. नंतर त्या श्रीविष्णूनें सर्व देवांसहित शंकराची आराधना करण्याचा विचार केला व ते शिवाजवळ जाऊन शिवाची स्तुति करूं लागले—

(३३) विष्णु ह्मणाले— हे परमेश्वरा, तूं सर्व देवांचा देव आहेस. तूं परमात्मा आहेस, तुला नारायण ह्मणतात, शर्व ह्मणतात, ब्रह्मदेव ह्मणतात, तूं ब्रह्मस्वरूप आहेस. (३४) विष्णूंनीं अशी महादेवाची स्तुति करून महादेवापुढें साष्टांग नमस्कार घातला, व पाण्यांत उभें राहून एक कोटि वेळ त्यांनीं रुद्रमंत्राचा जप केला. सर्व देवही श्रीविष्णूप्रमाणेंच शिवाची स्तुति करूं लागले—

(३५) देव ह्मणाले—हे परमेश्वरा, तूं सर्वान्तर्यामी आहेस, तूं लोकांचें कल्याण करणारा आहे. तूं लोकांचीं दुःखें दूर करितोस. तुला रुद्र ह्मणतात, नीलरुद्र

रुद्राय कद्रुदाय प्रचेतसे ॥३५॥ गतिर्नः सर्वदास्माभिर्वंद्यो देवारिसूदनः ॥ त्वमनादिस्त्वमादिस्त्वमनंतश्चाक्षयः प्रभुः ॥३६॥ प्रकृतिः पुरुषः साक्षात्स्रष्टा हर्ता जगद्गुरो ॥ वरदो वाङ्मयो वाच्यो वाच्यवाचकवर्जितः ॥३७॥ वाच्यो मुक्त्यर्थमीशानो योगिभिर्योगवित्तमैः ॥ हृत्पुण्डरीकसुषिरे योगिनां संस्थितः सदा ॥३८॥ वदंति सूरयः संतं परब्रह्मस्वरूपिणम् ॥ भवन्तं तत्वमित्याद्यं तेजोराशिं परात्परम् ॥३९॥ परमात्मानमित्याहुरस्मिन्जगति यत्प्रभो ॥ दृष्टं श्रुतं स्थितं सर्वं जायमानं जगद्गुरो ॥ अणोरल्पतरं प्राहुर्महतोऽपि महत्तरम् ॥४०॥ सर्वतः पाणिपादं त्वां सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ॥ महादेवमनिर्देश्यं सर्वज्ञं त्वामनामयम् ॥४१॥ विश्वरूपं विरूपाक्षं सदाशिवमनुत्तमम् ॥ कोटिभा-

---

ह्मणतात, कद्रुद्र ह्मणतात, आणि प्रचेता ह्मणतात. त्या तुला नमस्कार असो. (३६) हे परमेश्वरा, तूंच सर्वथैव आमचा रक्षक आहेस, तूं आह्मांस वंद्य (नमस्कार करण्यास योग्य) आहेस, तूं देवांशीं द्वेषभावानें वागणाऱ्या दैत्यांचा नाश करितोस, तुला जन्म नाहीं, तूं सर्व त्रैलोक्याच्या आधींपासून आहेस, तुला मरण नाहीं, तुला क्षय नाहीं, तूं समर्थ आहेस, तुला नमस्कार असो. (३७) हे त्रैलोक्याधिपते, प्रकृतिही तूंच आहेस, पुरुषही तूंच आहेस, तूं प्रत्यक्ष ब्रह्मदेव आहेस, तूंच जगाचा संहार करितोस. तूं वर देणारा आहेस, तूं वाङ्मय (वाक्स्वरूप) आहेस. तूं वाच्य (वर्णन करितां येण्यासारखा) आहेस, तूं वाच्यवाचकाव्यतिरिक्त आहेस, (तूं वाच्य नाहींस व वाचकही नाहींस). (३८) योगशास्त्र जाणणारे योगीश्वर लोक तुला मोक्षसाधनाचें मूळ असें मानतात. तूं ईशान आहेस, तूं नेहमीं योगीश्वराच्या हृदयकमलाच्या मध्यभागीं राहतोस. (३९) तूं परब्रह्मस्वरूप आहेस, विद्वान् लोक तूं आद्यतत्व (मुख्यतत्व) आहेस असें मानतात, तूं सज्जन आहेस. तूं अतिशय तेजस्वी आहेस, आणि तूं श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहेस. (४०) प्रभो, तुला ह्या जगांत सर्व लोक परमात्मा असें ह्मणतात. हें त्रैलोक्यपते ईश्वरा, आह्मी जें जें ऐकिलें, व जें जें पाहिलें, व पृथ्वीमध्यें जें जें कांहीं होत आहे, तें तें सर्व तुझेंच स्वरूप आहे. तूं अतिशय लहान पदार्थाहूनही लहान आहेस. आणि अतिशय मोठ्या पदार्थाहून मोठा आहेस. (४१) तुला चोहोंकडे पाय व हात आहेत. तुला चोहोंकडे डोळे मस्तकें आणि तोंडें आहेत. तुला महादेव ह्मणतात. तुझें स्वरूप अमुक प्रकारचें आहे असें सांगतां येत नाहीं. तूं सर्वज्ञ आहेस, तुला कोणत्याही प्रकारचा रोग नाहीं. (४२) तूं विश्वस्वरूप

स्करसंकाशं कोटिशीतांशुसन्निभम् ॥४२॥ कोटिकालाग्निसंकाशं षड्विंशकमनीश्वरम् ॥ प्रवर्तकं जगत्यस्मिन्प्रकृतेः प्रपितामहम् ॥४३॥ वदंति वरदं देवं सर्वा वाचः स्वयंभुवः ॥ श्रुतयः श्रुतिसारं त्वां श्रुतिसारविदश्च ये ॥४४॥ वृत्तम् ॥ अदृष्टमस्माभिरनेकमूर्ते विनिर्मितं यद्भवता त्रिलोके ॥ त्वमेव दैत्यासुरभूसुराश्च देवा नराः स्थावरजंगमाश्च ॥४५॥ पाहि नान्या गतिः शंभो विनिहत्यासुरान् क्षणात् ॥ मायया मोहिताः सर्वे भवतः परमेश्वर ॥४६॥ वृत्तम् ॥ यथा तरंगाः शफरीसमूहाद्युध्यन्ति चान्योन्यमपांनिधौ तु ॥ जडास्त्वया देव जडीकृताश्च सुरासुरास्त्वय्यगजेश शर्व ॥४७॥ स्तुतस्त्वेवं सुरेंद्राद्यैर्विष्णोर्जप्येन चेश्वरः ॥ सोमश्चोमामथालिंग्य नंदिदत्तकरः स्मयन् ॥ प्राह गंभीरया वाचा देवानालोक्य शंकरः ॥४८॥

---

आहेस, तुला विरूपाक्ष ह्मणतात, तुला सदाशिव ह्मणतात, तूं सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेस. कोटि सूर्यांसारखें तुझें तेज आहे. तसाच तूं कोटि चंद्रांसारखा शांत आहेस. (४३) तूं कोटि प्रलयाग्नीसारखा प्रखर आहेस. तूं सव्वीस तत्वस्वरूप आहेस. तुला कोणी ईश्वर नाहीं, तूंच सर्वांचा ईश्वर आहेस. जगामध्यें ज्या कांहीं गोष्टी घडत आहेत त्या सर्वांचा तूंच प्रवर्तक आहेस. तूं प्रकृतीचा आजा आहेस. (४४) ब्रह्मदेवाच्या सर्व वाणी, तूं वर देणारा परमेश्वर आहेस, असें ह्मणतात. वेदाचा तात्पयार्थ जाणणारे ज्ञाते लोक, तूं वेदाचा तात्पर्यार्थ आहेस, असें ह्मणतात.(४५) हे परमेश्वरा, तुझीं अनेक स्वरूपें आहेत. तीं त्रैलोक्यांत कोठें कोठें आणि कशीं कशीं आहेत हें आह्मीं पाहिलेंही नाहीं. दैत्य, देव, ब्राह्मण हे सर्व तूंच आहेस, देव मनुष्य, व स्थावर जंगम जितके प्राणी आहेत तितके सर्व, तुझींच स्वरूपें आहेत. (४६) हे परमेश्वरा, तूं आमचें रक्षण कर. तुजखेरीज आमचें रक्षण करणारा दुसरा कोणी नाहीं. तूं अगोदर ह्या दैत्यांस मारून आमचें रक्षण कर. हे परमेश्वरा, आह्मी सर्वजण तुझ्या मायेनें भुलून गेलों आहों (अज्ञान झालों आहों). (४७) ज्याप्रमाणें समुद्रांत उसळणाऱ्या लाटांबरोबरच सुसरी टकरा मारितात, त्याप्रमाणें ईश्वरा, तुझ्या मायेमुळें अज्ञान दशा पावलेले हे देव दैत्य आपआपसांत भांडत आहेत. तूं पार्वतीचा पति असून तुला शर्व ह्मणतात. तूं आमचें सर्व दुःखांपासून रक्षण कर. (४८) अशी सर्व देवांची स्तुति ऐकून शंकर प्रकट झाले, आणि पार्वतीस बरोबर घेऊन व नंदिकेश्वराच्या खांद्यावर हात ठेवून हंसत हंसत सर्व देवांकडे पाहून त्यांस गंभीरस्वरानें ह्मणाले.

शिव उवाच ॥ ज्ञातं मयेदमधुना देवकार्यं सुरेश्वराः ॥ पुरत्रयविनाशाय करिष्येऽहमिहोद्यमम् ॥४९॥ अथ सब्रह्मका देवाः सेंद्रोपेंद्राः समागताः ॥ श्रुत्वा शम्भोस्तदा वाक्यं प्रणेमुस्तुष्टुवुश्च ते ॥५०॥ अथ तदन्तरे देवी देवमालोक्य सस्मिता ॥ लीलांभोजेन संस्पृश्य कलमाह वृषध्वजम् ॥५१॥

देव्युवाच ॥ क्रीडमानं विभो पश्य षड्वक्त्रं रविसन्निभम् ॥ पुत्रं पुत्रवतां श्रेष्ठ भूषितं भूषणैः शुभैः ॥५२॥ मुकुटैः कटकैश्चैव कुण्डलैर्वलयैः शुभैः ॥ नूपुरैश्छन्नहारैश्च तथा ह्युदरबंधनैः ॥५३॥ किंकिणीभिरनेकाभिर्हैमैरश्वत्थपत्रकैः ॥ कल्पकद्रुमजैः पुष्पैः शोभितैरलकैः शुभैः ॥५४॥ हारैर्वारिजरागादिमणिचित्रैस्तथांगदैः ॥ मुक्ताफलमयैर्हारैः पूर्णचंद्रसमप्रभैः ॥५५॥ तिलकं च महादेव पश्य पश्य सुशोभनम् ॥

---

(४९) शिव ह्मणाले—हे देवश्रेष्ठहो, तुमचें कार्य काय आहे, हें मला समजून चुकलें. आतां तुह्मी चिंता करूं नका. मी आतां त्रिपुरांचा नाश करण्याचा यत्न करितों. (५०) हे शिवाचें बोलणें ऐकून ब्रह्मदेव वगैरे जितके मुख्य मुख्य देव तेथें आले होते, तितक्या सर्वांनीं शिवास नमस्कार केला. व सर्वजण शिवाची स्तुति करूं लागले. (५१) इतका प्रकार होत आहे इतक्यांत पार्वती हंसत हंसत आपल्या हातांतील लीलाकमल शंकराचें अंगास हळूच लावून ह्मणाली—

(५२) पार्वती ह्मणाली—परमेश्वरा, हा सूर्यासारखा तेजस्वी कार्तिकेय येथें कसा खेळतो आहे ह्याकडे पहा, तर खरें. मुलें असणाऱ्या पुरुषांत खरोखर तूं फार धन्य आहेस. चांगले चांगले अलंकार ह्याचे अंगावर असल्यामुळें हा कसा शोभत आहे ! (५३) ह्याच्या मस्तकावरील ते सहा मुकुट, ह्याच्या बारा हातांतील ते कडीं तोडे, ह्याच्या कानांतील कुण्डलें आणि चौकडे, ह्याच्या पायांतील घागऱ्या, ह्याच्या गळ्यांतील मोत्यांच्या माळा, ह्याच्या कमरेचा कडदोरा (५४) तशाच कडदोऱ्याच्या घागऱ्या, ह्याच्या कपाळावरील हीं अनेक प्रकारचीं पिंपळपानें, व ह्याचे केशांत खोंवलेलीं कल्पवृक्षांचीं फुलें कशीं शोभत आहेत ! (५५) ह्याच्या गळ्यांतील रत्नांच्या माळा, व ह्याच्या दण्डावर बांधलेलीं पद्मराग मण्यांचीं भूषणें कशीं शोभत आहेत ! ह्याच्या गळ्यांतील मोत्यांच्या माळा पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें कशा शोभत आहेत पहा ! (५६) महादेवा पहा तर खरा, ह्याचा कपाळावरील टिळा कसा शोभत आहे तो ! हा कसा गोल आहे पहा, हा कुंकु-

चर्चितं कुंकुमाद्यैश्च वृत्तं भसितनिर्मितम् ॥५६॥ वक्त्रवृंदं च पश्येदं लंबकानलकांस्तथा ॥ नेत्राणि च विभो पश्य शुभानि सुशुभानि च ॥५७॥ अंजनानि विचित्राणि मंगलार्थं च मातृभिः ॥ गंगादिभिः कृत्तिकाद्यैः स्वाहया च विशेषतः ॥५८॥ इत्याद्यैर्लोकमातुश्च वचोभिश्चोदितः शिवः ॥न ययौ तृप्तिमीशानः पिबन् स्कंदाननामृतम् ॥५९॥ न सस्मार च तान्देवान् दैत्यशस्त्रनिपीडितान् ॥ स्कंदमालिंग्य चाघ्राय नृत्य पुत्रेत्युवाच ह ॥६०॥ सोऽपि लीलालसो बालो ननर्तार्तिहरो विभुः ॥ सहाया ननृतुश्चान्ये सह तेन गणेश्वराः ॥६१॥ त्रैलोक्यमखिलं तत्र ननर्तेशाज्ञया क्षणात् ॥ नागाश्च ननृतुः सर्वे देवाः सेंद्रपुरोगमाः ॥६२॥ तुष्टुवुर्गणपाः स्कंदं मुमोदांबा च मातरः ॥ ससृजुः पुष्पवर्षाणि जगुर्देवाश्च किन्नराः ॥६३॥ नृत्तामृतं तदा पीत्वा पार्वती-

---

वांत भस्म मिसळून तयार केला आहे. (५७) ह्याच्या तोंडांची पंक्ति तर पहा आणि त्यावर लोंवत असलेले कुरुळ केश कसे शोभतात पहा. परमेश्वरा ह्याचे हे सुंदर डोळे कसे पाणीदार दिसत आहेत पहा. (५८) ह्याला कोणाची दृष्टि लागूं नये ह्मणून ह्याच्या मातांनीं, व गंगा, कृत्तिका आणि विशेषतः अग्नीची वायको स्वाहा ह्यांनीं कशीं काजळाचीं वोटें लाविलीं आहेत तीं पहा. (५९) असें त्रैलोक्यजननी पार्वतीनें ह्मटल्यावर शिवांनीं कार्तिकेयाच्या मुखाकडे पाहिलें, पण शिव किती वेळ कार्तिकेयाच्या मुखाकडे पाहत राहिले तरी त्यांच्या मनाची तृप्ति झाली नाहीं. (६०) त्यामुळें ते दैत्यांच्या शस्त्रास्त्रांनीं अगदीं जर्जर झालेल्या देवांशीं वोलत होते त्यांचेकडे पाहण्याचीही त्यांस आठवण झाली नाहीं. त्यांनीं कार्तिकेयाला जवळ पोटाशीं घेतलें, आणि त्याचें मस्तक हुंगून मुला, तूं नाच वरें, कसा नाचतोस तें मला पाहूं दे, असें ह्मटलें. (६१) शंकराच्या सांगण्याप्रमाणें तो कार्तिकेय मौजेनें नाचूं लागला. तेव्हां त्याच्या वरोवरीचे दुसरे शिवगणही नाचूं लागले. (६२) तेथें परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें तत्काळ सर्व त्रैलोक्यही नाचूं लागले, नाग नाचूं लागले, इंद्र वगैरे मुख्य मुख्य सर्व देव नाचूं लागले. (६३) तें पाहून प्रमथगण संतोषानें कार्तिकेयाची वाहवा वाहवा ह्मणून प्रशंसा करूं लागले. पार्वतीस व इतर आयांस ( मातृका, कृत्तिका, गंगा आणि स्वाहा यांस ) मोठा आनंद झाला. देवांनीं व किन्नरांनीं आकाशांतून कार्तिकेयावर फुलांची वृष्टि केली व ते सर्वजण गाऊं लागले. (६४) तें नृत्यरूप अमृत पिऊन ( कार्तिके-

परमेश्वरौ ॥ अवापतुस्तदा तृप्तिं सदेवाश्च गणेश्वराः ॥६४॥ वृत्तम् ॥ ततः स नंदी सह षण्मुखेन तया च सार्द्धं गिरिराजपुत्र्या ॥ विवेश दिव्यं भवनं भवोऽपि यथांबुदोऽन्यांबुदमंबुदाभः ॥६५॥ द्वारस्य पार्श्वे ते तस्थुर्देवा देवस्य धीमतः ॥ तुष्टुवुश्च महादेवं किंचिदुद्विग्नचेतसः ॥६६॥ किंनु किंन्विति चान्योन्यं प्रोचुश्चैतत्समाकुलाः ॥ पापा वयमतीवान्ये अभाग्याश्चेति चापरे ॥६७॥ ते भाग्यवन्तो दैत्येन्द्रा इति चान्ये सुरेश्वराः ॥ पूजाफलमिदं तेषामित्यन्योन्यं तु चापरे ॥६८॥ एतस्मिन्नंतरे तेषां श्रुत्वा शब्दाननेकशः ॥ कुंभोदरो महातेजा दण्डेनाताडयत्सुरान् ॥६९॥ दुद्रुवुस्ते भयाद्भीता देवा हाहेति चुक्रुशुः ॥ अपतन्मुनयश्चान्ये देवाश्च धरणीतले ॥७०॥ अहो विधेर्बलं चेति मुनयः कश्यपादयः ॥

---

याचें नाचणें पाहून ) शिवपार्वतीस मोठा संतोष झाला; तसाच सर्व देवांस आणि सर्व शिवगणांसही मोठा आनंद झाला. (६५) कार्तिकेयाच्या नाचण्याचा खेळ पाहिल्यावर पांढऱ्या शुभ्र ढगाप्रमाणें अंगकांति असणारा तो शिवही जसा एक ढग दुसऱ्या ढगांत शिरावा तसा नंदीस बरोबर घेऊन कार्तिकेयास बरोबर घेऊन आणि पार्वतीस बरोबर घेऊन आपल्या सुंदर वाड्यांत गेला. (६६) ते सर्वज्ञ महादेव आंत निघून गेल्यावर ते सर्व देवें तसेच महादेवाच्या दाराजवळ उभे राहिले; व मनांत अतिशय उदासीन होऊन मनांत ह्मणूं लागले. (६७) ते सगळेजण घाबरून जाऊन घाबरेपणानें आतां काय करावें, आतां कसें करावें, असें आपआपसांत बोलूं लागले. त्यांतील कितीएक जण ह्मणाले, आह्मी अतिशय पापी आहोंत, दुसरे ह्मणाले आह्मी अतिशय अभागी ( दुर्दैवी ) आहों. (६८) दुसरे कोणी देव ह्मणाले ते दैत्य खरोखरच फार दैववान् आहेत. त्यांनीं शिवपूजा केली तिचें फळ ते सुखानें घेत आहेत. असें ते देव आपआपसांत बोलूं लागले. (६९) त्याचवेळीं त्यांचा हा परस्पर बोलण्याचा गोंगाट ऐकून तो महापराक्रमी कुंभोदर बाहेर आला, आणि त्यानें असा गलबला करूं नका ह्मणून सर्व देवास काठीनें यथेच्छ मारिलें. (७०) त्या माराच्या भयानें सर्व देव घाबरून जाऊन हाय हाय करीत पळून जाऊं लागले; व ते अंगावर काठीचे वळ उठलेले देव मोठमोठ्यानें रडूं लागले. त्या पळण्याच्या गडबडींत कितीएक देव आणि मुनीश्वर पाय अडखळून जमिनीवर पडले. (७१) तेव्हां काश्यप वगैरे मोठमोठे ऋषि दैवास दोष देऊन ह्मणूं लागले— हा दुर्दैवाचा जोर कसा आहे पहा? प्रत्यक्ष

दृष्ट्वापि देवदेवेशं देवानां भाग्यदर्शनम् ॥७१॥ अभाग्यान्नः समाप्तं तु कार्यमित्यपरे द्विजाः ॥ प्रोचुर्नमः शिवायेति पूज्यं चाल्पतरं हृदि॥७२॥ ततः कपर्दी नंदीशो देवदेवप्रियो द्विजाः ॥ शूली माली तथा हारी कुण्डली वलयी गदी ॥७३॥ वृषमारुह्य सुश्वेतं ययौ देवांतिकं तदा ॥ इभमारुह्य सुश्वेतं यथा शच्याः पतिः सुरैः ॥७४॥ ततो वै नंदिनं दृष्ट्वा गणैः कुंभोदरोऽपि सः ॥ प्रणम्य नंदिनं मूर्ध्ना सह तेन त्वरन्ययौ ॥७५॥ नंदी भाति महातेजा वृषपृष्ठे वृषध्वजः ॥ सगणो गणसेनानीर्मेघपृष्ठे यथा भवः ॥७६॥ शतयोजनविस्तीर्णं मुक्ताजालैरलंकृतम् ॥ सितातपत्रं शैलादेराकाशमिव भाति तत् ॥७७॥ छत्रान्तर्बद्धमाला सा मुक्ताफलमयी शुभा ॥ गंगाकाशान्निपतिता भाति मूर्ध्नि विभोर्यथा ॥७८॥ अथ दृष्ट्वा गणाध्यक्षं देवदुंदुभयः शुभाः ॥ नियोगाद्वज्रिणः सर्वे नि-

---

श्रीशिवाचें दर्शन झालें तरी देखील सर्वांस काठीचा मार खावा लागला. देवांचें दैव जोरावर आहे खरें. (७२) दुसरे कितीएक ब्राह्मण ह्मणूं लागले आमचें दुर्दैवच अद्याप संपलें नाहीं. कितीएक ब्राह्मण आपल्या मनांत श्रीशिव सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ आहे असें मानून मनांत " नमःशिवाय " हा शिवपंचाक्षरी मंत्र जपूं लागले. (७३) ब्राह्मणहो, नंतर मस्तकावर जटाजूट बांधलेला, महादेवांच्या अतिशय प्रीतींतला, हातांत शूल घेतलेला, गळ्यांत फुलांच्या माळा आणि रत्नांच्या माळा असणारा, कानांत रत्नांचीं कुंडलें व हातांत कडीं तोडे घातलेला नंदिकेश्वर (७४) जसा पांढऱ्या शुभ्र ऐरावत हत्तीवर बसून इंद्र इतर देवांकडे यावा तसा पांढऱ्या शुभ्र बैलावर बसून त्या सर्व देवांजवळ आला. (७५) शिवाच्या आज्ञेप्रमाणें नंदिकेश्वर देवांकडे जाण्यास निघालेला पाहून तो कुंभोदरही आपले गण बरोबर घेऊन नंदीस नमस्कार करून त्याबरोबर घाईघाईनें येण्यास निघाला. (७६) वृषभाचा ध्वज असणारा तो महापराक्रमी व वृषभाच्या पाठीवर बसलेला नंदी जसा श्रीशंकर मेघावर बसून आपले सर्व प्रमथगण बरोबर घेऊन निघतांना शोभतो, तसा शोभला.(७७) नंदीच्या मस्तकावर असलेलें छत्र चारशें कोस लांबरुंद असून त्याला मोत्यांच्या झालरी लाविलेल्या होत्या. तें पांढरें पांढरें शुभ्र होतें त्यामुळें आकाशासारखें दिसत होतें. (७८) छत्राच्या आंतील बाजूस एक मोत्यांची माला लोंबत सोडलेली होती ती माला तर, श्रीशिवाच्या मस्तकावर आकाशांतून पडणाऱ्या गंगेचा प्रवाह जसा शोभावा, तशी शोभत होती. (७९) शिवगणांचा अधिपति नंदिकेश्वर आपल्या भेटीस येतो आहे असें पाहतांच इं-

नेदुः काहलादिभिः ॥७९॥ तुष्टुवुश्च गणाध्यक्षं वाग्भिरिष्टप्रदं प्रभुम् । यथा देवा भवं दृष्ट्वा प्रीतिकण्टकितत्वचः ॥८०॥ नियोगाद्वज्रिणो मूर्ध्नि पुष्पवर्षं बलाहकाः ॥ ववृषुश्च सुगंधाढ्यं नंदिनो भृंगनादितम् ॥८१॥ वृष्ट्या स्पृष्टस्तदा रेजे तुष्टस्पृष्टो यथांबया ॥ नंदी भवश्चाद्रिजया स्नातया गंधवारिणा ॥८२॥ पुष्पैर्नानाविधैस्तत्र भाति पृष्ठं वृषस्य तत् । संकीर्णं तु दिवः स्पृष्टं नक्षत्रैरिव सुव्रताः ॥८३॥ कुसुमैः संवृतो नंदी वृषपृष्ठे रराज सः ॥ दिवः पृष्ठे यथा चंद्रो नक्षत्रैरिव संवृतः ॥८४॥ तं दृष्ट्वा नंदिनं देवा सेंद्रोपेंद्रास्तथाविधम् ॥ तुष्टुवुर्गणपेशानं देवदेवमिवापरम् ॥८५॥

देवा ऊचुः ॥ नमस्ते रुद्रभक्ताय रुद्रजाप्यपराय ते ॥ रुद्रभक्तार्ति-

---

द्राच्या आज्ञेप्रमाणें देवांनीं दुंदुभि आणि काहल वगैरे दुसरीं वाद्यें वाजविण्यास आरंभ केला. (८०) शंकराचें दर्शन झाल्या बरोबर अंगावर रोमांच येऊन ज्याप्रमाणें सर्व देव शिवाची स्तुति करितात, त्याप्रमाणें सर्व देवांनीं आपले मनोरथ पूर्ण करणाऱ्या नंदिकेश्वराची मधुर मधुर शब्दांनीं स्तुति केली. (८१) इंद्राच्या आज्ञेप्रमाणें मेघांनीं आकाशांतून नंदिकेश्वराचे मस्तकावर फुलांचा वर्षाव केला. त्या फुलांच्या सुवासानें दाही दिशा व्यापून गेल्या होत्या व त्या फुलांवर बसून भुंगे गुंजारव करीत होते. (८२) सुगंधित पाण्यानें स्नान केलेली पार्वती जवळ असली म्हणजे श्रीशिव जसे शोभतात तसाच नंदिकेश्वर त्याच्या मस्तकावर आकाशांतून मेघांनीं केलेल्या पुष्पवृष्टीमुळें शोभला. (८३) आकाशांत रात्रीच्यावेळीं जागोजाग चांदण्या चमकूं लागल्यामुळें आकाश ज्याप्रमाणें शोभतें; त्याप्रमाणेंच नंदिकेश्वराच्या अंगावर व पाठीवर आकाशांतून मेघांनीं सुगंधित फुलें टाकिल्यामुळें नंदीच्या वाहनाची ( बैलाची ) पाठ शोभूं लागली. (८४) सभोंवतीं तारागण असतां आकाशांत मध्यभागीं चंद्र जसा शोभतो, त्याप्रमाणें बैलाच्या पाठीवर बसणारा नंदिकेश्वर मेघांनीं आकाशांतून केलेल्या पुष्पवृष्टीमुळें शोभूं लागला. (८५) तो नंदिकेश्वर तशा रीतीनें सुशोभित दिसत असतां, हा प्रत्यक्ष दुसरा श्रीशंकरच आहे अशा समजुतीनें सर्व देव त्या नंदिकेश्वराची स्तुति करूं लागले—

(८६) देव म्हणाले—नंदिकेश्वरा, तूं रुद्राचा निस्सीम भक्त आहेस, तूं नेहमीं रुद्रमंत्राचा जप करीत असतोस. तूं रुद्राची भक्ति करणाऱ्यांचीं दुःखें दूर करितोस, तूं प्रसंग पडल्यास क्रूरपणाचींही कामें करितोस. तुला नमस्कार

नाशाय रौद्रकर्मरताय ते ॥८६॥ कूष्माण्डगणनाथाय योगिनां पतये नमः ॥ सर्वदाय शरण्याय सर्वज्ञायार्तिहारिणे ॥८७॥ देवानां पतये चैव वेदवेद्याय ते नमः ॥ वज्रकुण्डलिने नित्यं वज्रिणाराधिताय ते ॥८८॥ रक्ताय रक्तनेत्राय रक्तांवरधराय च ॥ रक्तानां तव पादाब्जे रुद्र-लोकप्रदायिने ॥८९॥ नमः सेनाधिपतये रुद्राणां पतये नमः ॥ भूतानां भुवनेशानां पतये पाशहारिणे ॥९०॥ रुद्राय रुद्रपतये रौद्रपापहराय ते ॥ नमः शिवाय सौम्याय रुद्रभक्ताय ते नमः ॥९१॥

सूत उवाच ॥ ततः प्रीतो गणाध्यक्षः प्राह देवान् शिलादजः ॥ रथं च सारथिं शंभोः कार्मुकं शरमुत्तमम् ॥ कर्तुमर्हथ यत्नेन नष्टं मत्वा

---

असो.(८७)तूं कूष्मांडगणांचा अधिपति आहेस, तूं योगी लोकांचा अधिपति आहेस, तूं सर्व वस्तु देणारा आहेस, तूं शरणागतांचें रक्षण करितोस, तूं सर्वज्ञ आहेस, तूं लोकांचीं दुःखें दूर करितोस. तुला नमस्कार असो. (८८) तूं सर्व देवांचा अधि-पति आहेस, वेदांच्या द्वारानें तुझें यथार्थ ज्ञान होतें, तुला नमस्कार असो. तुझ्या कानांत इंद्रनीलमण्यांचीं कुण्डलें आहेत, इंद्र नेहमीं मनोभावानें तुझी सेवा करितो. त्या तुला नमस्कार असो. (८९) तुझा वर्ण लाल आहे, तुझे डोळे लाल आहेत, तूं लाल रंगाचें वस्त्र नेसला आहेस. तुझ्या चरणकमलाची जे लोक एक निष्ठपणानें सेवा करितात त्यांस तूं कैलास पदाची प्राप्ति करून देतोस, त्या तुला नमस्कार असो. (९०) तूं गणसेनेचा अधिपति आहेस, तूं रुद्रांचा अधिपति आहेस, तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस, तूं त्रैलोक्यपतींचा अधिपति आहेस, तूं पाशांतून पशूंची मुक्तता करितोस, तुला नमस्कार असो. (९१) तूं रुद्र आहेस, तूं रुद्रांचा अधिपति आहेस, तूं अतिशय भयंकर पाप असलें तरी त्याचा नाश करितोस. तूं कल्याण करणारा आहेस तुला नमस्कार असो. तूं सौम्यस्वरूपाचा आहेस, तूं रुद्राचा भक्त आहेस, तुला नमस्कार असो.

(९२) सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, अशी देवांनीं केलेली स्तुति ऐकून शिला-दपुत्र, शिवगणांचा अधिपति श्रीनंदि ह्याला मोठा संतोष झाला. मग तो संतुष्ट होऊन सर्व देवांस ह्मणाला—देवहो, तुह्मी हरप्रयत्नानें शिवाकरितां रथ, सारथि,

पुरत्रयम् ॥९२॥ अथ ते ब्रह्मणा सार्द्धं तथा वै विश्वकर्मणा ॥ रथं
चक्रुः सुसंरब्धा देवदेवस्य धीमतः ॥९३॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने त्रिपुरदहननिमित्तरथनिर्माणनिरूपणं नाम द्वाविंशोऽध्यायः ॥

---

धनुष्य, व उत्तम बाण तयार करा; ह्मणजे त्रिपुरांचा नाश झालाच ह्मणून समजा. (९३) असें नंदीचें बोलणें ऐकून ते सर्व देव त्या बुद्धिमान् आणि देवाधिदेव श्रीशंकराकरितां ब्रह्मदेवाच्या विचारानें विश्वकर्म्याकडून रथ तयार करण्याच्या कामास लागले.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठ नागनाथ नांवाच्या विद्वद्वर्यानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतलिशिवाधिक्यकथनापैकीं त्रिपुरदहनाकरितां शिवाचा रथ करण्याचे उद्योगास देवांनीं लागणें असें वर्णन असलेला हा बाविसावा अध्याय संपला.



## ॥ अथ त्रयोविंशोऽध्यायः प्रारंभः ॥

॥ श्रीशिवाय नमः ॥ सूत उवाच ॥ अथ रुद्रस्य देवस्य निर्मितो विश्वकर्मणा ॥ सर्वकर्ममयो दिव्यो रथो यत्नेन सादरम् ॥१॥ सर्वभूतमयश्चैव सर्वदेवमयस्तथा ॥ सर्ववेदमयश्चैव सौवर्णः सर्वसंमतः॥२॥ रथांगं दक्षिणं सूर्यो वामांगं सोम एव च॥ दक्षिणं द्वादशारं हि षोडशारं तथोत्तरम् ॥३॥ अरेषु तेषु विप्रेंद्राश्चादित्या द्वादशैव तु॥ शशिनः षोडशारे तु कला वामस्य सुव्रताः॥४॥ऋक्षाणि च तथा तस्य वामस्यैव तु भूषणम् ॥ नेम्यः षड्तवश्चैव तयोर्वै विप्रपुंगवाः ॥५॥ पुष्करं चांतरिक्षं हि रथनीडश्च मंदरः॥ अस्ताद्रिरुदयाद्रिश्च उभौ तौ कूबरौ स्मृतौ ॥६॥ अधिष्ठानं महामेरुराश्रयाः केसराचलाः ॥ धरणी रथपृष्ठं तल्लोकालोकसमावृता ॥७॥ वेगः संवत्सरस्तस्य अयने चक्रसंक्रमौ ॥ मु-

---

श्रीशिवास नमस्कार असो. (१) सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, मग विश्वकर्म्यानें देवाधिदेव श्रीशंकराकरितां मोठ्या प्रयासानें एक सुंदर रथ तयार केला. तो सर्व कामांचे उपयोगीं पडेल असा होता. (२) तो रथ सर्वभूत ( प्राणिमात्र ) स्वरूप होता, सर्व देवस्वरूप होता आणि सर्व वेदस्वरूप होता. ( सर्व प्राणिमात्रांच्या अंगीं, देवांच्या अंगीं आणि वेदांच्या अंगीं जितकें सामर्थ्य होतें तितकें सर्व ह्या रथाच्या अंगीं होतें ) तो चोहोंकडून सोन्याचा केलेला होता. (३) त्या रथाचे उजवे बाजूचें चाक सूर्य असून, डावे बाजूचें चाक चंद्र होतें. उजव्या बाजूच्या चाकास बारा अरा असून डावे बाजूच्या चाकास सोळा अरा होत्या. (४) हे ब्राह्मणहो, त्या उजवेबाजूच्या चाकाच्या बारा अरांच्या जागीं बारा सूर्य होते व डावे बाजूच्या चाकाच्या सोळा अरांच्या जागीं सोळा चंद्राच्या कला होत्या. (५) हे ब्राह्मणश्रेष्ठहो, आकाशांतील नक्षत्रें हीं त्या चाकांच्या डावे बाजूकडे बसविलेलीं रत्नें होत. सहा ऋतु हे त्या दोन्ही चाकांवरील धांवा होत. (६) आकाश हें त्या रथाची पोंकळी असून मंदर पर्वत हा त्या रथांत बसण्याकरितां तयार केलेली जागा होय. उदयपर्वत आणि अस्ताचल हे दोन्ही पर्वत त्या रथाचें जूं होत. (७) मेरुपर्वत त्या रथाचा मुख्य आश्रय असून लहान लहान ( केसर ) पर्वत त्यास दिलेले आधार होत. लोकालोकापर्यंत असलेली पृथ्वी हा त्या रथाचा पृष्ठभाग होय. (८) संवत्सर हे त्या रथाचा वेग असून दक्षिणायन आणि उत्तरायन हीं दोन अयनें त्या रथाच्या चाकांच्या उमटणाऱ्या रेषा होत. मुहूर्त हे त्या

हूर्ता बंधुरास्तस्य शल्याश्चैव कलावृताः॥८॥ तस्य काष्ठा स्मृता घोणा चाक्षदण्डः क्षणस्तु वै॥निमेषाश्चानुकर्षाश्च ईषा चास्य लवाः स्मृताः ॥९॥ द्यौर्वरूथं रथस्यास्य स्वर्गमोक्षावुभौ ध्वजौ ॥ धर्मो विरागो दण्डोऽस्य यज्ञा दण्डाश्रयाः स्मृताः ॥१०॥ दक्षिणा संधयस्तस्य भागाः पंचाशदग्नयः ॥ युगाक्षकोटिकौ तस्य ह्यर्थकामावुभौ स्मृतौ ॥११॥ ईषादण्डस्तथा व्यक्तं बुद्धिस्तस्यैव गीःस्थलं॥ कोणस्तथाप्यहंकारो भूतानि च तलं स्मृतम् ॥१२॥ इंद्रियाणि च तस्यैव भूषणानि समंततः॥ श्रद्धा च गतिरस्यैव वेदास्तस्य हयाः स्मृताः ॥१३॥ पदानि भूषणान्येव षडंगान्युपभूषणम् ॥ पुराणं न्यायमीमांसा धर्मशास्त्राणि सुव्रताः ॥१४॥ वालाश्रयाः पटाश्चैव सर्वलक्षणसंयुताः ॥ मंत्रा घण्टाः स्मृतास्तेषां वर्णाः पादास्तथा क्रमात् ॥१५॥ रथच्छंदो ह्यनंतस्तु सहस्र-

---

रथाचे मोठमोठे खिळे असून, कला हे लहान लहान खिळे होत. (९) काष्ठा (एक वेळेचें प्रमाण) ही रथाची पुढील बाजू असून क्षण हा त्या रथाच्या कण्याचा दांडा होय. निमेष (पापणीस पापणी लागणें इतका काळ) हा त्या रथाच्या तळाचें लांकूड होय. लव हे त्या रथाचा फाळ होत. (१०) आकाश हा त्या रथावर मढविलेला जाड पत्रा होय. स्वर्ग आणि मोक्ष हे दोन त्या रथावरील ध्वज होत. धर्म आणि विराग हे दोन त्या रथावरील ध्वजांचे खांब होत. आणि यज्ञ हे त्या दोन्ही खांबाचे आधार होत. (११) हें पंधरा अग्नि त्या रथाचे उजवे कडील भाग आहेत, अर्थ आणि काम हे दोन्ही त्या रथाच्या कण्याचीं दोन्हीकडील टोंकें आहेत. (१२) बुद्धि आणि बुद्धिस्थल हे दोन्ही त्या रथाचा फाळ आहे. अहंकार हा त्या रथाचा कोपरा असून पंचमहाभूतें हीं त्या रथाची तळची जागा आहे. (१३) पांच कर्मेंद्रियें आणि पांच ज्ञानेंद्रियें हीं त्या रथाच्या आजूबाजूंस शोभेकरितां बसविलेलीं रत्नें आहेत श्रद्धा ही त्या रथाची गति असून चार वेद हे त्या रथाचे चार घोडे आहेत. (१४) पदें हीं त्या रथावरील भूषणें असून षडंग (शिक्षा, कल्प, निरुक्त, छंदस्, ज्योतिष आणि व्याकरण) हीं उपभूषणें होत. हे सदाचारी ब्राह्मणहो, पुराणें, न्याय, मीमांसा आणि धर्मशास्त्रें (स्मृति) (१५) हे सर्व प्रकारांनीं सुशोभित दिसणारे रथाच्या घोड्यांच्या शेपटाचें केंसावरील अलंकार होत. अक्षरें, वेदवाक्यें (पद) क्रम आणि मंत्र हे त्या रथावरील ध्वजांच्या घंटा होत. (१६) हजार फणा असणारा शेष हा त्या रथाची

फणभूषितः ॥दिशः पादा रथस्यास्य तथा चोपदिशश्च ह ॥१६॥ पुष्कलाद्याः पताकाः स्युः सौवर्णा रत्नभूषिताः ॥ समुद्रास्तस्य चत्वारो रथकंबलकाः स्मृताः ॥१७॥ गंगाद्याश्च सरिच्छ्रेष्ठाः सर्वाभरणभूषिताः चामरासक्तहस्ताग्राः सर्वाः स्त्रीरूपधारिणः ॥ तत्र तत्र कृतस्थानाः शोभयांचक्रिरे रथम् ॥१८॥ आहवाद्यास्तथा सप्त सोपानं हैममुत्तमम्॥ सारथिर्भगवान् ब्रह्मा देवाभीशुधराः स्मृताः॥१९॥प्रतोदो ब्रह्मणस्तस्यप्रणवं ब्रह्मदैवतम्॥ लोकालोकाचलास्तस्य सूपधानं समंततः ॥२०॥ विषमश्चित्रभान्वाख्यो मानसाद्रिः सुशोभनः ॥ नासास्समंततस्तस्य सर्वे वर्षाचलाः स्मृताः॥२१॥तलाः कपोताः कापोताः सर्वे तलनिवासिनः॥ मेरुरेषो महच्छत्रं मंदरः पार्श्वडिंडिमः ॥२२॥ शैलेंद्रः कार्मुकं चैव ज्या भुजंगाधिपः स्वयम् ॥ कालरात्र्या सहैवेह नगेंद्रधनुषः पुनः ॥२३॥ घण्टा सरस्वती देवी धनुषः श्रुतिरूपिणी ॥ इषुर्विष्णुर्म-

---

दोरी होय. तसेंच दिशा आणि उपदिशा मिळून आठ दिशा ह्या त्या रथाच्या दुसऱ्या दोऱ्या होत. (१७) पुष्करावर्त नांवाचे मेघ ह्या त्या रथावरील सोन्याच्या रत्नजडित पताका होत. चार समुद्र ह्या त्या रथावरील कांबळ्या होत. (१८) गंगा वगैरे मोठमोठ्या व अतिशय पवित्र नद्या प्रत्यक्ष रूपानें तेथें आल्या असून त्यांच्या अंगांवर सर्व प्रकारचे अलंकार असल्यामुळें त्या फार शोभत होत्या; त्यांनीं आपल्या हातांत शिवावर वारण्याकरितां चवऱ्या घेतलेल्या होत्या. त्या चित्रांसारख्या रथावर जागजागीं बसविल्या होत्या. (१९) स्वामी, अमात्य, सुहृत्, कोश, राष्ट्र, दुर्ग, बल हीं सातप्रकारचीं राज्यांगें त्या रथावर चढण्याकरितां केलेल्या सात पायऱ्या होत. परमेश्वर ब्रह्मदेव हा त्या रथावर सारथि असून इतर देव त्या रथाच्या दोऱ्या धरणारे होत. (२०) ॐकार हा त्या सारथि ब्रह्मदेवाच्या हातांतील चाबूक होय. हे सात कुलपर्वत त्या रथावरील गाद्या व उशा होत. (२१) विषमपर्वत, चित्रभानुपर्वत, मानसपर्वत, सुशोभनपर्वत, आणि सर्ववर्षपर्वत ह्या सर्व त्या रथाभोंवतालच्या नासा होत. (२२) तलपर्वत, कपोतपर्वत, कापोतपर्वत, हीं सर्व रथापुढें जमिनीवर उभीं केलेलीं चित्रें होत. मेरुपर्वत हा मोठें थोरलें छत्र असून मंदरपर्वत हा बाजूचा डंका होता. (२३) मेरुपर्वत हा धनुष्य झाला शेषनाग हा त्या धनुष्याची प्रत्यंचा होती, तो मेरुपर्वत कालरात्रीसहित होता. (२४) वेदस्वरूप देवी सरस्वती त्या रथाची घंटा होय. महापरा-

हातेजाः शल्यं सोमः शरस्य च ॥२४॥ कालाग्निस्तच्छरस्यैव साक्षात्तीक्ष्णः सुदारुणः ॥ अनीकेषु समीभूता वायवो व्यापकाः स्मृताः ॥ ॥२५॥ एवं कृते रथे दिव्ये कार्मुके च शरे सुरैः ॥ सारथ्यकर्मयुक्तेन ब्रह्मणाऽधिष्ठितं पुरः ॥२६॥ आरुरोह रथं दिव्यं रणमण्डलद्दग्भवः ॥ सर्वदेवमयो भूत्वा कम्पयन्निव रोदसी ॥२७॥ ऋषिभिः स्तूयमानस्तु वंद्यमानश्च वंदिभिः॥*उपनृत्यश्चाप्सरसां गणैर्नृत्यविशारदैः*॥२८॥संगीयमानः सपदि समन्तादप्सरोगणैः ॥ सुशोभमानो वरदः संप्रेक्ष्यैव च सारथिं॥२९॥तस्मिन्नारोहति रथं कल्पितं लोकसंभृतम्॥ शिरोभिः पतिता भूमिं तुरगा वेदसम्भवाः ॥३०॥ अथाधस्ताद्रयस्यास्य भगवान्धरणीधरः ॥ वृषेंद्ररूपी चोत्थाप्य स्थापयामास वै क्षणात् ॥३१॥ क्षणांतरे वृषेन्द्रोऽपि जानुभ्यामगमद्धराम्॥ अभीषुहस्तो भगवानुद्यम्य च हयान्विभुः॥ स्थापयामास देवस्य वचनाद्वै रथं शुभम् ॥३२॥ततोऽ

---

क्रमी श्रीविष्णु हा त्या शिवाचा बाण होता व चंद्र हा त्या बाणाचा शल्य (अग्र) होता. (२५) स्वतः कालाग्नि हा त्या बाणाचा प्रखरपणा होता. युद्धांत मिळालेले ( सारखे वाहणारे ) वारे हे बाणाचे पिसारे होते. (२६) असो, ह्याप्रमाणें देवांनीं शिवाकरितां उत्तम रथ, उत्तम धनुष्य आणि उत्तम बाण तयार केल्यावर रथ हांकण्याचे कामांत चतुर असणाऱ्या ब्रह्मदेवास त्यांनीं रथ हांकण्याकरितां रथापुढें बसविलें. (२७) मग श्रीशिव सर्व देवतास्वरूप होऊन त्रैलोक्याचा थरकांप करीत युद्धभूमीकडे पहात पहात त्या दिव्य रथावर चढले. (२८) तेव्हां सर्व ऋषींनीं शंकराची स्तुति केली; स्तुतिपाठक लोकांनीं शंकराचीं स्तोत्रें केलीं; व नाचण्याच्या कामांत कुशल असणाऱ्या अप्सरा नाचूं लागल्या. (२९) व भक्तिभावानें सभोंवतीं मिळून लागल्याच शंकराचे गुणानुवाद मधुर स्वरानें गाऊं लागल्या. अशा समारंभानें वर देणारे श्रीशंकर सारथि ब्रह्मदेवाकडे पाहत पाहत (३०) सर्व लोकमय अशा देवांनीं केलेल्या रथावर चढूं लागतांच वेदांचे केलेले (वेदस्वरूप) घोडे आपलीं डोकीं खालीं करून जमिनीवर पडले. ( त्यांस शंकराचें ओझें सहन झालें नाहीं ). (३१) घोडे खालीं पडलेले पाहतांच लागलीच परमेश्वर वृषेंद्ररूपी शेष रथाच्या खालीं गेला आणि त्यानें तत्काळ त्या घोड्यांस उठवून उभें केलें. (३२) व आपण गुडघे टेंकून जमिनीवरून तो वृषेंद्र (शेष) चालूं लागल्यावर परमेश्वर ब्रह्मदेवानें आपल्या हातांत दोरी घेऊन शंकराच्या आज्ञेप्रमाणें रथ पूर्वीप्रमाणें उभा केला. (३३) असो नंतर शिवांनीं त्या वेग-

श्वांश्चोदयामास मनोमारुतरंहसः॥ पुराण्युद्दिश्य खस्थानि दानवानां तरस्विनाम्॥३३॥ वृत्तम्॥ गणेश्वरैरेव हरोऽथ धन्वी पुरत्रयं दग्धुमसौ जगाम॥ तं देवदेवं सुरसिद्धसंघा माहेश्वरा भूतगणाश्च सर्वे॥ गणेश्वरा नंदिमुखास्तदानीं स्ववाहनैरन्वयुरीशमीशाः॥३४॥ अग्रे सुराणां च गणेश्वराणां तथा स नंदी गिरिराजकल्पम्॥ विमानमारुह्य पुरं प्रहर्तुं जगाम मृत्युर्भगवानिवेशः ॥३५॥ प्रयांतं महांतं शिलादात्मजं तं समारुह्य नागेंद्रसिंहाश्वमुख्यान्॥ सुरेशाः प्रहृष्टा गणेशाश्च सर्वे गणेशं ययुः स्वायुधैश्चित्रहस्ताः ॥३६॥ खगेंद्रमारुह्य नगेंद्रकल्पं खगध्वजो वामत एव शंभोः॥ जगाम तूर्णं जगतां हिताय पुरत्रयं दग्धुमलुप्तशक्तिः ॥३७॥ तं सर्वदेवासुरलोकनाथाः समन्ततश्चान्वयुरप्रमेयम्॥ सुरासुरेशं शितशूलटंकगदात्रिशूलासिवरायुधैश्च ॥३८॥ रराज मध्ये भगवान्सुराणां विवाहनो वारिदवर्णवर्णः॥ यथा सुमेरोः

---

वान् दानवांच्या नगरांकडे मन आणि वारा ह्याप्रमाणें वेग असणाऱ्या घोड्यांस वळविलें. (३४) मग धनुष्य घेऊन श्रीशंकर रथांत बसून त्रिपुर जाळण्यास निघाला. त्यावेळीं त्या देवाधिदेव श्रीशंकराबरोबर देवांचे व सिद्धांचे समुदाय, माहेश्वर, भूतांचे समुदाय नंदीश्वर वगैरे सर्व मुख्य मुख्य प्रमथगण आपापल्या वाहनांसह चालले. (३५) सर्व देवांच्या आणि गणेश्वरांच्या पुढें तो नंदिकेश्वर पर्वताएवढ्या मोठ्या विमानांत बसून परमेश्वर श्रीशंकर जसे यमाच्या अंगावर धांवून जावे तसाच त्रिपुरांचा नाश करण्याकरितां चालला. (३६) श्रीनंदिकेश्वर आपल्या वाहनावर बसून त्रिपुरावर जाण्यास निघालेला पाहून सर्व देवांस व प्रमथांस मोठा संतोष झाला व ते हत्ती सिंह वगैरे आपापल्या वाहनांवर बसून व हातांत नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन नंदिकेश्वराबरोबर चालले. (३७) तो अतिशय शक्तिमान् गरुडध्वज श्रीविष्णु हिमालय पर्वताएवढ्या धिप्पाड गरुडावर बसून सर्व त्रैलोक्याचें कल्याण करण्याकरितां त्रिपुरावर शिवाच्या डावेकडील बाजूनें चालला. (३८) त्या देवांच्या आणि दैत्यांच्या अधिपती (विष्णु) बरोबर सर्व देव आणि इंद्रादिक मुख्य मुख्य देव आपापल्या हातांत तीक्ष्ण धारेचे शूल, टंक, गदा, त्रिशूल उत्तम तरवार वगैरे शस्त्रास्त्रें घेऊन निघाले. (३९) मेघांप्रमाणें अंगकांति असणारा तो परमेश्वर गरुडध्वज श्रीविष्णु सर्व देवांच्या समुदायांत मेरुपर्वताच्या शिखरावर जसा प्रखर किरणांचा सूर्य शोभावा तसा

शिखराधिरूढः सहस्ररश्मिर्भगवान्सुतीक्ष्णः ॥३९॥ सहस्रनेत्रः प्रथमः सुराणां गजेंद्रमारुह्य च दक्षिणेऽस्य ॥ जगाम रुद्रस्य पुरं निहंतुं यथोरगांस्तत्र तु वैनतेयः ॥४०॥ तं सिद्धगंधर्वसुरेंद्रवीराः सुरेंद्रवृंदाधिपमिंद्रमीशम् ॥ समन्ततस्तुष्टुवुरिष्टदं तं जयेति शक्रं वरपुष्पवृष्ट्या॥४१॥ तदाह्यहल्योपपतिं सुरेशं जगत्पतिं देववरं दिविस्थाः॥ प्रणेमुरालोक्य सहस्रनेत्रं सलीलमंबातनयं यथेंद्रः ॥४२॥ यमपावकवित्तेशा वायुर्निर्ऋतिरेव च ॥ अपांपतिस्तथेशानो भगवन्तं जगाम तम् ॥ त्रयस्त्रिंशत्कोटिदेवास्त्वनुजग्मुर्महेश्वरम् ॥४३॥ वीरभद्रो रणे भद्रो नैऋत्यां वै रथस्य तु ॥ वृषं भद्रं समारुह्य रोमजैश्च समावृतः ॥ सेवां चक्रे पुरं हर्तुं देवदेवं त्रियंबकम् ॥४४॥ महाकालो महातेजा महाबलपराक्रमः॥ वायव्यां सगणैः सार्द्धं सेवां चक्रे रथस्य तु ॥४५॥ वृत्तम् ॥ षण्मुखोऽ

---

शोभला. (४०) सापांस मारण्यास जसा त्यांच्या अंगावर गरुड धांवून जावा, तसा त्रिपुरांस मारण्यास इंद्र आपल्या ऐरावत नांवाच्या मुख्य हत्तीवर वसून सर्व देवांच्या पुढें शंकराच्या उजव्या हाताच्या रस्त्यानें चालला. (४१) सर्व देवांचा मुख्य अशा त्या इंद्राची, सर्व मुख्य मुख्य देव आणि पराक्रमी लोक स्तुति करूं लागले; व तूं आमचे मनोरथ पूर्ण करणारा आहेस, तुझा जयजयकार असो, असें ह्मणून इंद्राच्या मस्तकावर सर्व देवांनीं फुलांचा वर्षाव केला. (४२) तो त्रिपुराचा आणि शिवाचा होणारा युद्धचमत्कार पाहण्यासाठीं आकाशांत देव जमले होते त्यांनीं शिवाबरोबर देवेंद्रही युद्धास जात आहे असें पाहून इंद्र कार्तिकेयाचें दर्शन झाल्याबरोबर त्यास जसा नमस्कार करी तसेच सर्व देव इंद्रास नमस्कार करूं लागले. (४३) यम, अग्नि, कुबेर, वायु, निर्ऋति, वरुण आणि ईशान हे सर्व परमेश्वर श्रीशिवाबरोबर त्रिपुरांस जाळण्यास निघाले. त्या अष्टदिक्पालांबरोबर तेहतीस कोटि देव देखील शिवाबरोबर निघाले. (४४) त्या युद्धाकरितां वीरभद्रही शिवरथाच्या नैऋत्यबाजूनें त्रिपुरांचा नाश करण्याकरितां व देवाधिदेव त्रियंबकाची सेवा करण्याकरितां आपल्या सर्व रोमज ( रोमांपासून उत्पन्न झालेल्या ) गणांसहित एका सुंदर बैलावर बसून चालत होता. (४५) महाकाल नांवाचा मोठा पराक्रमी आणि बलाढ्य शिवदूत शिवाच्या रथाला मदत करण्याकरितां आपल्या सर्व गणांसहित रथाच्या वायव्य दिशेच्या बाजूनें चालत होता. (४६) परमेश्वर कार्तिकेय हिमालय पर्वतासारखा धिप्पाड दिसत होता व देवतांचा समु-

पि सह सिद्धचारणैः सेनया च गिरिराजसन्निभः ॥ देवनाथगणवृंद-संवितो वारणेन च तदाग्निदिग्गतः ॥४६॥ विघ्नं गणेशो ह्यसुरेश्वराणां कृत्वा सुराणां भगवानविघ्नं ॥ विघ्नेश्वरो विघ्नगणैश्च सार्द्धं तं देवमीशानपदं जगाम ॥४७॥ गणेश्वरैर्देवगणैश्च भृंगी समावृतः सर्वगणैश्च वंद्यः ॥ जगाम वेगात्त्रिपुरं निहंतुं विमानमारुह्य यथा महेंद्रः ॥४८॥ कृतो विगतवासाश्च महाकेशो महाज्वरः ॥ सौवर्णः सोमदत्तश्च सोमपेषणकस्तथा ॥४९॥ प्रकुण्डः कुण्डदन्तश्च कंपनश्च प्रकंपनः ॥ इंद्रश्चंद्रो यमश्चैव महार्हो भीमकस्तथा ॥५०॥ शताक्षश्चैव पंचाक्षः सहस्राक्षो महोदरः ॥ शतजिव्हः शतास्यश्च कंटकः कटघातनः ॥५१॥ द्विशिखस्त्रिशिखश्चैव तथा पंचशिखो द्विजाः ॥ मुंडोऽर्धमुण्डो दीर्घास्यः पिशाचास्यः पिनाकधृक् ॥५२॥ पिप्पलायतनश्चैव तथाह्यंगारकाशनः॥ शिथिलः शिथिलास्यश्चाप्यक्षपादो ह्यजो कुहः ॥ अजवक्त्रो हयवक्त्रो गजवक्त्रोर्ध्ववक्त्रकौ ॥५३॥ इत्याद्याः परिवार्येशं लक्ष्यलक्षणवर्जिताः ॥ वृंदशस्तं समावृत्य जग्मुः सोममिव द्विजाः॥५४॥सहस्राणां सहस्राणि

---

दाय त्याची सेवा करीत होता अशा समारंभानें तो सिद्धांस चारणांस देवसैन्यास बरोबर घेऊन महादेवाच्या रथाच्या आग्नेय दिशेकडून चालत होता. (४७) विघ्नेश्वर श्रीगणपति दैत्यश्रेष्ठांस विघ्न करून देवांचीं विघ्नें दूर करीत आपल्या विघ्नसमुदायांस बरोबर घेऊन त्या श्रेष्ठ शिवाच्या मार्गानें चालला. (४८) विमानांत बसून महेंद्र जसा युद्धास निघतो तसा सर्व गणांस नमस्कार करण्यास योग्य असणारा भृंगी शिवगण आणि देवगण बरोबर घेऊन त्रिपुरांचा नाश करण्यास लगबगीनें निघाला. (४९) तसाच कृत, विगतवासा ( दिगंबर ), महाकेश, महाज्वर, सौवर्ण, सोमदत्त, सोमपेषणक (५०) प्रकुंड कुंडदंत, कंपन, प्रकंपन, इंद्र, इंदु ! यम, महार्ह, भीमक (५१) तसाच शताक्ष, पंचाक्ष, सहस्राक्ष, महोदर, शतजिव्ह, शतास्य, कंटक, कटघातन (५२) तसाच ब्राह्मणहो, द्विशिख, त्रिशिख, पंचशिख, मुंड, अर्धमुंड, दीर्घास्य, पिशाचास्य, पिनाकधृक् (५३) तसाच पिप्पलायतन, अंगारकाशन, शिथिल, शिथिलास्य अक्षपाद, अज, कुह, अजवक्त्र, हयवक्त्र, गजवक्त्र, ऊर्ध्ववक्त्र (५४) इत्यादिक ज्यांचें नांव गांव देखील सांगतां येणार नाहीं असे असंख्यात शिवगण त्या पार्वती परमेश्वराबरोबर त्रिपुरांवर चालून गेले. (५५) हजारोहजार ब्रह्मचर्यव्रत पाळणारे रुद्रगण महादेवाबरोबर होते

रुद्राणामूर्ध्वरेतसाम् ॥ समावृत्य महादेवं तथा सिद्धा महेश्वरम् ॥ जग्मुः पुरत्रयं दग्धुं कोटिकोटिगणैर्वृताः ॥५५॥ वृत्तम् ॥ तं देवमीशं त्रिपुरं निहंतुं तदा तु देवेंद्ररविप्रकाशाः ॥ गजैर्हयैः सिंहवरै रथैश्च वृषैर्युयुस्ते गणराजमुख्याः ॥५६॥ हलैश्च शूलैश्च महामुसण्डैर्गिरींद्रकूटैर्गिरिसन्निभास्ते ॥ ययुः पुरस्ताद्धि महेश्वरस्य सुरेश्वरा भूतगणेश्वराश्च ॥५७॥काली तथा कालनिशाप्रकाशं शूलं कपालाभरणा करेण॥ प्रकंपयंती च तदा सुरेंद्रान्महासुरासृङ्मधुपानमत्ता॥५८॥ मत्तेभयाना मदलोलनेत्रा मत्तैः पिशाचैश्च गणैश्च मत्तैः ॥ मत्तेभचर्मांवरवेष्टितांगी यान्ती बभौ सा पुरतः पुरारेः ॥५९॥ तां सिद्धगन्धर्वपिशाचयक्षविद्याधराहींद्रसुरेंद्रमुख्याः ॥ प्रणेमुरुच्चैरभितुष्टुवुस्ते जयेति देवीमिव शैलपुत्रीं ॥६०॥ वृत्तं॥ दुर्गादुर्गमृगाधिपा दुरतिगा दोर्दण्डवृन्दैः

---

तसेच कोट्यावधि सिद्धगण त्रिपुरांचा नाश करण्यास शिवाबरोबर चालले. (५६) त्यावेळीं त्रिपुरांचा नाश करण्याकरितां इंद्र आणि सूर्य ह्याप्रमाणें तेजःपुंज दिसणारे मुख्य मुख्य प्रमथगण कोणी हत्तीवर कोणी घोड्यांवर कोणी उत्तम उत्तम सिंहावर व कोणी उत्तम रथांत बसून श्रीशिवाबरोबर जात होते. (५७) पर्वतावरील उंच उंच शिखरांमुळें जसे पर्वत शोभावे तसेच शिवापुढें चालणारे मुख्य मुख्य देव आणि भूतगणांतील मुख्य मुख्य लोक आपापल्या हातांतील नांगरांमुळें, शूलांमुळें आणि मुद्गरांमुळें शोभत होते. (५८) तशीच काली ही आपल्या एका हातांत कालरात्रीसारखा प्रखर शूल घेऊन व आपल्या अंगावर नृकपालांचे अलंकार घालून शिवापुढें चालत होती तिला पाहतांच देव थरथर कांपत होते दैत्यांचें रक्तरूप मद्य पिऊन ती अगदीं धुंद झाल्यासारखी दिसत होती. (५९) उन्मत्त झालेल्या हत्तीसारखी ती हळू हळू चालत होती, दारूचा कैफ चढल्याप्रमाणें तिचे डोळे धुंद झाले होते, तिच्या बरोबर उन्मत्त झालेले पिशाच व शिवगण अनेक होते, माजलेल्या हत्तीचें कातडें घेऊन तिनें आपल्या अंगाभोंवतीं गुंडाळलें होतें. तिजमुळें शिवसेनेला अलौकिक शोभा आली होती. (६०) सिद्ध, गंधर्व, पिशाच, यक्ष, विद्याधर, सर्वश्रेष्ठ व मुख्य मुख्य देव वगैरे सर्व त्या भद्रकालीला नमस्कार करूं लागले. व देवी पार्वतीचा जसा सर्वांनीं जयजयकार करावा; तसा सर्वांनीं भद्रकालीचा मोठ्यानें जयजयकार करून तिची स्तुति केली. (६१) भयंकर सिंह जिचें वाहन आहे, जी सर्वांस अजिंक्य आहे, जिनें आपल्या

शिवा बिभ्राणांकुशशूलपाशपरशूंश्चक्रासिशंखायुधम् ॥ तत्रादित्यसहस्त्र वन्हिसदृशैर्नेत्रैर्दहन्ती पुरं बालाऽबालपराक्रमा भगवती दैत्यान्प्रहर्तुं ययौ ॥६१॥ मातरः सुरपुरारिसूदनाः सादरं सुरगणैः सुपूजिताः॥ मातरं ययुरथादिवाहनैः स्वैर्गणैर्ध्वजवरैः समन्ततः ॥६२॥ मातरः सर्वलोकानां गणानां चैव मातरः ॥ भूतानां मातरश्चैव जग्मुर्देवस्य पृष्ठतः ॥६३॥ भाति मध्ये गणानां च रथमध्ये महेश्वरः ॥ नभःस्यामलनक्षत्रतारामध्य इवोडुराट् ॥६४॥ रराज देवी देवस्य गिरिजा पार्श्वसंस्थिता॥ प्रभा प्रभावहा गौरी भवस्येव जगन्मयी ॥६५॥ शुभावती तदा देव्याः पार्श्वसंस्था विभाति सा ॥ चामरासक्तहस्ताग्रा सहंसांबुजवल्लिका ॥६६॥ वृत्तं॥ अथ विभाति विभोर्विशदं वपुर्भसितभासितमंबिकया तया॥

---

हातांच्या समुदायांनीं अंकुश, शूल, पाश, परशु, चक्र, तरवार शंख वगैरे आयुधें धरिलीं आहेत, जिला शिवा ह्मणतात, जी वयानें लहान दिसत होती तरी मोठ्या शूर मनुष्यांचा सहज पराभव करील इतकी पराक्रमी होती, ती परमेश्वरी पार्वती हजार सूर्यांसारख्या व विस्तवासारख्या लाल दिसणाऱ्या डोळ्यांनीं सर्व जगास जाळतेच कीं काय असें भासवीत त्रिपुरांस मारण्यास निघाली. (६२) त्रिपुरांचा नाश करण्यास समर्थ असणाऱ्या व देवांच्या समुदायांस पूजा करण्यास योग्य अशा मातृका ज्यांवर उत्तम ध्वज फडकतात अशा रथ वगैरे आपापल्या वाहनांत बसून आपापले गण बरोबर घेऊन त्रिलोकजननी पार्वती हिच्या आजूबाजूनें त्रिपुरांचा नाश करण्यास निघाल्या. (६३) सर्व देवांच्या माता, सर्व शिवगणांच्या माता आणि सर्व भूतांच्या माता सर्वजणी मिळून शिवाच्या मागोमाग चालल्या. (६४) असो त्यावेळीं आकाशाच्या मध्यभागीं स्वच्छ नक्षत्रांच्या समुदायांत जसा चंद्र शोभावा, तसे सर्व शिवगणांच्या मध्यें रथांत बसलेले श्रीशिव शोभले. (६५) देवी पार्वती ही महादेवाच्या बाजूस होती. ती परमेश्वराची मूर्तिमंत त्रैलोक्यस्वरूप प्रभाच अशी शोभली. (६६) पार्वतीच्या बाजूकडे शुभावती नांवाची तिची परिचारिका ( दासी ) उभी असून ती आपल्या हातानें पार्वतीवर चवरी वारीत होती. ती एखाद्या कमलाचे वेलीवर हंस बसले ह्मणजे ती जशी दिसावी, तशी दिसत होती. (६७) शंकरांनीं आपल्या अंगास पांढरी शुभ्र विभूति लाविली होती, आणि जवळ पार्वती उभी होती, त्यामुळें त्यांचें अंग वीज चमकत असलेल्या पांढऱ्या ढगावर बसलेल्या इंद्राचें अंग जसें शोभावें तसें

सितमिवाभ्रमहो सह विद्युता नभसि देवपतेः परमेष्ठिनः ॥६७॥ भातींद्रधनुषाऽऽकाशं मेरुणैव यथा जगत् ॥ हिरण्यधनुषा सौम्यं वपुः शंभोः शशिद्युति ॥६८॥ सितातपत्रं रत्नांशुमिश्रितं परमेष्ठिनः ॥ यथोदये शशांकस्य भात्यखण्डं हि मण्डलम् ॥६९॥ सुदुकूला शिवे रक्ता लंविका भाति मालिका ॥ छत्रान्ते रत्नजाकाशात्पतंतीव सरिद्वरा ॥७०॥वृत्तम्॥ अथ महेंद्रविरिंचिविभावसुप्रभृतिभिर्नतपादसरोरुहः ॥ सह तथा च जगाम तयाम्बया सकललोकहिताय पुरत्रयम् ॥७१॥ तथेंद्रपद्मोद्भवविष्णुमुख्याः सुरा गणेशाश्च गणेशमीशम् ॥ जयेति वाग्भिर्भगवन्तमूचुः किरीटदत्तांजलयः समन्तात् ॥७२॥ ननृतुर्मुनयः सर्वे दण्डहस्ता जटाधराः ॥ ववृषुः पुष्पवर्षाणि खेचराः सिद्धचारणाः ॥७३॥ वृत्तम् ॥ दग्धुं समर्थो मनसा क्षणेन चराचरं सर्वमिदं त्रिशूली ॥ किं त्वत्र दग्धुं त्रिपुरं पिनाकी स्वयं गतश्चात्र गणैश्च सार्द्धं ॥७४॥

---

शोभत होतें. (६८) इंद्रधनुष्यामुळें जसें आकाश शोभावें किंवा मेरुपर्वतामुळें जसें जग शोभावें त्या प्रमाणें हातांतील सुवर्णाच्या धनुष्यामुळें चंद्राप्रमाणें गौरवर्ण असणारें शिवाचें शरीर शोभलें. (६९) चंद्र उगवला ह्मणजे त्याचे सभोंवतीं असणारें गोल गरगरीत मंडल जसें शोभावें; तसें शंकराचे मस्तकावर रत्नांच्या किरणांनीं युक्त असें पांढरें शुभ्र छत्र शोभलें. (७०) छत्राचे आंतील बाजूस एक मोत्यांची माळ लोंबत होती. ती शिवावर आसक्त होऊन आकाशांतून जशी देवगंगेची पांढरी शुभ्र धारा पडावी अशी दिसत होती. (७१) असो अशा समारंभानें इंद्र, ब्रह्मदेव, सूर्य वगैरे मुख्य मुख्य देव ज्याच्या चरणकमलाला नमस्कार करितात असे श्रीशिव पार्वतीसहित त्रैलोक्याचें कल्याण करण्याकरितां त्रिपुरावर गेले. (७२) तेव्हां इंद्र, ब्रह्मदेव, विष्णु वगैरे मुख्य मुख्य देवांनीं आणि प्रमथगणांनीं परमात्मा श्रीशिवाचा विजय असो, असा जयघोष करून आपल्या मस्तकास हात लाऊन नमस्कार केला. (७३) त्यावेळीं दंड हातांत घेणारे व मस्तकावर जटा असणारे मुनीश्वर नाचूं लागले. आकाशांतून विद्याधरांनीं आणि सिद्ध चारणांनीं शिवाचे मस्तकावर पुष्पांचा वर्षाव केला. (७४) ते ब्रह्मदेव इंद्र वगैरे सर्वजण आपआपसांत ह्मणूं लागले कीं, हा अजगव धनुष्य आणि त्रिशूल हातांत घेणारा भगवान् शंकर मनांत आल्याबरोबर एका क्षणांत हें सर्व स्थावर जंगम विश्व जाळून टाकण्यास समर्थ असतां, हा स्वतः इतके शिवगण बरोबर घेऊन त्रिपुरांचा नाश करण्यास कशासाठीं आला समजत नाहीं.

रथेन किं चेषुवरेण तस्य गणैश्च किं देवगणैश्च शंभोः ॥ पुरत्रयं दग्धुमलुप्तशक्तेः किमेतदित्याहुरजेंद्रमुख्याः ॥७५॥ मन्ये च नूनं भगवान् पिनाकी लीलार्थमेतत्सकलं प्रकर्तुम् ॥ व्यवस्थितश्चेति तदुन्नता चेदाडंबरेणास्य फलं किमन्यत् ॥७६॥ पुरत्रयस्यास्य समीपवर्ती सुरेश्वरैर्नंदिमुखैश्च नंदी ॥ गणैर्गणेशस्तु रराज दिव्यैर्जगद्रथो मेरुरिवाद्रिशृंगैः ॥७७॥ अथ निरीक्ष्य सुरेश्वरमीश्वरं सगणमद्रिसुतासहितं तदा ॥ त्रिपुररंगरथोपरि संस्थितं सुरगणोऽनुजगाद जयं तदा ॥७८॥ जगत्त्रयं सर्वमिवापरं तत्पुरत्रयं तत्र विभाति सम्यक् ॥ नरेश्वरैश्चैव गणैश्च देवैः सुरेश्वरैश्च त्रिविधैर्मुनींद्राः ॥७९॥ अथाधिज्यं धनुः कृत्वा शर्वः संधाय तं शरम् ॥ युक्त्वा पाशुपतास्त्रेण त्रिपुरं समचिंतयत् ॥८०॥ तस्मिंस्स्थिते महादेवे रुद्रे विततकार्मुके ॥ पुराणि तेन कालेन जग्मुरेकत्वमाशु

---

(७५) ह्या परमेश्वराला रथ तरी कशाला पाहिजे? ह्याला उत्तम बाण तरी कशाला पाहिजे ? ह्याची शक्ति कधींही कमी होत नसल्यानें ह्याला त्रिपुरांचा नाश करण्याचे कामीं मदती करितां शिवगण तरी कशाला पाहिजेत ? आणि देवांचा समुदाय तरी कशाला पाहिजे ? ह्याला कशाचेंही कारण नाहीं. (७६) ते ह्मणाले आह्मांला तर खचित असें वाटतें कीं, परमेश्वर श्रीशिवानें जें हें एवढें अवडंबर दाखविलें आहे तें फक्त मौजेखातर दाखविलें आहे. वास्तविक पाहिलें तर त्याला त्रिपुरांचा संहार करण्यास कोणाचीच मदत नको. (७७) असो पर्वतावरील उंच उंच शिखरांमुळें जसा मेरुपर्वत शोभावा तसा ह्या त्रिपुरांजवळ मोठमोठ्या पराक्रमी देवांमुळें आणि नंदीश्वर वगैरे प्रमथगणांमुळें आनंदी स्वभावाचा, सर्व गणांचा अधिपति व सर्व लोकांचें हित करणारा श्रीशंकर शोभला. (७८) सर्व देवांचा अधिपति परमात्मा श्रीशिव आपल्या प्रमथगणांसहित आणि पार्वतीसहित त्रिपुरांचा संहार करण्याकरितां युद्धभूमीवर उभा राहिलेला पाहून सर्व देवांनीं शिवाचा जयजयकार केला. (७९) मुनीश्वरहो, त्रैलोक्यांत जसे राजे देव आणि प्रमथगण असतात त्याप्रमाणें हल्लीं त्रिपुरांचा नाश करण्यासाठीं राजे देव आणि प्रमथगण एकत्र जमल्यामुळें त्रिपुरें त्रैलोक्यासारखींच दिसूं लागलीं. (८०) मग शंकरांनीं आपलें धनुष्य सज्य करून त्याला बाण लावला व त्यावर पाशुपतास्त्राचा प्रयोग करून तो बाण त्रिपुरावर टाकण्याचा विचार केला. (८१) तो महादेव अशा रीतीनें आपलें धनुष्य सज्य करून त्रिपुरावर बाण सोडतो आहे अशा वेळे-

वै ॥८१॥ एकीभावं गते चैव त्रिपुरे समुपागते॥ बभूव तुमुलो हर्षो देवानां च महात्मनाम् ॥८२॥ ततो देवगणाः सर्वे सिद्धाश्च परमर्षयः॥ जयेति वाचो मुमुचुः संस्तुवन्तो महेश्वरम् ॥८३॥ अथाह भगवान् ब्रह्मा भगनेत्रनिपातनम् ॥ पुष्ययोगेऽपि संप्राप्ते लीलालसमुमापतिं ॥८४॥

ब्रह्मोवाच ॥ स्थाने तव महादेव चेष्टेयं परमेश्वर॥पूर्वदेवाश्च देवाश्च समास्तव यतः प्रभो ॥८५॥ तथापि देवा धर्मिष्ठाः पूर्वदेवाश्च पापिनः ॥ यतस्तस्माज्जगन्नाथ लीलां त्यक्तुमिहार्हसि ॥८६॥ किं रथेन ध्वजेनेश तव दग्धुं पुरत्रयम् ॥ इषुणा भूतसंघैश्च विष्णुना च मया प्रभो ॥८७॥ पुष्ययोगो ह्यनुप्राप्तः पुरं दग्धुमिहार्हसि ॥ यावन्न याति देवेश विप्रयोगं पुराणि वै ॥८८॥ अथ देवो महादेवः सावज्ञं तदवैक्षत ॥

---

लाच तीं त्रिपुरें ( तीन नगरें ) एकेजागीं येऊन मिळालीं, (८२) त्रिपुरें एकजागीं येऊन मिळालेलीं पाहतांच त्या मोठ्या मनाच्या देवांला फारच आनंद झाला. (८३) आणि त्या आनंदामुळें त्या वेळेस सर्व देव, सिद्धलोक, मोठमोठे ऋषीश्वर महादेवाची स्तुति करून, महादेवाचा विजय असो, महादेवाचा विजय असो, असा मोठमोठ्यानें जयघोष करूं लागले. (८४) मग पुष्यनक्षत्राचा योग आल्यावर परमात्मा ब्रह्मदेव दक्षयज्ञांत सूर्यांचे डोळे उपडून काढणाऱ्या उमापति श्रीशिवाला ह्मणाला—

(८५) ब्रह्मदेव ह्मणाला— परमेश्वरा, महादेवा, तुझी ही चेष्टा ( क्रीडा ) योग्यच आहे. कांतर तूं स्वतः सर्व प्राणिमात्रांचा ईश्वर असल्यामुळें तुला देव आणि दैत्य हे दोघेही सारखेच आहेत. (८६) ही गोष्ट अगदीं खरी आहे. तरीपण देव हे धर्मशील आहेत, आणि दैत्य पातकी आहेत, ह्यासाठीं हे त्रैलोक्यपते, तूं ही थट्टा ( क्रीडा ) सोडून दे. (८७) परमेश्वरा, तुला त्रिपुरांचा संहार करावयाकरितां रथ तरी कशाला पाहिजे आणि ध्वज कशाला पाहिजे? तुझ्या हातांत बाण आणि तुझ्या मदतीसाठीं भूतांचा समुदाय, श्रीविष्णु, आणि मी हे कशाला पाहिजेत? तुला कशाचीच आवश्यकता नाहीं. (८८) ह्यावेळीं पुष्यनक्षत्राचा योग आला आहे ह्यासाठीं आतांचें आतां जोंपर्यंत एकत्र मिळालेलीं तीन नगरें पुनः दूर दूर झालीं नाहींत तोंपर्यंतच त्यांस जाळून टाक. एकवेळ तीं दूर दूर झालीं ह्मणजे त्यांचा नाश करितां येणार नाहीं. (८९) असें ब्रह्मदेवाचें बोलणें ऐकून त्रिनेत्र परमेश्वर महादेवांनीं तिरस्कार मुद्रेनें त्रिपुरांकडे पाहिलें

पुरत्रयं विरूपाक्षस्तत्क्षणं भस्म वै कृतम् ॥८९॥ सोमस्तु भगवान्विष्णुः
कालाग्निर्वायुरेव च॥ शरे व्यवस्थिताः सर्वे देवमूचुः प्रणम्य तम् ॥९०॥
दग्धमप्यथ देवेश वीक्षणेन पुरत्रयम् ॥ अस्मद्धितार्थं देवेश शरं मो-
क्तुमिहार्हसि ॥९१॥ अथ संमृज्य धनुषो ज्यां हसन् त्रिपुरार्दनः ॥ मु-
मोच बाणं विप्रेंद्रा ह्याकृष्याकर्णमीश्वरः ॥९२॥ तत्क्षणात्त्रिपुरं द-
ग्ध्वा त्रिपुरांतकरः शरः ॥ देवदेवं समासाद्य नमस्कृत्वा व्यवस्थितः
॥९३॥ तदा पुरत्रयं दग्धं दैत्यकोटिशतैर्वृतम् ॥ इषुणा तेन कल्पान्ते
रुद्रेणेव जगत्त्रयम् ॥९४॥ न किंचिदब्रुवन् देवास्सेन्द्रोपेंद्रा गणेश्वराः॥
भयाद्देवं निरीक्ष्यैव देवीं हिमगिरीन्द्रजाम् ॥९५॥ दृष्ट्वानीकं तदा भीतं
देवानां देवपुंगवः ॥ किन्वित्याह तदा देवान् प्रणेमुस्ते समन्ततः॥९६॥
ववंदिरे नन्दिनमिंदुभूषणं ववंदिरे पर्वतराजसम्भवाम् ॥ व-
वृत्तम् ॥

---

आणि त्यांस लागलेंच जाळून टाकिलें. (९०) आपल्या सामर्थ्यानें बाणास जास्त सामर्थ्य येऊन त्रिपुरांचा नाश व्हावा, ह्मणून परमेश्वर चंद्र, विष्णु, कालाग्नि आणि वायु हे अगोदरच शिवाच्या बाणांत गुप्तरूपानें जाऊन बसले होते असो मग सर्व देव शिवास नमस्कार करून ह्मणाले. (९१) परमेश्वरा, देवाधिदेवा, तुझ्या पाहण्यानेंच त्रिपुरांचा नाश झाला ही गोष्ट खरी आहे तरीपण सर्व देवांच्या कल्याणासाठीं तूं हा बाण त्रिपुरांवर सोड. (९२) ब्राह्मणहो, अशी सर्व देवांची विनंति ऐकून शिवांनीं आपल्या धनुष्यास तो बाण लावून व धनुष्याची दोरी कानापर्यंत ओढून त्रिपुरांचा नाश होण्यासाठीं तो बाण त्रिपुरांवर सोडला. (९३) तो बाण त्रिपुरांचा पूर्ण नाश करणारा होता, त्या बाणानें त्रिपुर लागलेंच जळून गेलें; आणि तो बाण पुनः शंकराकडे परत येऊन शंकरांपुढें हात जोडून उभा राहिला. (९४) त्या त्रिपुरांत कोट्यावधि दैत्य लोक राहत होते, तरी तें त्रिपुर शंकराच्या एका बाणानें जसें प्रळयकाळीं प्रळयाग्नीनें त्रैलोक्य एका क्षणांत जळून जावें तसें जळून गेलें. (९५) तो प्रकार पाहतांच सर्वजण भयानें अगदीं घाबरून गेले इंद्र, विष्णु वगैरे देव आणि सर्व प्रमथगण शिवपार्वतीच्या मुखाकडे पाहूं लागले परंतु कोणास एक अक्षर बोलण्यासही धैर्य होईना. (९६) सर्व देवांचे समुदाय असे भयभीत झालेले पाहून तुह्मी कां घाबरलां, असें शिवांनीं ह्मटल्यावर, सर्व देवांस थोडेंसें धैर्य येऊन ते जागचेजागींच शिवास नमस्कार करूं लागले. (९७) त्या देवांनीं मस्तकावर चंद्राचें भूषण असणाऱ्या नंदीस नमस्कार केला, त्यानें हिमालयाचे मुलीस (पार्वतीस) नमस्कार केला, त्यांनीं कार्तिकेयास नम-

वन्दिरे चाद्रिसुतासुतं प्रभुं ववन्दिरे देवगणा महेश्वरम् ॥९७॥ तुष्टाव हृष्टहृदयो ब्रह्मा देवैः समाहितः ॥ विष्णुना च भवं देवं त्रिपुरारातिमीश्वरम् ॥९८॥

ब्रह्मोवाच ॥ प्रसीद देवदेवेश प्रसीद परमेश्वर ॥ प्रसीद जगतां नाथ प्रसीदानन्दनिर्भर ॥९९॥ आत्मतत्वोपरिष्ठाय विद्यातत्वाय ते नमः ॥ शिवाय शिवतत्वाय चाघोराय नमो नमः ॥१००॥ अनिर्देश्याय नित्याय विद्युद्वलयरूपिणे ॥ अग्निवर्णाय देवाय चांबिकार्धशरीरिणे ॥१०१॥ श्यामरक्ताय रक्तानां मुक्तिदायामराय च ॥ ज्येष्ठाय रुद्ररूपाय कामाय वरदाय च ॥१०२॥ गगनेशाय देवाय स्वर्गेशाय नमो नमः ॥ मर्त्येशाय च पातालनरकेशाय वै नमः ॥१०३॥ सहस्रशिरसे तुभ्यं स-

---

स्कार केला, व त्या सर्वांनीं श्रीशिवासही नमस्कार केला. (९८) त्रिपुरांचा नाश झाल्यामुळें ब्रह्मदेवास मोठा संतोष झाला, त्या संतोषानें ब्रह्मदेवानें श्रीविष्णूसहित आणि सर्व देवांसहित श्रीशिवाची स्तुति करण्यास आरंभ केला—

(९९) ब्रह्मदेव ह्मणाला— देवाधिदेवा तूं आह्मांवर प्रसन्न हो, परमेश्वरा, तूं आमच्यावर कृपा कर. तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस, तूं आमच्यावर कृपा कर. तूं नेहमीं आनंदांत निमग्न असतोस, तूं आह्मांवर कृपा कर. (१००) तूं आत्मतत्वाच्यावर राहतोस ( तूं आत्मज्ञानी आहेस ), तूं विद्यातत्व आहेस तुला नमस्कार असो. तुला शिव ह्मणतात, तूं शिवतत्वस्वरूप आहेस, तुला अघोर ह्मणतात. तुला नमस्कार असो नमस्कार असो. (१०१) तूं अमुक तऱ्हेचा आहेस असें सांगतां येत नाहीं, तूं नित्य आहेस, तूं विजेसारखा तेजस्वी आहेस, तूं अग्नीसारखा सतेज आहेस, तुला परमेश्वर ह्मणतात, तुझ्या अर्धांगाला पार्वती आहे. (१०२) तुला नीललोहित असें ह्मणतात, जे लोक तुझी एकनिष्ठपणानें सेवा करितात त्यांस तूं मोक्ष देतोस, तुला मरण नाहीं, तूं सर्वांहून थोर आहेस. तूं रुद्रस्वरूप आहेस, तुला काम ह्मणतात, तूं वर देणारा आहेस. (१०३) तूं आकाशाचा अधिपति आहेस, तुला देव ह्मणतात, तूं स्वर्गाचा अधिपति आहेस, तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो. तूं मृत्युलोकाचा अधिपति आहेस, पाताळ लोकाचा आणि नरकाचा अधिपति आहेस, तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो. (१०४) तुला एक हजार मस्तकें आहेत, तुला नमस्कार असो. तुला एक हजार डोळे आहेत, तुला नमस्कार असो, तुला एक हजार पाय

हस्राक्षाय ते नमः ॥सहस्रपादयुक्ताय शर्वाय परमेष्ठिने ॥१०४॥ सदाशिवाय शांताय महेशाय पिनाकिने ॥ सर्वज्ञाय वरेण्याय सद्योजाताय ते नमः ॥१०५॥ अघोराय नमस्तुभ्यं वामदेवाय वै नमः ॥ तत्पुरुषाय नमस्तुभ्यमीशानाय नमो नमः ॥ अनंतेशाय सूक्ष्माय ह्युत्तमाय नमोऽस्तुते ॥१०६॥ नमस्त्रिमूर्तये तुभ्यं श्रीकण्ठाय शिखंडिने ॥ अनंतासनसंस्थाय चानंतायान्तकारिणे ॥१०७॥विमलाय विशालाय विमलांगाय ते नमः ॥ विमलासनसंस्थाय विमलार्थार्थरूपिणे ॥१०८॥ योगपीठान्तरस्थाय योगिने योगदायिने ॥ योगिनां हृदि संस्थाय सदानीवारशूकवत् ॥१०९॥ प्रत्याहाराय ते नित्यं प्रत्याहाररताय ते ॥ प्रत्याहाररतानां तु प्रतिष्ठासंस्थिताय च ॥११०॥ धारणाय नमस्तुभ्यं धारणाभिरताय ते॥धारणाभ्यासयुक्तानां पुरस्तात्संस्थिताय च ॥१११॥ध्याना-

---

आहेत, तुला शर्व ह्मणतात, तुला परमेष्ठी ह्मणतात, तुला नमस्कार असो. (१०५) तुला सदाशिव ह्मणतात, तुझा स्वभाव शांत आहे, तूं महेश्वर आहेस, तुझ्या हातांत अजगव नांवाचें धनुष्य आहे, तूं सर्वज्ञ आहेस, तूं सर्वांहून श्रेष्ठ आहेस, तुला सद्योजात असें ह्मणतात, तुला नमस्कार असो. (१०६) तुला अघोर ह्मणतात तुला नमस्कार असो, तुला वामदेव ह्मणतात, तुला नमस्कार असो, तुला तत्पुरुष ह्मणतात, तुला नमस्कार असो, तुला ईशान ह्मणतात, तुला नमस्कार असो, तूं शेषसर्पांचा अधिपति आहेस, तूं सूक्ष्म आहेस, तूं सर्वांहून उत्तम आहेस, तुला नमस्कार असो. (१०७) तूं त्रिमूर्ति आहेस तुला नमस्कार असो, तुला श्रीकंठ आणि शिखंडी असें ह्मणतात, तूं सर्पांचें आसन करून त्यावर वसतोस, तुझा अंत लागत नाहीं. तूं जगाचा संहार करितोस. (१०८) तूं विमल (निष्पाप) असून विशाल आहेस, तुझें अंग स्वच्छ आहे, तुला नमस्कार असो तूं स्वच्छ आसनावर बसतोस. तूं विमलार्थ व अर्थस्वरूप आहेस. (१०९) तूं योगपीठावर वसतोस. तूं योगसाधन करणारा आहेस, तूं योगाचें ज्ञान करून देतोस, कणसांत जसें धान्य रहावें तसा तूं योगीलोकांच्या हृदयकमळांत राहतोस. (११०) तूं प्रत्याहारस्वरूप आहेस, तुला नेहमीं प्रत्याहाराची अभिरुचि आहे. तूं प्रत्याहाराची आवड करणाऱ्यांची प्रतिष्ठा ठेवणारा आहेस. (१११) तूं धारणास्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. तूं धारणेची आवड करितोस, तुला नमस्कार असो तूं धारणेचा अभ्यास करणाऱ्यांच्या अग्रभागीं (पुढें) वसतोस, तुला नमस्कार असो. (११२) तूं ध्यानस्वरूप आहेस, तूं ध्यानाच्या द्वारानें यथार्थ

य ध्यानगम्याय ध्यानाध्यानाय ते नमः ॥ ध्येयाय ध्येयगम्याय ध्येयाध्येयाय ते नमः॥ध्येयानामपि ध्येयाय नमो ध्येयतमाय ते॥११२॥ समाधानाधिगम्याय समाधानाय ते नमः॥ समाधानरतानां तु निर्विकल्पार्थरूपिणे ॥११३॥ वृत्तम्॥ दग्धोध्दतं सर्वमिदं त्वयाद्य जगत्त्रयं रुद्र पुरत्रयं हि ॥ कस्तोतुमिच्छेत्कथमीदृशं त्वां स्तोष्येहि तुष्टाय शिवाय तुभ्यम् ॥११४॥ भक्त्याथ तुष्ट्याद्भुतदर्शनाच्च मत्ताः प्रमत्ता अपि देवदेव ॥ एते सुराः सिद्धगणाश्च सर्वे गृण्हन्ति देव प्रणिपत्य तुभ्यम् ॥११५॥ निरीक्षणादेव विभो प्रदग्धं पुरत्रयं दग्धजगत्त्रयं च ॥ लीलालसेनांबकवीक्षणेन दग्धं किलेषुश्च तदा प्रमुक्तः ॥११६॥ कृतो

---

रीतीनें जाणतां येण्यासारखा आहेस. तूं ध्यानस्वरूप असून अध्यानस्वरूपही आहेस, तुला नमस्कार असो. तूं ध्यान करण्यासारखा आहेस. तुझें वास्तविक स्वरूप ध्यानाच्या द्वारानें समजतें. तूं ध्यानकरितां येण्यासारखा आहेस व ध्यान करितां येण्यासारखा नाहींस. तुला नमस्कार असो. ध्यान करण्यासारखे जे कोणी आहेत ते देखील तुझें ध्यान करितात, अतिशय उत्तम अशी ध्यान करण्यासारखी वस्तु ह्मटली तर तूंच आहेस. तुला नमस्कार असो. (११३) तूं समाधानाच्या द्वारानें यथार्थरीतीनें जाणला जातोस, तूं समाधानस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. तूं नेहमीं समाधानांत निमग्न असतोस, तूं निर्विकल्प आहेस. (११४) परमेश्वरा, ह्या त्रिपुरांच्या त्रासामुळें हें सर्व त्रैलोक्य अगदीं जळाल्यासारखें झालें ( गांजून गेलें ) होतें, त्या त्रिपुरांचा नाश करून तूं त्रैलोक्यास संकटांतून वर काढिलेंस अशा रीतीचीं अलौकिक कृत्यें करणाऱ्या तुझें यथार्थ वर्णन कोणास करितां येईल! तरीपण प्रसन्न आणि शांतस्वरूप अशा तुझें मी यथामतीनें स्तवन करितों.(११५) हे परमेश्वरा, तुजवरील भक्तीमुळें, तूं दिलेल्या सुखामुळें आणि तुझें दर्शन होणें अतिशय प्रयासाचें काम असतां तें सहज रीतीनें झाल्यामुळें, हे सर्व देव कसे आनंद समुद्रांत बुडून जाऊन कसे आनंदी दिसत आहेत पहा. हे सर्व देव आणि सिद्ध लोक तुला नमस्कार करून तुझी स्तुति करीत आहेत. (११६) परमेश्वरा, तुझें काय अलौकिक सामर्थ्य सांगावें पहा ! सर्व जगाला ज्यानें अगदीं त्रासवून सोडलें होतें, तें दैत्यांचें त्रिपुर तूं सहज रीतीनें त्याकडे आपली दृष्टि फेंकून आपल्या तिसऱ्या डोळ्यांतील अग्नीनें जाळून टाकिलेंस. आणि त्रिपुरांचा नाश झाल्यावर उगीच निमित्ताला मात्र बाण सोडलास, बाण टाकण्यापूर्वींच त्रिपुरें जळून गेलीं होतीं. (११७) ह्या सर्व देवांनीं मिळून मोठ्या प्रयासानें त्रिपुरांचा

रथश्चेषुवरश्च शुभ्रं शरासनं ते त्रिपुरक्षयाय॥अनेकयत्नैश्च महच्च तुभ्यं फलं न दृष्टं सुरसिद्धसंघैः ॥११७॥रथो रथी देववरो हरिश्च रुद्रः स्वयं शक्रपितामहौ च॥त्वमेव सर्वं भगवन्कथं नु तोष्ये ह्यतोष्यं प्रणतोऽस्मि मूर्ध्ना ॥११८॥ अनन्तपादस्त्वमनन्तबाहुरनन्तमूर्धान्तकरः शिवश्च ॥ अनन्तमूर्तिः कथमीदृशं त्वां तोष्ये ह्यतोष्यं प्रणतोऽस्मि मूर्ध्ना ॥११९॥ त्वमष्टमूर्तिस्त्वमनेकमूर्तिस्त्वमिष्टदः सर्वसुरासुराणां ॥ अनिष्टदश्चेष्ट-विमर्दनश्च स्तोष्ये ह्यतोष्यं कथमीदृशं त्वाम् ॥१२०॥ नमो नमः सर्व-विदे शिवाय रुद्राय शर्वाय शिवाय तुभ्यम्॥स्थूलाय सूक्ष्माय सुसूक्ष्म-सूक्ष्मात् सूक्ष्माय सूक्ष्मार्थविदे विधात्रे ॥१२१॥ स्रष्ट्रे नमः सर्वसुरासु-राणां हर्त्रे च भर्त्रे जगतां विधात्रे॥ नेत्रे सुराणामसुरेश्वराणां धात्रे प्र-

---

नाश होण्यासाठीं रथ तयार केला उत्तम वाण तयार केला, व पांढरें शुभ्र धनुष्य तयार केलें. परंतु ह्यांपैकीं तुला एकाही वस्तूची जरूर लागली नाहीं. (११८) परमेश्वरा, रथही तूंच, रथांत बसणाराही तूंच, महादेवही तूंच, श्रीविष्णुही तूंच, रुद्रही स्वतः तूंच आहेस, इंद्रही तूंच असून ब्रह्मदेवही तूंच आहेस. परमेश्वरा, सर्व कांहीं तूंच आहेस. तुझें स्तोत्र करितां येणेंच शक्य नाहीं, अशा तुझें मी स्तोत्र तरी कसें करूं ? मी तुला जमिनीवर मस्तक ठेवून नमस्कार करितों. (११९) तुला अनेक पाय आहेत, तुला अनेक हात आहेत, तुला अनेक मस्तकें आहेत, आणि अनेक हात आहेत. तुला शिव ह्मणतात. तुझीं अनेक स्वरूपें आहेत. तुझी स्तुति करितां येणेंच मला शक्य नाहीं. अशा तुझी मी स्तुति तरी कशी करूं ? मी जमिनीला मस्तक लावून तुला नमस्कार करितों. (१२०) तूं अष्टमूर्ति आहेस, तुझीं अनेक स्वरूपें आहेत. तूं सर्व देवदैत्यांचे मनोरथ पूर्ण करितोस. तूं दुःख देणारा आहेस, व सुखाचा नाश करणारा आहेस. अशा तुझें मला स्तोत्र कसें करितां येईल ? (१२१) तूं सर्वज्ञ आहेस तुला नमस्कार असो, तुला शिव, रुद्र, शर्व अशीं अनेक नांवें आहेत त्या तुला ( शिवाला ) नमस्कार असो. तूं स्थूल आहेस, तूं सूक्ष्म आहेस, तूं अतिशय सूक्ष्म वस्तूंहूनही सूक्ष्म आहेस. तुला सूक्ष्मार्थाचें ज्ञान आहे. तूं ब्रह्मदेव आहेस तुला नमस्कार असो. (१२२) परमेश्वरा, तूं देवांस आणि दैत्यांस उत्पन्न केलेस. तूं सर्व जगाचा संहार करितोस व सर्व जगाचें रक्षण करितोस. तूं विधाता आहेस. तूं देवांचा आणि दैत्यांचा अधिपति ( नियंता ) आहेस. सर्व देवदैत्य तुझ्या आज्ञेंत चालतात. तूं उत्पन्नकर्ता आहेस, तूंच शासन करणारा आहेस फार काय परंतु माझा ( ब्रह्मदे-

शास्त्रे मम सर्वशास्त्रे ॥१२२॥ वेदान्तवेद्याय सुनिर्मलाय वेदार्थविद्भिः सततं स्तुताय ॥ वेदात्मरूपाय भवाय तुभ्यमन्ताय मध्याय सुमध्यमाय ॥१२३॥ आद्यन्तशून्याय च संस्थिताय तथात्वशून्याय च लिंगिने च ॥ अलिंगिने लिंगमयाय तुभ्यं लिंगाय वेदादिमयाय साक्षात्॥१२४ रुद्राय मूर्ध्नो विनिकृन्तनाय ममादिदेवस्य च यज्ञमूर्तेः ॥ विदोत्तमांगं मम कृत्तमीश दृष्टं च भूमौ करजाग्रकोट्या ॥१२५॥ अहो विचित्रं तव देवदेव विचेष्टितं विश्वसुरासुरेश॥देहीव देवैः सह देवकार्यं करिष्यसे निर्गुणतत्वरूप ॥१२६॥ एकं स्थूलं सूक्ष्ममेकं सुसूक्ष्मं मूर्तामूर्तं मूर्तमेकं ह्यमूर्तम् ॥ एकं दृश्यं वाङ्मयं चैकमीश ध्येयं चैकं तत्वमत्राद्भुतं ते ॥१२७॥ स्वप्ने दृष्टं यत्पदार्थं ह्यलक्ष्यं नूनं शंभो भाति

---

वाचा ) देखील तूंच शास्ता ( आज्ञेंत वागविणारा ) आहेस. (१२३) तूं वेदान्तशास्त्राच्या द्वारानें जाणण्यासारखा आहेस. तूं अतिशय निष्पाप स्वभावाचा आहेस. वेदार्थ जाणणारे लोक तुझी नेहमीं स्तुति करितात, तूं वेदस्वरूप आहेस. तुला भव ह्मणतात; अंत आणि मध्यही तूंच आहेस, तुझी कंबर फार चांगली आहे, त्या तुला नमस्कार असो.(१२४) तुला जन्म नाहीं व मरण नाहीं तूं उत्तम प्रकारानें जगांत राहिला आहेस. तसाच तूं अशून्य ( साकार ) असून लिंगी आहेस व अलिंगी आहेस, तूं लिंगस्वरूप आहेस, तूं लिंगच आहेस, तूं प्रत्यक्ष वेदस्वरूप आहेस. तुला नमस्कार असो. (१२५) परमेश्वरा, मी जरी सर्व देवांचा मूळपुरुष आहे, यज्ञस्वरूप आहें व सर्वज्ञ आहें. तरी तूं माझें मस्तक आपल्या नखांनीं तोडलेंस, त्यामुळें तें जमिनीवर पडलेलें मीं पाहिलें. त्या माझें मस्तक तोडणाऱ्या रुद्रस्वरूप अशा तुला नमस्कार असो. (१२६) हे त्रैलोक्यपते तूं देवांचा व दैत्यांचा अधिपति आहेस, हे देवाधिदेवा तुझें चरित्र खरोखर अलौकिक आहे, तूं देहधारी मनुष्याप्रमाणें सर्व देवांच्या बरोबर प्रकटरूपानें येऊन त्यांचें काम करितोस तरी वास्तविक पाहतां निराकाररूप आहेस. (१२७) तूं एक स्थूल आहेस ( तुझ्यापेक्षां ज्यास्त स्थूल कोणी नाहीं ), तूंच एक सूक्ष्म आहेस (तुझ्यापेक्षां ज्यास्त सूक्ष्म कोणी नाहीं), तूं फारच सूक्ष्म आहेस. तूं साकार असून निराकार आहेस, तूं एकटाच साकार आहेस, तूं एकटाच निराकार आहेस. तूंच एक पाहण्यासारखा ( दिसणारा ) आहेस, परमेश्वरा तूंच शब्दस्वरूप आहेस, तुझेंच एक तत्व ध्यान करण्यासारखें आहे, ही मोठी चमत्कारिक गोष्ट आहे. (१२८) परमेश्वरा, श्रीशिवा, न दिसणाराही पदार्थ जसा एखादेवेळीं स्वप्नांत

मन्ये तवापि ॥ मूर्तिर्नोचेदेवमीशान देवैर्लक्ष्यं यत्नैरप्यलक्ष्यं कथं नु ॥१२८॥ देवाः क्व देवेश तव प्रभावो वयं क्व भक्तिः क्व तव स्तुतिश्च ॥ तथापि भक्त्या विलपन्तमीश पितामहं मां भगवन्क्षमस्व ॥१२९॥

सूत उवाच ॥ य इदं शृणुयाद्द्विजोत्तमा भुवि देवं प्रणिपत्य वा पठेच्च ॥ स च मुंचति पापबंधनं भवभक्त्या पुरशासितुस्स्तवम् ॥१३०॥ श्रुत्वा च भक्त्या चतुराननेन कृतं भवः शैलसुतां निरीक्ष्य ॥ पितामहं प्राह महानुभावो महाभुजो मंदरशृंगवासी ॥१३१॥

भगवानुवाच ॥ स्तवेनानेन तुष्टोऽस्मि तव भक्त्या च पद्मज ॥ वरान् वरय भद्रं ते देवानां च यथेप्सितान् ॥१३२॥ ततः प्रणम्य देवेशं भगवान्पद्मसंभवः ॥ कृतांजलिपुटो भूत्वा प्राहेदं प्रीतमानसः ॥१३३॥

ब्रह्मोवाच ॥ भगवन् देवदेवेश त्रिपुरान्तक शंकर ॥ त्वयि भक्तिं परां

---

स्पष्ट दिसतो, तसेंच शंकरा, तुझें खरोखर कधींही दृष्टीस न पडणारें स्वरूप दृष्टीस पडलें असें वाटतें. कांतर, परमेश्वरा तुला जरी आकारच नाहीं तरी मोठ्या प्रयत्नानें कां होईना परंतु तुझें स्वरूप देवांच्या दृष्टीस पडावयास योग्य आहे असें असतां तें तुझें रूप अलक्ष्य ( न दिसावयास योग्य ) कसें होईल ? (१२९) हे देवाधिदेवा, शंकरा सर्व देव कोणीकडे ? तुझा पराक्रम कोणीकडे ? आह्मी कोणीकडे ? भक्ति कोणीकडे ? आणि तुझी स्तुति कोणीकडे ? तरीपण परमेश्वरा तूं सर्वगुण संपन्न आहेस, हा मी ब्रह्मदेव भक्तीमुळें कांहींतरी वडवड करीत आहें असें समजून माझ्या अपराधांची मला क्षमा कर.

(१३०) सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, जो कोणी मनुष्य हें ब्रह्मदेवानें केलेलें शंकराचें स्तवन श्रवण करील किंवा शिवास नमस्कार करून स्वतः वाचील त्याचें पाशबंधन शंकराच्या कृपेमुळें तुटून जाऊन, तो मुक्त होईल. (१३१) ब्रह्मदेवानें भक्तिभावानें अशी केलेली स्तुति ऐकून पार्वतीच्या तोंडाकडे पाहून ते अलौकिक सामर्थ्यवान् व मंदरपर्वताच्या शिखरावर राहणारे श्रीशंकर ब्रह्मदेवास ह्मणूं लागले.

(१३२) शिव ह्मणाले— ब्रह्मदेवा, तूं जी माझी स्तुति केलीस त्यामुळें मी तुजवर प्रसन्न आहें. तुला स्वतःला किंवा इतर देवांस मजपासून काय वर पाहिजे असेल तो मागून घे. मी वर देण्यास तयार आहें. (१३३) असें शिवाचें अभयवचन ऐकून ब्रह्मदेवास मोठा संतोष झाला. नंतर तो आपले दोन्ही हात जोडून शिवास ह्मणाला.

(१३४) ब्रह्मदेव ह्मणाला—देवाधिदेवा, तूं सर्वगुणसंपन्न आहेस. तूं त्रिपुरांचा

मेऽद्य प्रसीद परमेश्वर ॥१३४॥ देवानां चैव सर्वेषां त्वयि सर्वामरेश्वर ॥ प्रसीद भक्ति देवेश सारथ्यं चैव सर्वदा ॥१३५॥ जनार्दनोऽपि भगवान् नमस्कृत्य महेश्वरम् ॥ कृतांजलिपुटो भूत्वा प्राह सांबं त्रियंबकम् ॥१३६॥ वाहनत्वं तवेशान प्रसीद जगतां प्रभो ॥ त्वयि भक्तिं च देवेश देवदेव नमोऽस्तु ते ॥१३७॥ सामर्थ्यं च सदा मह्यं भवन्तं वोढुमीश्वरम् ॥ सर्वज्ञं वरदं शर्वं सर्वलोकमयं प्रभुं ॥१३८॥ तयोः श्रुत्वा महादेवो विज्ञप्तिं परमेश्वरः ॥ सारथ्ये वाहनत्वे च कल्पयामास तौ भवः ॥१३९॥ वृत्तम् ॥ दत्वा तस्मै ब्रह्मणे विष्णवे च दग्ध्वा दैत्यान् देवदेवो महात्मा ॥ सार्द्धं देव्या नंदिना भूतसंघैरन्तर्धानं कारयामास शर्वः॥१४०॥ ततस्तदा महेश्वरे गते रणाद्गणैस्तथा सुरेश्वराश्च विस्मि-

---

नाश केलास, तूं लोकांचें कल्याण करणारा आहेस. परमेश्वरा, तूं मजवर कृपा कर आणि तुझी भक्ति माझ्या हातून उत्तरोत्तर जास्त व्हावी हा वर दे. (१३५) ह्या सर्व देवांच्याही मनांत तुझ्याविषयीं भक्ति राहूं दे. हा वर त्यांस दे. आणि मला असा वर दे कीं, तुझा रथ हांकण्याचें काम मीं करावें. (१३६) ब्रह्मदेवानें असा वर मागितल्यावर श्रीविष्णूही नमस्कार करून व दोन्ही हात जोडून तीन नेत्र असणाऱ्या महेश्वर शिवपार्वतीस ह्मणाला. (१३७) परमेश्वरा, मीं तुझें वाहन व्हावें हा मला वर दे तूं त्रैलोक्यांचा अधिपति आहेस, तूं मजवर कृपा कर. देवाधिदेवा, तुझी भक्ति मला असावी, तूं सर्व देवांचा ईश्वर आहेस, तुला नमस्कार असो. (१३८) तुला आपल्या खांद्यावर मी नेहमीं वागवीत जाईन तूं परमेश्वर आहेस, तूं सर्वज्ञ आहेस, तूं वर देणारा आहेस, तूं त्रैलोक्यस्वरूप आहेस, तूं समर्थ आहेस तुला खांद्यावर वागविण्याचें सामर्थ्य माझ्या अंगांत असो. (१३९) परमेश्वर महादेवांनीं त्या दोघा ब्रह्मदेव व श्रीविष्णूचें बोलणें ऐकून तें मान्य केलें व त्यांच्या ह्मणण्याप्रमाणेंच ब्रह्मदेवास सारथ्य करण्याचें व विष्णूस आपल्या खांद्यावर आपणास घेऊन वागविण्याचें काम शिवांनीं दिलें. (१४०) असो ह्याप्रमाणें अलौकिक सामर्थ्य असणाऱ्या श्रीशिवांनीं ब्रह्मदेवास व विष्णूस त्यांच्या मागण्याप्रमाणें इच्छित वर दिला. दैत्यांचा नाश करून सर्व देवांस सुखी केलें. आणि मग पार्वती नंदिकेश्वर व इतर प्रमथगण ह्या सर्वांसहित देवांसमक्ष श्रीशंकर तेथल्या तेथेंच गुप्त झाले. (१४१) मग रणांगणांतून महेश्वर आपल्या सर्व परिवारासहित गुप्त झाल्यावर सर्व देवांस मोठें आश्चर्य वाटलें, त्यांनीं श्रीशं-

ता भवं प्रणम्य शंकरम् ॥ ययुश्च दुःखवर्जितास्स्ववाहनैर्दिवं तदा सुरे-श्वरा मुनीश्वरा गणेश्वराश्च भास्कराः ॥१४१॥ पापैश्च मुच्यते जन्तुः श्रुत्वाऽध्यायमिमं शुभम् ॥ शत्रवो नाशमायांति संग्रामे विजयी भवेत् ॥१४२॥ सर्वरोगैर्न बाध्येत चापदो न स्पृशन्ति तम् ॥ धनमायुर्यशो-विद्यां प्रभावमतुलं लभेत् ॥१४३॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वरा-चारसंग्रहे शिवाधिक्यकथने त्रिपुरदहनं नामत्रयोविंशोऽध्यायः ॥

---

करास नमस्कार केला. व मग आपापल्या वाहनांवर बसून मनांतील सर्व काळजी दूर झाल्यामुळें मोठ्या आनंदानें ते सर्व मुख्य मुख्य देव, मोठमोठे ऋषीश्वर, गणेश्वर आणि बारा सूर्य आकाशमार्गानें आपापल्या स्थानास गेले. (१४२) जो कोणी मनुष्य हा कल्याणकारक अध्याय ऐकेल, त्याचीं सर्व पापें नाहींशीं होतील, त्याच्यां शत्रूंचा नाश होईल, व युद्धांत त्यास जय मिळेल. (१४३) त्याला कोण-त्याही प्रकारचा रोग होणार नाहीं. त्यावर कोणतींही संकटें येणार नाहींत. त्याला द्रव्य पुष्कळ मिळेल. त्याचें आयुष्य जास्त वाढेल. त्याची कीर्ति दिगंतरास जाईल. तो मोठा विद्वान् होईल. व त्याला अलौकिक सामर्थ्य येईल.

ह्याप्रमाणें श्रीनिलकंठनागनाथ नांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमा-हेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं त्रिपुरदहन नांवाचा तेविसावा अध्याय संपला.



## ॥अथ चतुर्विंशोऽध्यायः॥

श्रीशिवाय नमः ॥ शैवे धर्मसंहितायाम् ॥ सनत्कुमार उवाच ॥ जलंधरं महादेवः पुरां जंभारिविक्रमम् ॥ कथं जघान भगवान् भगनेत्रहरो हरः ॥१॥ तन्ममाचक्ष्व तत्वेन विस्तरेण जगद्गुरो ॥ हिताय सर्वजगतां श्रोतुं कौतूहलं हि मे ॥२॥

नन्दिकेश्वर उवाच ॥ जलंधर इति ख्यातः सर्वलोकापकारकृत् ॥ आसीदन्तकसंकाशः सुरसेनाविमर्दनः ॥३॥ तेन देवाः सगन्धर्वाः सयक्षोरगराक्षसाः ॥ निर्जिताः समरे सर्वे मृगेंद्रेण मृगा इव ॥४॥ देवं जयार्थं वरदं सर्वलोकपितामहम् ॥ जगाम ब्रह्मणो लोकं तपसा लब्धविक्रमः ॥५॥ उवाच स महादेवं ब्रह्माणं दैत्यपुंगवः ॥ तेन दत्तवरोदीर्णो लोककर्त्रा स्वयंभुवा ॥६॥

जलंधर उवाच ॥ योद्धुकामो ह्यहं प्राप्तः सर्वान् जित्वा सवास-

---

श्रीशिवास नमस्कार असो. शिवपुराणांत धर्मसंहितेंत ह्मटलें आहे (१) सनत्कुमार ह्मणतात—नंदिकेश्वरा, पूर्वी परमेश्वर, सर्वगुणसंपन्न, सूर्याचे डोळे उपडून काढणाऱ्या अशा महादेवानें देवेंद्रासारख्या पराक्रमी जलंधरास कसें मारिलें! (२) हे त्रैलोक्यपते हा सर्व कथाभाग तूं मला सविस्तर रीतीनें सांग. त्यापासून सर्व जगांचें कल्याण होईल. आणि तें ऐकण्याची मला फार इच्छा आहे. असें सनत्कुमाराचें बोलणें ऐकून—

(३) नंदिकेश्वर ह्मणतात—सनत्कुमारा, जलंधर नांवाचा एक प्रसिद्ध दैत्य होता, त्यानें सर्व लोकांस अगदीं त्रासवून सोडिलें होतें, तो प्रत्यक्ष यमासारखा क्रूर असून त्यानें देवांच्या सेनेचा पुरा मोड केला होता. (४) जसे सिंहानें सर्व हरिण एका क्षणांत जिंकावे तसे जलंधरानें आपल्या अलौकिक पराक्रमानें देव, गंधर्व, यक्ष, सर्प आणि राक्षस जिंकिले. (५) आपण सर्व देवांस जिंकावें असा मनांत हेतु धरून तो वर देणाऱ्या व सर्व लोकांचा पितामह (अजा) ह्मणविणाऱ्या ब्रह्मदेवाच्या सत्यलोकास गेला; व तेथें तपश्चर्या करून तो मोठा बलाढ्य झाला. (६) जलंधराची तपश्चर्या पाहून सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवानें त्यास वर दिल्यामुळें तो फारच उन्मत्त झाला; व तो दैत्यपति त्या वर देणाऱ्या परमेश्वर ब्रह्मदेवास ह्मणाला.—

(७) जलंधर ह्मणाला—ब्रह्मदेवा, आपण सर्व लोकांचे अधिपति आहां, मी

वान् ॥ सबलः सर्वलोकेश यत्कर्तव्यं तदुच्यताम् ॥७॥ निशम्य वचनं तस्य भगवान्पद्मसंभवः ॥ प्रहसंश्च ततः प्राह प्रीतस्तु विनयं वचः ॥८॥

ब्रह्मोवाच ॥ कस्समर्थस्त्वया योद्धुं जलंधर महाबल ॥ देवो वा दानवो वापि वत्स प्रतपतां वर ॥९॥ दास्ये चान्यैरवध्यत्वं जलंधर जनार्दनम् ॥ गंतुमर्हसि युद्धार्थं समर्थं क्षणमच्युतम् ॥१०॥ नियोगात्सोऽपि देवस्य दैत्यो दैत्येश्वरः ॥ जलंधरो जगामाशु प्रसह्य गरुडध्वजम् ॥ अपश्यच्च जगन्नाथं देवं वैकुण्ठवासिनम् ॥११॥ शंखचक्रगदापद्मान् धारयंतं चतुर्भुजम् ॥ अनंतभोगशयने शयानं पंकजप्रभम् ॥१२॥ सनंदनाद्यैर्मुनिभिर्देव्या लक्ष्म्या च सादरम् ॥ संपूज्यमानमनघं सर्वाभरणभूषितम् ॥१३॥ गर्जमानो यथा मेघो गर्जयन् मुनिपुंगवान् ॥ मा-

---

मोठा बलवान् आहें. मी इंद्रादिक सर्व देवांस आपल्या सामर्थ्यानें जिंकलें; तरी मला अद्याप युद्ध करण्याची इच्छा आहेच. ह्यासाठीं आतां पुढें मीं काय करावें तें मला सांगा. (८) त्याचें तें बोलणें ऐकून परमेश्वर ब्रह्मदेव त्याकडे पाहून हंसत हंसत त्यावरील प्रेमामुळें त्यास शांतपणानें ह्मणाले.—

(९) ब्रह्मदेव ह्मणाले—मुला जलंधरा, तूं मोठा शक्तिमान् आहेस, जे मोठे तेजस्वी (पराक्रमी) ह्मणून मानले गेले आहेत त्या सर्वांपेक्षां तूं श्रेष्ठ आहेस. तुझ्या बरोबर युद्ध करावयाची कोणाची शक्ति आहे ? देव असो, किंवा दैत्य असो, तुझ्या बरोबर युद्ध करण्याची कोणाची प्राज्ञा नाहीं. (१०) दुसऱ्या देवांच्या हातून तुला मरण नाहीं असा मी तुला वर देतों. जलंधरा, तुला युद्ध करण्याची इच्छाच असेल तर क्षणभर श्रीविष्णूकडे जा. तो तुझ्या बरोबर युद्ध करील. (११) ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें तो दैत्याधिपति जलंधर घाईघाईनें श्रीविष्णूकडे धांवत गेला; व तेथें त्यानें त्रैलोक्यपति वैकुंठवासी श्रीविष्णूस पाहिलें. (१२) श्रीविष्णूस चार हात असून त्या चार हातांत शंख, चक्र, गदा आणि पद्म अशीं आयुधें होतीं; ते शेषाचें हातरुण करून त्यावर स्वस्थपणानें निजले होते. प्रफुल्लित कमलांप्रमाणें त्यांची अंगकांति होती. (१३) सनंदन वगैरे मुनीश्वर आणि देवी लक्ष्मी आदरपूर्वक त्यांची सेवा करीत होती; त्यांस कोणत्याही रीतीनें दोष देण्यास जागा नसून त्यांच्या अंगावर सर्व प्रकारचे अलंकार असल्यामुळें त्यांस अलौकिक शोभा आली होती. (१४) असो. अशा श्रीविष्णूस पाहिल्याबरोबर, जशी मेघानें मोठी गर्जना करावी, तशी जलंधरानें मोठी आरोळी मारिली. ती

यथैवास्य देवस्य दूषितः प्राह चाच्युतम् ॥१४॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ युद्धार्थं युयुत्सुरहमागतः ॥ विष्णुमित्यब्रवीद्वाक्यं सबलो बलगर्वितः ॥१५॥ श्रुत्वास्य वाक्यं भगवान् साक्षान्नारायणः स्वयम्॥विस्मयं परमं गत्वा तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् ॥१६॥ तयोः समभवद्युद्धं तुमुलं रोमहर्षणम् ॥ संवत्सरशतं साग्रं दैत्यस्तेनाप्यनिर्जितः ॥१७॥ हाहाकृतमभूत्सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ॥ नारायणोऽप्यदृश्यत्वं जगाम मुनिसत्तम ॥१८॥ जलंधरोऽपि तं जित्वा देवैः सार्द्धं जनार्दनम् ॥ जगाम भवनं दिव्यं समुद्रान्तर्गतं शुभम् ॥१९॥ सोऽनुस्मृत्य महादेवं शंकरं परमेश्वरम् ॥ गतासुराह दैत्येन्द्रो दैत्येंद्रान् बलगर्वितः ॥२०॥ गणयन् देवसामान्यं देवदेवं जगद्गुरुम् ॥ मायया मोहितस्तस्य मारांधकविमर्दनम् ॥ सर्वं

---

ऐकतांच तेथील सर्व ऋषीश्वर भिऊन गेले. नंतर त्या विष्णूच्या मायेमुळें भ्रमिष्ट होऊन तो विष्णूस ह्मणाला, (१५) हे विष्णो, ऊठ लवकर, ऊठ, मी जलंधर दैत्य तुजबरोबर युद्ध करण्यास आलों आहें पहा. असें त्या विष्णूस ह्मणाला मी मोठा बलवान् आहें अशा गर्वानें तो फुगला.(१६) त्या दैत्याचें हें बोलणें ऐकून परमेश्वर श्रीविष्णूला मोठें आश्चर्य वाटलें. व ते स्वतः त्या जलंधरास ह्मणाले, जलंधरा, ठीक आहे, उभा रहा, उभा रहा, मी तुजबरोबर युद्ध करितों. (१७) मग त्या श्रीविष्णूचें आणि जलंधराचें युद्ध सुरू झालें. तें युद्ध इतकें भयंकर रीतीचें झालें कीं, तें पहाणाऱ्यांच्या अंगावर भयानें कांटा येई. तें शंभर वर्षेपर्यंत चाललें होतें, तरीपण दैत्य त्या विष्णूस आटोपला नाहीं. (१८) त्यामुळें सर्व स्थावर जंगम विश्वांत जिकडे तिकडे हाहाकार उडून गेला. जलंधर आपणास आटोपत नाहीं असें पाहतांच, सनत्कुमारा, श्रीविष्णु तेथल्यातेथेंच गुप्त झाले. (१९) जलंधर देवांसह श्रीविष्णूला जिंकून समुद्राच्या आंत मध्यें असलेल्या शुभकर दिव्य मंदिराला गेला. (२०) त्या वाड्यांत आल्यावर त्यास आठवण झाली कीं, अद्याप शंकरास जिंकावयाचें राहिलें आहे. तो सर्व देवांत मुख्य देव मानला जात असून तो परमेश्वर आहे, मग आयुष्य भरत आलेला व आपल्या अंगांतील सामर्थ्यानें उन्मत्त झालेला दैत्यपति जलंधर दुसऱ्या मुख्य मुख्य दैत्यांशीं गर्वोक्तीनें बोलूं लागला. (२१) जरी शंकरांनीं मदनास जाळलें, व अंधकासुरास मारिलें ही गोष्ट जलंधरास माहित होती; तरी तो त्या शिवाच्याच मायेनें अज्ञानपणा पावला होता. ह्मणून देवाधिदेव आणि त्रैलोक्यपति शिवास तो इतर देवां-

जिता मया युद्धे शंकरो ह्यजितो रणे ॥२१॥ तं जित्वा सार्द्धमीशानं गणैर्नंदिना क्षणात् ॥ अहमेव शिवत्वं च ब्रह्मत्वं वैष्णवं पदम् ॥ वासवत्वं तथान्येषां करोमि पदमुत्तमम् ॥२२॥जलंधरवचः श्रुत्वा देवेशं प्रति दानवाः ॥ जगर्जुरुच्चैः पापिष्ठाः मृत्युदर्शनतत्पराः ॥२३॥ एतस्मिन्नंतरे ब्रह्मा विष्णुना वासवेन च ॥ तपसा प्राप्य देवेशं प्राह सर्वं तदा हि सः ॥२४॥

ईश्वर उवाच ॥ मा भैषीर्देवदेवेश त्वयि लब्धवरोऽसुरः ॥ देवानां प्रलये ब्रह्मन्नवध्यश्चापरैर्यतः ॥ ॥२५॥ * तेनैव मायया शीघ्रं चात्मनात्मानमंबुधौ ॥ चक्रं कृत्वा करिष्यामि देवकार्यं क्षणेन तु॥२६॥निशम्य वचनं तस्य देवदेवस्य सादरम् ॥ प्रणेमुस्तुष्टवुश्चैव जग्मुः सब्रह्मकाः

---

सारखाच निर्वीर्य मानूं लागला. तो आपल्या पदरच्या सर्व दैत्यांस ह्मणाला. दैत्यहो, मीं सर्व देवांस युद्धांत जिंकलें खरें, परंतु अद्याप शंकरास जिंकलें नाहीं. (२२) ह्यासाठीं आतां एका क्षणांत सर्व प्रमथगणासहित त्या शिवाला युद्धांत जिंकून मीच शिवाचें राज्य करीन, मीच सत्यलोकाचें (ब्रह्मदेवाचें) राज्य करीन इंद्राचें स्वर्गाचें राज्य मीच करीन, आणि इतर देवांचेंही राज्य मीच करीन. सर्वांपेक्षां माझें राज्य श्रेष्ठ होईल. (२३) असें जलंधराचें गर्वाचें बोलणें ऐकतांच ते सर्व दुष्ट दैत्य परमेश्वराची शक्ति जलंधरापेक्षां खरोखरच कमी आहे, अशा मोठमोठ्यानें आरोळ्या मारूं लागले. त्यांचें आयुष्य संपल्यामुळें त्यांस अशी दुर्बुद्धि झाली. (२४) त्याचवेळीं ब्रह्मदेवानें विष्णूस आणि इंद्रास बरोबर घेऊन शंकरास प्रसन्न करण्याकरितां तप केलें; व त्या तपश्चर्येमुळें शिव प्रसन्न झाल्यावर ब्रह्मदेवानें शिवास जलंधराची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून—

(२५) शिव ह्मणाले—ब्रह्मदेवा, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस, तूं भिऊं नकोस, तुझ्यापासून त्या जलंधराला वरदान मिळालें आहे, त्यामुळें तो हल्लीं देवांचा संहार करीत आहे. व त्याला दुसऱ्याच्या हातून मरण नाहीं हें खरें तरी (२६) मी आपल्या मायेनें त्याच्याकडूनच एक चक्र करवून समुद्रांत तो आपल्या आपणच कष्ट करून मरण पावेल; अशा तऱ्हेचें एक चक्र तयार करून एका क्षणांत देवांचें काम करीन. (२७) असें त्या देवाधिदेव श्रीशिवाचें बोलणें ऐकून सर्व देवांस मोठा आनंद झाला. मग त्या ब्रह्मदेव वगैरे मुख्य मुख्य देवांनीं श्रीशिवास नमस्कार केले, त्याचें स्तवन केलें, आणि सर्वजण आपापल्या स्थानास

---

* आत्मनो

सुराः ॥२७॥ अथ दैत्योऽपि बलवान् रथनागतुरंगमैः ॥ दैत्यैरात्मसमैश्चैव निर्ययौ रथमार्गतः ॥२८॥ बभूवुरधिकाश्चैव दैत्याः कालाग्निसन्निभाः ॥ हाहेति दुद्रुवुः सर्वे देवाश्च दिवि संस्थिताः ॥२९॥ सब्रह्मकास्तथा देवा मुनयश्च तपोधनाः ॥ सनारायणकाश्चैव जग्मुः पार्श्वं पिनाकिनः ॥३०॥ भद्राद्या गणपाः सर्वे रुद्रा रुद्रसमप्रभाः ॥ घण्टाकर्णगणाद्याश्च जग्मुः पार्श्वं पिनाकिनः ॥३१॥ नष्टे जगत्त्रये सर्वे नष्टे नारायणे स्वयम् ॥ नष्टे पितामहे देवे नष्टे धर्मे मुनीश्वर॥अभ्रान्तोऽहं मुनिश्रेष्ठ ह्यभवं द्वारि संस्थितः ॥३२॥ एतस्मिन्नेव काले तु देवः साक्षात् पिनाकधृक् ॥ देव्या गत्वाह मामेकं किमिदं त्विति शंकरः ॥३३॥ अहं दृष्ट्वाग्निसंकाशमवोचमभिवंद्य तम् ॥ पुरावृत्तं यथा सर्वं दैत्येनानेन शंकरम् ॥३४॥ तथेत्युक्त्वा भवोऽप्याह मा भैषीस्त्विवति मां तदा ॥

---

गेले. (२८) इकडे तो बलाढ्य जलंधरही आपल्या बरोबर रथ, हत्ती, घोडे व आपल्यासारखेच बलाढ्य दैत्यलोक बरोबर घेऊन रथाच्या वाटेनें (रथांत बसून) शंकराकडे येण्यास निघाला. (२९) सर्व दैत्य त्यावेळीं देवांपेक्षां शक्तीनें जास्त होते, आणि ते रागानें लाल झाल्यामुळें प्रळयकाळच्या अग्नीसारखे दिसत होते; त्यांस पाहतांच आकाशांत राहणारे देव भयानें हाय हाय आतां काय करावें, आतां कसें होईल, असे दुःखोद्गार काढीत पळूं लागले. (३०) मग ब्रह्मदेवासहित आणि श्रीविष्णूसहित सर्व देव आणि मोठमोठे तपस्वी मुनीश्वर अजगव धनुष्य धारण करणाऱ्या शिवाकडे धांवत गेले. (३१) वीरभद्र वगैरे शिवगण, प्रत्यक्ष श्रीशिवाप्रमाणें पराक्रम करणारे रुद्रगण, घण्टाकर्ण वगैरे दुसरे शिवगण (प्रमथगण), महादेवाजवळ धांवत गेले. (३२) हे मुनीश्वरहो, त्यावेळीं अशी स्थिति झाली कीं, सर्व त्रैलोक्य नाश पावलें, स्वतः श्रीविष्णु पळून गेला, ब्रह्मदेव पळून गेला, इतर तेहतीसकोटि देव पळाले, फार काय सांगावें परंतु धर्म देखील पळाला. अशा वेळेला मी मात्र काडीमात्र न डगमगतां शिवाच्या दारांत स्वस्थपणें पहारा करीत उभा होतों. (३३) इतक्यांत अजगव धनुष्य हातांत घेणारे प्रत्यक्ष श्रीशंकर पार्वतीसहित दाराजवळ आले, आणि काय गडबड आहे ह्मणून मला विचारूं लागले. (३४) मीही त्यांस नमस्कार केला आणि जलंधरानें सर्व त्रैलोक्याची जी दुर्दशा केली होती, ती सर्व हकीकत मीं अग्नीसारख्या तेजस्वी शंकरास सांगितली. (३५) ती ऐकून घेऊन शिवांनीं बरें आहे मी ह्याचा

कराभ्यां सुशुभाभ्यां च संस्पृश्यात्मानमीश्वरः ॥३५॥ ततो देवादिमुनयः सिद्धा विद्याधरास्तथा ॥ गंधर्वा मनवः सर्वे ह्यतिष्ठन् निर्भयाः क्षणात् ॥ गणेश्वरास्तदाभ्येत्य तस्थुः सर्वे महेश्वरम् ॥३६॥ जलंधरोऽपि भगवान् दैत्यैश्चात्मसमप्रभैः ॥ आसाद्य देवदेवेशमतिष्ठत्प्रहसन्मुने ॥३७॥ देवस्तमाह दैत्येंद्रं जलंधरमुमापतिः ॥ देवानालोक्य शक्रादीन् सनारायणकान्मुने ॥३८॥

शिव उवाच ॥ किं कृत्यमसुरश्रेष्ठ युद्धेनानेन सांप्रतम् ॥ मद्बाणैर्भिन्नसर्वांगो मर्तुं वा वांछितः किल ॥३९॥ जलंधरोऽपि तद्वाक्यं श्रुत्वा श्रोत्रविदारणं ॥ सुरेश्वरमुवाचेदं सुरेतरबलेश्वरः ॥४०॥

जलंधर उवाच ॥ वाक्येनालं महाबाहो वानराननवाक्यवत् ॥ वज्राशनिनिभैरस्त्रैर्हर योद्धुमिहागतः ॥४१॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा दैत्यें-

---

आतां बंदोबस्त करितों, तूं कांहीं घाबरूं नकोस असें मला आश्वासन दिलें; आणि त्यांनीं आपले दोन्हीं कल्याणकारक हात माझ्या अंगावरून फिरविले. (३६) नंतर देव, मुनीश्वर, सिद्ध, विद्याधर, गंधर्व, मनु वगैरे जे जलंधराच्या भयानें शिवाकडे पळून आले होतेच, त्यांस शिवांनीं तुह्मीं आतां कांहीं एक काळजी करूं नका स्वस्थ रहा, असें ह्मटल्यावर सर्वजण स्वस्थपणानें राहिले. इतर सर्व शिवगणही शिवाजवळ येऊन उभे राहिले. (३७) सनत्कुमारा, तो महाबलाढ्य जलंधरही आपल्या सारखेच बलवान् असे पुष्कळ दैत्यलोक बरोबर घेऊन शंकराकडे आला; आणि त्यांच्या समोर हंसत हंसत उभा राहिला. (३८) सनत्कुमारा, मग पार्वतीपति श्रीशिवांनीं विष्णु इंद्र वगैरे सर्व देवांकडे पाहिलें आणि त्या दैत्येश्वर जलंधराकडे पाहून त्यास ह्मटलें.

(३९) शिव ह्मणाले—दैत्यपते जलंधरा, हल्लीं तुला मजबरोबर युद्ध करून काय करावयाचें आहे ? माझ्या बाणांनीं आपलें शरीर छिन्नभिन्न करून घेऊन तुला मरावयाची इच्छा झाली आहे असें वाटतें. (४०) असें कानाला करवतासारखें कांपणारें शिवाचें बोलणें ऐकून इंद्रापेक्षांही दैत्यलोकांत प्रबळ असणारा जलंधर त्या देवाधिदेव श्रीशिवास ह्मणाला.

(४१) जलंधर ह्मणाला—हे पराक्रमी शंकरा, वानरानें आपल्या तोंडानें जशी घाटेल तशी बडबड करावी, तशी बडबड करणें पुरे कर. वज्र अशनिसारखीं मोठमोठीं शस्त्रास्त्रें घेऊन मी तुजबरोबर युद्ध करण्यास आलों आहे. (४२) त्या दैत्यपति जलंधराचें हें बोलणें ऐकून परमात्मा महादेव त्याला फसविण्याकरितां

द्रस्य महेश्वरः ॥ वंचयित्वा तदा प्राह हसन् देवः पिनाकधृक् ॥४२॥ वृत्तम् ॥ तथेति चोक्त्वा तरुणेंदुशेखरो रथांगमेकेन पदेन चांबुधौ ॥ लिलेख दैत्येंद्रमहासुशोषणं शतारमादित्यनिभं भगाक्षिहा ॥४३॥

नंदिकेश्वर उवाच ॥ उवाच स महादेवः स्तूयमानः सुरोत्तमैः ॥ जलंधरमथालोक्य सबलं बलगर्वितम् ॥४४॥

ईश्वर उवाच ॥ जलंधर जले रेखामिमामेवं विनिर्मिताम् ॥ उद्धरस्व बलं ज्ञातं तव दैत्य महाबल ॥४५॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा क्रोधेनादीप्तलोचनः ॥ प्राहेंदुतिलकं देवं प्रहसंश्च मुहुर्मुहुः ॥४६॥

जलंधर उवाच ॥ रेखामुध्दृत्य हत्वा च नंदिनं त्वां च शंकर॥हत्वा भूतान्सुरैः सार्द्धं डुंडुभान्गरुडो यथा ॥४७॥ हंतुं चराचरं सर्वं समर्थोऽहं सवासवम् ॥ को महेश्वर मद्बाणैरभेद्यो भुवनत्रये ॥४८॥ बाल-

---

हंसत हंसत त्यास ह्मणाला. (४३) ठीक आहे जलंधरा, मीही तुजबरोबर युद्ध करण्यास तयार आहें. असें ह्मणून सुशोभित चंद्र मस्तकावर असणाऱ्या व सूर्याचे दक्षयज्ञांत डोळे उपटून काढणाऱ्या श्रीशिवानें आपल्या एका पायानें समुद्रांत एक चक्र लिहिलें, तें दैत्याचे पांच प्राण घेण्यास समर्थ होतें. त्यास शंभर आरा असून तें सूर्यासारखें तेजस्वी दिसत होतें.

(४४) नंदिकेश्वर ह्मणाला—सनत्कुमारा, असें तें चक्र लिहिल्यावर मोठमोठे देव देखील ज्याला नमस्कार करितात तो महादेव शक्तीमुळें उन्मत्त झालेल्या त्या बलवान् जलंधराकडे पाहून त्यास ह्मणाला.—

(४५) शिव ह्मणाले— जलंधरा, पाण्यांत ही मी अशा तऱ्हेनें एक रेषा काढिली आहे, ती तरी तूं उपटून काढ; ह्मणजे तुझें सामर्थ्य काय आहे तें मला समजून येईल. तूं आपणास मोठा बलवान् समजतोस तें बळ मला आतां दाखीव (४६) असें शिवाचें बोलणें ऐकतांच जलंधराचे डोळे रागानें लालभडक झाले. मग तो वरचेवर हंसत हंसत चंद्रशेखरा ( शिवा ) कडे पाहत त्यांस ह्मणाला—

(४७) जलंधर ह्मणाला— श्रीशिवा, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें ही रेषा आतांचे आतां उपटून टाकितों; नंतर नंदीला आणि तुला दोघांसही मारून टाकितों; आणि मग गरुडानें जसें सर्पांस मारून टाकावें, तसें ह्या सर्व देवांस आणि भूतगणांस मारून टाकितों. (४८) मीं इंद्रादिक सर्व देव आणि स्थावरजंगम विश्व एका क्षणांत मारून टाकीन, इतकी माझी शक्ति आहे, महेश्वरा, माझ्या बाणानें जिंकला जाणार नाहीं असा प्राणी ह्या त्रिभुवनांत कोण आहे? सांग बरें.(४९) मी

भावे च भगवान् तपसा वै जितः पुनः ॥ब्रह्मा स्वयं यौवने तु मुनिभिः सुरपुंगवैः ॥४९॥ सरथो भगवान् विष्णुः क्षिप्तश्च शतयोजनम् ॥ गरुडोऽपि मया बद्धो नागपाशेन जिष्णुना ॥५०॥ दग्धं क्षणेन सकलं त्रैलोक्यं सचराचरम् ॥ तपसा किं त्वया रुद्र जिते विष्णौ मया युधि ॥५१॥ इंद्राग्नियमवित्तेशवायुवारीश्वरादयः ॥ न सेहिरे यथा नागा गंधं पक्षिपतेरिव ॥५२॥ अलब्ध्वा दिवि भूमौ च बाह्वोश्च मम शंकर ॥ कंडूविनोदं हर्तुं वै समर्थान्पर्वतान्गताः ॥५३॥ गिरीन्द्रो मंदरः श्रीमान् नीलो मेरुर्गिरीश्वरः ॥ घर्षिता बाहुदण्डैस्तु कण्डूनोदार्थमापतन्॥५४॥ गंगा निरुद्धा बाहुभ्यां लीलार्थं हिमवद्गिरौ ॥ स्त्रीणां च मम भृत्यैस्तु जटा बद्धा दिवौकसाम् ॥५५॥वडवाया मुखं भद्रं गृहीतं वै करेण तु ॥

---

ल्हानपणींच तपश्चर्या करून ब्रह्मदेवास जिंकिलें, आणि तरुणपणांत आपल्या सामर्थ्यानें ब्रह्मदेवास सर्व ऋषीश्वरांसहित आणि मुख्य मुख्य देवांसहित जिंकिलें. (५०) मीं आपल्या सामर्थ्यानें ह्या श्रीविष्णूला रथासुद्धां चारशें कोस लांब फेंकून दिलें. मीं विष्णूला आणि गरुडाला दोघांलाही नागपाशानें जखडून बांधून टाकिलें. (५१) मीं आपल्या तपश्चर्येच्या सामर्थ्यानें हें सर्व स्थावरजंगम विश्व एका क्षणांत जाळून टाकिलें. मी युद्धांत प्रत्यक्ष श्रीविष्णूस देखील जिंकिलें मग शिवा तुझी काय बिशाद आहे? मी तुला एका क्षणांत जिंकून टाकीन. (५२) इंद्र, अग्नि, यम, निऋति, वरुण, वायु, कुबेर ईशान वगैरे आठ दिशांचे अधिपति गरुडाचा वारा येतांच साप जसे घाबरून पळून जातात, तसे मला पाहून पळून जातात. (५३) शंकरा, तुला फार काय सांगावें, माझ्या ह्या हातांची खाज जिरवावयाची होती. परंतु ह्यांची खाज जिरविणारा स्वर्गांत आणि मृत्युलोकांतही कोणी मिळाला नाहीं. तेव्हां ह्या कामांस पर्वत कांहीं तरी बरे आहेत असें समजून माझे हात पर्वतांकडे गेले ( मी पर्वतांकडे गेलों ). (५४) आणि खाज जिरावी ह्मणून त्या पर्वतश्रेष्ठ मंदरावर आपले हात घांसलें, नील पर्वतावर आणि सर्वांत श्रेष्ठ अशा मेरुपर्वतावर आपले हात घांसले. त्यामुळें हाताची खाज तर जिरली नाहींच परंतु ते पर्वत मात्र जमिनीवर पडले. (५५) मीं आपल्या दोन्ही हातांनीं हिमालयपर्वतावर मौजेखातर नदी आडवून धरिली. माझ्या चाकरांनीं देवांच्या बायकांच्या केशांच्या जटा वळविल्या ( त्यांस नहाण ह्मणून कधीं मिळूं दिलें नाहीं. ) (५६) त्या वडवेचें ( वडवानलाचें ) तोंड चांगलें दिसतें ह्मणून मीं आपल्या हातानें धरिलें, त्यामुळें एका क्षणांत जिकडे तिकडे समुद्राचें पाणीच

तत्क्षणादेव सकलमेकार्णवमभूदिदं ॥५६॥ ऐरावतादयो नागाः क्षिप्ताः सिन्धुजलोपरि ॥ उर्वश्याद्याः समानीताः स्त्रियः कारागृहान्तरम् ॥५७॥ कथंचिद्वज्रभृल्लेभे शचीमेकां क्षणाद्विभो ॥ विजित्वा त्वां प्रपत्स्यामि शंकर त्वं तवाद्भुतम् ॥५८॥ मां न जानासि दैत्येंद्रं जलंधरमुमापते ॥ अथवा रक्षितुं सेनां शुल्कं दातुमिहार्हसि ॥५९॥ रथांगमेतद्दत्वा वा मम भूतपते तव ॥ जीवितं रक्ष भूतानां देवानां च तथाऽतुलम् ॥६०॥ प्रार्थ्यो जयो वै दैत्यानाममरेश महात्मनाम् ॥ नेच्छामि हंतुं तस्माद्वै लब्धशुल्को महेश्वर ॥६१॥

नंदिकेश्वर उवाच ॥ अथ तस्य वचः श्रुत्वा भगवान् गोवृषध्वजः ॥ प्राहालोक्य हरिं विष्णुं पद्मयोनिं च मां सुरान् ॥६२॥ तुष्टोऽस्मि वत्स सकलं तथ्यमेतत्त्वयाऽतुलम् ॥ कथितं दैत्यवीर्यं वै जलंधर महाद्युते ॥६३॥ एवमुक्त्वा महादेवः प्रादहद्वै चमूस्तदा ॥ क्षणान्नेत्राग्निभागैक-

---

पाणी दिसूं लागलें. (५७) ऐरावत वगैरे दिग्गज उचलून मीं सहज समुद्राच्या पाण्यांत फेंकून दिले. उर्वशी, मेनका घृताची वगैरे अप्सरांस धरून आणून मीं वंदिशाळेंत ठेविलें आहे. (५८) फक्त नाहीं ह्मणण्यास इंद्राची इंद्राणी ( शची ) मात्र अद्याप मीं धरून आणिली नाहीं; तिलाही एखादे वेळेस सहज धरून आणीन. तुलाही जिंकून टाकून तुझें अलौकिक ऐश्वर्यही मीच उपभोगीन. (५९) पार्वतीपते, शिवा, मी जलंधर नांवाचा राजा आहें. हें तुला माहीत नाहीं काय? अथवा आपले प्राण वांचावे असें तुला वाटत असल्यास, मला ह्या माझे दैत्य सेनेचें पोषण करण्याकरितां येईल अशी खंडणी दे. (६०) हे भूतपते, तुझें हें चक्र मला दे. आणि अशा रीतीनें तूं आपले, सर्व भूतांचे आणि सर्व देवगणांचे जीव वांचीव. (६१) तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस, तूं सर्वदा ह्या पराक्रमी दैत्यांचा विजय असावा, अशी इच्छा करीत जा. परमेश्वरा, तुझ्यापासून मला खंडणी मिळाल्यावर तुला मारण्याची माझी इच्छा नाहीं.

(६२) नंदिकेश्वर ह्मणाले– सनत्कुमारा, असें त्या जलंधराचें उद्धटपणाचें बोलणें ऐकून वृषभध्वज परमेश्वर श्रीशिव, विष्णु, ब्रह्मदेव मी ( नंदी ) आणि इतर देव ह्यांकडे पाहून त्या जलंधरास ह्मणाले. (६३) मुला जलंधरा, तूं मोठा पराक्रमी आहेस, मी तुला प्रसन्न आहे, तूं इतका वेळ जें कांहीं सांगितलेंस तें सर्व खरें आहे दैत्यांचा पराक्रम अलौकिक आहे. (६४) असें ह्मणून शिवांनीं लखलखीत दिसणाऱ्या आपल्या तिसऱ्या नेत्रांतील एका अगदीं लहानशा अग्नीच्या ज्वालेनें

कलार्धार्द्धेन चातुलाः ॥६४॥ दृष्ट्वा विनिहतान् दैत्यान् क्षणाद्दैत्यालिपालकः ॥ न चचाल न सस्मार निहतान् बांधवान्युधि ॥६५॥ अथ दैत्यः स्मयन् प्राह देवदेवमुमापतिं ॥ किमनेन महाबाहो ममैकेनैव शासितुम् ॥ शक्यो भवान्सुरैः सार्द्धं नंदिना गणपुंगवैः ॥६६॥ अथाह भगवांश्चापि त्रिपुरारिरनंगहा ॥ दास्ये शुल्कमिदं चक्रं गृहीत्वा गंतुमर्हसि ॥६७॥ जिताश्च देवा दैत्येंद्र वयं सर्वे गणेश्वराः ॥ तवाज्ञया चरन्त्वेते गच्छ गच्छ यथासुखम् ॥६८॥ उक्त्वैव भगवान् दैत्यं गत्वा वेदमज़ात्मज ॥ गुरुत्वं प्रददौ तस्य रथांगस्य ततः स्मयन् ॥६९॥ अथ मत्वा पुरा यद्वद्रथांगं दैत्यपुंगवः ॥ आदाय दुर्भरं रौद्रं स्कन्धदेशे तदा न्यसन् ॥७०॥ पपात तेन भिन्नांगः शुल्केन मुनिपुंगव ॥ कुलिशेन

---

जलंधराबरोबर आलेले अलौकिक पराक्रमी ह्मणविणारे सर्व दैत्य जाळून टाकिले. (६५) आपल्या बरोबरचे सर्व दैत्य शिवांनीं एका क्षणांत जाळून टाकिलेले पाहिलें तरी तो दैत्यांचा राजा जलंधर मुळींच डगमगला नाहीं; आणि आपले नातलग युद्धांत मेले ह्याबद्दल त्याला वाईटही वाटलें नाहीं, तो शंकरापुढें पूर्वींप्रमाणें निश्चल उभा राहिला. (६६) आणि मग तो जलंधर हंसत हंसत देवाधिदेव पार्वतीपतीस ह्मणाला. हे पराक्रमी शिवा, असें करण्यानें माझें काय नुकसान व्हावयाचें आहे? मी एकटाच तुला सर्व देवांसहित, नंदीसहित आणि इतर सर्व प्रमथगणांसहित मारण्यास समर्थ आहे. तुला मारण्यास मला ह्या सैन्याच्या मदतीचें कांहींच कारण नव्हतें. (६७) असें जलंधराचें बोलणें ऐकून परमेश्वर, त्रिपुरान्तक आणि मदनास जाळून टाकणारे श्रीशिव त्यास ह्मणाले, हें चक्र मी तुला खंडणी ह्मणून दिलें आहे, हें तूं घेऊन जा. (६८) जलंधरा, हें चक्र उचलून तूं आपल्या घरीं नेलेंस, ह्मणजे आह्मां सर्व देवांना तूं जिंकिलेंस असें आह्मी मानूं. असें करशील तर हे सर्व प्रमथगणही तूं जिंकिलेस, असें होईल, व हे सर्वजण तुझ्या आज्ञेंत वागतील तर आतां उशीर करूं नकोस. हें चक्र घेऊन तुला वाटेल तिकडे सुखानें तूं जा. (६९) हे सनत्कुमारा, असें बोलून श्रीशिव त्या दैत्याजवळ गेले, आणि त्याच्या मागण्याप्रमाणें तें चक्र त्यास घेऊन जाण्यास हंसत हंसत सांगून त्यांनीं आपलें सर्व सामर्थ्य त्या चक्रांत ठेविलें. (७०) त्या दैत्यपति जलंधरासही हें पूर्वींसारखेंच चक्र आहे असें वाटून ज्यांत सहन करवणार नाहीं असें शिवतेज भरलें होतें तें चक्र उचलून त्या जलंधरानें आपल्या खांद्यावर घेतलें. (७१) हे मुनिश्रेष्ठा, सनत्कुमारा, जलंधरास खंडणी ह्मणून जें

यथा भिन्नो गिरिस्तद्वत्पपात ह॥७१॥ ममार स महाबाहुर्मंदबुद्धिर्जलंधरः ॥ तच्चक्रकुण्डमभवत्ख्यातमद्यापि तस्य तु ॥७२॥ जलंधरं हतं दृष्ट्वा देवगंधर्वपार्श्वगाः ॥ सिंहनादं महत्कृत्वा साधु देवेति चाब्रुवन् ॥७३॥ तुष्टुवुश्च सुराध्यक्षं महादेवं महेश्वरम् ॥ देवाः सब्रह्मकाः शर्वं प्रणेमुश्च समंततः ॥७४॥ हत्वा देवरिपुं त्यक्त्वा देवान्देवेश्वरो भवः ॥ गंतुं मंदरसंकाशं सस्मार वृषभोत्तमम् ॥७५॥ आरुह्य च वृषं सोमः सोमसूर्याग्निलोचनः ॥ जगाम भवनं दिव्यं नंदिना गणपुंगवैः ॥७६॥ इत्येतत्कथितं सर्वं जलंधरविमर्दनम् ॥ संक्षेपाद्यः पठेद्वाऽपि नंदीशानुचरो भवेत् ॥७७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने जलंधरवधो नाम चतुर्विंशोऽध्यायः॥

---

चक्र शिवांनीं दिलें, तें उचलून त्यानें आपल्या खांद्यावर घेतांच त्याच्या सर्वांगाचे तुकडे तुकडे झाले. आणि इंद्राचें वज्र आपटून पर्वत जसा फुटून जमिनीवर पडावा, तसा जलंधर धाडकनजमिनीवर पडला. (७२) आणि त्यामुळें जरी तो पराक्रमी होता तरी तो अज्ञानबुद्धिचा जलंधर मरण पावला. जलंधर जेथें मरण पावला तेथें चक्रकुंड नांवाचें एक तीर्थ अद्याप प्रसिद्ध आहे. (७३) जलंधर मरण पावला असें पाहतांच, शिवाच्याजवळ तितके देव आणि गंधर्व होते त्या सर्वांनीं मोठा सिंहनाद केला. आणि झालेली गोष्ट फार चांगली झाली असें सर्वजण ह्मणूं लागले. (७४) देवाधिदेव महादेव हाच महेश्वर आहे, ह्यालाच शर्व ह्मणतात, असें ह्मणून ब्रह्मादिक देव शिवाची स्तुति करूं लागले. व शिवापुढें उभे राहून त्यास नमस्कार करूं लागले. (७५) देवांचा शत्रु जलंधर ह्यास मारल्यावर सर्व देवांस निरोप देऊन, आपण आपल्या स्थानास जावें, अशा विचारानें देवाधिदेव श्रीशिवांनीं मंदर पर्वताएवढ्या धिप्पाड नंदीचें स्मरण केलें. (७६) व नंदी येतांच त्यावर बसून चंद्र, सूर्य आणि अग्नि हे तीन नेत्र असणारा शिव पार्वतीसहित नंदीसहित आणि इतर प्रमथगणांसहित आपल्या सुशोभित स्थानास गेला. (७७) असो. असें हें जलंधरवधाचें सर्व चरित्र संक्षिप्त रीतीनें सांगितलें. जो कोणी मनुष्य हें चरित्र वाचील तो मरणानंतर शिवगण होईल.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठनागनाथ नांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं जलंधर नांवाचा चोविसावा अध्याय संपला.

## ॥ अथ पंचविंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ लैंग्ये ॥ ऋषय ऊचुः ॥ अंधको नाम दैत्येन्द्रो मंदरे चारुकंदरे ॥ दैत्यस्तु स कथं लब्धो गाणपत्यं महेश्वरात् ॥ वक्तुमर्हसि चास्माकं यथावृत्तं यथाश्रुतम् ॥१॥

सूत उवाच ॥ अंधकानुग्रहं चैव दमनं शोषणं वरम् ॥ वरलाभमशेषं च प्रवदामि समासतः ॥२॥ हिरण्याक्षस्य तनयो हिरण्यनयनोपमः ॥ पुरान्धक इति ख्यातो तपसा लब्धविक्रमः ॥ प्रसादाद्ब्रह्मणः साक्षादवध्यत्वमवाप्य च ॥३॥ त्रैलोक्यमखिलं भुक्त्वा भुक्त्वा चेंद्रपुरं पुरा ॥लीलया चाप्रयत्नेन बाधयामास वासवम् ॥४॥ बाधितास्ताडिता बद्धाः पातितास्तेन ते सुराः ॥ दुद्रुवुर्मंदरं भीता नारायणपुरोगमाः ॥५॥एवं संपीड्य वै देवानंधकोऽपि महासुरः ॥ यदृच्छया गिरिं

---

श्रीशिवास नमस्कार असो. लिंगपुराणांत हा कथाभाग आहे. (१) ऋषि ह्मणाले— अंधक या नांवाचा एक बलाढ्य दैत्य होता, तो एकवेळ सुंदर सुंदर गुहा असणाऱ्या मंदर पर्वतावर गेला त्या दैत्याला शंकरापासून गाणपत्य ( शिवगणाचा अधिकार ) कसें मिळालें? हा कथाभाग जसा असेल व जसा तूं ऐकिला असशील तसा आह्मांस कृपा करून सांग. असा ऋषींचा प्रश्न ऐकून—

(२) सूत ह्मणाले— ऋषीश्वरहो, अंधकावर ब्रह्मदेवाचा अनुग्रह कसा झाला? त्यांस शिवांनीं शिक्षा काय केली? त्यानें लोकांस त्रास कसा दिला? त्याला वरदान कसें आणि काय मिळालें? हें सर्व मी तुह्मांस थोडक्यांत सांगतों ऐका. (३) पूर्वी हिरण्याक्षाचा मुलगा अंधक नांवाचा दैत्य होता. तोही आपल्या बापासारखाच पराक्रमी होता. त्यानें मोठी खडतर तपश्चर्या केली असल्यानें तो सर्वांस अजिंक्य झाला होता, प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें त्यास तुला मरण नाहीं असा वर दिला होता. (४) त्यानें सर्व त्रैलोक्याचा उपभोग घेतला ( राज्य केलें ) आणि अमरावतीस जाऊन इंद्रास सहज रीतीनें जिंकून इंद्राचें राज्य घेतलें, व त्यास कैदेंत ठेविलें. (५) त्यानें सर्व देवांस अगदीं त्रासवून सोडिलें, त्यानें त्यांस पाहिजे तितके बेदम मारिलें, त्यांस बांधून ठेविलें, त्यांस पाय धरून जमिनीवर आपटलें. तेव्हां विष्णु वगैरे मुख्य मुख्य देव घाबरून मंदरपर्वतावर श्रीशंकराकडे पळत गेले. (६) अंधकासुरानें त्रासवून सोडलेले देव जसे सुंदर गुहा असणाऱ्या मंदर

प्राप्तो मंदरं चारुकंदरम् ॥६॥ भुजंगप्रयातवृत्तम् ॥ ततस्ते समस्ताम-रेंद्राः ससाध्याः सुरेशं महेशं पुरेत्याहुरेवम्॥ द्रुताश्चाल्पवीर्याः प्रभग्ना विभिन्ना वयं दैत्यराजस्य शस्त्रैर्निकृत्ताः ॥७॥ इतीदमखिलं श्रुत्वा दै-त्यागममनौपमम् ॥ गणेश्वरैश्च भगवानंधकाभिमुखं ययौ ॥८॥ वृत्तम्॥ तदेव पद्मोद्भवविष्णुमुख्याः सुरेश्वरा विप्रवराश्च सर्वे ॥ जयेति वाचा भगवन्तमूचुः किरीटदत्तांजलयः समंतात् ॥९॥ तथाशेषासुरांस्तस्य कोटिकोटिशतांस्ततः ॥ भस्मीकृत्य महादेवो निर्बिभेदांधकं तदा॥१०॥ शूलेन शूलिना प्रोतं दग्धकल्मषकंचुकम् ॥ दृष्ट्वाऽन्धकं ननादेशं प्रणम्य च पितामहः ॥११॥ तन्नादश्रवणान्नेदुर्देवा देवं प्रणम्य तम् ॥ ननृतुर्मु-नयः सर्वे मुमुदुर्गणपुंगवाः ॥१२॥ ससृजुः पुष्पवर्षाणि देवाः शंभो-

---

पर्वतावर आले, तसा त्यांच्या मागोमाग सहजगतीनें अंधकासुरही धांवत आला (७) तेव्हां ते सर्व मुख्य मुख्य देव साध्यांसहित सर्व देवांचा अधिपति महेश्वर ह्याचे पुढें जाऊन असें ह्मणाले, परमेश्वरा, आह्मी धांवत पळत तुजकडे आलों, आमचा पराक्रम अंधकासुरापुढें कांहीं चालत नाहीं. आह्मी निर्बळ आहों, आह्मी अंधकासुरापासून पराजय पावलों, दैत्यांच्या शस्त्रांनीं आमचीं अंगें रक्तं-बाळ झालीं, त्यामुळें निरुपाय होऊन आह्मी सर्वजण तुला शरण आलों आहों, तूं आमचें रक्षण कर. (८) असें तें सर्व देवांचें बोलणें ऐकून घेऊन हा अंधका-सुर दांडगेश्वरासारखा येथें आला, असें समजतांच आपल्या सर्व गणेश्वरांसहित परमेश्वर श्रीशिव अंधकासुराबरोबर युद्ध करण्याकरितां त्याच्या समोर येऊन उभे राहिले. (९) तें पाहिल्याबरोबर लागलेच ब्रह्मदेव श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देव आणि मुनीश्वर यांनीं श्रीशिवाचा जयजयकार केला. आणि सर्वजण मस्त-कांस दोन्ही हात लावून त्यास नमस्कार करूं लागले. (१०) अंधकासुराबरोबर कोट्यावधि दैत्य आले होते त्या सर्वांस महादेवांनीं एका क्षणांत जाळून टाकिले, आणि मग अंधकासुरावर त्यांनीं प्रहार केला. (११) महादेवांनीं आपला शूल अंधकासुराचे अंगांत रोंविला, आणि त्यामुळें त्याचें पाप नाहींसें झालेलें पाहून ब्रह्मदेवास मोठा आनंद होऊन त्यानें शिवास नमस्कार करून सिंहनाद केला. (१२) ब्रह्मदेवाचा तो आनंदाचा ध्वनि ऐकतांच सर्व देवांस मोठा आनंद होऊन त्यांनीं शिवास नमस्कार केला व सर्वांनींच आनंदानें जयघोष केला. मुनीश्वर नाचूं लागले व सर्व शिवगणांस मोठा आनंद झाला. (१३) सर्व देवांनीं तेव्हां शंकरावर फुलांचा वर्षाव केला. फार काय सांगावें? त्या आनंदामुळें सर्व

स्तदोपरि ॥ त्रैलोक्यमखिलं हर्षान्ननर्त च ननंद च ॥१३॥ दग्धोऽग्नि-
ना च शूलेन प्रोतः प्रेत इवांधकः ॥ सात्त्विकं भावमास्थाय चिंतया-
मास वै तदा ॥१४॥ शंकरः पापिनं मूढं पतितं मां सुरेश्वरः ॥ अदह-
द्यन्महादेवः कृतार्थोऽस्मि न संशयः ॥१५॥ ममाद्यानुमितं कर्म मम
शोभनमित्यहो ॥ जन्मान्तरेऽपि देवेन दग्धो यस्माच्छिवेन वै ॥१६॥
आराधितो मया शंभुः पुरा साक्षान्महेश्वरः ॥ तस्मादेतन्मया लब्ध-
मन्यथा नोपपद्यते ॥१७॥ यः स्मरेन्मनसा रुद्रं प्राणान्ते सकृदप्यसौ ॥
प्रयाति शिवसायुज्यं किं पुनर्मम शोभनम् ॥१८॥ ब्रह्मा च भगवान्वि-
ष्णुः सर्वे देवाः सवासवाः ॥ शरणं प्राप्य तिष्ठंति तमेव शरणं व्रजे
॥१९॥ एवं संचिंत्य तुष्टात्मा सोऽन्धकश्चांधकार्दनम् ॥ सगणं सांब-
मीशानमस्तुवत्पुण्यगौरवात् ॥२०॥ प्रार्थितस्तेन भगवान्परमार्तिहरो

---

त्रैलोक्य नाचूं लागलें. जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. (१४) शंकराच्या तिसऱ्या डोळ्यांतील अग्नीच्या उष्णतेनें अंधकाचें अंग भाजून गेलें, व अंगांत शूल रोंवला असल्यामुळें तो प्रेतासारखा निस्सत्व दिसूं लागला. तेव्हां त्याचे मनांत सात्विक भाव उत्पन्न होऊन तो आपल्या मनांत विचार करूं लागला. (१५) मी पातकी आहें, मी अज्ञान आहें, मी पतित आहें. असें असतां देवाधिदेव, शंकर, महादेवानें मला आतां भाजून टाकिलें, त्यामुळें माझ्या जन्माचें सार्थक्य झालें. ह्यांत संशय नाहीं. (१६) माझें कर्म कसें होतें ह्याचें मीं अनुमान केलें. मीं पूर्वजन्मांत फारच पुण्य केलें होतें ह्यांत शंका नाहीं. ह्मणून मला शिवांनीं जाळलें, शिवाच्या हातून मरण येणें कमीपणाचें काम नव्हे.(१७) मीं पूर्वजन्मांत शंकराचें आराधन केलें, ह्मणूनच मला शिवाच्या हातून मरण आलें; नाहींपेक्षां कधींही आलें नसतें. (१८) जो कोणी मनुष्य मरणाच्या वेळीं एकवेळ कां होईना मनांत शिवाचें स्मरण करितो तो शिवसायुज्य पावतो. मग माझें चांगलें होईल असें तें काय सांगावयाचें आहे? (१९) ब्रह्मदेव, परमेश्वर श्रीविष्णु आणि इंद्रादिक सर्व देव ज्याला शरण जाऊन ज्याजवळ राहतात, त्यालाच मी शरण जातों. (२०) असा विचार करून त्या अंधकानें संतुष्ट होऊन पूर्वार्जित पुण्यामुळें पार्वतीसहित आणि सर्व प्रमथगणांसहित श्रीशिवाची स्तुति केली. (२१) अशी त्यानें स्तुति केल्यावर दुःखितांचें दुःख निरसन करणारा

हरः ॥ हिरण्यनेत्रतनयं शूलाग्रस्थं सुरेश्वरः ॥ प्रोवाच वदनं प्रेक्ष्य घृणया नीललोहितः ॥२१॥

तुष्टोऽस्मि वत्स भद्रं ते कामं किं करवाणि ते ॥ वरान् वरय दैत्येंद्र वरदोऽहं तवान्धक ॥२२॥ श्रुत्वा वाक्यं तदा शंभोर्हिरण्यनयनात्मजः ॥ हर्षगद्गदया वाचा प्रोवाचेदं महेश्वरम् ॥२३॥

भगवन् देवदेवेश भक्तानामार्तिसंहर ॥ त्वयि भक्तिं प्रसीदेश यदि देयो वरश्च मे ॥२४॥ श्रुत्वा भवोऽपि वचनं चांधकस्य महात्मनः ॥ प्रददौ दुर्लभां श्रद्धां दैत्येंद्राय महात्मने ॥२५॥ गाणपत्यं च दैत्याय प्रददौ चावरोप्य तम् ॥ प्रणेमुस्ते सुरेंद्राद्या गाणपत्ये प्रतिष्ठिते ॥२६॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने अंधकगाणपत्यप्रदानं नाम पंचविंशोऽध्यायः ॥

---

देवाधिदेव नीललोहित ( शिव ) दयालुपणानें शूलाच्या अग्रावर उचलून धरिलेल्या हिरण्याक्षाच्या मुलाच्या ( अंधकासुराच्या ) तोंडाकडे पाहून ह्मणाले—

(२२) शिव ह्मणाले मुला अंधका, मी तुला प्रसन्न आहें तुझें कल्याण असो, तुझी काय इच्छा पूर्ण करूं तें मला सांग. हे दैत्येश्वरा, तुला काय वर पाहिजेत ते मजजवळून मागून घे, मी तुला वर देण्यास सिध्द आहे. (२३) असें शिवाचें कृपालुपणाचें बोलणें ऐकून हिरण्याक्षाचा मुलगा ( अंधकासुर ) मोठ्या आनंदानें सद्गदित होऊन तो शिवास ह्मणाला—

(२४) अंधकासुर ह्मणाला— परमेश्वरा, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस. तूं भक्तांचीं दुःखें दूर करितोस. मला जर आपण वर देणार आहां तर आपली भक्ति माझे मनांत असावी हाच वर द्या. (२५) महादेवांनींही त्या मोठ्या मनाच्या अंधकासुराचें बोलणें मान्य करून त्या दैत्येश्वराच्या मनांत कधींही मिळणार नाहीं अशी दृढ श्रद्धा उत्पन्न केली. (२६) मग त्या अंधकासुरास त्यांनीं शूलावरून खालीं उतरलें आणि त्यास गाणपत्याचा अधिकार दिला. तो गणेंद्राचा अधिकार मिळाल्यापासून सर्व देव त्यास नमस्कार करूं लागले.

ह्याप्रमाणें श्रीनीलकण्ठनागनाथनांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांपैकीं अंधकास गाणपत्याचा अधिकार मिळाल्याचें वर्णन असलेला हा पंचविसावा अध्याय संपला.

## ॥ अथ षड्विंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ काशीखण्डे ॥ अगस्त्य उवाच ॥ दृष्ट्वा काशीं दृगानंदां तारकारे पुरारिणा ॥ किमकारि समाचक्ष्व प्राप्तं बहुमनोरथैः ॥१॥

स्कंद उवाच ॥ माहात्म्यं तच्छृणु मुने कथ्यमानं मयाऽनघ ॥महाश्चर्यप्रजजनं महापातकहारि च ॥२॥ कोलाहलो महानासीत्त्राहि त्राहीति सर्वशः ॥ महिषासुरसुतोऽसौ समायाति गजासुरः ॥३॥ यत्र यत्र धरायां स चरणं प्रहिणोति हि ॥ अचलोल्ललयांचक्रे तत्र तत्रास्य भारतः ॥४॥ ऊरुवेगेन तरवः पतंति शिखरैः सह ॥ यस्य दोर्दण्डघातेन चूर्णाः स्युश्च शिलोच्चयाः॥५॥ यस्य मौलिजसंघर्षाद्धना व्योम त्यजन्त्यपि ॥ गिरिभागं न चाद्यापि जहुस्तत्केशतापिताः ॥६॥ यस्य निश्वाससंभारैरुत्तरंगा महाब्धयः ॥ नद्योऽप्यमन्दकल्लोला भवंति ति-

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ स्कंद पुराणांत, काशीखंडांत हा कथाभाग आहे, तो असाः– (१) अगस्त्यऋषि ह्मणाले– कार्तिकेया, डोळ्यास आनंद देणारी काशी पाहिल्यावर शिवांनीं काय केलें तें मला सांग. तें ऐकण्याची मला फार दिवसांपासून इच्छा आहे. असें अगस्त्याचें बोलणें ऐकून—

(२) कार्तिकेय ह्मणाले— हे निष्पापस्वभावाच्या मुनीश्वरा, काशीक्षेत्राचें माहात्म्य मी तुला सांगतों. तें माहात्म्य मोठें मौजेचें असून तें ऐकल्यानें ऐकणाराचीं पंचमहापातकें नाश पावतात. (३) एकेवेळीं काशीक्षेत्रांत सांभाळा, आह्मांस सांभाळा, महिषासुरापासून जन्मलेला गजासुर आह्मांवर धांवून येत आहे, अशी चहूंकडे आरडा ओरड होऊन, मोठा गोंधळ उडाला. (४) हा गजासुर इतका दांडगेश्वर होता कीं, तो जेथें जेथें पाय ठेवी तेथें तेथें जमीन त्याच्या ओझ्यानें थरथर कांपत असे. (५) तो पळूं लागला ह्मणजे त्याच्या मांड्यांच्या वाऱ्यानें झाडें मुळासुध्दां उपटून पडत असत. त्याच्या दोन्ही दंडाच्या प्रहारानें पर्वताचा देखील चुरा होई. (६) त्या गजासुराच्या मस्तकावरील केंस घांसल्यामुळें ढग आकाशांतून निघून जात, अद्याप देखील त्याच्या केशामुळें भाजून गेलेले ढग पर्वताच्या आश्रयानें राहिलेले दिसतात. (७) तो श्वासोच्छ्वास करूं लागला ह्मणजे महासमुद्रांत मोठमोठ्या लाटा उसळूं लागत, व नद्यांत मोठ्या

मिभिः सह ॥७॥ योजनानां सहस्राणि नव यस्य समुच्छ्रयः ॥ तावि चैव हि विस्तारस्तनोर्मायाविनोऽस्य हि ॥८॥ यन्नेत्रयोः पिंगलिमा तथा तरलिमा पुनः ॥ विद्युता नोज्झितेऽद्यापि सोऽयमायाति सत्वरम् ॥९॥ यां यां दिशं समभ्येति सोऽयं दुःसहदानवः ॥ सा सा भस्मीभवेदस्य साध्वसादेव दिग्ध्रुवम् ॥१०॥ ब्रह्मलब्धवरश्चायं तृणीकृतजगत्त्रयः ॥ अवध्योऽहं भवामीति स्त्रीपुंसैः कामनिर्जितैः ॥११॥ ततस्त्रिशूलहस्तस्तमायान्तं दैत्यपुंगवम् ॥ विज्ञायावध्यमन्येन शूलेनाभिजघान तम् ॥१२॥ प्रोतस्तेन त्रिशूलेन स च दैत्यो गजासुरः ॥ छत्रीकृतमिवात्मानं मन्यमानो जगौ हरम् ॥१३॥

गजासुर उवाच ॥ त्रिशूलपाणे देवेश जाने त्वां स्मरहारिणम् ॥

---

मोठ्या लाटा उसळूं लागून मासे कावरे बावरे होत. (८) त्या गजासुराची उंची नऊ हजार योजनें होती, आणि त्या कपटी गजासुराचे इतर अवयवही त्या मानानें धष्ट पुष्ट असून त्याच्या अंगाचा व्यास नऊ हजार योजनें होता. (९) त्याच्या डोळ्याचा पिंगटपणा (लालपणा) आणि चंचळपणा विजेनें आपले ठिकाणीं धारण करून ठेविला आहे तो अद्यापि देखील सोडिला नाहीं (त्याचे डोळे विजेपेक्षां लाल व चंचळ होते ). तो राक्षस आपल्याकडे येत आहे, आतां काय करावें? अशी चिंता लागून लोकांत एकच गोंधळ उडून गेला. (१०) हा कोणालाच न आटोपणारा दैत्य ज्या ज्या दिशेकडे जाई ती ती दिशा खरोखर त्याच्या भयानेंच जळून जाई. (११) जे कोणी स्त्रीपुरुष मदनास वश झाले असतील ( विषयसुख भोगणारे असतील ) त्यांच्या हातून आपणास मरण नसावें असा ब्रह्मदेवापासून ह्यानें वर मिळविला होता आणि त्यामुळें हा सर्व त्रैलोक्याला कसपटासारखें मानीत असे त्याला वाटे कीं, सर्व त्रैलोक्य विषयलंपट असल्यामुळें आपल्याला कोणापासूनच मरणाची भीति राहिली नाहीं. (१२) मग आपल्या हातांत शूल घेऊन श्रीशिवांनीं आपल्याकडे येणाऱ्या आणि स्वतःस अमर असें मानणाऱ्या गजासुरास मारिला. (१३) श्रीशिवांनीं आपल्या पोटांत तीक्ष्णधारेचा त्रिशूल रोंवून आपणास वरचेवर छत्रीसारखें उचलून धरिलें आहे असें पाहून, तो गजासुर दैत्य शिवास ह्मणूं लागला—

(१४) गजासुर ह्मणाला— त्रिशूल हातांत घेणारे देवाधिदेवा, मी तुला ओळखतों, तूं मदनाचा नाश करणारा आहेस, मदनास वश होणारा नव्हेस, हे त्रिपु-

तव हस्तान्मम वधः श्रेय एव पुरान्तक ॥१५॥ त्वमेको जगतां वंद्यो विश्वस्योपरि संस्थितः ॥ कालेन सर्वैः स्मर्तव्यः श्रेयसे मृत्युरीदृशः ॥१५॥ इति तस्य वचः श्रुत्वा देवदेवः कृपानिधिः ॥ प्रोवाच प्रहसंश्छंभुः घटोद्भव गजासुरम् ॥१६॥

ईश्वर उवाच ॥ गजासुर प्रसन्नोऽस्मि महापौरुषशेवधे ॥ सानुकूलं वरं ब्रूहि ददामि सुमतेऽसुर ॥ इत्याकर्ण्य स दैत्येन्द्रः प्रत्युवाच महेश्वरम् ॥१७॥

गजासुर उवाच ॥ यदि प्रसन्नो दिग्वासाः सदा भव वसान मे ॥ इमां कृत्तिं विरूपाक्ष त्वत्त्रिशूलाग्निपाविताम् ॥ सुप्रमाणां सुखस्पर्शां रणांगणप्रणीकृताम् ॥१८॥ इष्टगंधिः सदैवास्तु सदैवास्त्वतिकोमला ॥ सदैव निर्मला चास्तु सदैवास्त्विवति मण्डनम् ॥१९॥ महातपोनलज्वालां प्राप्यापि सुचिरं विभो ॥ निर्दग्धा कृत्तिरेषा मे पुण्या गंधनिधिस्ततः ॥२०॥ यदि पुण्यवती नैषा मम कृत्तिर्दिगंबर ॥ तथा त्वदंगसंगो

रांतका, तुझ्या हातून मला मरण येणें हेंही चांगलेंच आहे. (१५) कां तर तूंच जगास वंद्य ( नमस्कार करण्यास योग्य ) आहेस, सर्व जग तुला नमस्कार करितें. तूं सर्व त्रैलोक्याच्या वर राहतोस ( सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेस ). सर्व प्राणिमात्रांनीं माझ्या सारखेंच शेवटीं तुझ्या हातून मरण यावें हेंच मागावें. (१६) अगस्त्य ऋषे, असें गजासुराचें बोलणें ऐकून ते दयाळू देवाधिदेव शिव हंसत हंसत ह्मणाले.

(१७) ईश्वर बोलले— गजासुरा मी तुला प्रसन्न आहें, तूं शौर्याचा निधि आहेस ( मोठा बलाढ्य आहेस ), हे बुद्धिमाना दैत्यपते, तुला काय पाहिजे असेल तो अनुकूल वर माझ्यापासून मागून घे, मी तुला देण्यास तयार आहें असें महेश्वराचें बोलणें ऐकून गजासुर ह्मणाला—

(१८) गजासुर ह्मणाला— हे दिगंबरा, हे भवा, हे विरूपाक्षा, जर तूं मला प्रसन्न आहेस तर युध्दामध्यें मिळालेलें हें माझें कातडें तुझ्या त्रिशूलाच्या अग्नीनें पवित्र झालें आहे, हें वातावेताचें लांब रुंद आहे, हें मऊ आहे, हें तूं पांघरीत जा. ह्मणजे झालें. (१९) ह्या कातड्याला नेहमीं सुगंध असो, हें नेहमीं अतिशय मऊ असो, व नेहमीं अतिशय निर्मळ असो, व हें नेहमीं अलंकारासारखें शोभो. (२०) मीं पूर्वीं पुष्कळ दिवसपर्यंत तपश्चर्या केल्यामुळें हें माझें कातडें तपोग्नीमुळें अतिशय पवित्र झालें आहे; त्यामुळें ह्याला सुगंधही चांगला येत आहे. (२१) हे दिगंबरा ( शिवा ), जर हें माझें कातडें पवित्र नसतें तर

ऽस्याः कथं जातो रणांगणे ॥२१॥ अन्यं च मे वरं देहि यदि तुष्टोऽसि शंकर ॥ पुनः प्रोवाच दैत्येंद्रं देवो निर्मलमानसम् ॥२२॥

ईश्वर उवाच ॥ शृणु पुण्यनिधे दैत्य वरमन्यं सुदुर्लभम् ॥ इदं पुण्यं शरीरं ते क्षेत्रेऽस्मिन्मुक्तिसाधने ॥२३॥ मम लिंगं भवत्यत्र सर्वेषां मुक्तिदायकम् ॥ कृत्तिवासेश्वरं नाम महापातकनाशनम् ॥२४॥ सर्वेषामेव लिंगानां शिरोभूतमिदं परम् ॥ कथयित्वेति विश्वेशस्तत्कृत्तिं प्रतिगृह्य च ॥ गजासुरस्य महतीं प्रावृणोद्धरिचर्मवत् ॥२५॥ महामहोत्सवो जातस्तस्मिन्नहनि कुंभज ॥ कृत्तिवासत्वमापेदे यस्मिन् देवो दिगंबरः ॥२६॥ कृत्तिवासःसमुत्पत्तिं ये श्रोष्यन्तीह मानवाः ॥ तल्लिंगदर्शनाच्छ्रेयो लभन्ते ते न संशयः ॥२७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने गजचर्मधारणं नाम षड्विंशोऽध्यायः ॥

---

ह्याला युध्दांत तुझ्या अंगाचा स्पर्श कसा झाला असता? मुळींच झाला नसता. (२२) शंकरा, जर तूं मला प्रसन्न आहेस ह्मणतोस तर मला आणखी एक वर दे. असें गजासुराचें बोलणें ऐकून पुनः श्रीशंकर निर्मळ मनाच्या दैत्यास ह्मणाले—

(२३) शिव ह्मणाले— हे गजासुरा, तूं मोठा पुण्यवान् आहेस, आणखी एक दुसरा दुर्मिळ वर तुला देतों ऐकून घे. हें तुझें पवित्र शरीर ह्या मोक्षप्राप्ती करून देणाऱ्या काशीक्षेत्रांत (२४) माझे नांवचें लिंग होईल आणि तें सर्वांस मोक्षास नेईल, त्यास कृत्तिवासेश्वर असें नांव पडेल, व त्याचें दर्शन घेणाऱ्यानें महापातकें केलीं असलीं तरी त्यांचा नाश होईल. (२५) हें लिंग सर्व लिंगांत श्रेष्ठ होईल. असें सांगून विश्वेश्वरांनीं गजासुराच्या अंगावरील मोठें थोरलें कातडें काढून घेतलें व ते नृसिंहाच्या कातड्यासारखें त्या कातड्यास आपल्या अंगावर घेऊं लागले (त्यांनीं तें पांघरलें). (२६) अगस्त्य ऋषे, ज्या दिवशीं श्रीशिव दिगंबर यांनीं गजासुराचें कातडें आपलें अंगावर घेतलें, त्या दिवशीं मोठा समारंभ झाला. (२७) जे लोक ह्या कृत्तिवासेश्वर लिंगाची उत्पत्ति कशी झाली हा कथाभाग ऐकतील, व त्या लिंगाचें दर्शन घेतील, त्यांचें कल्याण होईल ह्यांत कांहीं संशय नाहीं.

ह्याप्रमाणें श्रीनीलकण्ठनागनाथनांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं गजचर्मधारण नांवाचा सव्विसावा अध्याय संपला.

## ॥ अथ सप्तविंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ अगस्त्य उवाच ॥ भगवन्सर्वधर्मज्ञ सर्वलोकनमस्कृत ॥ सर्वार्थवेदनोपाय सर्वेश्वरसुत प्रभो ॥१॥ त्वत्तः श्रुता मया पूर्वं शिवाश्रयकथाः शुभाः ॥ इदानीं श्रोतुमिच्छामि त्वत्प्रसादात्षडानन ॥ दुर्विज्ञेयानि लोकेऽस्मिन् चरितानि त्रिशूलिनः ॥२॥ किं कारणं वृषेंद्राख्यं वाहनं बहु मन्यते ॥ रथनागतुरंगादौ वाहनार्हे शुभे सति ॥३॥ चंदनागरुकर्पूरकुंकुमालेपने शुभे ॥ श्मशानभस्मदिग्धांगं कुतो रूपं प्रियं प्रभोः ॥४॥ मुक्तामाणिक्यवैडूर्यशुद्धजांबूनदाच्छुभात् ॥ भूषणाद्बहु मन्यते कथमस्थीनि शंभुना ॥५॥ शिरःकपालमालाभिरुत्तमांगे स्वलंकृते ॥तनुर्वेदान्तवेद्यस्य कुतो हेतोः प्ररोचते ॥६॥ कैलासशिवलोकादौ वासस्थानेऽतिशोभने ॥ तद्वत्पितृवने कष्टे

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ स्कंदपुराणांत पुढील कथाभाग आहे. (१) अगस्त्य ह्मणतात---कार्तिकेया, तूं प्रत्यक्ष परमेश्वर आहेस, तुला सर्व धर्म माहीत आहेत, तुला सर्व लोक नमस्कार करितात. सर्व प्रकारचे अर्थ समजून घेण्याचा तूं मार्ग आहेस. तूं देवाधिदेवाचा मुलगा असून समर्थ आहेस. (२) मी तुजपासून शिवसंबंधी कल्याणकारक अशा अनेक कथा ऐकिल्या; कार्तिकेया आतांही तुझ्यापासून अशाच शिवकथा मला ऐकावयाच्या आहेत. तर तूं मला कृपा करून सांग. त्रिशूल धारण करणाऱ्या शिवाचीं चरित्रें ह्या जगांत ऐकण्यास मिळणें फार दुर्मिळ आहेत. (३) रथ, हत्ती, घोडा वगैरे बसण्याचे उपयोगीं पडणारीं चांगलीं चांगलीं वाहनें असतां, वृषभ नांवाचें वाहनच शिवास इतकें मनापासून कां आवडतें ? (४) चंदन, कृष्णागरु, कापूर, कुंकुम वगैरे चांगलीं चांगलीं सुवासिक द्रव्यें सोडून शिवाला स्मशानांतील भस्म आपले अंगास लावून बसणें कां आवडतें ? (५) मोतीं, माणिक, वैडूर्य, उत्तम बावनकशी सोनें ह्यांच्या अलंकारांपेक्षां शिवाला अस्थींचे अलंकारच जास्त कां आवडतात ? (६) आपल्या गळ्यांत आणि मस्तकावर कपालमाला धारण करून आपलें शरीर सुशोभित करणें ही गोष्ट तो श्रीशिव स्वतः वेदान्ताच्या साधनानें जाणण्यासारखा असतां त्याला कशी आवडते ? (७) कैलास पर्वत, शिवलोक वगैरे राहण्याला योग्य असे दुसरे चांगले चांगले प्रदेश असतां, ते सर्व सोडून त्याला अतिशय

रमते केन हेतुना ॥७॥ कूर्मांगं क्रोडशृंगं च प्राण्यंगं ध्रियते कथम् ॥ अस्पृश्यानीति निन्दन्तेऽस्थीनि प्राण्यंगजानि च ॥८॥ भीषणान्दंशनपरान् बीभत्सान्वितदूषितान् ॥ फणींद्रान्भूषणत्वेन कुतो धत्ते महेश्वरः ॥९॥ नानावर्णेषु सूक्ष्मेषु वासस्वतिमृदुष्वपि ॥ क्षौमादिषु च सत्स्वेव चर्माणि परमेष्ठिनः ॥ द्वीपिहस्तिनृसिंहानां रोचन्ते केन हेतुना ॥१०॥ स्वर्णरत्नमयानेकपादपीठेषु सत्स्वपि ॥ अपस्मारोपरीशानः कुतो नृत्यन् व्यवस्थितः ॥११॥ अग्निं मृगं कुतो धत्ते त्रिशूलाद्यायुधैः समम् ॥ किं वा डमरुकं धत्ते भैरवांगं महारवम् ॥१२॥ देवकिन्नरगंधर्वयक्षाद्यैरुपशोभितैः ॥ सेव्यमानो महादेवस्तथा चाप्सरसां गणैः ॥१३॥ पिशाचैर्विकृताकारैर्भूतैश्च विकटाननैः ॥ सहवासप्रियो नित्यं कुतः कल्याणवेषधृक् ॥१४॥ एतत्सर्वं परिज्ञातुमिच्छामीश्वरचेष्टितम् ॥ वेदा

---

भयंकर दिसणाऱ्या स्मशानभूमींतच स्वच्छंदपणानें फिरणें कसें आवडतें ? (८) कासवाचीपाठ, डुकराचें शिंग, वगैरे जनावरांचे अवयव तो कसे धारण करितो ! प्राण्याच्या शरीरांतील हाडें तर लोक अपवित्र मानतात; असें असून शिवाला तीं कशीं आवडतात ? (९) हे साप पाहिल्याबरोबर भय वाटतें, हे चावतात, हे दिसण्यांतही चांगले नसून अतिशय विषारी असतात. ह्या अशा सापांचे अलंकार करून अंगावर घालणें शिवास कां चांगलें वाटतें ? तो तसें कां करितो. (१०) अनेक प्रकारचीं बारीक, मऊ मऊ आणि ऊबदार रेशमाचीं व जरीचीं वस्त्रें असतां, तीं सर्व टाकून देऊन परमेश्वराला वाघाचें हत्तीचें आणि नृसिंहाचें कातडें अंगावर घेणेंच कां बरें आवडतें. (११) अनेक प्रकारचीं रत्नें जडलेलीं सिंहासनें पायाखालीं ठेवण्यास अनुकूल असतां, तीं सर्व टाकून देऊन हा परमेश्वर सापाच्या पाठीवरच नाचत कां उभा राहतो ? (१२) श्रीशिव आपल्या हातांत त्रिशूल वगैरे आयुधांबरोबर अग्नि आणि हरिण हे कशासाठीं घेतो ? तसेंच ओबडधोबड दिसणारा कर्कश आवाजाचा डमरु हातांत कशासाठीं घेतो? (१३) ह्या शिवाची देव, किन्नर, गंधर्व, यक्ष आणि अप्सरांचे समुदाय सेवा करितात; त्यामुळें ह्याचें घर नेहमीं गजबजलेलें असतें तें ह्यास बरें न वाटतां, (१४) हा भयंकर तोंडें असणाऱ्या आणि विरूप वेष असणाऱ्या पिशाचांची संगति कां करितो ? स्वतः ह्याचा कल्याणकारक वेष असतां ह्याला पिशाचांची संगति कशी बरी वाटते ? (१५) ही सर्व परमेश्वराची लीला मला समजून घ्यावयाची आहे. वेद देखील ह्या परमेश्वराचें चरित्र यथार्थ रीतीनें जाणण्यास असमर्थ

अप्यस्य मुह्यन्ति ज्ञातुं चरितमद्भुतम् ॥१५॥ स एव वेत्ति सर्वज्ञः सा च माता तवांबिका ॥ वेत्ति सर्वं तथा नूनं तनयत्वात्तयोर्भवान् ॥१६॥ ब्रह्मविष्णू न जानीतस्तदुद्भवविनाशनात् ॥ तस्माद्भवत्प्रसादेन ज्ञातुं मन्ये मयाप्यलम् ॥१७॥ अज्ञातज्ञापनं कर्तुं गुरुः शिष्येषु चार्हति ॥ भवान्मम गुरुस्तस्मादनुगृण्हीष्व तत्वतः ॥१८॥ इत्येवं प्रार्थितः स्कन्दोऽगस्त्येन ब्रह्मसूनुना ॥ आत्मनश्चापि शिष्येण प्रोवाच प्रणतो हरम् ॥१९॥

स्कंद उवाच ॥ त्वमतीव शिवे भक्तः कर्मणा मनसा गिरा ॥ तेन ते निखिलं वक्ष्ये रहस्यं शंभुचेष्टितम् ॥२०॥ आसन्नेते विशेषास्तु मम प्रागेव जन्मनः ॥ शंकरस्याप्रमेयस्य श्रुता मे वदनांबुजात् ॥२१॥ कल्पान्ते संव्हतिं कृत्वा स्वयमेको महेश्वरः ॥ ननर्त परमं भावं स्वातंत्र्यं चात्मनः स्मरन् ॥२२॥एकोमा साक्षिणी विद्या चतुःषष्ठिकलेश्वरी॥

---

आहेत; मग इतरांची कथा काय (१६) त्या शिवपरमात्म्याचें चरित्र त्याचा तो एक जाणतो, किंवा तुझी माता पार्वती जाणत्ये. किंवा त्या शिवपार्वतींचा तूं प्रत्यक्ष मुलगा आहेस ह्मणून खरोखर तूं एक जाणतोस. दुसऱ्या कोणाची जाणण्याची प्राज्ञा नाहीं. (१७)ब्रह्मदेव व श्रीविष्णु ह्यांस स्वतः जन्ममरण असल्यामुळें त्यांस शिवचरित्र यथार्थ माहीत नाहीं. ह्यासाठीं हें सर्व तुझ्या प्रसादानें मला समजून घ्यावें असें वाटतें. (१८) शिष्याला जी गोष्ट माहीत नाहीं ती गोष्ट गुरु त्याला समजावून देतो. तूं तर माझा गुरुच आहेस. ह्यासाठीं मीं तुला विचारलेल्या सर्व गोष्टी तूं मला यथार्थरीतीनें समजावून सांग(१९) असें ब्रह्मदेवाचा पुत्र अगस्त्यऋषि ह्याचें बोलणें ऐकून, व हा अगस्त्यऋषि आपलाच शिष्य आहे असें जाणून कार्तिकेय श्रीशिवास नमस्कार करून अगस्त्यास ह्मणाला.

(२०) कार्तिकेय ह्मणाला—अगस्त्यऋषे तूं मोठा शिवभक्त आहेस. तूं काया वाचा मनानें शिवाची भक्ति करितोस ह्यासाठीं सर्व शिवचरित्र मी तुला सांगतों ऐक. हें चरित्र फार महत्वाचें आहे. (२१) हे विशेष प्रकार तर मी जन्मास येण्याचे अगोदरच झाले आहेत; ते मी ज्याचें प्रमाण करितां येत नाहीं ( ज्याचें स्वरूप कळत नाहीं ) अशा श्रीशिवाच्या मुखानें ऐकिले आहेत, असो. (२२) प्रलयकाळाच्यावेळीं सर्व जगाचा संहार करून, महेश्वर एकटा मोठ्या आनंदानें मी सर्वांपेक्षां मोठा आहें आणि मी स्वतंत्र आहें असें मनांत आणून, नाचूं लागला. (२३) त्यावेळीं ही उमा ( पार्वती ) अर्थात चौसष्ट कलांची मुख्य

तस्यां वेदाश्च मंत्राश्च संस्थिता नित्यतां गताः ॥२३॥ तदा नाहो न रात्रिश्च न विष्णुर्न प्रजापतिः ॥ नाकाशादीनि भूतानि किं पुनर्भौतिकं जगत् ॥२४॥ धर्मोऽपरा तनुः शंभोर्दृष्ट्वा नष्टं चराचरम् ॥ नाशोऽपि मे भीतियुक्तो वृषो भूत्वेशमाश्रितः ॥२५॥ माभून्नाशो वृषस्येति तं चक्रे वाहनं शिवः ॥ वृषरूपमुवाचेदं धर्मं तत्र परः शिवः॥२६॥ सर्वदा त्वविनाशाय वाहनत्वं भजस्व मे ॥ मां धारयसि धर्म त्वं वृषरूपेण सर्वदा ॥२७॥ त्वामहं धारयाम्येव मच्छक्त्या परिबृंहितम् ॥ इत्येवं धर्ममाज्ञाप्य वाहनत्वमकल्पयत् ॥२८॥ अत एव हि संकल्पाद्दाहे तु तिसृणां पुराम् ॥ विष्णुर्वृषेंद्ररूपेण दधार शिरसा रथम् ॥ तस्माद्धर्मः सदा शंभोर्वृषरूपेण वाहनः ॥२९॥ श्मशाने नृत्यतीशानः सर्वभूतक्षयावहे ॥ तद्भस्मनांऽगरागेण हरिब्रह्मास्थिभूषणः ॥३०॥ तत्तत्संहारक-

देवता विद्या ही मात्र साक्षिणी होती; दुसरें कोणी नव्हतें. त्या विद्येंत हे वेद आणि मंत्र राहिले होते. त्यामुळें ते नित्यपणा पावले (२४) त्यावेळेस दिवस नव्हता, त्यावेळेस रात्र नव्हती, विष्णु नव्हता, ब्रह्मदेव नव्हता, आकाश, वायु वगैरे पंचमहाभूतें नव्हतीं; मग हें पंचमहाभूतात्मक जग कोठून असणार !(२५) त्यावेळीं शंकराची प्रत्यक्ष दुसरी मूर्तिच अशा धर्मानें सर्व जगाचा नाश झालेला पाहून तो माझाही असाच नाश होईल ह्या भयानें बैलाचें रूप घेऊन श्रीशिवास शरण आला. (२६) तेव्हां बैलाचें रूप घेऊन आपणास शरण आलेल्या धर्माचा नाश होऊं नये, ह्मणून आपलें वाहन करून परशिव त्या धर्मास ह्मणाले. (२७) तुझा कधींही नाश होऊं नये असें तुला वाटत असेल, तर तूं माझें वाहन हो; आणि धर्मा, तूं नंदीचेंच रूप घेऊन मला पाठीवर नेहमीं बसूं देत जा. (२८) ह्मणजे मीही माझ्या शक्तीनें परिपूर्ण अशा तुला सांभाळून धरीन; तुझा नाश होऊं देणार नाहीं. असें धर्मास सांगून शिवानें त्यास आपलें वाहन होण्याची आज्ञा केली, व त्यास आपलें वाहन केलें. (२९) ह्यासाठीं ह्याच उद्देशानें त्रिपुरांचा नाश करावयाच्यावेळीं श्रीविष्णूनें नंदीचें स्वरूप घेऊन आपल्या डोक्यानें रथ वर उचलला ह्मणूनच नंदीस्वरूप धर्माला शिवानें आपलें वाहन केलें ( शिवास नंदीवर बसण्याची आवड आहे. ) (३०) श्रीविष्णु ब्रह्मदेव ह्यांच्या हाडांच्या माळा गळ्यांत घालून सर्व प्रेतांचें स्थान अशा भयंकर स्मशानभूमींत ( प्रलयकालच्या महास्मशानांत ) आपल्यास अंगास उटीसारखें भस्म लावून शिव कां नाचतो तें सांगतों ऐक. (३१) त्या त्या प्रळयकाळाच्यावेळीं

ष्यांगा ब्रह्मविष्ण्वैंद्रदेवताः ॥ विष्णुसंज्ञा ह्यसंख्याता ह्यसंख्याताः पितामहाः ॥ ह्यसंख्याताः सुरेंद्राश्च नित्य एको महेश्वरः ॥३१॥ तेषामस्थीनि भस्मानि कपालानि महेश्वरः ॥ नित्यत्वमात्मनो धत्ते प्रबोधयितुमक्षयी ॥ लिंगार्थमात्मभक्तानां धारयत्यस्थिभस्मनी ॥३२॥ रक्षार्थं मंगलार्थं च पवित्रार्थं च संततम् ॥ लिंगार्थमात्मभक्तानामुत्तमं भस्म धत्तवान् ॥३३॥ भयेभ्यो रक्षणाद्रक्षा रोगेभ्यश्चापि रक्षणात् ॥ पापानां भर्त्सनाद्भस्म भासनाद्भसितं मतम् ॥३४॥ क्षारयत्यखिलान्दोषान् तत्तु क्षारमुदाहृतम् ॥ तस्माद्भस्मसमं श्रेयो न भूतं न भविष्यति ॥३५॥ एतस्मात्कारणाद्भस्म ध्रियते शंभुना सदा ॥ यद्यत्स मन्यते देवस्तत्तद्भक्तः समाचरेत् ॥३६॥ संहारलीलायुक्तस्य संहारस्थानमेव

---

विष्णूंचा ब्रह्मदेवांचा आणि इंद्रादिक देवांचा संहार होऊन त्यांचीं अंगें जळून गेलीं. असे आजपर्यंत अनेक विष्णु होऊन गेले, असे आजपर्यंत अनेक ब्रह्मदेव होऊन गेले, व असे आजपर्यंत अनेक इंद्रादिक देव होऊन गेले. तरी पण महेश्वर एकटाच अविनाशी आहे हें स्पष्ट दाखविण्याकरितां, (३२) हा कधींही नाश न पावणारा महेश्वर त्यांचीं हाडें, त्यांची राख व त्यांचीं कपाळें स्वतः आपल्या भक्तांच्या खुणे करितां आपल्या शरीरावर धारण करितो, (३३) आपल्या भक्तांच्या रक्षणाकरितां, आपल्या भक्तांच्या कल्याणाकरितां आपल्या भक्तांच्या शुद्धते करितां, व आपल्या भक्तांच्या खुणेसाठीं श्रीशिव हें उत्तम भस्म धारण करितो (लावितो) (३४) भस्म हें भयापासून भक्तांचें रक्षण करितें, व रोगांपासून रक्षण करितें. ह्मणून त्याला रक्षा ह्मणतात. तत्वाचा प्रकाश दाखवितें ह्मणून त्याला भसित ह्मणतात तें पातकांचा नाश करितें, ह्मणून त्यास भस्म ह्मणतात. (३५) भस्म हें सर्व दोषांचा नाश करितें, ह्मणून भस्माला क्षार असेंही एक नांव आहे. सारांश इतकाच कीं, भस्मासारखी कल्याकारण वस्तु आजपर्यंत कधीं झाली नाही, व पुढें होणार नाहीं. (३६) ह्या साठींच श्रीशिव आपले अंगास नेहमीं भस्म लावितो. आपल्या देवाला जें मान्य आहे तें त्या देवाचा भक्त ह्मणविणाऱ्यानें केलेंच पाहिजे. हें शिवांनीं आपल्या अंगास चिताभस्म लावून अस्थिमाला व कपालमाला धारण करण्याचें कारण सांगितलें. आतां शिवास स्मशानांत राहणें कां आवडतें तें सांगतों ऐक. (३७) संहाररूप लीलेनें युक्त अशा परमेश्वरास तें स्थान संहारस्थानच झालें अर्थात श्रीशिवास त्या महास्मशानांत राहणें

तत् ॥ तत ईशस्य वासोऽपि ह्यद्योऽभूत्पितृकानने ॥३७॥ समुद्रमथने पूर्वममृतार्थं कृते सुरैः ॥ मंथानं मंदरं कृत्वा योक्त्रं कृत्वा च वासुकिम् ॥३८॥ आधारो मंदरस्याभूत्कूर्मरूपी जनार्दनः ॥ कृतेऽपि मथने कूर्मः क्षोभयामास सागरम् ॥३९॥ तेषु विक्षुभ्यमाणेषु क्षुभिताः प्राणिनोऽखिलाः ॥ ततः प्राण्युपकाराय कूर्मं संहृत्य गर्वितम् ॥ तदंगं भूषणत्वेन धारयामास शंकरः ॥४०॥ पुराभवन्महाकायो हिरण्याक्षो महासुरः ॥ हिरण्यकशिपोर्भ्राता चक्रे त्रैलोक्यमर्दनम् ॥४१॥ ततो भीतास्सुरास्सर्वे विष्णुं शरणमाश्रयन् ॥ पृथिव्युद्धरणार्थाय वाराहं रूपमास्थितः ॥४२॥ स निहत्य हिरण्याक्षं तेन गर्वेण दुर्मदः ॥ दंष्ट्रया पर्वतेंद्राणां चलनं कृतवान्महत् ॥४३॥ द्वीपानां चैव सप्तानामर्णवानां च भेदनम् ॥ ततो ज्ञात्वा महादेवः पृथिवीभेदनं कृतम् ॥४४॥ उत्पा-

---

आवडलें. (३८) आतां कासवाचें कातडें शिवांनीं अंगावर घेण्याचें कारण तुला सांगतों ऐक. पूर्वीं देवांनीं अमृत मिळविण्यासाठीं समुद्र मंथन केलें; त्यावेळीं त्यांनीं मंदरपर्वताची रवि करून वासुकिसर्पास रवीची दोरी केली. (३९) आणि तो मंदर पर्वत पाण्यांत बुडून जाऊं नये ह्मणून विष्णूनें कासवाचें रूप घेऊन भांड्यासारखें मंदर पर्वताच्या खालीं रहावें असें ठरलें. याप्रमाणें समुद्रमंथनाचें काम तर निर्विघ्नपणें शेवटास गेलें. परंतु त्या नंतर त्या कूर्मानें सर्व समुद्र अगदीं खवळून सोडला. (४०) तेव्हां समुद्र अतिशय खवळल्यामुळें सर्व प्राणी अगदीं घाबरून गेले. त्या सर्व प्राण्यांचा त्रास चुकविण्यासाठीं त्या उन्मत्त झालेल्या कासवास शिवांनीं मारिलें. आणि त्या कासवाचें कातडें त्यांनीं शोभेकरितां आपले अंगावर घेतलें. (४१) आतां वराहाचा दांत त्या शिवास कां प्रिय झाला, तो कथाभाग तुला सांगतों ऐक. पूर्वीं हिरण्यकशिपूचा भाऊ हिरण्याक्ष नांवाचा एक मोठा थोरला दैत्य होऊन गेला. त्यानें सर्व त्रैलोक्यास अगदीं त्रासवून सोडलें. (४२) त्यामुळें सर्व देव अगदीं घाबरून जाऊन श्रीविष्णूस शरण गेले. हिरण्याक्षानें पृथ्वीस समुद्रांत नेऊन बुडविलें. तिला समुद्रांतून वर काढण्याकरितां विष्णूनें वराहाचें रूप घेतलें. (४३) वराहरूप घेऊन विष्णूनें हिरण्याक्षास तर मारलेंच; परंतु तेव्हांपासून त्यास आपल्या सामर्थ्याचा मोठा गर्व होऊन, तो आपल्या दाढेनें मोठमोठाले पर्वत मुळापासून उपटूं लागला. (४४) त्यानें सात द्वीपें दाढेनें वर उपटून काढिलीं, सात समुद्रही दुभंग केले. तेव्हां वराहरूपी विष्णूंनीं पृथ्वीस फोडलें ही गोष्ट शिवास समजतांच (४५) त्यांनीं त्या वराहाच्या दोन दातां-

त्य दंष्ट्रां तस्यैकां दधारोरसि भूषणम् ॥ कपर्दगतचंद्रांशं श्रियमाणमि-
वापरम् ॥४५॥ ततस्तुष्टाव तं पोत्री ह्यन्यशृंगस्य सिद्धये ॥ एकशृंगव-
राहोऽभूत्तदाप्रभृति माधवः ॥४६॥ ततोऽतीते युगेऽन्यस्मिन् हिरण्या-
ख्यो महासुरः ॥ लोकपालान्निवार्यैषस्त्रैलोक्यश्रियमन्वभूत् ॥४७॥ त-
तश्चेंद्रादयः सर्वे विष्णुं शरणमागताः ॥ सोऽपि ज्ञात्वा हिरण्यस्य वर-
दानं दुरत्ययम् ॥४८॥ सिंहस्यार्धं नरस्यार्धं रूपं कृत्वा सुदारुणम् ॥
अनायासेन संहृत्य विदार्योरस्स्थलं महत् ॥४९॥ पातयामास भूपृष्ठे
द्विधाभूतं महद्वपुः ॥ हिरण्यकशिपोर्भीमं सिंहः क्षुद्रमृगं यथा ॥५०॥
ततः संचलितं सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ॥ अतीव भीतं क्रुद्धेन नर-
सिंहेन वेगिना ॥५१॥ दृष्ट्वा ब्रह्मयमेंद्राद्याः संधीभूय विचार्य ते ॥ जग्मुः

---

पैकीं एक दांत ( दाढ ) उपटून काढिला आणि उरावर अलंकारासारखा धारण केला. ती दाढ इतकी पांढरी शुभ्र होती कीं, ती शिवाच्या जटाजूटांतील चंद्राच्या कलेसारखी तेजःपुंज दिसत होती. (४६) तेव्हां तो वराहरूपी श्रीविष्णु आपल्या उपटून नेलेल्या दांताच्या ठिकाणीं दुसरा तरी एखादा अणकुचीदार दांत असावा ह्मणून श्रीशिवाची प्रार्थना करूं लागला आणि तेव्हांपासूनच विष्णु एक बाजूस दांताचें टोंक असणारा वराह झाला. (४७) अगस्त्य ऋषे, वराहाचा एक दांत शिवास इतका कां आवडतो, ह्याचें कारण मीं तुला सांगितलें. आतां नृसिंहाचें कातडें शिवांनीं अंगावर घेण्याचें कारण तुला सांगतों. तें युग लोटल्या-नंतर दुसऱ्या युगांत हिरण्यकशिपु नांवाचा एक प्रबळ दैत्य झाला; त्यानें सर्व लोकपालांस जिंकून सर्व त्रैलोक्याचें राज्य आपले हस्तगत केलें. (४८) तेव्हां इंद्रादिक तेहतीस कोटि देव, आमचें हिरण्यकशिपूपासून रक्षण कर, ह्मणून श्री-विष्णूस शरण आले, तेव्हां श्रीविष्णूंनींही हिरण्यकशिपूला ब्रह्मदेवाचा मोठा विकट वर आहे, (४९) असें लक्ष्यांत आणून अर्धें अंग सिंहाचें व अर्धें अंग मनुष्याचें असें भयंकर रूप घेऊन, सहजरीतीनें त्या हिरण्यकशिपूचें मोठें रुंद असें ऊर फोडलें. (५०) आणि एखादा सिंह ज्याप्रमाणें हरणाच्या शरीराचे दोन तुकडे करून जमिनीवर पाडतो, त्याप्रमाणें विष्णूनें त्या भयंकर दैत्याचें शरीर जमिनीवर पाडिलें. (५१) पुढें हिरण्यकशिपूस मारल्यावर त्या नृसिंहानें आपल्या अलौकिक सामर्थ्यानें सर्व त्रैलोक्य हालवून सोडिलें. तो नृसिंह मोठा क्रूर आणि चपळ असल्यामुळें सर्व लोक अगदीं घाबरून गेले. (५२) नृसिंहाचें तें भयंकर

शरणमीशानं कैलासनिलयं हरम् ॥ एवं विज्ञापयामासुः सर्वज्ञाय त्रिशूलिने ॥५२॥

देवा ऊचुः ॥ भगवन् देवदेवेश सर्वलोकमहेश्वर ॥ अस्मान् पाहि भयोद्विग्नान् नरसिंहस्य दर्शनात् ॥५३॥ इति तैः प्रार्थितः शंभुर्ब्रह्माद्यैरखिलैः सुरैः ॥ आस्थाय शारभं रूपं क्रूरं सर्वभयावहम् ॥ आदायोत्क्षिप्य पादाग्रे नृसिंहं पर्वताकृतिम् ॥५४॥ द्विधा कृत्वोरश्च क्रुद्धः स्वात्मन्यारोप्य तद्बलम् ॥ विचित्रं चर्म निर्भिद्य तेन चर्माम्बरोऽभवत् ॥५५॥वाराणस्यां पुराऽऽयातो गजरूपो महासुरः ॥ तापसांश्छिवभक्तांश्च निहंतुं कोपदीपितः ॥५६॥ तमागतमथालोक्य कालमेघमिवांतिकम् ॥ अविमुक्तगताः सर्वे प्राणिनश्चुक्रुशुर्भयात् ॥५७॥ ततो वि.

---

रूप पाहून ब्रह्मदेव, यम, इंद्र वगैरे देव एकत्र होऊन आतां पुढें काय करावें ह्याचा विचार करूं लागले मग सर्वांचा विचार ठरून ते सर्वजण कैलासपर्वतावर राहणाऱ्या श्रीशिवास शरण गेले, व त्या सर्वज्ञ त्रिशूलधारण करणाऱ्या शिवास ह्मणूं लागले—

(५३) देव ह्मणाले— भगवन्, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस, तूं सर्व लोकांचा महेश्वर आहेस, नृसिंहाचें हें भयंकर रूप पाहतांच आह्मी सर्व देव अगदीं घाबरून गेलों. (५४) ह्या क्रूर स्वभावाचे नृसिंहापासून तूं आमचें रक्षण कर. ह्याप्रमाणें ब्रह्मादिक सर्व देवांनीं श्रीशिवाची प्रार्थना केली. तेव्हां शिवांनीं सर्व प्राणिमात्रांस भय वाटण्यासारखें क्रूर स्वभावाच्या शरभाचें रूप घेतलें. व पर्वतासारख्या धिप्पाड अशा नृसिंहास पंजांत धरून तो शरभ आकाशांत उडाला. (५५) मग ह्या शरभानें त्याच्या उराचे दोन तुकडे केले, त्याचें बळ आपल्या स्वतःच्या बळांत मिळविलें, आणि त्याचें चित्रविचित्र कातडें काढून आपल्या अंगावर घेतलें. तेव्हांपासून शिवास नृसिंहाचें कातडें आपल्या अंगावर घेण्याची आवड आहे. (५६) आतां तुला श्रीशिव हत्तीचें कातडें कां पांघरतात तें सांगतों ऐक. पूर्वी एक वेळ काशीक्षेत्रांत हत्तीचें रूप घेऊन कोणी एक मोठा दैत्य आला; व तो रागारागानें काशीक्षेत्रांतील तपस्वीलोकांस आणि शिवभक्तांस मारूं लागला. (५७) प्रळयकाळच्या ढगासारखा काळाकुट्ट तो गजासुर आपल्या जवळ येतो आहे असें पाहतांच, काशीक्षेत्रांतील सर्व प्राणिमात्र घाबरून आक्रोश करूं लागले. (५८) तें पाहून श्रीशिवाचे मनांत दया आली; आणि सर्व लोकांचें

श्वेश्वरो देवः करुणारक्षिताश्रयः ॥ आस्थाय भैरवं रूपं बहुबाह्वायुधोद्यतम् ॥ जगाम गजमायान्तं महान्तं नादभैरवम् ॥५८॥ हत्वा तं कुंजरं भीममधृष्यं दिग्गजैरपि ॥ पादहस्तयुतं चर्म विश्वस्याच्छिद्रमाततम् ॥५९॥ प्रावृत्यात्मानमात्मेशः स्तूयमानोऽखिलैः सुरैः ॥ विहाय भैरवं रूपं जगामाभीष्टमालयम् ॥६०॥ पुरा हिमवतः पृष्ठे देवदारुवने शुभे ॥ नानापक्षिसमाकीर्णे नानामृगसमाकुले ॥६१॥ तटाकैर्बहुभिश्चैव गिरिप्रस्रवणैर्युते ॥ कंदमूलफलोपेते सुखावासे महावने ॥६२॥ तप उग्रं समास्थाय मुनयो वीतकल्मषाः ॥ भृग्वादयः सपत्नीकाः पुत्रपौत्रसमन्विताः ॥६३॥ स्वाश्रमोक्तं समाचारं पालयन्तो दिवानिशम् ॥ चत्वारिंशत्सहस्रेण सहस्रैः सार्धमष्टभिः ॥६४॥ द्रष्टुकामा

---

रक्षण करण्याकरितां पुष्कळसे हात असलेले, व प्रत्येक हातांत तीक्ष्ण धारेचीं शस्त्रें असलेलें असें भैरवाचें भयंकर रूप घेऊन, शंकर, मोठमोठ्यानें आरोळ्या मारीत आपल्याकडे येणाऱ्या त्या गजासुराच्या समोर गेले. (५९) आणि दिग्गजांस देखील न आटोपणाऱ्या अशा भयंकर व दांडगेश्वर हत्तीचें रूप घेणाऱ्या गजासुरास त्यांनीं मारिलें. आणि त्याच्या अंगावरील कातडें हातापायांसहित कोठेंही फाटूं न देतां व्यवस्थेनें काढून तें शिवांनीं आपल्या अंगावर घेतलें. (६०) आणि तें गजासुराचें कातडें आपल्या अंगावर पांघरून देवादिकांस नमस्कार करण्यास योग्य असणारे आत्मेश्वर श्रीशिव तें भैरवाचें रूप सोडून आपलें पूर्वींचें रूप घेऊन आपल्या आवडत्या स्थलास निघून गेले. तेव्हांपासून शिवास हतीचें-कातडें अंगावर पांघरण्याची आवड आहे. (६१) आतां वाघाचें कातडें, हरिण, नाग व अग्नि वगैरे अंगावर घेणें शिवास कां आवडतें, ह्याचें कारण तुला सांगतों ऐक. हिमालयाच्या पृष्ठभागावर देवदारु नांवाचें सुंदर वन आहे; त्या वनांत अनेक प्रकारच्या पक्ष्यांचे व जनावरांचे कळप आहेत. (६२) त्या वनांत पुष्कळ तलाव आणि सरोवरें आहेत. जागोजाग पर्वतापासून पाण्याचे झरे वाहतात. तेथें कंद, मुळें आणि फळें हीं पुष्कळ आहेत. तें देवदारुवन बरेंच मोठें लांब रुंद असून तपस्वी लोकांस राहण्याच्या फार सोयीचें आहे. (६३) असो त्या वनांत पूर्वीं भृगु वगैरे मोठमोठे तपस्वी बायकांसहित आणि मुलांनातवांसहित कडक रीतीनें तपश्चर्या करीत होते. (६४) ते रात्रंदिवस आपले आश्रमधर्म मनापासून पाळीत असत. अशा रीतीनें त्या तपोवनांत त्या ऋषींनीं अठ्ठेचाळीस हजार वर्षेंपर्यंत तपश्चर्या केली. (६५) त्यांच्या मनांतील हेतु असा कीं, ज्या महादेवाचें

महादेवं योगिध्येयं सनातनम् ॥ सर्वज्ञं सर्वकर्तारमनेनैव हि चक्षुषा ॥६५॥ केचित् पंचाग्निमध्यस्थाः केचिदन्तर्जलाशयाः ॥ केचिदूर्ध्वाननाः नित्यं केचिच्चैवोर्ध्वबाहवः ॥६६॥ पादेनैकेन तिष्ठन्तः केचित्पादाग्रसंस्थिताः॥शीर्णपर्णाशनाः केचिच्छाकमूलफलाशिनः ॥६७॥ अम्भक्षा वायुभक्षाश्च निराहारास्तथा परे ॥ कृशांगा दीर्घरोमाणो जटामुकुटधारिणः ॥६८॥ त्रिस्नानसंयुताः केचिद्भस्मोध्दूलितविग्रहाः॥ लिंगार्चनपराः केचित्सूर्यमण्डलपूजकाः ॥६९॥ केचिदग्नौ मनस्यन्ये केचित्स्थंडिलपूजकाः ॥ पंचाक्षरजपासक्ताः शतरुद्रीयतत्पराः॥७०॥तेष्वेवं तप्यमानेषु महर्षिषु महेश्वरः ॥ रागद्वेषौ गतिं तेषां परीक्ष्येऽह-

---

योगीलोक नेहमीं ध्यान करितात, जो अनादिकालापासून आहे, जो सर्वज्ञ आहे, व जो सर्व कांहीं करितो, त्या महादेवास आपण स्वतः एकवेळ तरी आपल्या दृष्टीनें पहावें. (६६) त्या ऋषीश्वरांपैकीं कितीएक ऋषि पंचाग्निसाधन करीत होते, कितीएक नेहमीं गळ्याइतक्या पाण्यांत जाऊन उभे राहत होते, कितीएकजण वर तोंडें करून तपश्चर्या करीत होते. कितीएकजण दोन्ही हात वर करून तपश्चर्या करीत होते. (६७) कितीएक एका पायावर उभे राहून तपश्चर्या करीत होते, कित्येक एका पायाच्या पुढील भागावर उभे राहून तपश्चर्या करीत होते, कितीएकजण वाळलेलीं झाडाचीं पानें खाऊन तपश्चर्या करीत होते, व कितीएकजण कंदमुळें फळें खाऊन तपश्चर्या करीत होते. (६८) कोणी नुसतें पाणी पिऊनच तपश्चर्या करीत होते, कोणी नुसता वायु भक्षण करून राहत होते, व दुसरे कितीएक तर कांहींएक न खातां निराहार ( उपवास ) करूनच तपश्चर्या करीत होते. कितीएकजण अंगानें अगदीं रोड होते, कितीएकांच्या अंगावर लांब लांब केस वाढलें होते, व कितीएकांनीं आपल्या डोकीवरील जटा मुकुटासारख्या बांधल्या होत्या. (६९) कोणी कोणी ऋषीश्वर त्रिकाळ स्नान करीत होते, कोणी कोणी ऋषीश्वर आपल्या अंगास भस्म लावणारे होते, कोणी पार्थिवलिंगाची पूजा करणारे होते, कोणी सूर्यमंडलाची पूजा करीत होते. (७०) कोणी अग्नीची पूजा करणारे होते कोणी उपांशुजप ( मनांतले मनांत जप ) करणारे होते, कोणी स्थंडिलाची पूजा करीत असत, कोणी ऋषीश्वर पंचाक्षरी मंत्राचा जप करीत, व कोणी ऋषीश्वर शतरुद्रीय मंत्रांचा जप करीत होते. (७१) ते महर्षि याप्रमाणें देवदारुवनांत तपश्चर्या करीत असतां, विषयप्रीति आणि द्वेष यांबद्दल त्यांची परीक्षा पाहण्याचा शिवांनीं आपले

मिति स्मरन् ॥७१॥ नग्नवेषो जटाधारी भस्मभूषितविग्रहः ॥ भिक्षुरू-पप्रतिच्छन्नस्तापसाश्रममाययौ ॥७२॥ मायया मुनिपत्नीनां जनयन्म-दनस्मृतिम् ॥ कल्याणवेषं तं दृष्ट्वा ताः स्त्रियः काममोहिताः॥७३॥ त्य-क्त्वा पतिं तद्देशानमनुजग्मुर्हि ताः स्त्रियः ॥ विस्रस्तवस्त्राभरणा ह्यना-दृत्य पतीन् स्वकान् ॥७४॥भार्याः परवशा दृष्ट्वा मुनयस्ताः पतिव्रताः ॥ किमेतदिति शोकार्ताः पुनर्मन्युवशं गताः ॥ शापान्बहुविधान् तस्मि-न्पुरुषे मुमुचुस्तदा ॥७५॥ शापं कुर्वत्सु तेष्वेवं स्मयमानो महेश्वरः ॥ चचार भिक्षां सर्वेषामाश्रमेष्ववलावृतः ॥७६॥ पादुकासक्तपादाब्जशु-भमंदगतिर्भवः ॥ क्वचिच्च नादयन् वीणां क्वचिड्डमरुकाप्रियः ॥ क्वचि-

---

मनांत विचार करून (७२) एका ब्रह्मचाऱ्याचें स्वरूप घेतलें. त्यांच्या अंगावर बोटभर देखील चिंधी नव्हती. मस्तकावर पुष्कळशा जटा होत्या. व आपल्या सर्व अंगावर त्यांनीं भस्माचा लेप केला होता, त्यामुळें तें त्यांचें शरीर फार शोभत होतें. असा ब्रह्मचाऱ्याचा गुप्त वेष घेऊन ते त्या ऋषींच्या आश्रमास आले. (७३) त्यांनीं आपल्या मायेनें तेथील मुनींच्या वायकांच्या मनांत कामविकार उत्पन्न केला. त्यामुळें त्या वायका त्या सुंदरस्वरूपाच्या तरुण ब्रह्मचाऱ्यास पाह-तांच कामातुर होऊन वेड्या झाल्या. (७४) त्या वायकांनीं आपले नवरे सोडून दिले आणि सर्वजणीं त्या ब्रह्मचाऱ्यावरोवर हिंडूं लागल्या. त्या ब्रह्मचाऱ्यास पाहतांच कितीएक वायकांचीं नेसलेलीं वस्त्रें फिटलीं, व कोणाच्या अंगावरील अलंकार खालीं पडले, त्यांची स्मृति त्यांस राहिली नाहीं. त्या आपल्या नवऱ्या-कडे नुसत्या पाहीनात देखील. (७५) आपल्या वायका पतिव्रता असून त्या एकाएकीं इतक्या बेताल झालेल्या पाहून त्या ऋषींस फारच वाईट वाटलें. त्यामुळें ते त्या ब्रह्मचाऱ्यावर पहिल्यापेक्षां जास्तच संतापले. आणि त्यांनीं त्यास तुझें अमुक अमुक प्रकारांनीं अकल्याण होवो, अशा अर्थाचे अनेक शाप दिले. (७६) ते ऋषीश्वर आपणावर अतिशय रागावून आपणास शिव्या शाप देतात असें पाहून श्रीमहेश्वर हंसूं लागले, आणि आपल्यावर आसक्त झालेल्या त्या ऋषीश्वरांच्या वायका बरोवर घेऊन त्या ऋषीश्वरांच्या प्रत्येक आश्रमाजवळ जाऊन भिक्षा मागत फिरूं लागले. (७७) शिवांनीं आपल्या दोन्ही पायांत पादुका (खडाव) घातलेल्या असून ते हळू हळू चालत होते, एखादेवेळीं त्यांनीं वीणा वाजवावा, एखादेवेळीं मौजेनें आपला डमरु वाजवावा एखादेवेळीं एखादें सुस्वर

च्छोभनगीतश्च कचिन्मंदस्मितप्रियः ॥७७॥ स्त्रियः परवशा दृष्ट्वा तत्पतीन् कुपितान् भृशम् ॥ आश्रमेषु च सर्वेषु ह्यनादृत्य चचार सः॥७८॥ शापास्त्वेतैर्विसृष्टाश्च बभूवुर्निष्फलाः शिवे ॥ अन्येषूत्सृज्यमानास्ते भस्मीकर्तुं क्षमा अपि ॥७९॥ प्रहसंस्तानृषीन् दृष्ट्वा स्त्रीषु सक्तान् समन्युकान् ॥ रागद्वेषौ महान्तो वः स्यातामित्यब्रवीच्छिवः ॥८०॥ शापेषु विफलीभूतेष्वभिचारे मनो दधुः ॥ अग्निमाधाय कुण्डेषु क्रूरकर्मप्रवर्तिनः ॥८१॥ आथर्वणैर्महामंत्रैरभिचारफलप्रदैः ॥ प्रक्रान्ता जुहुयांचक्रुर्होमद्रव्यैर्विनिंदितैः ॥८२॥ एकस्मात्प्रथमात्कुण्डादपस्मारो महारवः ॥ उत्थितो मुनिमुख्येभ्यो निर्गतापस्मृतिर्यतः ॥८३॥ क्रूरदृष्टिर्महाकायः किं कृत्यमिति तान्ब्रुवन् ॥ ते प्रत्यूचुर्गृहाणेमं धूर्तं भिक्षुच्छ-

---

पद ह्मणावें, आणि एखादेवेळीं मौजेनें किंचित् हंसावें. (७८) ऋषींच्या बायका आपणावर आसक्त झाल्या आहेत आणि त्यामुळें त्यांचे नवरे आपणावर फारच संतापले आहेत, असें समजूनही त्यांस न जुमानतां, ऋषींच्या बायका बरोबर घेऊन श्रीशिव प्रत्येक आश्रमाजवळ भिक्षा मागूं लागले. (७९) त्या ऋषींनीं शिवास जे कांहीं वाईट वाईट शाप दिले ते शाप दुसऱ्या कोणास त्यांनीं दिले असते तर तो खचित लागलाच जळून गेला असता; परंतु ते सर्व शिवास दिल्यानें व्यर्थ गेले. त्या शापांपासून शिवाचें कांहींएक नुकसान झालें नाहीं. (८०) हे सर्व ऋषीश्वर विषयलंपट असून मोठे रागीट आहेत असें पाहून श्रीशिव हंसूं लागले, आणि तुह्मांस राग व द्वेष फारच दिसतो असें वारंवार ह्मणूं लागले. (८१) आपण ब्रह्मचाऱ्यास दिलेले शाप व्यर्थ गेले असें पाहून, ते ऋषीश्वर अधिकच खवळले, आणि जारणमारण करण्याचा विचार करूं लागले. त्यांनीं आपल्या कुंडांत अग्नि पेटविला व क्रूरकर्मे करण्यास त्यांनीं आरंभ केला. (८२) त्यांनीं अथर्वण वेदांतील जारणमारणाचीं फळें देणारे मंत्र ह्मटले, व ते अग्नींत निंद्यनिंद्य अशा होमद्रव्यांच्या आहुती देऊं लागले. (८३) तेव्हां एकाएकीं पहिल्या कुंडांतून अपस्मार ( सर्प ) बाहेर निघाला, त्यानें मोठ्यानें आरोळी मारिली. त्या मुख्य मुख्य ऋषीश्वरांपासून अपस्मृति ( वाईट शास्त्र ) निघालें ह्मणून त्यापासून अपस्मार निघाला. असो, (८४) त्याचे डोळे फार भयंकर होते, त्याचें अंग मोठें होतें. तो बाहेर आल्याबरोबर त्यानें सर्व ऋषींस मी तुमचें काय काम करूं ह्मणून विचारिलें. तेव्हां सर्व ऋषीश्वर त्यास ह्मणाले कीं, हा तुझ्यासमोर ब्रह्मचाऱ्याचें ( भिक्षूचें ) सोंग घेऊन उभा आहे, ह्या कपट्यास मारून

लात्स्थितम् ॥८४॥ तमागतं महावेगं कुपितं मुनिचोदितम् ॥ पातयित्वा ततोऽनृत्यत्तस्योपरि महेश्वरः ॥८५॥ ततो मृगः समुत्थाय शीघ्रमागच्छदंवरात् ॥ सम्यग्ज्ञानविहीनांस्तान् मृगतुल्यानिव ब्रुवन् ॥ आदाय वामहस्तेन दधारेशश्च निश्चलम् ॥८६॥ ततो व्याघ्रो महान् क्रुद्ध आजगाम नखायुधः ॥ तेषामृषीणामात्मस्थक्रोधोऽयं निर्गतो यथा ॥८७॥ तं चादाय त्वचं भित्वा तया चर्माम्बरोऽभवत् ॥ शुशुभे चर्मणा तेन नानावर्णयुतेन च ॥८८॥ ततो बहुविधान्यस्त्राण्यायुधानि समंततः ॥ टंकशूलगदाखड्गपाशवज्रांकुशादयः॥ तेषां प्रहरणाकाराश्चोत्साहा जज्ञिरे तदा॥८९॥आगतानि समस्तानि निशितान्यायुधानि

टाक. (८५) तें ऋषीश्वरांचें बोलणें ऐकतांच तो अपस्मार ( यानांवाचा सर्प ) मोठ्या वेगानें शिवाच्या अंगावर धांवून आला; त्यास त्यांनीं लागलेंच खालीं पाडून श्रीशिव त्याचे अंगावर नाचूं लागले. हेंच शिवाचें सर्पावर नाचण्याचें मुख्य कारण आहे. (८६) अपस्माराचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें पाहून सर्व ऋषींनीं आपल्या अग्नीपासून एक हरिण उत्पन्न केला. तो हरिण उंच उंच उड्या मारीत शिवाच्या अंगावर येऊं लागला, त्यास पाहतांच ब्रह्मचारी त्या ऋषींस ह्मणाले, ऋषीश्वरहो, तुह्मांस यथार्थ ज्ञान मुळींच नाहीं, तुह्मी निव्वळ पशुसारखे आहां. असें ह्मणून त्यांनीं त्या हरणास डाव्या हातानें सहज वरचेवर उचलून धरिलें. त्या हरणास त्यांनीं इकडे तिकडे पुरते हलूं देखील दिलें नाहीं. अगस्त्यऋषे, शिवांनीं आपल्या डाव्या हातांत हरिण धरण्याचें हें कारण आहे. (८७) हरिणाचा असा प्रकार झाल्यावर एक वाघ त्या अग्नींतून वर येऊन महादेवाच्या अंगावर धांवला. तो मोठा रागीट आणि क्रूर असून त्याचीं नखें फार तिखट होतीं. तो वाघ तर त्या सर्व ऋषींच्या मनांतील मूर्तिमंत क्रोधच होय असा दिसला. (८८) तो वाघ अंगावर येतांच त्यास लागलेंच मारून टाकून त्याचें कातडें काढून त्यांनीं आपले अंगावर घेतलें. त्या कातड्यावर अनेक रंगाचे ठिपके ठिपके असल्यामुळें तें वाघाचें कातडें तर फारच शोभूं लागलें. हें शिवांनीं आपले अंगावर वाघाचें कातडें पांघरण्याचें कारण आहे.(८९) वाघाची अशी स्थिति झाल्यावर त्या ऋषींनीं चोहोंकडून रागारागानें त्या ब्रह्मचाऱ्याचे अंगावर अस्त्रें आणि आयुधें मारिलीं, तीं टंक, शूल, गदा, खड्ग, पाश, वज्र, अंकुश, वगैरे तीक्ष्ण धारेचीं आयुधें होतीं, त्यावेळीं सर्व ऋषींस ब्रह्मचाऱ्याचे अंगावर शस्त्रास्त्रें फेंकण्याचा मोठा आवेश आला होता. (९०) ऋषीश्वरांनीं फेंक-

च ॥ उद्यतानि प्रहर्तुं च पुष्पाणीव दधौ शिवः ॥९०॥ ततो विकृतवेषाणि भूतानि च सहायुधैः ॥ सहितानि पिशाचैश्च समुत्तस्थुर्हुताशनात् ॥९१॥ वध्यः कोऽस्माभिरित्युक्त्वा वीक्ष्यमाणानि सर्वशः ॥ वदन्ति व्याकुलं चित्तं पैशाचं च तपस्विनाम् ॥९२॥ आगतानि समुद्दिश्य प्रणतानि मुहुर्मुहुः ॥ सिषेविरे महादेवं नृत्यन्ति च हसन्ति च ॥९३॥ ततः पंचफणा नागा निःश्वसन्तो विषोल्बणाः ॥ शीघ्रमुत्थाय कुण्डेभ्यः समाजग्मुर्महेश्वरम् ॥ ऋषीणामनभिज्ञानां शिवं कोपाग्नयो यथा ॥९४॥ तानुपादाय नागेंद्रान् ज्वलितानुपशोभितान् ॥ दधार भूषणत्वेन तेनासीन्नागभूषणः ॥९५॥ अपरैरपि नागेंद्रैर्वासुकिप्रमुखैः शि-

---

लेलीं सर्व अस्त्रें व मारण्याकरितां उगारलेलीं सर्व शस्त्रें जरी तीक्ष्ण धारेचीं होतीं, तरी तीं सर्व शस्त्रास्त्रें शिवांनीं आपल्या मस्तकावर फुलांसारखीं मानलीं त्या शस्त्रास्त्रांपासून शिवाला कोणत्याही प्रकारची इजा झाली नाहीं. (९१) नंतर त्या अग्नींतून अनेक प्रकारचीं भयंकर भयंकर स्वरूपें असणारीं भुतें आपापल्या हातांत शस्त्रास्त्रें घेऊन पिशाचगणांसहित वर निघालीं. (९२) तीं भुतें आम्हीं आतां कोणास मारावें असें ह्मणून चोहोंकडे पाहूं लागलीं; व पिशाचगणांनीं तर लहान तोंडें करून आमच्या हातून हें काम होणार नाहीं असें त्या तपस्वी लोकांस स्पष्ट सांगितलें. (९३) तरीपण ते सर्वजण ऋषींच्या ह्मणण्याप्रमाणें शिवाच्या अंगावर गेले आणि महादेवास पाहून वरचेवर नमस्कार करूं लागले, महादेवाची सेवा करूं लागले, त्यांच्या बरोबर नाचूं लागले, व त्यांच्या बरोबर हंसूं लागले.(९४) अगस्त्यऋषे, भूतांचा आणि पिशाचांचा सहवास शिवास कां आवडूं लागला ह्याचें कारण मी तुला सांगितलें; आतां सर्पांचे अलंकार करण्याचें कारण तुला सांगतों ऐक. भूतांची व पिशाचांची अशी स्थिति झाल्यानंतर ऋषीश्वरांच्या कुंडांतून मोठमोठे पांच फणांचे नाग सुस्कारे टाकीतच बाहेर निघाले. ते मोठे विषारी होते. ते बाहेर निघाल्या बरोबर लागलेंच चावण्याकरितां श्रीशिवाच्या अंगावर धांवून गेले. ते साप त्या अज्ञान ऋषींच्या मनांतील मूर्तिमंत क्रोधच आहेत असे दिसले. (९५) ते नाग फुसकारे टाकीत आपल्या अंगावर धांवून येतात असें पाहतांच, ते रागीट आणि विषारी नाग शिवांनीं उचलून आपल्या अंगावर अलंकारासारखे धारण केले. तेव्हांपासून शिवास नागभूषण ( सर्पांचे अलंकार आपल्या अंगावर घालणारा ) असें नांव पडलें. शिवांनीं आपले अंगावर विषारी साप अलंकारासारखे घालण्याचें हें कारण आहे.(९६) दुसरें आणखी

वैः ॥ वैनतेयभयोद्विग्नैरलंचक्रे तनुं निजाम् ॥९६॥ ततः पावकसंभूते सर्वस्मिन् विफलीकृते ॥ अग्निं तं प्रेरयामासुर्दहैनमिति तापसाः॥९७॥ आगतोऽग्निः स्वयं दीप्तो मुनिभिः प्रेषितो भृशम् ॥ अपराधं क्षमस्वेति याचमान इवेश्वरम् ॥९८॥ तमागतं महादेवः क्रीडापुष्पमिवानलम् ॥ वामहस्ततले दध्रे स्वांशं चंद्रार्धशेखरः ॥९९॥आभिचारिकमंत्रास्ते गत्वा डमरुकध्वनिम् ॥ ऋषिं संत्यज्य देवस्य दक्षिणं हस्तमाश्रिताः ॥१००॥ ततोऽपस्मारमत्युग्रं पृष्ठतोऽधिष्ठितं बलात् ॥ दक्षिणेनांघ्रिणा कृत्वा तस्योपरि ननर्त सः ॥ भिक्षुरूपं परित्यज्य दर्शयन् रूपमैश्वरम् ॥१०१॥ वृत्तम् ॥दृष्ट्वा त्रिनेत्रं कनकच्छविं प्रभुं कपर्दिनं चंद्रकलावतंसकम् ॥ भस्मांगरागं फणिराजभूषणं नृत्यन्तमत्यन्तसुरूपदर्शि-

---

वासुकी वगैरे मोठमोठे सुंदर दिसणारे नाग गरुडाच्या भयानें आपलें रक्षण व्हावें ह्मणून शिवास शरण आले. त्यांस शिवांनीं आश्रय देऊन आपल्या शरीरावर अलंकारासारखे धारण केलें. (९७) त्या अग्नींतून जितके कांहीं प्राणघातक जीव बाहेर निघाले तितके सर्व शिवांनीं निष्फळ केल्यावर ह्या ब्रह्मचाऱ्यास तूं जाळून टाक असें सांगून त्या सर्व ऋषीश्वरांनीं अग्नीलाच शिवाचे अंगावर पाठविलें. (९८) मुनीश्वरांनीं पाठविलेला तो तेजःपुंज अग्नि शिवाजवळ इतक्या नम्रपणानें गेला कीं, माझ्या हातून मोठी चूक झाली, माझे अपराध क्षमा करा, अशी तो शिवाची विनंतीच करितो कीं काय असें वाटलें. (९९) मस्तकावर अर्धचंद्र धारण करणाऱ्या श्रीशिवांनीं हा अग्नि आपल्या आठमूर्तींपैकीं एक मूर्ति आहे असें समजून, त्यास आपल्या डाव्या हातांत गमतीनें सुवासाकरितां घेतलेल्या फुलांसारखें घेतलें. (१००) ऋषीश्वरांचे ते जारणमारण मंत्र शिवाच्या हातांतील डमरूंत शिरले. ऋषींचा सहवास सोडून शिवाच्या उजव्या हातांत राहणें त्यांस बरें वाटलें. (१०१) इतकें झाल्यावर तो फार भयंकर अपस्मार शिवाचे पाठीमागील बाजूस उभा होता त्यास शिवांनीं उजव्या पायाची लाथ मारून खालीं जमिनीवर पाडलें; आणि ते त्याचेवर नाचूं लागले. आणि तत्काळ त्यांनीं ब्रह्मचाऱ्याचें रूप सोडून आपलें ( शिवाचें ) स्वरूप प्रकट केलें. (१०२) सर्व ऋषीश्वर पाहतांत तों, ज्याला तीन डोळे आहेत, सोन्यासारखी ज्याची अंगकांति आहे. जो समर्थ असून ज्याच्या मस्तकावर जटाजूट आहे, व त्यावर चंद्राची कला शोभत आहे, ज्यानें आपल्या सर्व अंगास भस्माची उटी लाविली असून आपल्या सर्व अंगावर सर्पांचे अलंकार घातले आहेत, व जो अपस्मारावर नाचत

नम् ॥१०२॥ शैलेन्द्रकन्यामतिलोकसुंदरीमन्योन्यसंदर्शनतृप्त्यविश्रमाम् ॥ नृत्यानुकूलां शुभतालगीतिकामालोक्य किंचिद्धसिताननांबुजाम् ॥१०३॥ वैय्याघ्रचर्माम्बरमंबरस्थितैस्तैर्ब्रह्मविष्णुप्रमुखैरभिष्टुतम् ॥ आत्माभिचारैर्विफलैर्जडीकृताः कोपं विसृज्य प्रणताः प्रपेदिरे॥१०४॥ सोऽपि प्रपन्नार्तिहरो मुनीनामालोक्य मायामखिलां विमोहिनीम् ॥ तेषां व्यपोह्य प्रसभं घृणानिधिर्भक्तिं दधौ पाशलये पटीयसीम् ॥१०५॥ ते भक्तियुक्ताः परिशुद्धमानसा लब्ध्वा प्रसादं पशुपाशविद्विषम् ॥ आदाय मूर्ध्न्यंजलिमिंदुशेखरं तं तुष्टुवुः पुष्टतनूरुहा मुहुः॥१०६॥

मुनय ऊचुः ॥ नमः शिवाय स्वरसानुभूतये वाचामतीताय मनो-

---

असून ज्याचें सुंदररूप फारच मोहक आहे, (१०३) असा शिव प्रकट झाला. त्याच्याजवळ पार्वती उभी होती, तिच्यासारखी सौंदर्यवान् बायको त्रैलोक्यांत नाहीं. त्या दोघांनीं परस्परांकडे कितीवेळ पाहिलें तरी त्यांच्या मनाची तृप्ति ह्मणून होतच नव्हती. तो जशा रीतीनें नाचत होता, त्या नाचाला अनुसरून ती तसा ताल धरीत असून तदनुसार गाणें गात होती; व मधून मधून कांहीं थोडी हंसत होती.(१०४) असो. ज्यानें आपल्या अंगावर वाघाचें कातडें घेतलें असून हा प्रकार पाहण्यास आलेले ब्रह्मादिक देव आकाशांत बसून मनोभावानें ज्याची स्तुति करीत आहेत अशा त्या शिवाला पाहतांच, आपण केलेले सर्व जारण-मारणाचे उपाय व्यर्थ गेलेले पाहून निरुपायानें आपला सर्व राग सोडून देऊन ते सर्व ऋषीश्वर शिवास शरण आले. (१०५) श्रीशिव हे शरणागतांचें दुःख दूर करणारे असल्यामुळें त्यांनीं त्या मुनींकडे कृपादृष्टीनें पाहिलें; व दयाळुपणानें त्यांच्या मनास अज्ञानदशा आणणारी माया सर्व दूर करून, पाशांतून मुक्तता करण्यास समर्थ असणारी आपली भक्ति त्यांस दिली ( त्यांचे मनांत त्यांनीं आपले विषयीं भक्ति उत्पन्न केली ).(१०६) त्यामुळें ते भक्तिवान् झाले, त्यांचीं मनें निर्मळ झालीं. त्यांच्यावर पशुपाशांचा नाश करणारा शिवाचा प्रसाद झाल्यावर त्यांनीं आपले दोन्ही हात जोडून मस्तकास लाविले व अंगावर दाट रोमांच येऊन ते श्रीशिवाची स्तुति करूं लागले.

(१०७) मुनि ह्मणाले— श्री शिवाला नमस्कार असो, तूं आत्मानुभवाचा उपभोग घेतोस, तुझें महत्व वाचेनें वर्णन करितां येणें फारच प्रयासाचें आहे, तुझें यथार्थज्ञान मनास होत नाहीं, तूं मोठा आनंदी आहेस, व मोठा ज्ञानी

तिगाय ते ॥ आनन्दविज्ञानघनाय शंभवे नमः परस्तात्परतः परात्मने ॥१०७॥ परात्परस्वरूपाय ततो नादात्मने नमः ॥ ततो विंदुस्वरूपाय कोट्यंशाय नमो नमः ॥१०८॥ नमः शिवाय शुद्धाय ब्रह्मणे बृहदात्मने॥ ज्ञानानंदस्वरूपाय सत्यायाखण्डहेतवे॥१०९॥ शांन्तिविद्यानिवृत्याख्य-प्रतिष्ठाशक्तये नमः ॥ ततः शक्तिस्वरूपाय शान्त्यतीताय ते नमः॥११० नमः सदाशिवाख्याय पंचवक्त्राय ते नमः ॥ नमो निष्कलरूपाय तस्मै सकलरूपिणे ॥१११॥ ईश्वराय नमस्तुभ्यं विग्रहाविष्कृताय ते ॥ सर्वज्ञाय स्वतंत्राय तृप्तायानंदशक्तये ॥११२॥ अनादिबोधरूपायालुप्ताया-नंदमूर्तये ॥ अष्टैश्वर्योपपन्नाय तत्प्रदायाश्रिताय ते ॥११३॥ रुद्राय सर्वसंहर्त्रे त्रिमूर्तिभ्यः पराय ते ॥ नीललोहितरूपाय स्वेच्छाविग्रहधा-

---

आहेस, तूं पुढें आहेस आणि मागेंही आहेस, तूं परमेश्वर आहेस, तुला नमस्कार असो. (१०८) तुझें स्वरूप श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, तुला नमस्कार असो, तूं नादस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो, तूं विंदुस्वरूप आहेस, तुझीं कोट्यावधि स्वरूपें आहेत, तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो (१०९) तुला शिव ह्मणतात, तूं शुद्ध आहेस, तूं ब्रह्मस्वरूप आहेस, तूं स्थूलात्मा आहेस, तूं ज्ञानस्वरूप आणि आनंदस्वरूप आहेस, तूं सत्यस्वरूप आहेस, तूं सर्व प्रकारच्या कार्यांचें मूल कारण आहेस, तुला नमस्कार असो. (११०) तूं शांति, विद्या, निवृत्ति, आणि प्रतिष्ठा ह्यांस शक्तिस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. तूं शक्तिस्वरूप आहेस, तूं शांत्यतीतस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. (१११) तुला सदाशिव असें नांव आहे, तुला नमस्कार असो, तुला पांच तोंडें आहेत, तुला नमस्कार असो. तूं निष्कलस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो, तूं सकलस्वरूप आहेस त्या तुला नमस्कार असो. (११२) तूं ईश्वर आहेस, तुला नमस्कार असो, तूं साकाररूपानें दृष्टीस पडतोस तुला नमस्कार असो, तूं सर्वज्ञ असून स्वतंत्र आहेस, तूं नेहमीं तृप्त आहेस, तुला कशाचीही आशा नाहीं, तूं आनंदस्वरूप व शक्तिस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. (११३) तूं अनादिकालापासून आहेस, तूं ज्ञानस्वरूप आहेस, तुझी शक्ति कधींही नाश पावत नाहीं, तूं प्रत्यक्ष आनंदस्वरूप आहेस. तुला अणिमा, महिमा वगैरे अष्टमहासिद्धि अनुकूल आहेत; आणि जे लोक एकनिष्ठपणानें तुझी भक्ति करितात त्यांस तूं त्या प्राप्त करून देतोस. त्या तुला नमस्कार असो. (११४) तुला रुद्र ह्मणतात, तूं सर्वांचा संहार करितोस तूं त्रिमूर्तीपेक्षां श्रेष्ठ आहेस, तूं नीललोहितस्वरूप आहेस, तूं आपलें इच्छेप्रमाणें

रिणे ॥११४॥ रक्षोन्मुखाय सर्वेषां विष्णवे सर्वजिष्णवे ॥ ब्रह्मणे सृष्टिशीलाय शान्तपद्मासनाय ते ॥११५॥ नमः पुरुषरूपाय समष्टिव्यष्टिरूपिणे ॥ नमः प्रकृतिरूपाय गुणत्रयमयाय ते ॥११६॥ विद्याकालकलारागनियत्युत्पन्नभोगिने॥ क्षेत्रज्ञाय नमस्तुभ्यं संसारवशवर्तिने ॥११७॥ आकाशाय सशब्दाय नमः श्रोत्रेंद्रियाय च ॥ वायवे स्पर्शयुक्ताय त्वगिंद्रययुताय ते ॥११८॥ अग्नये सहरूपाय नमस्तुभ्यं च चक्षुषे ॥ वारिणे रसयुक्ताय रसज्ञायै च ते नमः ॥ पृथिव्यै गन्धयुक्ताय नमो घ्राणेंद्रियाय ते ॥११९॥ वाक्पाण्युपस्थपाय्वंघ्रिकर्मेंद्रियमयाय ते ॥ नमोऽवयवहीनाय मनसे संचलात्मने ॥१२०॥ बुद्धयेऽध्यवसायिन्यै महत्त्वात्मने नमः ॥ अहंकारात्मने तुभ्यमहंकरणधर्मिणे ॥१२१॥ चित्ताय

---

शरीर धारण करितोस. तुला नमस्कार असो.(११५) तूं सर्वांचें रक्षण करण्यास नेहमीं तयार असतोस, तुला विष्णु ह्मणतात, तूं सर्व प्राणिमात्रांस अजिंक्य आहेस. तूं ब्रह्मदेव आहेस, सृष्टि उत्पन्न करण्याचा तुझा स्वभाव आहे. तुझा स्वभाव शांत असून तूं कमलाच्या असनावर वसतोस, तुला नमस्कार असो. (११६) तूं पुरुषस्वरूप आहेस तुझें एकरूप असून तुझीं अनेक रूपें आहेत. तूं प्रकृतिस्वरूप आहेस, तूं सत्वरजस्तमोगुणात्मक आहेस, तुला नमस्कार असो. (११७) तूं विद्या, काल, कला, राग, नियति(प्रारब्ध) आणि उत्पन्न ह्यांचा उपभोग घेणारा आहेस, तुला क्षेत्रज्ञ ह्मणतात, तूं संसारचक्रांतही भ्रमण करितोस, तुला नमस्कार असो. (११८) तूं आकाशस्वरूप आहेस तूं शब्दस्वरूप आहेस तूं श्रोत्रस्वरूप आहेस, तूं वायुस्वरूप आहेस, तूं स्पर्शस्वरूप आणि त्वगिंद्रिय ( अंगावरील त्वचा )रूप आहेस, तुला नमस्कार असो. (११९) तूं अग्निस्वरूप आहेस, रूप हें तुझा गुण आहे, तूं नेत्रस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो, तूं जलस्वरूप आहेस, रस हा तुझा गुण आहे, तूं जिव्हास्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. तूं पृथ्वीस्वरूप आहेस, गंध हा तुझा गुण आहे, तूं घ्राणेंद्रियस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. (१२०)तूं वाचा, हात, लिंग गुद, पाय वगैरे पंचकर्मेंद्रियस्वरूप आहेस, तुला अवयव नाहींत, तूं निरवयव ( निराकार ) आहेस. तूं मनोरूप आहेस तुझा स्वभाव फार चंचळ आहे, तुला नमस्कार असो, (१२१) तूं बुद्धिस्वरूप आहेस, तूं निश्चल करण्यासारखा आहेस, तूं महत्तत्वस्वरूप आहेस, तुला नमस्कार असो. तूं अहंकारस्वरूप आहेस, अहंकार हा तुझा धर्म आहे, त्या तुला नमस्कार असो. (१२२) तूं चित्तस्वरूप आहेस, तूं स्मरणस्वरूप आहेस, तूं विश्वरूप आहेस, तुला नम-

स्मृतिमात्राय नमस्ते विश्वरूपिणे ॥ देहभेदाद्भवानेको ब्रह्माद्यं सचराचरम् ॥१२२॥ तत्तद्रूपविभागेन विश्वरूपाय ते नमः ॥ त्वया विना जगत्सर्वं न किंचिद्विद्यते क्वचित् ॥१२३॥ भूतं भव्यं भविष्यच्च सर्वं त्वन्मयमेव हि ॥ भेदाभेदस्वरूपेण संस्थिताय नमोऽस्तु ते ॥१२४॥ इत्येवमखिलाकारैर्मुनिभिः संस्तुतः शिवः ॥ चत्वारिंशत्सहस्रैस्तु सहस्रैः सार्द्धमष्टभिः ॥ प्रसन्नस्तानुवाचेदं मेघगंभीरया गिरा ॥१२५॥

ईश्वर उवाच ॥ क्षान्तं पूर्वकृतं सर्वं मय्यज्ञानात्तपोधनाः ॥ ममैतन्नृत्यमाश्चर्यं चिंतयध्वं मुहुर्मुहुः ॥१२६॥ सह पार्श्वस्थया गौर्या विशालाक्ष्यापि पृष्टया ॥ पूजयध्वं तथा लिंगे मदीये मन्त्रपूर्वकम् ॥१२७॥ ततोऽचिरेण कालेन विमुक्ता मामवाप्स्यथ ॥ इत्युक्त्वान्तर्दधे देवो मुनीनां पश्यतां तदा ॥१२८॥ तेऽपि तं वंद्यमानाश्च चक्रुस्तद्भाषितं त-

---

स्कार असो. तूं स्वतः एकटा आहेस, तरी ब्रह्मदेवापासून तों तहत गवताच्या काडीपर्यंत तूं वेगवेगळीं रूपें घेतोस. सर्व स्थावरजंगमविश्व तुझेंच स्वरूप आहे. तुला नमस्कार असो. (१२३) त्या त्या प्रकारचें निरनिराळें रूप घेऊन तूं त्रैलोक्यास व्यापून राहिला आहेस. तुझें स्वरूप ज्यांत नाहीं अशी एकही वस्तु ह्या जगांत नाहीं. (१२४) मागें झालेलें, आतां होत असलेलें आणि पुढें होणारें सर्व कांहीं तुझेंच रूप आहे, तूं निराळाही आहेस, आणि एकही आहेस, अशा तऱ्हेनें राहणाऱ्या तुला नमस्कार असो. (१२५) अशा रीतीनें अनेक प्रकारचे वेष असणाऱ्या ऋषीश्वरांनीं शिवाची स्तुति केली. तेव्हां अठ्ठेचाळीस हजार वर्षेपर्यंत सतत तपश्चर्या करणाऱ्या त्या मुनीश्वरांवर श्रीशिव प्रसन्न झाले, व दयाळूपणानें मेघगर्जनेसारख्या गंभीर शब्दानें त्यांस ह्मणाले—

(१२६) श्रीशिव ह्मणाले— हे तपस्वीलोकहो, तुह्मी पूर्वीं अज्ञानपणानें माझे जे अपराध केलेत, ते सर्व मी सहन केले आहेत. त्यांबद्दल आतां माझे मनांत कांहीं राग राहिला नाहीं. तुह्मी माझ्या ह्या आश्चर्यकारक नाचण्याची नेहमीं आठवण करीत जा. (१२७) माझ्या डावेकडील बाजूस पार्वती आहे, तिचे डोळे मोठे आहेत, व ती मला लोकहिताचे प्रश्न करीत आहे. अशा ह्या पार्वतीसह यथाविधीनें मंत्रपूर्वक शिवलिंगांत माझी पूजा करा. (१२८) ह्मणजे लवकरच तुह्मी सर्वजण मुक्त व्हाल, आणि मला येऊन मिळाल. असें बोलून श्रीशिव सर्व ऋषीश्वरांसमक्ष तेथल्या तेथेंच गुप्त झाले. (१२९) त्या मुनीश्वरांनींही शिवाला नमस्कार केला आणि तेव्हांपासून ते शिवांनीं सांगितल्याप्रमाणें वागूं लागले, व मरणानंतर

था ॥ तथान्ते पुनरैशानमवापुस्तेज उत्तमम् ॥१२९॥

स्कन्द उवाच ॥ इत्येतत्ते समाख्यातं विश्वेशस्य विचेष्टितम्॥अस्थि-भस्माजिनादानकारणं चाखिलं क्रमात् ॥१३०॥ एतच्चरितमीशस्य ज्ञा-तुमन्यैः सुदुष्करम् ॥ ज्ञातं मया प्रसादेन तस्यैव परमेष्ठिनः ॥ यस्मै कस्मै न वक्तव्यमेतद्गुह्यतमं मतम् ॥१३१॥ एवंविधान्यचिंत्यानि चेष्टि-तान्यंबिकापतेः ॥ वेदैः शास्त्रैरवेद्यानि संत्यनेकानि धूर्जटेः ॥१३२॥ भ-क्त्या शृण्वन्ति ये सर्वमेतच्चरितमादरात् ॥ कीर्तयन्ति पठंत्येव ते यां-ति शिवलोककम् ॥१३३॥ वृत्तम् ॥ नमः शिवायाद्भुतवेषधारिणे नमः शिवायाद्भुतविक्रमाय ते ॥ नमः शिवायाद्भुतचेष्टिताय ते नमः शिवा-याद्भुतहेतवे नमः ॥१३४॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वरा-चारसंग्रहे शिवाधिक्यकथने वृषेंद्रवाहनाद्यस्थिभस्माजिनादानकारणं नाम सप्तविंशोऽध्यायः ॥

---

जेथें अतिशय प्रकाश आहे अशा शिवपदाला गेले.

(१३०) कार्तिकेय ह्मणाला—अगस्त्यऋषे, असें हें श्रीशिवाचें आपल्या हातांत अस्थि ( हाडें ) घेऊन अंगास भस्म लावून अंगावर कातडें पांघरणें वगैरे लीलाचरित्र क्रमाक्रमानें तुला मीं सांगितलें. (१३१) हें परमेश्वराचें चरित्र दुसऱ्यांस मुळींच समजावयाचें नाहीं. माझ्यावर त्या परमेश्वर श्रीशिवाची कृपा होती ह्मणूनच मला समजलें, तें मीं तुला सांगितलें; हें तूं कोणा भलत्या सलत्या मनुष्यांस सांगूं नकोस, हें फार महत्वाचें आहे. (१३२) पार्वतीपति श्रीशिवाचीं अशा तऱ्हेचीं न समजण्यासारखीं अनेक चरित्रें आहेत, तीं शिवचरित्रें वेदांला व शास्त्रांलाही यथार्थ रीतीनें समजत नाहींत. (१३३) जे कोणी लोक हें शिवचरित्र भक्तिभावानें ऐकतात, वाचतात, आणि याचें कीर्तन करतात ते शिवलोकास जातात. (१३४) जो शिवपरमात्मा विचित्र रीतीचा वेष घेतो, त्याला नमस्कार असो, जो शिवपरमात्मा अलौकिक पराक्रम करितो त्याला नमस्कार असो, जो शिवपरमात्मा विचित्र प्रकारच्या लीला करितो त्याला नमस्कार असो, आणि जो शिवपरमात्मा विचित्र विचित्र गोष्टींला मूलकारण आहे त्याला नमस्कार असो.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठनागनाथनांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहे-श्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं, नंदीवाहन, अस्थि, भस्म आणि कातडें वगैरे पदार्थ शिवास कां आवडतात या वर्णनाचा सत्ताविसावा अध्याय संपला.

## ॥ अथाष्टाविंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ पुराणान्तरे मुनय ऊचुः ॥ कथं देवो महादेवो नाम्ना गंगाधरो हरः ॥ सेयं गंगा समाख्याता रोमहर्षण तद्वद ॥१॥

सूत उवाच ॥ ब्रह्मा नारायणो रुद्र इति देवास्त्रयः क्रमात् ॥ सृष्टिस्थित्यन्तसंहारकारिणः परमेष्ठिनः ॥ पृथिव्याः सलिलस्याग्नेरधिष्ठातृत्वमागताः ॥२॥ ते त्रयश्च क्रियाभेदास्तद्यथा ब्रह्मरूपिणी ॥ भूरियं जनयत्येव सर्वान् जन्तून् जनिक्रिया ॥३॥ ब्रह्मणस्तु प्रसिद्धैव जलं विष्णुस्वरूपकम् ॥ आप्यायनत्वाज्जन्तूनां विष्णोः ख्याताऽवनक्रिया॥४॥ अग्ने रुद्रस्वरूपत्वात्सर्वं दहति पावकः॥ संहारकत्वाद्रुद्रस्य ख्याता संहरणक्रिया ॥५॥ पृथिवी सलिलं चापि द्वयं स्थूलमधोन्वयात्॥ उत्क्षिप्तमूर्तं गत्वापि पतत्येवाश्रयावधि ॥६॥ ब्रह्मा विष्णुश्च तद्वत्स्यादग्निरू-

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ इतर पुराणांत पुढील कथाभाग आहे. (१) मुनि ह्मणतात—ह्या महादेव श्रीहराला गंगाधर असें नांव कसें पडलें ? जी ही गंगानांवाची नदी आहे तीच ती नदी होय किंवा काय ? सूता, हा सर्व कथाभाग तूं आह्मांस सांग. असा ऋषीश्वरांचा प्रश्न ऐकून—

(२) सूत ह्मणाले—ऋषीश्वरहो, ब्रह्मदेव, श्रीविष्णु, आणि रुद्र ह्या नांवांचे अनुक्रमानें तीन देव आहेत; ते तिघेजणही परमेश्वर असून, ब्रह्मदेवाकडे सृष्टि उत्पन्न करण्याचें, विष्णूकडे जगाचें रक्षण करण्याचें, आणि रुद्राकडे जगाचा संहार करण्याचें काम आहे. त्यामुळें ते क्रमानें पृथ्वीचे, जलाचे, आणि अग्नीचे आश्रयदाते मानले गेले आहेत. (३) ते तीन देव असून त्यांच्या क्रियाही वेगवेगळ्या आहेत. त्या अशा–पृथ्वी ही ब्रह्मस्वरूप आहे. ती सर्व प्राणिमात्रांस उत्पन्न करिते, उत्पन्न करणें हें पृथ्वीचें काम आहे. (४) विष्णुस्वरूप हें जल (पाणी) आहे, त्या पाण्यामुळें सर्व प्राणिमात्रांचें जीवरक्षण होतें; ह्मणून विष्णूकडे जगाचें रक्षण करण्याचें काम आहे हें प्रसिद्ध आहे. (५) अग्नि हा रुद्रस्वरूप असल्यामुळें तो हें सर्व जाळून टाकतो; रुद्र हा विश्वाचा संहार करितो. ह्मणून रुद्राची सृष्टीचा संहार करण्याबद्दल प्रसिद्धि आहे. (६) पृथ्वी आणि पाणी हे दोन पदार्थ जड असून त्यांचे अंगीं खालीं खालीं जाण्याचा गुण आहे; त्यामुळें जरी त्यांनां वर उचलून फेंकलें, तरी ते पूर्वीच्या खोल प्रदेशाकडे येतात. (७) पृथ्वी आणि जल ह्यांचे अधिपति अनुक्रमें ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु ह्यांची-

र्ध्वविजृंभणः ॥ तथापि रुद्रश्चिन्मूर्तिरुल्लासकृततांडवः ॥ वायुराकाशमिति च द्वयमग्निवशं गतम् ॥७॥ अग्नेः संधुक्षको वायुराकाशो ह्यवकाशदः ॥ कद्रुद्र एव भगवान् मारुताकाशविग्रहः ॥८॥ रुधिरावरणे धातुरावृत्य निखिलं स्वकम् ॥ रुणद्धि रुद्र इत्येवं निरुक्तः परमेश्वरः ॥९॥ महाप्रलयकाले तु ब्रह्मा विष्णौ क्षितिर्जले ॥ क्रमेण विलयं याति विष्णू रुद्रे विलीयते ॥१०॥ जलमग्नौ ततोऽग्निस्तु रुद्ररूपी निरर्गलः ॥ स्वैरं संहृत्य सकलं वायुना परिबृंहितः ॥११॥ महेश्वराभिधः स्वैरं महागगनरंगके ॥ महाश्मशानभूते च महासंहारताण्डवः ॥ कुर्वन्निजपदांभोजभक्तैः क्रीडति शंकरः ॥१२॥ क्रीडन्नाकाशरूपत्वात्सदाशिवसमाव्हयः ॥ पंचवक्त्रो दशभुजः कदाचिन्निरवग्रहः ॥१३॥ कोटिको-

---

ही अशीच स्थिति आहे. अग्नीचा गुण मात्र वर जाण्याचा आहे, ह्मणून अग्नि पेटला ह्मणजे त्याच्या ज्वाला वर जातात. चैतन्यस्वरूप परमात्मा रुद्र हा अग्नीचा अंश असल्यामुळें, तो अग्नीच्या स्वभावाप्रमाणेंच उंच उंच उड्या मारून नाचतो. वायु आणि आकाश हीं दोन्हींही अग्नीस अनुकूल आहेत. (८) वारा हा अग्नीला जास्त पेटवितो, आणि त्या वाऱ्याला आकाश आपल्या पोटांत राहण्यास जागा देतें. ह्मणूनच परमेश्वर श्रीशिवाला कद्रुद्र असें ह्मणतात. कद्रुद्र ह्या शब्दाचा अर्थ वायुस्वरूप आणि आकाशस्वरूप असा होतो. (९) रुधू धातु आच्छादन घालणें अशा अर्थाचा आहे. त्या धातूच्या अर्थास अनुसरून हें सर्व त्रैलोक्य रुद्र आपल्या शक्तीनें व्यापून टाकितो. ह्मणून परमेश्वर श्रीशिवास रुद्र असें नांव पडलें आहे. (१०) महाप्रळयकाळाच्या वेळीं ब्रह्मदेव श्रीविष्णूंत लय पावतो, आणि पृथ्वी पाण्यांत लय पावते, आणि विष्णु रुद्रांत लय पावतो. (११) पाणी अग्नींत लय पावतें. तो अग्नि हा रुद्रस्वरूप आहे त्याला कोठेंही प्रतिबंध होत नाहीं. तो अग्नि सर्व जगास जाळून वाऱ्यानें वरचेवर स्वच्छंदपणानें अधिकाधिक भडकत असतो. (१२) त्याला महेश्वर असें नांव आहे. तो महाकाशरूप आंगणांत आणि महास्मशानांत महासंहाररूप नाच करीत असतो; आणि आपल्या पदकमलांची भक्ति करणाऱ्या भक्तांबरोबर सुखानें कालक्रमणा करीत असतो. (१३) शिव हा आकाशस्वरूप असल्यामुळें क्रीडा करितो, ह्मणून त्याला सदाशिव असें नांव पडलें. त्याला पांच तोंडें असून दहा हात आहेत, एखादेवेळीं तो निराकार असलेलाही अनुभवास येतो.(१४) त्याला कोट्यावधि मस्तकें,

टिशिरोवक्त्रनेत्रपाणिपदांबुजः ॥ कोटिकोटिमहाहेतिभूषणक्रीडनोद्यः ॥१४॥ परमानंदभरितो महानादो महेश्वरः ॥ महानादो महाभीमो महाभैरवविग्रहः ॥१५॥ महाशक्तिर्महादीप्तिर्महाकीर्तिर्महामतिः ॥ महाग्रासो महद्भासो महोल्लासमहारवः ॥१६॥ अन्तःस्वच्छंदसंपन्नं परमानंदमेदुरम् ॥ परमाकाशमध्यस्थमात्मशक्त्यमृतप्लवम् ॥ अपारमतुलं देवो बभार शिरसा हरः ॥१७॥ गंगां चंद्रकलारूपां महाबोधसुधारसाम् ॥ किंचिदुल्लास्य भक्तानां दर्शयामास शंकरः ॥१८॥ गगनं गमिति प्रोक्तं गामिनी गेति कथ्यते ॥ गगने गमनाद्गंगा निरुक्ता तत्ववेदिभिः ॥१९॥ महाप्रलयकाले तु सर्वं संहृत्य नृत्यतः ॥ महाज्वलनरूपस्य हरस्य शिरसि प्रभोः ॥२०॥ ज्वालाभिर्व्योमकेशस्य विलीना सा

---

कोट्यावधि तोंडें, कोट्यावधि डोळे, कोट्यावधि हात, आणि कोट्यावधि पाय आहेत. तो आपले हातांत कोट्यावधि तीक्ष्ण धारेचीं हत्यारें घेऊन अंगावर कोट्यावधि प्रकारचे अलंकार घालून खेळत असतो. (१५) तो नेहमीं अतिशय आनंदी दिसतो. त्याचा ध्वनि मोठा आहे, त्याला महेश्वर असें नांव आहे, त्याचा नाद मोठा आहे, त्याचें स्वरूप अकराळ विकराळ आहे; आणि तो महाभैरवस्वरूप आहे. (१६) तो मोठा शक्तिमान् आहे, तो मोठा तेजस्वी आहे, तो मोठा कीर्तिमान् आहे, तो मोठा बुद्धिमान् आहे, त्याचा ग्रास मोठा आहे, तो मोठा तेजःपुंज आहे, तो मोठा उल्हासी असून त्याचा नाद मोठा आहे. (१७) तो स्वतंत्र आहे, तो मोठा आनंदी आहे, तो परमेश्वर परमाकाशांत राहणारें व आत्मशक्तिरूप अमृताच्या लाटा ज्यांत उसळतात असें अपरंपार, आणि ज्याची बरोबरी कशाच्यानेंही होऊं शकत नाहीं, असें पाणी आपल्या मस्तकावर घेतो. (१८) त्या पाण्यालाच गंगा असें ह्मणतात. ती गंगा चंद्राच्या कलेप्रमाणें पांढरी पांढरी शुभ्र आहे, तिच्यांत अतिशय ज्ञानरूप अमृताची गोडी भरलेली आहे. कांहीं थोडी बाहेर प्रकट करून श्रीशिव भक्तलोकांस ती दाखवितो. (१९) गगनास ( आकाशास ) “ ग ” असें ह्मणतात, आणि गामिनी ( जाणारी, वाहणारी ) अशा अर्थाचे शब्दास “ गा ” असें ह्मणतात. ह्मणून आकाशांत वाहणारी नदी अशा अर्थावरून तिला गंगा असें नांव विद्वान् लोकांनीं दिलें असो. (२०) महाप्रळयकाळाच्यावेळीं सर्व जगाचा संहार करून नाचणाऱ्या, प्रलयाग्नीचें स्वरूप घेणाऱ्या परमेश्वर श्रीशिवाच्या मस्तकावर (२१) ही कल्याणकारक गंगा व्योमकेशाच्या केशांच्या प्रकाशांत गुप्त झाली आहे. तिचे पाण्याचा विस्तार

स्वयं शिवा ॥ महानंदावृतप्लावा तेन गंगाधरो हरः ॥२१॥ एवं धृता महागंगा कदाचित्स्वेच्छया विभोः ॥ जटापटलरंध्रान्तर्निःसृताभिर्महेश्वरी ॥२२॥ सहस्रकोटिधाराभिरभिषिच्यैव तं शिवम् ॥ प्रणम्य पुरतः स्थित्वा नत्वा संपूज्य भूरिशः ॥ अतीव मुदिता देवी बभाषे शंकरेण च ॥२३॥

शिव उवाच ॥ त्वं हि मे सर्वशक्तीनां परमानंददायिनी ॥ त्वच्छक्तिकोटिकोट्यंशात्काऽपि शक्तिर्विनिःसृता॥२४॥ प्रवर्ततां ब्रह्मलोके नदीरूपेण पावनी ॥ सर्वेषामेव कल्याणी व्योमगंगेति संज्ञिता ॥२५॥ एवमुक्ता महेशेन महागंगा महेश्वरी ॥ सृष्टिकाले तथा कृत्वा पुनर्लीनाथ तद्विभौ ॥२६॥ तस्याः सुता व्योमगंगा] महाकल्लोलफेनिला ॥ स्वकीयैः शिखरैर्विष्वक् समुद्रांश्च नदान्नदीः ॥२७॥ कोटिशः स्पृष्टवत्येवमण्डान्तर्बहिरव्यया ॥ सा ब्रह्मलोके देवर्षिदानवाद्यैः सुपूजिता ॥२८॥ प्रव-

---

महानंदस्वरूप आहे, असो. अशा रीतीनें महादेव गंगेस धारण करितात, ह्मणून त्याला गंगाधर असें नांव पडलें आहे. (२२) अशा तऱ्हेनें शिवांनीं आपल्या मस्तकावर धारण केलेली परमेश्वरी महागंगा एकवेळ शिवाच्या जटामंडलांतून स्वेच्छेनें निघणाऱ्या(२३) आपल्या स्वच्छ पाण्याच्या हजारों कोटि धारांनीं शिवास अभिषेक करून, व अनेक प्रकारांनीं भक्तिभावानें शिवाचें पूजन करून, व नमस्कार करून आनंदानें उभी राहिली. तिजकडे पाहून शिव ह्मणाले.

(२४) शिव ह्मणाले— गंगे, तूं माझ्या सर्व शक्तींस आनंद देतेस तुझ्या शक्तीच्या एक कोटीच्या कोटि अंशानें कांहींएक शक्ति उत्पन्न झाली.(२५) गंगे, तूं फार पवित्र आहेस, तूं नदीचें रूप घेऊन ब्रह्मलोकांत रहा. तूं सर्वांचें कल्याण करणारी आहेस, तुला आकाशगंगा असें नांव पडेल. (२६) महादेव श्रीशिवानें गंगेस असें ह्मटल्यावर महादेवी गंगेनें सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीं तसें केलें, आणि पुनः ती परमेश्वरांत गुप्त झाली. (२७) आकाशगंगा ही तिची मुलगी आहे, तिच्यांत मोठमोठ्या लाटा उसळून तिजवर फेंस येतो. ती आपल्या लाटांनीं सर्व ठिकाणीं नद नदी आणि समुद्र ह्यांच्या पाण्यास जाऊन मिळाली.(२८) ही नदी अविनाशी आहे, तिनें सर्व ब्रह्मांडांत फिरून कोट्यावधि नद्यांस व नदांस पवित्र केलें. तिची ब्रह्मलोकांत देव ऋषि आणि दानव भक्तिभावानें पूजा करितात. (२९) ती आकाशगंगा त्रैलोक्यांत वहात असतां एकवेळ देवेंद्र आणि

हन्ती कदाचित्तु देवेंद्रैरावतादिभिः ॥ निर्भिन्नतीरा क्षुभिता कुपिता च महानदी ॥२९॥ तरंगताण्डवव्यूहकवलीकृतदिङ्मुगा ॥ विश्वाण्ड-पिण्डग्रासैकतत्परा च बभूव सा ॥३०॥ तां विलोक्य यग्रस्ता ब्रह्म-विष्णुमुखाः सुराः ॥ असुरा ऋषयः सिद्धास्तुष्टुवुः मेश्वरम् ॥ वि-श्रान्तर्वासिनं शंभुं कैलासशिखरस्थितम् ॥३१॥ देवः महादेव प्रप-न्नार्तिप्रभंजन ॥ अकाण्डप्रलयं नाथ संहर व्योमगामि ॥ गंगाप्रवा-हमीशान नमस्ते भगवन्नमः ॥३२॥ इति स्तुतो महाः प्रहसन्प्रेक्ष्यं पार्वतीम् ॥ सलिलं मनसा वेगं गंगायाः स्वजटान्तआकृष्य गोप-यामास चिरकालं महाविभुः॥३३॥ततो लोकविशुध्दशेखरे हिमव-द्रिरेः ॥ अतितुंगे महादेवो जटाग्रैस्तां विसृष्टवान् ॥ निर्गत्य सह-

ऐरावत हत्ती वगैरे तिच्या कांठावर येऊन स्वच्छंदपणानें करूं लागल्यानें तिचे दोन्ही कांठ पडून गेले; त्यामुळें ती आकाशगंगा खवळून तिचें पाणी चोहोंकडे पसरलें (३०) त्या नदीच्या लाटांचे समुदाय नाल्यानें दहाही दिशा व्यापून गेल्या, ती नदी त्यावेळीं अशी भयंकर दिसूं र्कीं, सर्व ब्रह्मां-डाचाही एका क्षणांत ग्रास करिते कीं काय असें वाटूं लाग) तिला पाह-तांच ब्रह्मदेव, विष्णु वगैरे मुख्य मुख्य देव, दैत्य,ऋषीश्वर सिद्ध फार घाव-रून जाऊन सर्व त्रैलोक्यांत पूर्णपणानें भरलेल्या, कैलासा शिखरावर राहणाऱ्या परमेश्वर श्रीशिवास शरण गेले, आणि त्याची रूं लागले. (३२) देव ह्मणाले– परमेश्वरा, तूं सर्व देवांचा अधिपति तुला महादेव ह्मणतात. तूं शरण आलेल्या लोकांचें दुःख दूर करितोस. च वेळीं सर्व जगाचा संहार होण्याचा प्रसंग आला आहे. ह्यांतून तूं आग कर. पर-मेश्वरा, हा आकाशगंगेचा प्रवाह फारच मोठा होऊन सर्वचा नाश क-रीत आहे. तो वंद कर. परमेश्वरा, तुला आह्मां सर्वांचा नसो. (३३) अशी सर्व देवांची स्तुति ऐकून महादेव पार्वतीकडे पाहून सले, आणि मग गंगानदीचें पाणी त्यांनीं आपल्या मनानें जटांतघेऊन त्या महासामर्थ्यवान् शिवांनीं तें तेथल्या तेथेंच गुप्त के मग पुनः हें गंगेचें पाणी फार पवित्र आहे ह्यामुळें अनेक प्राणी उद्व विचारानें हिमालयाच्या अतिशय उंच अशा एका शिखरावर महागेचें पाणी आपल्या जटांतून बाहेर सोडून दिलें. (३५) परमेश्वरी क ती गंगा-

सा देवी गंगा कोटिमुखात्ततः ॥ तिर्यगूर्ध्वमधस्ताच्च सर्वतः प्रसृता शिवा ॥३५॥ मेरुमंदरकैलासप्रभृतिष्वपि सर्वशः ॥ भूभागेषु च पुण्येषु वन्येष्वपि मास्वना ॥ दिक्षु सर्वासु सर्वांश्च सागरान् पर्यपूरयत् ॥३६॥ एवं व्यवस्थतां देवो गंगामालोक्य सुंदरीम् ॥ व्याजहार महागंगाप्रसवामारिकाम् ॥३७॥ सर्वतः प्रसृता पुत्रि त्रिमार्गा भव सुव्रते ॥ भूम्यन्तरिक्षस्वर्गेषु सर्वलोकैकपावनी ॥३८॥ इति व्याहृत्य भगवान् पार्वत्यह शंकरः ॥ पर्वताग्रेषु सर्वेषु रेमे गंगां विलोकयन् ॥३९॥ तदाप्रभृ गंगाऽसौ त्रिमार्गेति प्रकीर्त्यते ॥ उपगंगानुगंगाश्च कोटयोऽस्याः यशः॥४०॥उपगंगा समीपस्था अनुगंगास्तु ताः स्मृताः ॥ गंगामनुग याः सर्वा गंगा इति स्मृताः ॥४१॥

सूत उवाच ति गंगाधरत्वं हि देवदेवस्य शूलिनः ॥ गंगानिर्व-

---

नदी जटांतून बाहेर पडतां कोटिमुखानीं जटांतून बाहेर पडली. आणि आजुबाजूला वर खाली पृथ्वीच्या पृष्ठभागावर चोहोंकडे पसरली. (३६) मेरुपर्वत, मंदरपर्वत, र्वत वगैरे सर्व पर्वतावर, पृथ्वीच्या पृष्ठभागावर पवित्र वनांत आणि सर्व घो घो असा मोठा शब्द करीत गंगानदी वेगानें वाहूं लागली, व तिनें पाण्याच्या पुरानें समुद्राचें पाणी तुडुंब भरून टाकिलें. (३७) अशा रीतीं शांतून खालीं पृथ्वीवर पडणाऱ्या, महागंगेपासून उत्पन्न झालेल्या त्या सुंदपाहून महादेव ह्मणाले. (३८) मुली गंगे, तूं सदाचारी आहेस, तूं घर चोहोंकडे पसरली आहेस; तर असें न करितां स्वर्ग, मृत्यु आणि ह्या तिन्ही लोकांत तुझ्या पाण्याचे तीन प्रवाह करून रहा, ह्मणजे त्रैलोक्य कृतार्थ होतील. (३९) असें गंगेस सांगून परमेश्वर श्रीशिव पार्वर्व पर्वतावरील गंगेच्या प्रवाहाची शोभा पाहत पाहत सुखानें लीला करु(४०) तेव्हांपासून गंगेला ( त्रिमार्गगा ) तिन्ही लोकांत तीन प्रवाह णारी अशा अर्थाचें नांव पडलें. ह्या गंगेबरोबर वाहणाऱ्या आणि ळणाऱ्या उपगंगा आणि अनुगंगा तर हजारोंहजार आहेत. (४१) गं ज्या लहान लहान नद्या वाहतात, त्यांस उपगंगा असें ह्मणतात; व गंगा होत जितक्या कांहीं नद्या गंगेस येऊन मिळाल्या त्या सर्व :

(४२) सूत ऋषीश्वरहो, असें देवाधिदेव श्रीशिवाला गंगाधर

चनं चापि गंगाप्रादुर्भवं वचः ॥ प्रवृत्तिमपि सर्वत्र प्रावोचं भवता महम् ॥४२॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने गंगाधरलीला नामाष्टविंशोऽध्यायः ॥

---

असें नांव पडण्याचें कारण मीं तुह्मांस सांगितलें. तसेंच गंगानदीस गंगा असें नांव पडण्याचें कारण, गंगेची उत्पत्ति, आणि गंगेची सर्व त्रैलोक्यांत प्रसिद्धि कशी झाली, हेंही तुह्मांस सर्व सांगितलें.

ह्याप्रमाणें श्रीनीलकण्ठनागनाथनांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं गंगाधरलीलावर्णन नांवाचा अठ्ठाविसावा अध्याय संपला.



## ॥ अथैकोनत्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शैवे धर्मसंहितायाम् ॥ सनत्कुमार उवाच ॥ नीलकण्ठः कथं चासीच्छर्व उग्रस्त्रियंबकः॥ वक्तुमर्हसि मे सर्वं भगवन्नंदिकेश्वर ॥१॥

नंदिकेश्वर उवाच ॥ पुरा सुरासुराः सर्वे ममंथुः क्षीरसागरम् ॥ मंथानं मंदरं कृत्वा योक्त्रं कृत्वा च वासुकिम् ॥ सुधार्थमभवत्तस्मात्कालकूटं महाविषम् ॥२॥ तं दृष्ट्वा विबुधाः सर्वे ततः शक्रपुरोगमाः ॥ संभ्रान्ता विवशा दीना दुद्रुवुश्च महासुराः ॥३॥ दग्धास्त्रवस्त्रकवचा दग्धांगा दग्धलोचनाः ॥ अवदन् केचिदन्योन्यं प्रेक्ष्य देवाश्च दानवाः ॥४॥ दंदह्यमानास्ते सर्वे दावा इव दवाग्निना ॥ हाहेति प्राकृतरवानवदन् विबुधाः सुराः ॥५॥ वृत्तम् ॥ विनिर्गतांत्रशोणिता विशीर्णहार-

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ शिवपुराणांत धर्मसंहितेंत पुढील कथाभाग आहे तो असा— (१)सनत्कुमार ह्मणतात– शर्व, उग्र, त्रिनेत्र अशीं नांवें श्रीशिवास जरीं आहेत, तसेंच शिवास नीलकंठ असें नांव पडण्याचें काय कारण झालें, तें सर्व, परमेश्वरा नंदिकेश्वरा, तूं आह्मांस सविस्तर रीतीनें सांग. असा सनत्कुमारांचा प्रश्न ऐकून–

(२) नन्दिकेश्वर ह्मणाले– पूर्वी देवांनीं आणि दैत्यांनीं अमृत निघावें ह्या हेतूनें क्षीर समुद्र घुसळला. त्यावेळीं त्यांनीं मंदर पर्वताची रवि करून वासुकीसर्पाची दोरी केली, अमृताकरितां सर्वांनीं समुद्र घुसळला खरा; परंतु त्यांतून अगोदर कालकूट नांवाचें अतिशय तीव्र विष निघालें. (३) त्या भयंकर विषाला पाहतांच इंद्रादिक सर्व घाबरून व्याकुळ झाले; व ज्यास जिकडे वाट फुटेल तिकडे लहान तोंडें करून ते पळूं लागले. (४) त्या विषाच्या उष्णतेनें देवांच्या हातांतील शस्त्रास्त्रें, अंगावरील वस्त्रें आणि चिलखतें तापून गेलीं; त्यांचीं अंगें भाजलीं व त्यांचें डोळे तापून गेले, त्यामुळें कितीएक देव आणि दैत्य आतां पुढें काय करावें, असें आपआपसांत बोलूं लागले. (५) रानांत वणवा पेटून त्यामुळें सगळें रान जसें भाजून जावें, तशीं त्या देव दैत्यांचीं अंगें कालकूट विषाच्या उष्णतेनें भाजून गेल्यामुळें; आतां कसें करावें, आतां काय करावें, असे केविलवाणे उद्गार काढून ते सामान्य मनुष्यासारखें रडूं लागले. (६) त्यांच्या अंगांतील शिरा व रक्त बाहेर दिसूं लागलें, त्यांच्या अंगावरील अलंकार व गळ्यांतील मोत्यांच्या माळा तुटून गेल्या, त्यांच्या शेंडींच्या गांठी सुटल्या. ते देव आणि

भूषणा विमुक्तकेशबन्धनाः सुरेतरा बलाधिकाः ॥ अरोदिषुस्सबांधवा महाविषाग्निना तदा समन्ततस्तु बाधिता स्वदेहपालने रताः ॥६॥ विषण्णा विबुधाः सर्वे जग्मुस्ते ब्रह्मणोऽतिकम् ॥ ब्रह्मा चापि महातेजास्तद्विदित्वा विषं तदा ॥७॥ विषाग्निना सुसंदग्धं गरुडेनेव पन्नगम् ॥ विष्णुं विश्वेश्वरं जिष्णुमब्रवीद्भगवानजः ॥८॥

ब्रह्मोवाच ॥ ग्रस्यते यदि देवेश त्वादृशोऽपि विषाग्निना ॥ अतश्चराचरं सर्वं ग्रस्तं मन्ये विचारतः ॥९॥ प्रधानमूर्ते सर्वस्य वामांगज वरप्रद ॥ मायिन्मग्नो यदि भवान्मग्ना एव वयं हरे ॥१०॥ तमेवं वादिनं देवं ब्रह्माणं कमलासनम् ॥ पितामहमथालोक्य देवैः सार्द्धं जगद्गुरुम् ॥ परापरज्ञो भूतानां वाक्यमाह जनार्दनः ॥११॥

विष्णुरुवाच ॥ किं कृत्यं वद देवेश देवदेव जगद्गुरो ॥ त्वयैव सृष्टं

---

दैत्य जरी मोठे बलाढ्य होते खरे, तरी ते कालकूट विषाच्या उष्णतेनें होरपळून गेल्यामुळें, ते आपल्या नातलगांसहित मोठमोठ्यानें रडूं लागले. व चोहोंकडून त्यांचीं अंगें भाजल्यामुळें ते आपले प्राण कसे वांचतील ह्याचा उपाय शोधूं लागले. (७) तेव्हां सर्व देव अगदीं घाबरून जाऊन ब्रह्मदेवाकडे गेले. ब्रह्मदेवही मोठा शक्तिमान होता त्यानें त्या सर्व देवांकडे पाहून कालकूट विषामुळें अशी सर्व देवांची अवस्था झाली असें जाणलें. (८) गरुडामुळें जशी सापाची गाळण व्हावी तशी कालकूट विषामुळें सर्व देवांची व मुख्यत्वेंकरून श्रीविष्णूची गाळण झालेली पाहून सर्व जगास अजिंक्य असणाऱ्या विष्णूस ब्रह्मदेव ह्मणाले—

(९)ब्रह्मदेव ह्मणाले— हे देवाधिदेवा, तूं जर असा ह्या कालकूट विषाच्या उष्णतेनें इतका होरपळून गेलास, तर मला खचित असें वाटतें कीं, ह्या विषाच्या उष्णतेनें हें स्थावरजंगम विश्व खचित जळून गेलेंच. (१०) तूं सर्व प्राणिमात्रांचा मुख्य पुरुष आहेस, तूं श्रीशिवाच्या डाव्या अंगापासून जन्म घेतलास. तूं आपल्या भक्तांस इच्छिलेले वर देतोस, दैत्यांविषयीं तूं धूर्त आहेस. तूं जर कालकूटास इतका भ्यालास, तर आह्मी सर्वजण खचित बुडालों ( मेलों ) असें समज. (११) अशा रीतीनें बोलणाऱ्या त्या परमात्म्या जगद्गुरु कमलासन ब्रह्मदेवाचें बोलणें ऐकून सर्व देवांसहित ब्रह्मदेवाकडे पाहून प्राणिमात्रांचें हिताहित पाहणारा श्रीविष्णु ब्रह्मदेवास ह्मणाला—

(१२) विष्णु ह्मणाले— ब्रह्मदेवा, तूं देवांचा ईश्वर आहेस, सर्व देवांचा देव आहेस, तूं त्रैलोक्याचा गुरु आहेस, आह्मीं काय करावें तें सांग. तूंच हें सर्व

यत्सर्वं जगद्दग्धमनेन वै ॥१२॥ निशम्य वचनं तस्य भगवान् पद्मसंभवः ॥ प्रणम्य च महादेवं सुरांश्चाह जनार्दनम् ॥१३॥

ब्रह्मोवाच ॥ अनादिदेवमीशानं सप्तविंशतिकं शिवम् ॥ षड्विंशकं महादेवमष्टधाधिष्ठितं विभुम् ॥१४॥ आनंदमचलं स्वेच्छातनुमास्थाय सर्वगम्॥योगिनं योगनाथेशं बीजैः सार्धमबीजिनम् ॥प्रपद्ये देवमीशानं श्रद्धयाऽभ्यर्च्य शंकरम् ॥१५॥याचामहे महेशं तं वयं कैलासवासिनम्॥ विषसंहरणं कर्तुं सर्वभूतार्तिहारिणम् ॥१६॥ याचितोऽसौ महादेवो भगवान् जगदीश्वरः ॥ मग्नं विषार्णवे सर्वं त्रैलोक्यं तारयिष्यति ॥१७॥ पितामहेनैवमुक्तः प्रीतियुक्तो जनार्दनः ॥ तथेत्युक्त्वा महादेवं सस्मार च महेश्वरम् ॥१८॥ देवाः सेंद्राः स्वयं ब्रह्मा ब्रह्मलोकनिवासि-

---

जग उत्पन्न केलेंस, आणि तें जग ह्या कालकूट विषामुळें जळून जात आहे, त्यास काय उपाय करावा हें तुझें तूंच विचार करून पहा. (१३) असें विष्णूचें बोलणें ऐकून परमेश्वर कमलसंभव ब्रह्मदेव ह्यांनीं श्रीशिवास नमस्कार केला; व मग सर्व देवांकडे आणि विष्णूकडे पाहून ते ह्मणाले.

(१४)ब्रह्मदेव ह्मणाले– देवहो, कांहीं चिंता करूं नका. महादेव हा अनादिकालापासून आहे, तो सत्तावीस तत्वांचा समुदाय आहे, त्याला शिव ह्मणतात, तो सव्वीस तत्वात्मक आहे, त्याला महादेव ह्मणतात, तो आठ रूपें धरून राहतो तो समर्थ आहे. (१५) तो आनंदस्वरूप असून स्थिर आहे, तो आपल्या इच्छेप्रमाणें शरीर धारण करितो, त्याला सर्व ठिकाणीं जाण्यायेण्याची शक्ति आहे, तो योगीश्वर आहे, तो योगांचा अधिपति आहे, त्याला ईश्वर ह्मणतात. तो सबीज आहे आणि निर्बीज आहे. त्या परमेश्वर श्रीशिवाची आराधना करून त्यास शरण जाऊं, (१६) त्या शिवाखेरीज कालकूट विषापासून आमचें रक्षण करण्यास कोणी समर्थ दिसत नाहीं. त्याकडे गेलें तर आपलें कार्य होऊन आपण कृतार्थ होऊं. तो परमेश्वर कैलास पर्वतावर राहतो, तो विषाचा त्रास चुकविण्यास समर्थ आहे, तो सर्व प्राणिमात्रांचें दुःख निवारण करितो. (१७) तो महादेव त्रैलोक्याचा अधिपति आहे, तो सर्व गुणसंपन्न आहे. आपण त्यास शरण गेलें तर कालकूटरूप समुद्रांत बुडालेल्या सर्व त्रैलोक्यास तो त्रासांतून सोडवील. (१८) ब्रह्मदेवानें असें ह्मटल्यावर श्रीविष्णूस मोठा संतोष वाटला. मग त्यानेंही बरें आहे तसेंच करूं, असें ह्मणून महेश्वर महादेवाचें स्मरण केलें. (१९) मग इंद्रादिक सर्व देवांनीं, स्वतः ब्रह्मदेवानें, सत्यलोकांत राहणाऱ्या इतर देवांनीं, आणि

नः ॥ पूर्वदेवाश्च देवेशं प्रणेमुः प्रीतमानसाः ॥१९॥ स्मरणाद्देवदेवस्य दुःखं तेषां महात्मनाम् ॥ ध्वस्तमासीत्सुरश्रेष्ठा जगर्जुश्च भवं जगुः ॥२०॥ तथापि बहुधा संस्थं तेषां वर्णमनुत्तमम् ॥ कालमासीन्मुनिश्रेष्ठ कालकूटस्य गौरवात्॥२१॥रक्तवर्णं हरेर्वर्णं कृष्णमासीद्विशेषतः॥ संसर्गात्कालकूटस्य त्रिधा संस्थस्य तत्क्षणात् ॥२२॥ शक्रस्य हेमवर्णाभं तथान्येषां महात्मनाम् ॥ दैत्यानामग्निकल्पानामहो ब्रह्मसुतोत्तम ॥२३॥ हिताय जगतां सार्धं ब्रह्मणा भगवान् हरिः ॥ कैलासपर्वतं गन्तुं मतिं चक्रे सुरासुरैः ॥२४॥ गरुडस्य तथा स्कंधमारुह्य पुरुषोत्तमः ॥ जगाम भगवान् ब्रह्मा विमानं विश्वतोमुखम् ॥२५॥ तं तथा देवदेवेशं ब्रह्माणं च जनार्दनम् ॥ देवाश्च मुनयः सर्वे पिण्डीभूताः समंययुः ॥२६॥ सर्वे संप्राप्य देवस्य सार्धं गिरिवरं शुभम् ॥ भीरवस्तं

---

दैत्यांनीं संतोषानें देवाधिदेव श्रीशिवास नमस्कार केला. (२०) त्या देवाधिदेव महादेवाचें स्मरण केल्याबरोबर त्या मोठ्या मनाच्या देवांचें दुःख नाहींसें झालें. दुःख नाहींसें होतांच सर्व मुख्य मुख्य देव मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले, व सर्वजण शिवास शरण गेले. व त्या देवाची त्यांनीं स्तुति केली. (२१) त्या देवांची अंगकांति अनेक प्रकारची व सुंदर होती. परंतु सनत्कुमारा, त्या विषाच्या उष्णतेनें सर्वांचीं पूर्वीचीं रूपें पार नाहींशीं होऊन त्यांचीं अंगें काळीं, ठिक्कर पडलीं होतीं. (२२) श्रीकृष्णाचें रूप पूर्वीं लाल होतें परंतु कालकूटाच्या सहवासामुळें काळें झालें. (२३) इंद्राचें रूप सोन्यासारखें पिंवळें होतें, व इतर मोठमोठ्या देवांचीं स्वरूपें व दैत्यांचीं स्वरूपें अग्नीसारखीं सुंदर होतीं; परंतु विषाच्या उष्णतेमुळें तीं सर्व काळीं ठिक्कर झालीं. (२४) असो. मग सर्व लोकांच्या कल्याणासाठीं ब्रह्मदेवास बरोबर घेऊन व सर्व देव दैत्यांसह, कैलास पर्वतावर शिवाकडे जावयाचा श्रीविष्णूंनी विचार केला. (२५) गरुडाच्या खांद्यावर बसून श्रीविष्णु निघाले, परमेश्वर ब्रह्मदेव लागलेच चोहोंकडे तोंडें असलेल्या विमानांत बसून निघाले. (२६) श्रीशंकराकडे ब्रह्मदेव आणि विष्णु आपापल्या वाहनांवर बसून निघालेले पाहतांच, इतर सर्व देव आणि मुनीश्वरही एकत्र जमून शिवाकडे जाण्यास निघाले. (२७) मग सर्व देव आणि ऋषीश्वर मिळून शिवाच्या कल्याणकारक पर्वताकडे निघाले. कालकूट विषाच्या काळजीनें ते अगदीं घाबरून गेले होते. दुरून शिवाचें राहण्याचें स्थान जो मेरुपर्वत तो पाहतांच त्या सर्वांनीं

प्रणेमुश्च मेरुं सर्वनिकेतनम् ॥२७॥ भगवान् वारिजाभाक्षो गरुडारूढ ड्ध्वजः॥अवतीर्य नमस्कृत्य चारुरोह गिरीश्वरम् ॥२८॥ पितामहोऽपि भगवान्विमानादवतीर्य च ॥ मुनीश्वरैः स्वयं सार्धं देवैः सर्वैस्तथेतरैः ॥२९॥ वृत्तम् ॥ सकलदुरितहीनं सर्वलोकप्रसिद्धं सकलदुरितहीनैः सेवितं चात्मविद्भिः ॥ सकलदुरितहीनैर्भूतमुख्यैः प्रभूतैः सकलदुरितहीनैर्भृंगिमुख्यैर्विचित्रं॥३०॥मधुररणितगीतं मारकालान्तकारेः पदरुचिरवनांतं कान्तपादान्ततोयम् ॥ इभशरभमृगाद्यैः सर्वतत्वार्थविद्भिः मुनिवरमुनिमुख्यैरप्रमादैश्च जुष्टम् ॥३१॥ भवनशतसहस्रैर्जुष्टमादित्यकल्पैर्ललितगतिविदग्धैर्हंसकारण्डवृन्दैः ॥ शुकपिकशतवृन्दैर्वृन्दभूतैर्द्विजेंद्रैर्द्विजवरशतजुष्टैः सेवितं कल्पवृक्षैः ॥३२॥ शृंगैर्हैमैः स्फाटिकैः

---

नमस्कार केला. (२८) मेरुपर्वताजवळ येतांच कमलाप्रमाणें नेत्र असणारा गरुडध्वज श्रीविष्णु गरुडावरून खालीं उतरला, व अगोदर पर्वतास नमस्कार करून स्वतः पायांनीं पर्वतावर चढूं लागला. (२९) ब्रह्मदेवही मेरुपर्वताजवळ येतांच विमानांतून खालीं उतरला, व इतर देवांसहित आणि ऋषीश्वरांसहित स्वतः पायांनीं मेरुपर्वतावर चढूं लागला. (३०) तो मेरुपर्वत सर्व प्रकारांनीं निर्दोष असून सर्व लोकांत प्रसिद्ध होता; निर्दोष स्वभावाचे आत्मज्ञानी लोक त्या पर्वतावर रहात होते; निर्दोष स्वभावाचे मुख्य मुख्य भूतांचे समुदाय त्यावर पुष्कळ रहात होते, त्यांत निर्दोष स्वभावाचे भृंगि वगैरे पार्षदगण मुख्य होते. (३१) सनत्कुमारा, त्या मेरुपर्वतावर किन्नरांच्या स्त्रिया, मदनाचा, यमाचा, आणि अंधकासुराचा शत्रु शिव ह्याचे गुणानुवाद सुस्वर रीतीनें गात होत्या. शिवपार्वती त्या पर्वतावर स्वच्छंदपणानें क्रीडा करीत असल्यानें त्यांच्या पदरजानें वनाचे सर्व प्रदेश पवित्र झाले होते. मेरुपर्वताच्या आसपास लहान लहान अनेक टेंकड्या होत्या, त्यांजवरून पाणी झुळझुळ वाहत होतें. हत्ती, शरभ, मृग वगैरे जनावरें आणि मुख्य मुख्य मुनीश्वर त्या पर्वतावर राहत होते. (३२) मेरुपर्वतावर शेंकडो हजारों घरें होतीं तीं, सर्व सूर्यासारखीं झळकत होतीं; ज्यांची चालण्याची ढब फारच सुंदर आहे अशा हंसांचे आणि कारंडवांचे समुदाय तेथें पुष्कळ होते. मेरुपर्वतावर कल्पवृक्ष पुष्कळ होते. त्यांवर राघू, कोकिळ, वगैरे मधुर मधुर शब्द करणारीं हजारों पांखरें वसत होतीं; व त्यांखेरीज इतर पक्षीही तेथें पुष्कळ वसत होते. त्या कल्पवृक्षांच्या खालीं शेंकडों ब्राह्मण राहत होते. (३३) मेरुपर्वतावर मोठमोठीं अनेक शिखरें होतीं. त्यांत कांहीं सोन्यांचीं होतीं,

वंज्रशृंगैः शृंगैर्दिव्यै राजतैर्हैमचित्रैः ॥ शृंगैश्चान्यैः सर्वरत्नप्रदीपैः शृं-गैर्वृष्टैर्गोवृषेंद्रस्य गत्या ॥३३॥ विनायकभयत्रस्तैर्विनायकनिभैरिभैः ॥ विनायककरभ्रष्टैर्महागिरिनिभैर्द्रुमैः ॥३४॥ वृत्तम् ॥ स्कंदस्य शक्त्या निहतैर्मृगौघैः स्कंदस्य शक्त्या प्रणुदैर्द्विजेंद्रैः ॥ स्कन्दस्य कैलासनि-भैरिभेंद्रैः स्कन्दस्य पुण्यैः शिखिजैः शिखीन्द्रैः ॥३५॥ उमापदस्प-र्शपवित्रभूतमहानगैः पुण्यफलैस्तथान्यैः ॥ उमापदप्रख्यविचित्रपत्रै-रुमास्मितप्रख्यविचित्रपद्मैः ॥३६॥ हैमैर्लताशतैः शंभोर्जटाशतनिभै-र्मुने ॥ प्रफुल्लकुसुमाद्यैस्तु कुंचितैराश्रितैस्तरुम् ॥३७॥ लताश्च पुष्पन-मिताः स्वाश्रिताश्च सुरद्रुमम् ॥ रेजिरे तु यथा देवं देवदारुवने स्त्रि-यः ॥३८॥ निरीक्ष्यैवंविधं देवा देवदेवस्य शोभनम् ॥ कैलासं मेरुम-

---

कांहीं स्फटिकांचीं होतीं, कांहीं इंद्रनील मण्यांचीं होतीं, कांहीं शिखरें निवळ रुप्यांचीं असल्यामुळें चकाकत होतीं, दुसरीं कांहीं वज्रमय शिखरें सर्व प्रकारच्या रत्नांच्या केवळ खाणीच असल्यामुळें दीपासारखीं चकाकत होतीं; त्यांतलि कांहीं शिखरांवर तर नन्दिकेश्वराच्या जाण्यायेण्यामुळें, तेथील जागा घांसल्यांसारखी झाली होती. (३४) मेरुपर्वतावर गणपतीच्या भयामुळें त्रासून गेलेले गणपती-एवढाले मोठमोठे हत्ती होते, व गणपतीच्या सोंडेच्या तडाख्यांतून सुटलेलीं मोठ-मोठ्या डोंगराएवढालीं धिप्पाड झाडें होतीं. (३५) त्या मेरुपर्वतावर कार्तिक-स्वामीनें आपल्या शक्तीनें हजारोंहजार हरिणें मारिलीं, हजारोंहजार पक्षी मारिलें कार्तिकस्वामीच्या बसण्याचे उपयोगीं पडणारे तेथें हजारोंहजार हत्ती असून, कार्तिकस्वामीच्या पवित्र मोरासारखें तेथें हजारोंहजार मोर होते. (३६) पार्व-तीच्या पायांचा स्पर्श झाल्यामुळें पवित्र झालेलीं हजारों झाडें तेथें होतीं, तशींच चांगलीं चांगलीं व खाण्याचे उपयोगीं पडणारीं फळें येणारीं अनेक झाडें तेथें होतीं, पार्वतीच्या पावलांसारखीं सुंदर दिसणारीं झाडांचीं पानें तेथें पुष्कळ असून पार्वतीच्या मुखाप्रमाणें शोभिवंत दिसणारीं कमळें तेथें पुष्कळ होतीं. (३७) तेथें सुवर्णाच्या वेली अनेक होत्या. त्यांला टवटवीत फुलें येऊन त्या झाडावर चढ-लेल्या असल्यामुळें त्या शंकराच्या मस्तकावरील पिंगट रंगाच्या जटांसारख्या दिसत होत्या. (३८) तेथील कितीएक वेली तर फुलांनीं लवून गेल्या होत्या; त्या कल्पवृक्षास चिकटल्या असल्यामुळें पूर्वीं देवदारुवनांत शंकरावर आसक्त झालेल्या ऋषींच्या बायकांप्रमाणें दिसत होत्या. (३९) असो, अशा रीतीचें त्या देवाधिदेव श्रीशंकराचे मेरुपर्वताच्या मध्यभागीं असणारें कैलास नांवाचें नगर

ध्यस्थमपश्यंश्छांकरं पुरम् ॥३९॥ वृत्तम् ॥ पुरस्य पूर्वे पुरशासनस्य सुशोभनं गोपुरमद्वितीयम् ॥ तदाद्यमद्रींद्रसुतापतेस्तु विवेश देवैर्भगवानजश्च ॥४०॥ सहस्रसूर्यप्रतिमं महांतं सहस्रशः सर्वगुणैर्विभिन्नम् ॥ जगाम कैलासनिभं सुमेरुं हेमाद्रिकूटोपममद्भुतं च ॥४१॥ ततार नारीगजवाजिसंकुलं रथैरनेकैरमरारिसूदनः ॥ सुरेश्वरः पद्मजसन्निकाशैर्मुनीश्वरैर्वज्रधरो हरिश्च ॥४२॥ प्रविष्टा ददृशुः सर्वे पुरं बाह्यं सुरासुराः ॥ ददर्श भगवान्विष्णुरजश्च भगवान्हरिः ॥४३॥ अथ जांबूनदमयैर्भवनैर्मणिभूषितैः ॥ विमानैर्विविधाकारैः प्राकारैश्च समावृतम् ॥४४॥ दृष्ट्वा बाह्यं पुरं शंभोः स वज्री भगवानजः ॥ विष्णुना दितिजैः सार्धं प्रविवेश ततः पुरम् ॥४५॥ रम्यप्रासादसंबाधमट्टालकसमाकुलम् ॥ द्वितीयं देवदेवस्य चतुर्द्वारं सुशोभनम् ॥४६॥ मृदंगमुरजो-

---

देवांनीं पाहिलें. (४०) शिवाच्या नगराच्या पूर्वेकडील बाजूला अतिशय सुंदर अशी एक वेस होती. अशी वेस दुसरीकडे कोठेंही नव्हती. त्या शिवाच्या पहिल्या चौकांत सर्व देवांसहित परमेश्वर श्रीविष्णु आणि ब्रह्मदेव गेले. (४१) मेरुपर्वत हजार सूर्यांसारखा तेजस्वी दिसत होता, तो सर्व पर्वतांपेक्षां फारच उंच असून, त्याचे अंगीं सर्व प्रकारचा चांगुलपणा भरला होता. मेरुपर्वत तर एखाद्या सोन्याच्या मोठ्या थोरल्या ढिगासारखा दिसत होता. (४२) त्या पूर्वेकडील बाजूचे वेशीजवळ बायका, हत्ती, घोडे वगैरेंची गर्दी झालेली होती; तसेंच तेथें मोठमोठे असे पुष्कळ रथ उभे केलेले होते. ते सर्व पाहत पाहत दैत्यांचा नाश करणारा, इंद्र आपल्या हातांत वज्र घेऊन ब्रह्मदेवासह आणि विष्णूसहित पुढें नगरांत गेला. (४३) त्या वेशीच्या आंत गेल्यावर सर्व देवांनीं व दैत्यांनीं ते बाहेरील नगर पाहिलें, तसें श्रीविष्णु आणि जन्ममरण नसणाऱ्या ब्रह्मदेवानेंही पाहिलें. (४४) नगरांत जिकडे तिकडे सोन्याचींच घरें दिसत होतीं, व त्यांत जागोजाग रत्नें बसविलेलीं होतीं; अनेक प्रकारचीं विमानें असून मोठमोठे सुंदर वाडेही तेथें पुष्कळ होते. (४५) शंकराचें तें बाहेरील नगर पाहिल्यावर ब्रह्मदेव इंद्र व श्रीविष्णूसहित, इतर दैत्यवीरांस बरोबर घेऊन, त्याचे पुढील नगरांत ( चौकांत ) गेला. (४६) तेथें तर सुंदर सुंदर असे अनेक मोठे मोठे वाडे होते, तेथें मोठा बाजार असून प्रत्येक दुकानापुढें चांगले मजबूत बांधलेले ओटे होते. तो महादेवाच्या वाड्याचा दुसरा चौक होय, त्याला चार दारें होतीं.(४७) तेथें जिकडे तिकडे मृदंग, आणि मुरजा नांवाचें एक प्रकारचें सुस्वर वाद्य आहे, त्याचा

द्दष्टं वीणावेण्वादिनादितम् ॥ नृत्यद्भिरप्सरस्संघैर्भूतसंघैश्च शोभितम् ॥४७॥ तत्तु सर्वेश्वरपुरं सर्वभूतेश्वरालयम् ॥ दुर्दर्शं बलदृप्तानां दैत्यदानवरक्षसाम् ॥४८॥ निर्यूहाखिलकूटं च प्रतोलीशतमण्डितम् ॥ तप्तजांबूनदमयप्रांशुप्राकारतोरणम् ॥४९॥ नानारत्नविचित्राभिर्निर्मिताभिर्गणेश्वरैः ॥ महाभवनकोटीभिरनेकाभिर्विभूषितम् ॥५०॥ सर्वेश्वरगणाकीर्णं विमानशतमंडितम् ॥ महाविभवसंपूर्णं महादेवस्य धीमतः ॥५१॥ पुरी सा विमलादित्या देवदेवेन निर्मिता ॥ त्रैलोक्यसारमुद्धृत्य यथा देवी तिलोत्तमा ॥५२॥ महावीरसमाकीर्णा नित्यं प्रमुदि-

---

नाद ऐकूं येत होता. तसाच वीणा, वेणु वगैरे वाद्यांचा मंजुळ ध्वनिही ऐकूं येत होता, जिकडे तिकडे देवांगना नाचत होत्या, त्यांच्या बरोबर भूतांचे समुदायही नाचत होते. त्यामुळें तें नगर अतिशय सुंदर दिसत होतें. (४८) तेंच परमेश्वर श्रीशिवाचें नगर होय. तेथेंच श्रीशिवाचें राहण्याचें मुख्य स्थान आहे; तें स्थान आपल्या शक्तीनें उन्मत्त झालेल्या दैत्यांला, दानवांला आणि राक्षसांस कधीं पहावयास देखील, मिळणार नाहीं. तेथें दर्शनास जाणें झालें तर भक्तलोकांनीं नम्रपणानेंच गेलें पाहिजे. (४९) त्या नगराच्या प्रत्येक बुरजांतून जाण्या येण्याचे रस्ते होते, मुख्य मुख्य रस्त्याच्या बाजूनें तेथें शेंकडो ठिकाणीं पायरस्ते केले होते. तापविलेल्या सोन्याचा त्या नगरास मोठा थोरला तट असून त्यास जागोजाग वेशी होत्या. (५०) गणेश्वरांनीं आपणांस राहण्याकरितां सुंदर सुंदर अशीं कोट्यावधि घरें तयार केलीं होतीं. त्यांच्या भिंतींस अनेक प्रकारचीं चित्रविचित्र रत्नें जडविलेलीं असल्यामुळें, तीं शोभत होतीं.(५१)त्या नगरांत परमेश्वराचे गणेश्वर राहत होते, त्यामुळें तें नगर गजबजलेलें दिसत होतें; तेथें शेंकडों हजारों विमानें ठेविलेलीं असल्यामुळें तें फार शोभत होतें, सारांश त्या बुद्धिमान् महादेवाचें तें नगर ऐश्वर्यानें पूर्णपणें भरलेलें होतें; कोणत्याही गोष्टीची तेथें कमतरता नव्हती. (५२) ती नगरी दोन प्रहरच्या वेळच्या सूर्यासारखी तेजःपुंज दिसत होती, जशी सर्व त्रैलोक्यांतील चांगल्या चांगल्या वस्तूंचें सार घेऊन ब्रह्मदेवानें तिलोत्तमा नांवाची अप्सरा उत्पन्न केली; तशीच ही नगरी शिवांनीं मुद्दाम आपल्या करितांच ह्मणून शानदार तयार केली होती. (५३) त्या नगरींत मोठमोठे पराक्रमी लोक पुष्कळ होते, तेथें सर्व लोक नेहमीं आनंदानें असत, दुःख तर तेथें कोणास माहितच नव्हतें. त्या नगरीच्या आसपास शिवाचे दर्श-

ता शिवा ॥ त्रिदशानां महायानैरुपस्थानगतैस्सदा ॥५३॥ शोभिता पुष्पमाल्यैश्च पताकाध्वजमालिनी ॥ महायक्षैर्महानागैर्महागंधर्वसाधुभिः ॥५४॥ महाप्सरोगणैश्चान्यैर्महामुनिगणैस्तथा ॥ उपस्थानगतैः सिद्धैराकीर्णविविधाश्रया ॥५५॥ विश्वेश्वरपुरी रम्या समृद्धा गणपुंगवैः ॥ मध्ये मार्गे महेशस्य तस्याः प्रासादसंकुलम् ॥५६॥ गणेश्वरांगनाजुष्टं रत्नतोरणभूषितम् ॥ रत्नसोपानसंबाधं कल्पद्रुमविराजितम् ॥५७॥ राजितं रत्नचित्राभिर्ध्वजमालाभिरुच्छ्रितैः ॥ सितैः सितासितैः पुष्पैरंजितं कांचनप्रभैः ॥५८॥ पंचवर्णैः सुमृदुभिः पद्मैर्नाभ्यंबुजोपमैः ॥ आकीर्णं तु दिवःपृष्ठस्ताराभिरिव सर्वतः ॥५९॥ वृत्तम् ॥ आश्रित्य मार्गं सुरसिद्धसंघैः सुमार्गदश्चैव मुनीश्वराणाम् ॥ मुनीश्वरैः पद्मजस-

---

नासाठीं आलेल्या देवांचीं विमानें नेहमीं उभीं असत. (५४) त्या नगरीस शोभा येण्यासाठीं जागोजाग फुलांच्या माळा आडव्या बांधिलेल्या होत्या, व जागोजाग पताका आणि ध्वज उभे केले होते. त्या नगरींत मोठमोठे यक्ष मोठमोठे नाग मोठमोठे गंधर्व, आणि साधु लोक रहात होते. (५५) त्या नगरींत मोठमोठ्या स्वरूपवान् अप्सरा राहत होत्या; तसेंच दुसरे मोठमोठे तपस्वी लोक तेथें राहत होते. त्या नगरीच्या जवळच सिद्धलोक राहत होते, सारांश, त्या नगरींत सर्व प्रकारचे लोक राहत होते, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. (५६) ती त्रैलोक्यपति शिवाची नगरी दिसण्यांत फार सुंदर होती, व तेथें मोठमोठे शिवगण रहात असल्यानें सर्व गोष्टींची तेथें अनुकूलता होती. त्या नगरीच्या मध्यभागीं परमेश्वराचा वाडा होता. त्याचे आजूबाजूंस असेच मोठमोठाले वाडे होते.(५७) त्या शिवमंदिरांत गणेश्वरांच्या पुष्कळ वायका होत्या, जागोजाग तेथें रत्नांचीं तोरणें बांधलेलीं होतीं. जागोजाग रत्नांच्या पायऱ्या होत्या व जागोजाग कल्पवृक्षाचीं झाडें असल्यामुळें तें शिवमंदिर शोभत होतें. (५८) तेथें जागोजाग मोठमोठे रुप्याचे ध्वज उभारलेले होते, त्यामुळें वाड्यास अलौकिक शोभा आली होती. जमिनीवर जागोजाग पांढरीं, काळीं, तांबडीं काळीं पांढरीं अशीं फुलें पसरलेलीं होतीं. (५९) नाभिकमलासारखीं सुशोभित दिसणारीं मऊ आणि पंचरंगी कमळें तेथें जागोजाग पसरलेलीं होतीं. त्यामुळें आकाशाच्या पृष्ठभागावर रात्रीच्या वेळीं चांदण्या चमकूं लागल्या, ह्मणजे जशी शोभा दिसते; तशी शोभा चोहोंकडे दिसूं लागली. (६०) मग ब्रह्मदेव पुढें झाला, आणि आपल्याबरोबर सिद्ध, मुनीश्वर, देव आणि दैत्य ह्यांस घेऊन शंकराचे मंदिरास जावयाच्या रस्त्यानें शिव-

त्रिकाशैः पितामहस्तु प्रजगाम देवः ॥६०॥ जनार्दनो देववरैः समृद्धैः सुरेश्वराद्यैरपि पूज्यमानः ॥ सुरेश्वरश्चापि तथा समृद्धः सहस्रनेत्रस्तु जगाम सर्वैः ॥६१॥ मार्गान्ते विपुला दिव्या सभा शक्रसभोपमा ॥ ब्राह्मी सभा यथा दिव्या वैष्णवी शांकरी सभा ॥६२॥ सा सभा सर्वसंपन्ना वज्रवैडूर्यतोरणा ॥ सुखावहा च देवानामृषीणां च महात्मनाम् ॥६३॥ प्रांशुतोरणनिर्यूहा हेमजालपरिष्कृता ॥ स्वर्णस्तंभसहस्रैस्तु सर्वरत्नमयैर्वृता ॥६४॥ रत्नचित्रा महाभोगा चित्रतोरणवेदिका ॥ परार्घ्यास्तरणोपेतैः प्रविन्यस्तैर्वरासनैः ॥६५॥ रत्नोपचितसंश्लिष्टचित्राघ्वनिकटस्थला ॥ मनोज्ञा सुखसंचारैर्वायुभिः किंचिदीरिता ॥६६॥ कृशानुज्वलनाकारैर्माल्यदामभिरर्चिता ॥ पारिजातकपुष्पाणामवलंबै-

---

मंदिराकडे चालला. ब्रह्मदेव हा मुनीश्वरांस सन्मार्ग दाखविणारा असून ते ऋषीश्वरही ब्रह्मदेवाच्या बरोबरीचे होते. (६१) इंद्रादिक मुख्य मुख्य देव देखील त्याची पूजा करितात तो श्रीविष्णु आपले बरोबर मोठमोठे ऐश्वर्यवान् देव घेऊन शिवाच्या मंदिरांत चालला; त्याचे बरोबर हजार नेत्र असणारा देवेंद्र देखील आपल्याबरोबर सर्व देवांचा समुदाय घेऊन शिवमंदिराकडे चालला. (६२) वाटेंतच एक मोठी सभा लागली ती मोठी आणि सुंदर अशी होती. ती शिवाचीच सभा होय. ती सभा जशी इंद्राची इंद्रसभा शोभावी, जशी ब्रह्मदेवाची ब्रह्मसभा शोभावी किंवा जशी श्रीविष्णूची विष्णुसभा शोभावी, तशी शोभत होती. (६३) ती सभा सर्वगुणसंपन्न होती, तिच्यांत कोणतीही उणीव नव्हती. त्या सभेंत वज्राचें आणि वैडूर्याचें तोरण बांधलेलें होतें. ती दृष्टीस पडतांच त्या मोठ्या मनाच्या देवांला आणि ऋषीश्वरांला मोठा संतोष वाटला. (६४) त्या सभेला बाजूस मोठमोठे बुरूज असून त्यांतून जाण्यायेण्याचे रस्ते होते. त्या सभेला शोभेकरितां सोन्याच्या जाळ्या बसविलेल्या होत्या, त्या सभेंत सोन्याचे हजार खांब असून त्यांवर अनेक प्रकारचीं रत्नें जडलेलीं होतीं. (६५) त्या सभेंत जागोजाग नानाप्रकारचीं रत्नें बसविलीं होतीं, तिचा मधील भाग लांब रुंद आणि भव्य होता, त्या सभेंत अनेक प्रकारचीं तोरणें आणि ओटे होते, त्या सभेंत चोहोंकडे मौल्यवान् वस्त्रांचीं छतें दिलीं होतीं. (६६) त्या सभेंतून जाण्यायेण्याच्या रस्त्याजवळ अनेक प्रकारचीं रत्नें जडलीं होतीं, त्यामुळें ती जागा विशेष शोभत होती. ती सभा फारच मनोहर असून तींत मंद सुगंध आणि शीतल असे वारे वहात होते. (६७) त्या सभेंत जागोजाग फुलांच्या माळा लोंबत सोडल्या होत्या

विभूषिता ॥६७॥ रुद्रैरुद्रसमैर्जुष्टा गणैश्चैव गणेश्वरैः ॥ विभूत्या परया युक्ता द्युतिमद्भिः समायुता ॥६८॥ शंकरस्य सभा रम्या शांकरी सर्वसंमता ॥ तत्रास्ते भगवान् रुद्रैरेकरुद्रो मुनीश्वरैः ॥६९॥ तं च दृष्ट्वा नमस्कृत्वा लकुलीशं जगद्गुरुम् ॥ सनारायणका देवाः सशक्रा ब्रह्मणा सह ॥ जग्मुरभ्यन्तरं तस्याः क्षणं तस्थुः समन्ततः ॥७०॥ शंकरांशभवो देवस्त्वेकरुद्रो महेश्वरः ॥ सुखासीनो नमस्कार्यः सर्वशास्त्रार्थतत्ववित् ॥ एवं दृष्ट्वा गमिष्यामो वयं धर्ममनुत्तमम् ॥७१॥ इति बुध्वा सुरास्सर्वे मुनयश्च महर्षयः ॥ अब्रुवंश्चेप्सितं सर्वं ब्रह्मणे हरये तथा ॥७२॥ तौ देवौ तानथालोक्य प्रवृत्तिज्ञानपारगान् ॥ अब्रूतां नाभिचारोऽस्ति युष्माकं प्रष्टुमीश्वरम् ॥७३॥ एष देवेश्वरः साक्षाद्विमुक्तिज्ञान-

---

त्या माळांतील दोरे सोन्याचे असल्यामुळें विस्तवाच्या ज्वालासारखे शोभत होते. पारिजातकांच्या फुलांचे घोंस जागोजाग लोंबत सोडले असल्यामुळें सभेस विशेष शोभा आली होती. (६८) त्या सभेंत अनेक रुद्रगण होते, ते प्रत्यक्ष रुद्राप्रमाणेंच पराक्रमी होते. ऐश्वर्यवान् आणि तेजस्वी असे शिवगण आणि गणेश्वरही होते. त्यामुळें सभेस विशेष शोभा आली होती. (६९) ती शंकराची सभा फार मनोहर होती. तिला शांकरीसभा ह्मणतात. ती सभा सर्वांस आवडण्यासारखी होती. तेथें परमेश्वर श्रीरुद्र सर्व मुनीश्वरांसहित वसला होता. (७०) त्या त्रैलोक्यपति लकुलेश श्रीशिवास पाहतांच विष्णु इंद्र वगैरे मुख्य मुख्य देवांनीं आणि इतर सर्व देवांनीं नमस्कार केला, व सर्वजण त्या सभेजवळ जाऊन शांतपणानें क्षणभर उभे राहिले. (७१) आणि परस्परांत विचार करूं लागले कीं, हा परमेश्वर शंकराच्या अंशापासून उत्पन्न झाला आहे. हा परमात्माच एकरुद्र आहे, ह्याला महेश्वर ह्मणतात, हा येथें सुखानें वसला आहे, ह्यास आतां आपण नमस्कार करावा; ह्याला सर्व शास्त्रार्थांची आणि तत्वांची माहिती आहे, ह्याचें दर्शन घेऊन ह्यापासून आपण अनायासानें सर्व धर्म समजून घेऊं. (७२) असा विचार करून सर्व देवांनीं, मुनीश्वरांनीं आणि महर्षींनीं आपापल्या मनांत जे विचार होते, ते सर्व ब्रह्मदेवास आणिं विष्णूस सांगितले. (७३) त्या सर्व देवांचें ह्मणणें ऐकून घेऊन व त्या सर्व देवांकडे पाहून ब्रह्मदेव आणि विष्णु ह्मणाले, तुह्मांला काय विचारावयाचें असेल तें श्रीशिवास खुशाल विचारा तुह्मांला शंकरास विचारण्यास कांहीं हरकत नाहीं. (७४) हा देवाधिदेव प्रत्यक्ष मोक्षज्ञानांत

पारगः ॥ शिवज्ञानरतो नित्यं दक्षिणावदनः प्रभुः ॥ नमस्कार्यस्तथा ध्येयश्चात्मभिर्नान्यथा विभुः ॥७४॥ एवमुक्त्वा स्वयं ब्रह्मा देवैः सार्धं मुनीश्वरैः ॥ प्रदक्षिणं मुने चक्रे सभां तां शांकरीं तदा ॥७५॥ पुनर्जग्मुर्नमस्कृत्वा ब्रह्मणा चाग्रतः शिवम् ॥ तेन मार्गेण महता महादेवस्य-धीमतः ॥७६॥ दृष्ट्वा सुरासुरांश्चैव सिद्धचारणपन्नगान् ॥ ध्वस्तवीर्यां-स्तथालोच्य किमित्यूचुर्गणेश्वराः ॥७७॥ किमिदं किमिदं देवास्त्वा-यान्ति गणकिंकराः ॥ दग्धास्त्रवस्त्रनिचया ह्यभवन् केन हेतुना ॥७८॥ निशम्य वचनं तेषां सेंद्रास्त्वालोक्य तान् द्विज ॥ न किंचिदब्रुवन् देवाः शुभं वा यदि वेतरम् ॥७९॥ एवमुक्तास्तदा पौरैस्तृतीयं पारमे-श्वरम्॥विविशुर्म्लानवदना देवाः शक्रपुरोगमाः॥८०॥चतुर्थं पंचमं चैव षष्ठं वै सप्तमं तथा ॥अष्टमं नवमं चैव दशमं च पुरोत्तमम्॥८१॥ अती-

---

पारंगत आहे, हा नेहमीं शिवज्ञानांत निमग्न असतो, हा परमेश्वर दक्षिणामुख आहे. व आत्मतत्त्ववेत्ते लोक त्याला नमस्कार करतात व त्याचें ध्यान करतात. ह्मणूनच त्याला विभु ह्मणतात(७५)असें बोलून स्वतः ब्रह्मदेवानें सर्व मुनीश्वरांसहित त्या शंकरसभेला अगोदर प्रदक्षिणा केली. (७६) प्रदक्षिणा केल्यावर पुनः ब्रह्म-देवानें नमस्कार केला, आणि मग सभेंतील मार्गानें त्या सर्व देवांसहित तो त्या बुद्धि-मान् शिवाच्या समोर गेला. (७७) ते देव, दैत्य, सिद्ध, चारण आणि पन्नग शिवसभेंत आल्यावर ते सर्व अगदीं निस्सत्व झाले आहेत असें पाहून, अशी ह्या सर्वजणांची दुर्दशा कां झाली ह्याचा गणेश्वर आपआपसांत विचार करूं ला-गले; ते आपआपसांत ह्मणूं लागले (७८) हें काय आहे ? हें काय आहे ? हे देव येथें कां आले? ह्यांचीं हातांतील शस्त्रास्त्रें आणि त्यांच्या अंगावरील वस्त्रें जळून गेल्यासारखीं कशानें दिसतात? अशी ह्यांची दुर्दशा कशानें झाली? असें शिवगण आपआपसांत बोलूं लागले. (७९) सनत्कुमारा शिवगणांचें आपआ-पसांत चाललेलें बोलणें इंद्रादिक देवांनीं सर्व ऐकिलें, परंतु ते त्यांस बरें किंवा वाईट कांहींएक बोलले नाहींत. (८०) नगरवासी लोकांस शिवमंदिरांस जा-ण्याचा मार्ग कोणता, असें देवांनीं विचारल्यानंतर, त्यांनीं देवांस अमुक मार्ग आहे असें सांगितल्यावर, ते इंद्रादिक मुख्य मुख्य देव लहान तोंडें करून शि-वाच्या तिसऱ्या दारांत गेले. (८१) मग क्रमाक्रमानें चवथें, पांचवें, सहावें, सा-तवें, आठवें, नववें आणि दहावें अशीं दारें ओलांडीत (८२) सर्व देव मोठ्या

त्यासाद्य देवस्य पुरं शंभोः सुशोभनम् ॥ सुवृत्तं सर्वतः शुद्धं थिविशुस्ते प्रयत्नतः ॥८२॥ सूर्यमण्डलसंकाशैर्विमानैश्च विभूषितम् ॥ स्फाटिकैर्मंटपैः शुभ्रैर्जांबूनदमयैस्तथा ॥ ८३ ॥ नानारत्नमयैश्चैव नानाभूषणभूषितैः ॥ मुने वै सर्वतोभद्रैः सर्वरत्नमयैः शुभैः ॥८४॥ सर्वकालफलोपेतैः सर्वर्तुकुसुमोज्वलैः ॥ सर्वैः कल्पकसंकाशैर्नगैश्चैव विभूषितम् ॥८५॥ नंदनैर्विविधाकारैः पुष्पोद्यानैश्च शोभनैः ॥ तटाकैर्विविधाकारैर्दीर्घिकाभिः सहस्रशः ॥ मयूरैश्चैव कारण्डैर्मुने वै चक्रकाव्हयैः ॥८६॥ नदीभिश्च समाकीर्णं पुरं दृष्ट्वा सुरासुराः॥ तस्थुर्विनयमापन्नाः सनारायणका मुने ॥८७॥ तत्रैव ददृशुर्देवा गणानां वृंदमुत्तमम् ॥ भूतानां चैव रुद्राणां मुनीनां मुनिसत्तम ॥८८॥ अथ तेषां तदा प्रान्ते विमानानि सहस्रशः ॥ ददृशुर्देवदेवस्य हैमानि वि-

---

प्रयासानें शंकराच्या मुख्य नगरास जाऊन पोंचले. तें नगर फारच सुशोभित होतें, त्याची आकृति वाटोळी असून तें चोंहोंकडे स्वच्छ होतें. (८३) त्या शिवनगरांत सूर्यमंडलासारखीं लखलखीत विमानें असल्यामुळें तें नगर फार शोभिवंत दिसत होतें. कोठें कोठें त्या नगरांत स्फटिक मण्यांचे पांढरे शुभ्र मंडप होते, व कोठें कोठें सोन्याचे मंडप होते. (८४) सनत्कुमारा, त्या नगरांत ठिकठिकाणीं सर्वतोभद्रें काढलेलीं होतीं, त्यांमध्यें अनेक प्रकारचीं मौल्यवान् रत्नें बसविलेलीं होतीं, त्यांवर अनेक प्रकारचे अलंकार घातलेले असून तीं सर्व रत्नांचींच केलीं आहेत असें वाटे.(८५) त्या नगरांतील झाडांस सर्व ऋतूंत फळें येत होतीं. अमुक ऋतूंत अमुक झाडांसच फळें यावयाचीं असा नियम मुळींच नव्हता. तेथील वेलींस सहाही ऋतूंत फुलें येत असून, तेथील झाडें कल्पवृक्षांसारखीं दिसत होतीं.(८६)त्या नगरांत नंदनवनाप्रमाणें जागोजाग उपवनें होतीं. तीं अनेक प्रकारचीं सुशोभित होतीं तेथें मजबूत आणि सुंदर वांधलेले तलाव पुष्कळ असून, सुंदर सुंदर विहिरीही पुष्कळ होत्या. त्यांत मोर, हंस, चक्रवाक, वगैरे पक्षी सुखानें क्रीडा करीत होते. (८७) हे सनत्कुमारा, त्या नगरांत नद्याही पुष्कळ होत्या. असो. तें नगर दृष्टीस पडतांच विष्णु वगैरे तेहतीस कोटि देव नम्रपणानें तेथें उभे राहिले. (८८) हे मुनीश्वरा सनत्कुमारा, तेथें सर्व देवांनीं शिवगणांचा समुदाय पाहिला, भूतांचा समुदाय पाहिला, रुद्रांचा समुदाय पाहिला, आणि मुनीश्वरांचा समुदाय पाहिला. (८९) त्या नगराच्या बाजूला देवाधिदेव श्रीशिवाचीं हजारो हजार सातमजलीं

विधानि च ॥८९॥ तेषां शृंगेषु दृष्टाश्च नार्यः कमललोचनाः ॥ विशा-
लजघना यक्षगन्धर्वाप्सरसस्तथा ॥९०॥ किन्नर्यः किन्नराणां च भुजं-
गयः सिद्धकन्यकाः ॥ नानावेषधराश्चान्या नानाभूषणभूषिताः ॥९१॥
नानाप्रभावसंयुक्ता नानाभोगरतिप्रियाः ॥ नीलोत्पलदलप्रख्याः पद्मप
त्रायतेक्षणाः ॥ भूषिता भूषणैर्दिव्यैः सुंदर्यो मण्डनप्रियाः ॥९२॥ वाप्यो
वैडूर्यसोपानाः फुल्लांबुरुहसंकुलाः ॥ दृष्टाश्चामृतसंपूर्णा हंसकारण्ड-
सेविताः ॥९३॥ नारीकुलसमाकीर्णा नानापक्षिगणैर्वृताः ॥ जलक्रीडा
रताभिश्च जलक्रीडारतैस्तथा ॥ समृद्धा हेमसंयुक्तैः सोपानैश्च विभू-
षिताः ॥९४॥ जलक्रीडारताभिश्च नारीभिर्देवपुंगवाः ॥ वापीमध्यगता-
भिश्च सावज्ञं प्रेक्षितास्तदा॥गणेश्वरैः सदारैश्च जलक्रीडारतैस्तथा॥९५॥

---

घरें त्या देवांनीं पाहिलीं, तीं सोन्याचीं असून अनेक आकारांचीं होतीं. (९०) त्यांच्या शिखरावर ( गच्यांवर ) तरुण स्त्रिया उभ्या असलेल्या देवांनीं पाहिल्या, त्यांचे कमळासारखे डोळे होते, त्यांचीं ढुंगणें मोटीं असून, त्या सर्व गंधर्वस्त्रिया, यक्षांच्या स्त्रिया, आणि अप्सरा होत्या. (९१) किन्नरांच्या तरुण मुली किन्नरी, नागांच्या मुली ( नागकन्या ), सिद्धकन्या, व अनेक प्रकारचे वेष घेतलेल्या दुसऱ्या बायका आपापल्या अंगावर अनेक प्रकारचे अलंकार घालून तेथें उभ्या होत्या. (९२) त्यांच्या अंगीं अलौकिक प्रकारची शक्ति होती; त्यांस अनेक प्रकारचे विषयोपभोग आणि रतिसुख घेण्याची मोठी हौस होती; निळ्या कमळांच्या पानांसारखी त्यांची अंगकांति होती; व कमलांच्या पानांसारखे त्यांचे डोळे मोठमोठे होते. अशा उत्तमोत्तम स्त्रिया आवडीनें अंगावर दागिने घालून त्या अलंकारांनीं शोभत होत्या. (९३) तेथें विहिरी पुष्कळ होत्या, त्या विहिरींस वैडूर्यमण्यांच्या पायऱ्या होत्या; व त्यांत टवटवीत कमळें इतकीं होतीं कीं, पाणी मुळींच दिसत नव्हतें. त्या विहिरी पाहतांच मनाला सुख होई. त्या विहिरींत अमृतासारखें गोड पाणी होतें, व त्या पाण्यांतील कमलांवर हंस कारण्डव वगैरे पक्षी नेहमीं बसलेले असत. (९४) त्या विहिरींवर पुष्कळ सुंदर सुंदर तरुण बायका होत्या, व पुष्कळ चमत्कारिक चमत्कारिक जातींचे पक्षी होते. कोणी बायका विहिरींतील पाण्यांत पुरुषांसह जलक्रीडा करीत होत्या. व कोणी पोहण्याची तयारी करीत होत्या. त्या विहिरीस आंत उतरण्याकरितां सोन्याच्या पायऱ्या केल्या असल्यामुळें, फार शोभा आली होती. (९५) तेथील तरुण तरुण बायका त्या विहिरींत सुखानें पोहत होत्या, तसेंच शिवगणही आपा-

वृत्तम् ॥ दृष्ट्वाथ तस्थुः पुरमध्यतस्ते पुरारिणः पुण्यमनंतशृंगम् ॥ विमानमध्यं शतशृंगकल्पं गुहस्य देव्याश्च विनायकस्य ॥९६॥

नंदिकेश्वर उवाच ॥ अथ तस्य विमानस्य द्वारि संस्थं गणेश्वरम् ॥ नंदिनं ददृशुः सर्वे देवा दैत्याश्च शूलिनम् ॥९७॥ प्रणेमुर्दूरतो देवं देवदेवस्य वल्लभम् ॥ नंदिनं प्रातरुत्थाय दृष्ट्वा भानुमिव द्विजाः ॥९८॥ ऊचुश्चान्योन्यमनघाः प्रीतिकण्टाकितत्वचः ॥ एष देवो गणाध्यक्षः स्वयं रुद्रो विचारतः ॥ दृष्टोऽस्माभिः स्वयं चाग्रे नंदी दिनकरप्रभः ॥९९॥ इत्थं संचिंत्य हृदि ते संप्राप्यादित्यवर्चसम् ॥ प्रणेमुर्नंदिनः पादौ बहुमानेन सादरम् ॥१००॥ आलोक्य गणपः प्राह नेत्रैः फुल्लांबुजप्रभैः ॥ देवांश्चछतक्रतुमुखान् सयक्षोरगराक्षसान् ॥१०१॥ किमर्थं वै महाभागा

---

पल्या बायकांसहित सुखानें विहिरींत पोहत होते. त्यांनीं त्या आलेल्या सर्व देवांकडे तिरस्कारानें पाहिलें. असो. (९६) मग ते देव त्या नगराच्या मध्यभागीं उभे राहिले, आणि तेथून त्या सर्वांनीं तें शिवनगर पाहिलें. तें फारच पवित्र असून त्यांत जिकडे तिकडे हजारों शिखरें दिसत होतीं. त्या शिखरांसारख्या शंभर शिखरांइतकी ज्यांची उंची होती अशीं तेथें कार्तिकेयाचें, पार्वतीचें आणि गणपतीचें अशीं मंदिरें होतीं.

(९७) नंदिकेश्वर ह्मणाला:—मग सर्व देवांनीं आणि दैत्यांनीं श्रीशिवाचें मंदिर पाहिलें, त्या मंदिरापुढें नंदी उभा होता, त्या नंदीनें आपल्या हातांत शूल घेतला होता. (९८) तो नंदी श्रीशिवाच्या फारच प्रीतींतला होता. सर्व लोक सकाळच्या प्रहरीं सूर्याला जसे नमस्कार करितात, तसे सर्व देव दैत्यांनीं नंदीला लांबून पाहिल्यावरोवरच नमस्कार केले. (९९) आणि ते सर्वजण आपआपसांत बोलूं लागले, त्यांच्या अंगावर रोमांच आले; ते ह्मणाले हा देव सर्व गणांचा अध्यक्ष आहे, नीट विचार करून पाहिलें तर हा प्रत्यक्ष रुद्रच आहे. हा नंदी सूर्यासारखा तेजस्वी दिसणारा आमच्या सुदैवानें आमच्यापुढें उभा आहे.(१००) असा मनांत विचार करून ते सर्व देव त्या सूर्यासारख्या तेजस्वी दिसणाऱ्या नंदिकेश्वराजवळ गेले, आणि सर्वांनीं त्याच्या पायावर भक्तिभावानें आदरपूर्वक आपलीं डोकीं टेविलीं. (१०१) नंदिकेश्वरानेंही मग विकासलेल्या कमलाप्रमाणें शोभणाऱ्या आपल्या नेत्रांनीं कृपाळूपणानें इंद्रादिक मुख्य मुख्य देवांकडे यक्षांकडे, नागांकडे आणि राक्षसांकडे पाहिलें. (१०२) आणि नंदिकेश्वर त्या सर्वांस ह्मणाला--हे भाग्यशाली देवदैत्यहो, तुह्मी सर्वजण असें उदासीन कां दि-

भीता उद्विग्नचेतसः ॥ दिव्याष्टगुणमैश्वर्यं भवतां संप्रकल्पितम् ॥ केन व्यावर्तितैश्वर्या यूयं शक्रपुरोगमाः ॥१०२॥ त्रैलोक्यस्येश्वरा यूयं सर्वे वै विगतज्वराः ॥ सनारायणका देवाः सेंद्राः सवरुणोरगाः॥१०३॥ तत्किमर्थं भयोद्विग्ना मृगाः सिंहार्दिता इव ॥ किं दुःखं किं नु संतापः कुतो वा भयमागतम्॥ एतत्सर्वं यथान्यायं शीघ्रमाख्यातुमर्हथ ॥१०४॥ श्रुत्वा वाक्यं गणेशस्य ततस्तस्य महात्मनः ॥ ऊचुस्ते ऋषिभिः सार्धं सनारायणकाः सुराः ॥१०५॥

देवा ऊचुः ॥ सुरासुरैर्मथ्यमाने पयोराशौ गणेश्वर ॥ भुजंगभृंगसंकाशं नीलजीमूतसन्निभम् ॥ प्रादुर्भूतं विषं घोरं संवर्ताग्निसमप्रभम् ॥१०६॥ विषेणोत्तिष्ठमानेन कालानलसमत्विषा ॥ निर्दग्धो रक्तगौरांगो विष्णुः कृष्णत्वमागतः ॥१०७॥ तं दृष्ट्वा रक्तगौरांगं कृतं कृष्णं जनार्दनम् ॥ ततः सर्वे वयं भीताः शंकरं शरणं गताः ॥१०८॥ इंद्रस्य भ-

---

सतां? तुह्मांला अष्टमहासिद्धि अनुकूल असतां, हे इंद्रादिक देवहो, तुमचें तें ऐश्वर्य कोणी हिसकावून घेतलें? (१०३) हे विष्णु वगैरे प्रमुख प्रमुख देवहो, हे इंद्रादिक देवहो, हे वरुणादिक देवहो, हे नागहो, तुह्मी सर्व त्रैलोक्याचे अधिपति आहां, तुह्मांला कोणापासूनही भय वाळगावयाचें कारण नाहीं. (१०४) असें असतां सिंहाला पाहतांच हरिणांनीं घाबरावें तसें तुह्मीं इतकें घाबरलां कां? असें तुह्मांस काय दुःख झालें! असें तुमच्यावर कोणतें संकट आलें? तुह्मांला कोणापासून पीडा होते हें मला सर्व सविस्तर रीतीनें लवकर सांगा. (१०५) असें त्या मोठ्या मनाच्या नंदिकेश्वराचें बोलणें ऐकतांच ते ऋषीश्वरांसहित श्रीविष्णु वगैरे मुख्यमुख्य देव त्या नंदीस ह्मणाले.

(१०६) देव ह्मणाले—गणेश्वरा, नंदिकेश्वरा, क्षीरसमुद्रांतून अमृत काढण्याकरितां आह्मी सर्व देवांनीं व दैत्यांनीं क्षीरसमुद्र घुसळला. त्यांतून अद्याप अमृत न निघतां कालकूट नांवाचें विष निघालें. तें काळ्याकाळ्या भोर सापासारखें किंवा भुंग्यासारखें, किंवा काळ्या काळ्याभोर ढगासारखें दिसत आहे. तें विष फार जहाल असून तें आह्मांस प्रलयाग्नीसारखें वाटत आहे. (१०७) तें कालकूट विष प्रत्यक्ष प्रळयकाळासारखें वर निघालें; त्याच्या उष्णतेनें हा श्रीविष्णु कसा पूर्वीं गोरा गोरा पान असतां काळा ठिक्कर पडला आहे, पहा! (१०८) हा परमात्मा श्रीविष्णु इतका सुस्वरूप असतां त्याची अशी स्थिति झालेली पाहतांच आह्मी सर्वजण अगदीं भिऊन जाऊन शंकरास शरण आलों. (१०९) परमेश्वरा,

गवन्वर्णं तप्तचामीकरप्रभम् ॥ कृष्णत्वमागतं पश्य दग्धं तेन विषाग्निना ॥१०९॥ दैत्यानां च विषेणैव शैलादे वर्णमुत्तमम् ॥ विवर्णत्वं गतं पश्य द्विजानां च द्विजेश्वर ॥११०॥ पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ॥ दग्धास्त्रवस्त्रकवचान्मुनीन् मुनिगणार्चित ॥१११॥ देवाश्च दैत्यौ नष्टाश्च किंनराः सिद्धचारणाः ॥ कालकूटेन संदग्धाः पाहि नान्या गतिर्हि नः ॥११२॥ निशम्य तेषां तद्वाक्यं भगवान्नंदिकेश्वरः ॥ प्राह गंभीरया वाचा किंचित् प्रहसिताननः ॥११३॥

नंदिकेश्वर उवाच ॥ शृण्वन्तु देवताः सर्वा ऋषयश्च तपोधनाः ॥ यत्तदग्रे समुत्पन्नं मथ्यमाने महोदधौ ॥विषं कालानलप्रख्यं कालकूटमिति स्मृतम् ॥११४॥ येन प्रोद्भूतमात्रेण न व्यराजंत देवताः ॥ येन विष्णुः स्वयं दग्धो वज्रपाणिः सुरेश्वरः ॥ न शक्नुवंति वै सोढुं वेग-

---

ह्या इंद्राचें स्वरूप पूर्वी कसें तापविलेल्या सोन्यासारखें होतें; परंतु, त्या कालकूट विषाच्या तापानें तें कसें काळें झालें आहे पहा! (११०) शिलादपुत्रा नंदिकेश्वरा, हे सर्व दैत्य पहा पूर्वी कसे सतेज दिसत होते; परंतु आतां त्या विषाच्या तापानें भाजून गेल्यामुळें हे कसे कलाहीन दिसत आहेत ते? हे ब्राह्मणश्रेष्ठा, ह्या सर्व ऋषीश्वरांचीही विषाचे उष्णतेनें अशीच दुर्दशा झाली आहे पहा! (१११) हे नंदिकेश्वरा, सर्व मुनीश्वर तुला मनोभावानें नमस्कार करितात, तूं ह्या सूर्याकडे पहा, वसूंकडे पहा, ह्या रुद्रांकडे पहा, ह्या अश्विनीकुमारांकडे पहा, ह्या इतर देवांकडे आणि मुनीश्वरांकडे पहा; ह्यांच्या हातांतील शस्त्रास्त्रें ह्यांच्या अंगावरील वस्त्रें आणि कवचें कशीं भाजून गेलीं आहेत पहा! (११२) हे देव आणि दैत्य कालकूट विषाच्या उष्णतेनें भाजून गेले, तसेच हे किन्नर, सिद्ध, आणि चारण देखील होरपळून गेले आहेत; ह्या आह्मां सर्वांचें तूं रक्षण कर. ह्या संकटांत तुझ्याखेरीज दुसरा कोणी आमचें रक्षण करण्यास समर्थ नाहीं. (११३) असें त्या सर्व देवांचें बोलणें ऐकून परमेश्वर नंदिकेश्वर त्या सर्वांकडे कृपादृष्टीनें पाहून हंसत हंसत ह्मणाला.

(११४) नंदिकेश्वर ह्मणाला—हे देवहो, हे ऋषीश्वरहो, हे तपस्वीलोकहो, माझें बोलणें ऐका, तुह्मी समुद्रमंथन करीत असतां तुमच्यासमक्ष समुद्रांतून जें कांहीं वर निघालें ह्मणतां तें प्रळयकाळाच्या अग्नीसारखें फार जहाल आहे, त्याला कालकूट असें ह्मणतात. (११५) तें विष उत्पन्न झाल्यावरोबरच त्याच्या उष्णतेनें ह्या सर्व देवांची अशी स्थिति होऊन ते निस्तेज दिसत आहेत. त्या

मन्यत्र शंकरात्॥११५॥ इत्युक्त्वा भगवान्नंदी शंभोः पार्श्वं जगाम सः॥ नियोगाच्च नटन् विष्णुर्भगवान् पुरुषोत्तमः ॥ अनुगश्च विरिंचश्च जगाम ह जगत्पतिम् ॥११६॥ संप्रेक्ष्य च पपौ दृष्ट्या सोमं नारायणः स्वयम् ॥ कृतांजलिपुटो भूत्वा ब्रह्मा च मुनयस्तथा ॥११७॥ अथ नंदी जगामाशु पार्श्वं तस्य पिनाकिनः ॥ भानुमानिव नेत्राब्जं तदाभासावबोधयन् ॥११८॥ प्रणेमतुस्तौ देवेशौ नंदिना च प्रदर्शितौ ॥ देवदेवं महादेवं प्रसन्नवदनं प्रभुम् ॥ प्रणेमुर्दर्शितास्तेन नारायणमुखाश्च तम् ॥११९॥ सनारायणकैर्देवैर्भगवान्पद्मसंभवः ॥ प्रहृष्टवदनो भूत्वा देवं तुष्टाव शंकरम् ॥१२०॥

ब्रह्मोवाच ॥ प्रसीद देवदेवेश प्रसीद परमेश्वर ॥ प्रसीद जगतां नाथ प्रसीदानंददाव्यय ॥१२१॥ सहस्रशिरसे तुभ्यं सहस्राक्षाय ते

---

विषाच्या उष्णतेनें हा श्रीविष्णु स्वतः भाजून गेला; आणि हातांत वज्र घेणाऱ्या ह्या देवेंद्राची अशीच दुर्दशा झाली आहे. एका श्रीशिवाखेरीज कालकूट विषाचें निवारण करण्याची दुसऱ्या कोणत्याही देवाची शक्ति नाहीं. (११६) असें ह्मणून परमेश्वर नंदी श्रीशिवाच्या जवळ गेला. त्याच्या आज्ञेप्रमाणें परमेश्वर श्रीविष्णूही नंदिकेश्वरांचे मागोमाग गेला, त्याच्याबरोबर परमेश्वर ब्रह्मदेवही शिवाकडे गेला. (११७) श्रीविष्णूंनीं स्वतः दुरून पार्वतीस मांडीवर घेऊन बसलेल्या शिवास आपल्या डोळ्यांनीं पाहिलें; त्याबरोबर लागलाच त्यानें दोन्ही हात जोडून नमस्कार केला. तें पाहून ब्रह्मदेवानें आणि इतर मुनीश्वरांनींही परमेश्वरास दोन्ही हात जोडून नमस्कार केला. (११८) जसा सूर्य उगवला ह्मणजे तो सर्व प्राणिमात्रांच्या डोळ्याला दिव्य दृष्टि देतो, तसेंच नंदिकेश्वरानें सर्व देवांस श्रीशिवाचें दर्शन करून दिलें; व आपण लागलाच श्रीशिवाजवळ जाऊन उभा राहिला. (११९) ब्रह्मदेवास व श्रीविष्णूस नंदिकेश्वरानें शिवाचें दर्शन करून दिलें. त्या देवाधिदेव महादेवास हंसत मुख पाहतांच त्या दोघांनीं नमस्कार केले. (१२०) मग इंद्र, विष्णु, वगैरे सर्व मुख्य मुख्य देवांसहित ब्रह्मदेव श्रीशिवापुढें उभा राहून, देवाधिदेव श्रीशिवाची शांतपणानें स्तुति करूं लागला.

(१२१)ब्रह्मदेव ह्मणाला हे देवाधिदेवा, आह्मांवर कृपा कर. परमेश्वरा, तूं आह्मांस प्रसन्न हो. तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस, तूं आमच्यावर कृपा कर. तूं आनंदस्वरूप आहेस, तूं अविनाशी आहेस, तूं आह्मांवर कृपा कर. (१२२) हे परमेश्वरा, तुला हजार मस्तकें आहेत, तुला नमस्कार असो, तुला हजार डोळे आ-

नमः ॥ नमः सहस्रपादाय शर्वाय परमेष्ठिने ॥१२२॥ सदाशिवाय शांताय महेशाय पिनाकिने ॥ सर्वज्ञाय शरण्याय सद्योजाताय ते नमः ॥१२३॥ अघोराय नमस्तुभ्यं वामदेवाय ते नमः ॥ तत्पुरुषाय नमस्तुभ्यमीशानाय च ते नमः ॥१२४॥ अनन्तेशाय सूक्ष्माय चोत्तमाय नमो नमः ॥ एकाक्षाय नमस्तुभ्यमेकरुद्राय ते नमः ॥१२५॥ नमस्त्रिमूर्तये तुभ्यं श्रीकण्ठाय शिखंडिने ॥ अनंतासनसंस्थाय ह्यनंतायान्तकारिणे ॥१२६॥ विमलाय विशालाय वीतरागाय ते नमः ॥ योगपीठान्तरस्थाय योगिने योगदायिने ॥१२७॥ योगिनां हृदि संस्थाय योगगम्याय ते नमः ॥ पराय परमेशाय निर्गुणाय नमोऽस्तु ते ॥१२८॥ आत्मत्रयगरिष्ठाय त्रिगुणाय कपर्दिने ॥ मध्ये देहस्य मध्ये च मूले नाभौ

---

हेत, तुला नमस्कार असो, तुला हजार पाय आहेत, तुला नमस्कार असो, तुला शर्व, परमेष्ठी अशीं अनेक नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (१२३) तुला सदाशिव ह्मणतात, तूं शांत आहेस, तूं महेश्वर आहेस, तुझ्या हातांत अजगव धनुष्य आहे, तूं सर्वज्ञ आहेस, तूं शरणागतांचें रक्षण करणारा आहेस, तुला सद्योजात ह्मणतात, तुला नमस्कार असो. (१२४) तुला अघोर ह्मणतात, तुला नमस्कार असो, तूं वामदेव आहेस, तुला नमस्कार असो, तुला तत्पुरुष ह्मणतात, तुला नमस्कार असो, तुला ईशान असें ह्मणतात, तुला नमस्कार असो. (१२५) तूं अनंत नागाचा ईश्वर असून तूं सूक्ष्म आहेस, तूं उत्तम आहेस, तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो. तुला एकाक्ष ह्मणतात, तूंच एकरुद्र आहेस, तुला नमस्कार असो. (१२६) तूं सत्व, रजस्तमोगुणरूप आहेस, तुला श्रीकंठ ह्मणतात, तुला शिखंडी ह्मणतात. तूं शेषसर्पाचें आसन करून त्यावर बसतोस, तुझा अंत लागत नाहीं, तूं अंतकाचा अंतक आहेस, तुला नमस्कार असो. (१२७) तूं विमल ( निष्पाप ) आहेस, तुला विशाल ह्मणतात तूं फार निस्पृह आहेस, तुला नमस्कार असो. तूं योगपीठावर बसतोस, तूं योगी आहेस, तूं योगांचा दाता आहेस, (१२८) तूं योगीश्वरांच्या हृदयांत (मनांत) राहतोस, तूं योगांचे साधनानें समजून येण्यासारखा आहेस. तूं श्रेष्ठ आहेस, तूं परमेश्वर आहेस, तूं निर्गुण आहेस, त्या तुला नमस्कार असो. (१२९) तूं जीवात्मा, अंतरात्मा आणि परमात्मा ह्यापेक्षांही श्रेष्ठ आहेस, तूं त्रिगुणात्मक ( सत्वरजस्तमोगुणात्मक ) आहेस; तुझ्या मस्तकावर जटाजूट आहे. तूं देहांत राहतोस, तूं मू-

स्थिताय च ॥१२९॥ शिवाय शिवतत्वाय विद्यातत्वाय ते नमः ॥ आत्मतत्वाय निर्बीजबीजिने बीजयोनये ॥१३०॥ इति स्तवेन दिव्येन स्तुत्वा देवं पिनाकिनम् ॥ कृतांजलिपुटो भूत्वा ब्रह्मा प्रोवाच शंकरम् ॥१३१॥ प्रादुर्भूतं विषं घोरं युगान्ताग्निसमप्रभम् ॥ ग्रसते भगवान् लोकान्सर्वतः सचराचरान् ॥१३२॥ सर्वे सेंद्रास्तथा देवा दैत्याः सिद्धाश्च चारणाः ॥ दंदह्यमानास्तेनैव विषेण शरणं गताः ॥१३३॥ इत्युक्त्वा देवदेवेशं ब्रह्मा विश्वेश्वरं हरम् ॥ अतिष्ठत्पुरतस्तस्य कृतांजलिपुटो मुने ॥१३४॥ अथ तस्य वचः श्रुत्वा देवानालोक्य चेश्वरः ॥ सस्मार च विषं घोरं युगान्ताग्निसमप्रभम् ॥१३५॥ स्मृतं विषं कराग्रस्थमभवत्तत्क्षणाद्विभोः ॥ तदा रेजे करतलं सभृंगमिव वारिजम् ॥१३६॥ अथ दृष्ट्वा विनेदुस्ते तदाश्चर्यं सुरासुराः ॥ प्रणेमुश्च महादेवं

---

लस्थानीं राहतोस, तूं नाभिस्थानांत राहतोस, तुला नमस्कार असो. (१३०) तुला शिव ह्मणतात, तूं शिवतत्व आहेस, तूं विद्यातत्व आहेस तुला नमस्कार असो, तूं आत्मतत्व आहेस, तूं निर्बीजाचा बीज आहेस, तूं बीजाचा मूलपुरुष आहेस, तुला नमस्कार असो. (१३१) अशी ब्रह्मदेवानें दोन्ही हात जोडून उत्तम प्रकारच्या स्तोत्रांनीं मधुर शब्दानें अजगव धनुष्य धारण करणाऱ्या श्रीशिवाचीं स्तुति केली; आणि मग शंकरास ह्मटलें (१३२) परमेश्वरा, समुद्रमंथन करितांना त्यांतून जालीम विष बाहेर निघालें. तें फार तीव्र असून प्रळयकाळच्या अग्नीसारखें प्रखर आहे. हे परमेश्वरा, तें विष आतां ह्या सर्व स्थावरजंगम विश्वाचा संहार करीत आहे. (१३३) हे सर्व इंद्रादिक देव, हे सर्व दैत्य, हे सर्व सिद्ध, हे सर्व चारण त्या विषाच्या उष्णतेनें अगदीं होरपळून गेले आहेत; आणि त्या विषापासून आपला प्राण वांचवावा ह्मणून तुला शरण आले आहेत. (१३४) सनत्कुमारा, इतकें सांगून तो ब्रह्मदेव परमेश्वर देवाधिदेव श्रीशिवाच्या पुढें तसाच दोन्ही हात जोडून उभा राहिला. (१३५) मग श्रीशिवांनीं असें ब्रह्मदेवाचें बोलणें ऐकून दीनवदन करून बसलेल्या सर्व देवांकडे पाहिलें; आणि प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें प्रखर भासणाऱ्या त्या कालकूटाचें स्मरण केलें. (१३६) परमेश्वरांनीं त्या कालकूटाचें स्मरण केल्यावरोबर तें विष तत्काळ श्रीशिवाच्या तळहातांत आलें आणि तें विष हातांत घेतल्यामुळें एखाद्या कमलावर भुंगे बसले ह्मणजे कमळ जसें दिसावें तसा शंकराचा तो हात दिसूं लागला. (१३७) परमेश्वरांनीं विषाचें स्मरण करितांच, तें विष परमेश्वराचे हातांत आलें; असें पाह-

प्रीतिकण्टकितत्वचः ॥१३७॥ ननृतुर्मुनयः सर्वे दण्डहस्ता जटाधराः॥ देवदुंदुभयो नेदुः प्रशान्तमभवज्जगत् ॥१३८॥ वृत्तम् ॥ सुरासुराः सिद्धमहोरगाश्च मुनीश्वराश्चारणकिन्नराश्च ॥ गणेश्वरा भूतगणा महेशं प्रणेमुरुच्चैरभितुष्टुवुश्च ॥१३९॥ अथोवाच नमस्कृत्वा भगवान्पद्मसंभवः ॥ तत्पिबस्वेति सर्वज्ञं लोकानां हितकाम्यया ॥१४०॥ भगवान्ग्रस्य भोक्ता वै भवान् देववरप्रभुः ॥ त्वदृतेऽन्यो महादेव क्ष्वेडं सोढुं न विद्यते ॥१४१॥ एवं तस्य वचः श्रुत्वा ब्रह्मणः परमेष्ठिनः ॥ बाढमित्येव तद्वाक्यं प्रतिगृह्य घृणानिधिः ॥ पपौ यथामृतं शर्वः कालकूटं महाविषम् ॥१४२॥ एवं तद्ग्रसितं क्षिप्रं नीलनीरदसन्निभम् ॥ वचनाद्ब्रह्मणो घोरं जगतां हितकाम्यया ॥१४३॥ तं दृष्ट्वोत्पलपत्राभं कंठे कांचनसन्निभे ॥ तदोवाच नमस्कृत्वा ब्रह्मा लोकपितामहः ॥१४४॥

---

तांच देवांस आणि दैत्यांस मोठें आश्चर्य वाटलें. त्या आश्चर्यानें सर्वांनीं सिंहनाद केला, व सर्वांच्या अंगावर आनंदानें शहारे येऊन सर्वांनीं शिवास नमस्कार केला. (१३८) त्यावेळीं दंड हातांत घेतलेले आणि मस्तकावर जटांचीं ओझीं असणारे ऋषीश्वर आनंदानें नाचूं लागले. आकाशांत देवांनीं दुंदुभि वाजविला, व त्रैलोक्यांत जिकडे तिकडे शांतता झाली. (१३९) देव, दैत्य, सिद्ध, महानाग, मुनीश्वर, चारण, किन्नर, गणेश्वर, भूतगण वगैरे तेथें त्यावेळीं जितके जमले होते, त्या सर्वांनीं परमेश्वर श्रीशिवास नमस्कार केला; व सर्वांनीं शिवाची स्तुति केली. (१४०) मग परमेश्वर ब्रह्मदेव महादेवास मनोभावानें नमस्कार करून ह्मणाला, परमेश्वरा, तूं सर्वज्ञ आहेस, तुला मीं सांगावें असें नाहीं. सर्व लोकांचें कल्याण होण्यासाठीं तूं हें कालकूट पिऊन टाक. (१४१) परमेश्वरा, खाण्याच्या पदार्थांचा उपभोग घेणारा तूंच आहेस, तूं सर्व देवांचा अधिपति आहेस. महादेवा, तुझ्याखेरीज दुसरा कोणी हें जालीम विष पिऊन टाकण्यास समर्थ दिसत नाहीं. (१४२) असें ब्रह्मदेवाचें बोलणें ऐकून, बरें आहे, मी तसें करितों, असें ह्मणून शिवांनीं तें मान्य केलें; आणि जसें अमृत पिऊन टाकावें, तसें शिवांनीं तें जालीम विष एका क्षणांत पिऊन टाकिलें. (१४३) असो, ह्याप्रमाणें शिवांनीं ब्रह्मदेवाचें ह्मणणें मान्य करून तें अतिशय जालीम विष सर्व जगाचें कल्याणासाठीं पिऊन टाकिलें.(१४४)शंकराचा गळा पूर्वीं सोन्यासारखा दिसत होता; तोच कालकूट विष त्यांत जातांच निळ्या कमळांच्या पानासारखा निळा दिसूं लागला. तें पाहून त्रैलोक्याचा पितामह शिवास नमस्कार करून–

ब्रह्मोवाच ॥ शोभसे त्वं महादेव कण्ठेनानेन सांप्रतम् ॥ तृतीयेन यथापूर्वं नित्यं नेत्रेण शंकर ॥१४५॥ ललाटे तिलकं यद्वन्नेत्राख्यं विद्रुमप्रभम् ॥ कण्ठे च कालकूटाद्दै चासीद्भूषणमुत्तमम् ॥१४६॥ गले विराजितं देव कालकूटं तवानघ ॥ कंठिकायां यथा क्लृप्तमिंद्रनीलमिवामलम् ॥१४७॥ एवमुक्त्वा नमश्चक्रे दण्डवत् क्षितिमण्डले ॥ पितामहो महादेवं नीलकण्ठं त्रियंबकम् ॥१४८॥ भुजंगप्रयातवृत्तम् ॥ ततस्तं प्रणेमुः समंतात्सुरेशं सुरेंद्राग्निवित्तेशनारायणाद्याः ॥ स्तवैस्तुष्टुवुर्दैत्यमुख्याश्च मुख्यैः सुलब्धेप्सिताः सिद्धसाध्या मुनींद्राः ॥१४९॥

नंदिकेश्वर उवाच ॥ एतत्सर्वं मयाख्यातं विषसंहरणं परम् ॥ प्रसंगात्तव संक्षेपाच्चतुर्मुखसुतोत्तम ॥१५०॥ य इदं श्रुणुयात्पुण्यं विषसंहरणं परम् ॥ मुच्यते पातकैः सर्वैः शिवलोकं स गच्छति ॥१५१॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने कालकूटविषसंहरणं नामैकोनत्रिंशोऽध्यायः॥

---

(१४५) ब्रह्मदेव ह्मणाला—परमेश्वरा, श्रीशिवा, तुझ्या मस्तकावरील तिसऱ्या डोळ्यामुळें तूं जसा शोभतोस, तसा आतां ह्या विषामुळें तुझा कंठ निळा झाला आहे ह्मणून शोभतोस. (१४६) तुझ्या कपाळावर जसा पोंवळ्यासारखा लाल रंगाचा तिसरा डोळा तिलकाप्रमाणें शोभत आहे, तसा विषामुळें नीलवर्णाचा झालेला तुझा गळा शोभत आहे. हें विष तुला अलंकारासारखेंच दिसत आहे. (१४७) हे निर्दोष स्वभावाचे महादेवा, सोन्याचे कंठींत जसा इंद्रनीलमणि घातला ह्मणजे शोभतो, तसें तुझ्या गळ्यांत विष शोभत आहे. (१४८) इतकें ह्मणून ब्रह्मदेवानें नीलकंठ त्रियंबक महादेवापुढें जमिनीवर दंडवत् नमस्कार घातला. (१४९) नंतर महादेवापुढें इंद्र, अग्नि, कुबेर, श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देव, व दैत्य, सिद्ध, आणि साध्य ह्यांनीं नमस्कार घातले; आणि त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण झाल्यामुळें ते आनंदानें शिवाची स्तुति करूं लागले.

(१५०) नंदिकेश्वर ह्मणाला— ब्रह्मपुत्रा सनत्कुमारा, असें हें ओघाओघानें संक्षिप्त रीतीनें कालकूट विष पिऊन टाकून सर्व जगाचा त्रास चुकविल्याचें वर्णन असलेलें आख्यान मीं तुला सांगितलें. (१५१) शिवांनीं विषप्राशन केल्याचें हें चरित्र जो कोणी ऐकेल, तो सर्व पातकांतून मुक्त होऊन शिवलोकास जाईल.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठनागनाथनांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं कालकूट विष शांत केल्याचें वर्णन असलेला हा एकोणतिसावा अध्याय संपला.

## ॥ अथ त्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ लैंग्ये ॥ सनत्कुमार उवाच ॥ भवान्कथमनुप्राप्तो महादेवमुमापतिम् ॥ वक्तुमर्हसि शैलादे जितो मृत्युस्त्वया यथा ॥१॥

नंदिकेश्वर उवाच ॥ प्रजाकामः शिलादोऽभूत्पिता मम महामुने ॥ सोऽपीह सुचिरं कालं तपस्तेपे सुदुश्चरम् ॥२॥ तपतस्तस्य तपसा संतुष्टो वज्रधृक् प्रभुः ॥ शिलादमाह तुष्टोऽस्मि वरयस्व वरानिति ॥३॥ ततः प्रणम्य देवेशं सहस्राक्षं सहामरैः ॥ प्रोवाच मुनिशार्दूलः कृतांजलिपुटो हरिम् ॥४॥

शिलाद उवाच ॥ भगवन् देवतारिघ्न सहस्राक्ष वरप्रद ॥ अयोनिजं मृत्युहीनं पुत्रमिच्छामि सुव्रतम् ॥५॥

शक्र उवाच ॥ पुत्रं दास्यामि विप्रर्षे योनिजं मृत्युसंयुतम् ॥ अन्यथा ते न दास्यामि मृत्युहीना न संति वै ॥६॥ न दास्यति सुतं तेऽत्र

---

श्रीशिवास नमस्कार असो. लिंगपुराणांत हा कथाभाग आहे. (१) सनत्कुमार ह्मणतात—नंदिकेश्वरा, तुला पार्वतीपति श्रीशिव कसा मिळाला?आणि तूं आपला मृत्यु कसा चुकविलास? हा सर्व कथाभाग मला सांग. असा सनत्कुमाराचा प्रश्न ऐकून—

(२) नंदिकेश्वर ह्मणाले— हे मुनिश्रेष्ठा, माझा बाप शिलाद नांवाचा ऋषि होता, त्यास मूल बाळ वगैरे कांहीं नव्हतें ह्मणून त्यानें मूल होण्यासाठीं पुष्कळ वर्षेपर्यंत मोठी खडतर तपश्चर्या केली. (३) त्या तपश्चर्येमुळें इंद्र प्रसन्न झाला आणि शिलादाजवळ येऊन त्यास ह्मणाला, मुनीश्वरा, तुझ्या तपश्चर्येमुळें मी तुला प्रसन्न झालों आहें, तुला जे पाहिजे असतील ते वर माग. (४) असें इंद्राचें अभयवचन ऐकून शिलादानें सर्व देवांसहित इंद्रास नमस्कार केला. आणि शिलादमुनि दोन्ही हात जोडून इंद्रास ह्मणाला.

(५) शिलाद ह्मणाला—परमेश्वरा, तूं दैत्यांचा नाश करितोस,तुला एक हजार डोळे आहेत, तूं वर देणारा आहेस, माझी अशी इच्छा आहे कीं, जो योनीपासून जन्मला नाहीं, ज्याला मरणाचें भय नाहीं, ज्याचें आचरण चांगलें आहे, असा एक मुलगा मला व्हावा. असें शिलादाचें बोलणें ऐकून—

(६) इंद्र ह्मणाला— ब्रह्मर्षे, तूं म्हणतोस तसा मुलगा तुला मला देतां येत नाहीं. तुला पाहिजे असेल तर योनीपासून जन्मणारा आणि मरण असणारा मुलगा मी तुला देतों. मरण नसणारे असे लोक त्रैलोक्यांत कोठेंच नाहींत. (७) तूं

मृत्युहीनमयोनिजम् ॥ पितामहोऽपि भगवान्किमुतान्यो महामुने ॥७॥ तस्माच्छिलाद लोकेषु दुर्लभो वै त्वयोनिजः ॥ मृत्युहीनः पुमान् विद्धि स मृत्युः पद्मजोऽपि सः ॥ योनिजश्च महातेजाश्चाण्डजः पद्मसंभवः ॥८॥ महेश्वरांगजश्चैव भवान्यास्तनयः प्रभुः ॥ तस्याप्यायुः समाख्यातं परार्धद्वयसंमितम् ॥९॥ तस्मादयोनिजे पुत्रे मृत्युहीने प्रयत्नतः ॥ परित्यज स विप्रेन्द्र गृहाणात्मसमं सुतम् ॥१०॥ किं तु देवेश्वरो रुद्रः प्रसीदति यदीश्वरः ॥ न दुर्लभो मृत्युहीनस्तव पुत्रो ह्ययोनिजः ॥११॥ मया च विष्णुना चैव ब्रह्मणा च महात्मना ॥ अयोनिजं मृत्युहीनमसामर्थ्यं निवेदितुम् ॥१२॥ एवं व्याहृत्य विप्रेंद्रमनुगृह्य च तं घृणी ॥ देवैर्वृतो ययौ देवः सितेनेभेन वै प्रभुः ॥१३॥

नंदिकेश्वर उवाच ॥ गते वरेण्ये वरदे सहस्राक्षे शिलाशनः ॥ आ-

---

ह्मणतोस तसा योनीपासून जन्मास न आलेला आणि मरण नसणारा मुलगा तुला प्रत्यक्ष ब्रह्मदेव देखील देऊं शकणार नाहीं. मग मुनीश्वरा, दुसऱ्याची का महति आहे ! (८) ह्यासाठीं शिलादमुने, तूं ह्मणतोस तसा योनीपासून जन्मास न आलेला आणि मरण नसणारा मुलगा होणें कठिण आहे. फार काय सांगूं ? परंतु प्रत्यक्ष त्या ब्रह्मदेवास देखील मरण आहे, आणि तो कमलसंभव ब्रह्मदेव योनीपासून जन्मास आला आहे. (९) श्रीशिवाचा मुलगा परमेश्वर कार्तिकेय पार्वतीच्या पोटीं जन्मला खरा, परंतु त्याला देखील दोन परार्ध आयुष्य पूर्ण झाल्यावर मरण आहेच. (१०) ह्यासाठीं तूं आतां योनीपासून जन्मास न येणारा आणि मरण नसणारा मुलगा आपणास व्हावा ह्या इच्छेनें व्यर्थ परिश्रम करूं नकोस; तुझ्यासारखाच सद्गुणी पुत्र तुला पाहिजे असेल तर मी तुला देण्यास तयार आहें. (११) तरीपण देवाधिदेव श्रीशिव जर तुला प्रसन्न होईल तर मात्र योनीपासून न जन्मणारा आणि मरण नसणारा असा मुलगा तुला होणें अशक्य नाहीं. (१२) त्या श्रीशिवाखेरीज मजकडून, श्रीविष्णूकडून, आणि त्या महात्म्या ब्रह्मदेवाकडून, योनीपासून न जन्मलेला आणि मृत्यु नसणारा मुलगा तुला मिळणार नाहीं. ही आमच्या शक्तीबाहेरील गोष्ट आहे. (१३) सनत्कुमारा, असें बोलून तो दयाळू इंद्र शिलादमुनीवर अनुग्रह करून आपल्या पांढऱ्या शुभ्र ऐरावतावर बसून सर्व देवांसहित निघून गेला.

(१४) नंदिकेश्वर ह्मणाला—ह्याप्रमाणें मोठ्या मनाचा, वर देणारा, व हजार

राधयन् महादेवं तपसातोषयद्भवम् ॥१४॥ तदा तस्यैवमनिशं तत्परस्य द्विजस्य तु ॥ दिव्यं वर्षसहस्रं तु गतं क्षणमिवोल्बणम् ॥१५॥ वल्मीकेनावृतांगश्च भक्षितश्च खगैर्मुनिः ॥भक्षितोऽहिवृकाद्यैश्च भक्षितस्त्रिमुखैर्मुनिः ॥१६॥ वक्रसूचिमुखैश्चान्यैरक्षःस्त्रीभिश्च सर्वतः ॥ निर्मांसरुधिरत्वग्भिर्निर्लेपः कुड्यवत्स्थितः॥अस्थिशेषोऽभवत्पश्चात्तममन्यत शंकरः ॥१७॥ यथा स्मृतो मुनिः सोऽयं शंकरेणासुरारिणा ॥ तथैव मुनिशार्दूलश्चोत्ससर्ज क्लमं द्विजः॥१८॥ तपतस्तस्य तपसा प्रतुतोष च शंकरः ॥ तुष्टः समेत्य प्रोवाच सगणश्चोमया सह ॥१९॥

ईश्वर उवाच ॥ तपसानेन किं कार्यं तव तात महामते ॥ ददामि पुत्रं सर्वज्ञं सर्वशास्त्रार्थपारगम् ॥२०॥ ततः प्रणम्य देवेशं स्तुत्वोवाच

---

नेत्र असणारा तो इंद्र निघून गेल्यावर शिलादानें महादेव श्रीशिवाची आराधना करून शिवास संतुष्ट केलें. (१५) महादेवांनीं आपणावर कृपा करावी ह्मणून शिलादानें देवांची एक हजार वर्षेंपर्यंत खडतर तपश्चर्या केली; आणि इतका गेलेला वेळ त्याला एका क्षणा सारखा वाटला. (१६) त्या शिलादमुनीच्या आंगावर वारूळ वाढलें, त्याचें अंग पांखरांनीं कुरतडून टाकिलें, साप लांडगे वगैरे विषारी आणि हिंसक प्राण्यांनीं त्याचें अंग कुरतडलें. व त्या मुनीला तीन तोंडें असणाऱ्या प्राण्यांनीं कुरतडलें. (१७) वांकड्या सुईसारखीं तोंडें असणाऱ्या दुसऱ्या कितीएक जातींच्या प्राण्यांनीं व राक्षसांच्या बायकांनीं त्या मुनीचें अंग चोंडोंकडून फाडून खाल्लें. त्याच्या अंगांत मांस, रक्त कातडी वगैरे कांहीं एक न राहिल्यामुळें तो गिलावा पडलेल्या भिंतीसारखा दिसूं लागला. फक्त त्याच्या अंगांतील हाडांचा सांपळा मात्र उरला. अशी त्याची स्थिति झाली. तेव्हां श्रीशिवास त्याची आठवण झाली. (१८) दैत्यांचा समूळ नाश करणाऱ्या श्रीशिवांनीं आपले मनांत शिलादाचें स्मरण करितांच, त्या मुनिश्रेष्ठ ब्राह्मणास ( शिलादास ) इतके दिवस तपश्चर्येमुळें जे कांहीं श्रम झाले होते ते सर्व नाहींसे झाले. (१९) तपश्चर्या करणाऱ्या त्या शिलाद मुनीच्या तपश्चर्येनें श्रीशिव प्रसन्न झाले; आणि प्रसन्न होऊन पार्वतीसहित आणि सर्व प्रमथगणांसहित त्याचे जवळ येऊन त्यास ह्मणाले.

(२०) शिव ह्मणाले—बापा शिलादा, तूं मोठा बुद्धिमान् आहेस, तुला तपश्चर्या करावयाचें काय काम आहे ? मी तुला सर्वज्ञ, आणि सर्व शास्त्रांत पारंगत असणारा मुलगा देतों. (२१) असें शिवाचें अभयवचन ऐकून, शिलादऋषि

शिलाशनः ॥ हर्षगद्गदया वाचा सोमं सोमविभूषणम् ॥२१॥

शिलाद उवाच ॥ भगवन् देवदेवेश त्रिपुरार्दन शंकर ॥ अयोनिजं मृत्युहीनं पुत्रमिच्छामि सत्तम ॥२२॥

ईश्वर उवाच ॥ तव पुत्रो भविष्यामि नंदिनाम्ना त्वयोनिजः ॥ पिता भविष्यसि मम पितुर्वै जगतां मुने ॥२३॥ एवमुक्त्वा तु स मुनिं प्रणिपत्य स्थितं घृणी ॥ सोमः सोमभृदीशानस्तत्रैवान्तरधीयत ॥२४॥

नंदिकेश्वर उवाच ॥ लब्धपुत्रः पिता रुद्रात्प्रीतो मम महामुने ॥ यज्ञांगणं चकर्षाथ यज्ञार्थं यज्ञवित्तमः ॥२५॥ ततः क्षणादहं शंभोस्तनूजस्तस्य तेजसा ॥ संजातः पूर्वमेवाहं युगान्ताग्निसमप्रभः ॥२६॥ वृत्तम् ॥ ववर्षुस्तदा पुष्कलावर्तकाद्या जगुः किन्नराः खेचरा वै ससि-

---

देवाधिदेव शिवास नमस्कार करून व त्याची स्तुति करून, संतुष्ट मनानें गळा दाटून येऊन मस्तकावर चंद्र असणाऱ्या व पार्वतीजवळ असणाऱ्या श्रीशिवास ह्मणाला.

(२२) शिलाद ह्मणाला—परमेश्वरा, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस, तूं त्रिपुरांचा नाश केलास, तुला शंकर ह्मणतात. हे श्रेष्ठा परमेश्वरा, जो योनीपासून जन्मला नाहीं व ज्याला मरणाचें भय नाहीं असा मला एक मुलगा व्हावा, अशी माझी इच्छा आहे.

(२३) शिव ह्मणाले—मुने शिलादा, मी स्वतःच तुझा नंदी नांवाचा मुलगा होतों, मला योनींतून जन्मावें लागणार नाहीं, मी सर्व जगाचा पिता आहें त्या माझा तूं पिता झाल्यानें सर्व जगाचा पिता झालास असें होईल. (२४) असें शिवाचें बोलणें ऐकतांच शिलादानें शिवास नमस्कार केला; व त्या शिवापुढें तो आपले दोन्ही हात जोडून उभा राहिला. त्याचेकडे पार्वतीसह असणाऱ्या आपल्या मस्तकावर चंद्रकलेस धारण करणाऱ्या, ईशान असें नांव असणाऱ्या व कृपाळू अशा श्रीशिवांनीं कृपादृष्टीनें पाहिलें; व ते तेथल्या तेथेंच गुप्त झाले.

(२५) नंदिकेश्वर ह्मणाला—सनत्कुमारा माझ्या पित्याला (शिलादाला) आपणास श्रीशिवाच्या कृपेनें मुलगा होणार असें समजल्यामुळें मोठा आनंद वाटला. मग यज्ञाची रीति माहीत असणाऱ्या शिलादानें यज्ञ करण्याकरितां आंगण उकरिलें. (२६) तो आंगण उकरीत असतां मी श्रीशिवाचा मुलगा त्या श्रीशिवाच्या सामर्थ्यानें यज्ञाच्या अगोदरच जन्मास आलों. माझी आंगकांति प्रळयकाळच्या अग्नीसारखी होती. (२७) मी जन्मास आल्याबरोबर पुष्करावर्त

द्धा ॥ शिलादात्मजत्वं गते मय्यथेंद्रः ससर्जांशु वृष्टिं सुपुष्पांबुमिश्राम् ॥२७॥ तं दृष्ट्वा कालसूर्याभं जटामुकुटधारिणम् ॥ त्र्यक्षं चतुर्भुजं शान्तं शूलखट्वांगधारिणम् ॥२८॥ वज्रिणं वज्रदंष्ट्रं च वज्रिणाराधितं शिशुम् ॥ वज्रकुण्डलिनं घोरं नीरदोपमनिस्वनम् ॥२९॥ ब्रह्माद्यास्तुष्टुवुः सर्वे सुरास्सेंद्राः सुरेश्वराः ॥ नेदुः समन्ततः सर्वे ननृतुश्चाप्सरोगणाः ॥३०॥ मुनयो मुनिशार्दूला ऋग्यजुःसामसंभवैः ॥ मंत्रैर्माहेश्वरैः स्तुत्वा मां प्रणेमुर्महातपाः ॥३१॥ ब्रह्मा हरिश्च रुद्रश्च शक्रः साक्षाच्छिवोंऽबिका ॥ जीवश्चेंदुर्महातेजा भास्करः पवनोऽनलः ॥३२॥ ईशानो निऋतिर्यक्षो यमो वरुण एव च॥विश्वेदेवास्तथा रुद्रा वसवश्च महाबलाः ॥३३॥ लक्ष्मी साक्षाच्छची ज्येष्ठा देवी चैव सरस्वती ॥अदितिश्च दितिश्चैव स्मृतिर्लज्जा धृतिस्तथा ॥ नंदा भद्रा च सुरभिः

---

नांवाच्या मेघांनीं मजवर आकाशांतून पुष्पांचा वर्षाव केला; किन्नर, खेचर, आणि सिद्ध हे मंजुल शब्दांनीं गाणीं गाऊं लागले; मी शिलादाचा मुलगा होऊन जन्मल्याबरोबर इंद्रानें मजवर आकाशांतून सुवासिक फुलें मिसळलेल्या गंधोदकाची वृष्टि केली. (२८) तो जन्मलेला मुलगा प्रलयकाळच्या सूर्यासारखा तेजस्वी होता, त्याच्या मस्तकावर जटा असून त्यावर मुकुट घातलेला होता. त्याला तीन डोळे असून चार हात होते, त्याची मूर्ति शांत असून त्याचे हातांत शूल खट्वांग वगैरे आयुधें होतीं. (२९) त्याचे हातांत वज्र होतें. वज्रासारख्या त्याच्या दाढा कठिण होत्या. त्या मुलाची सेवा ( भक्ति ) इंद्र स्वतः करीत होता. त्याच्या कानांत इंद्रनीलमण्याचीं कुण्डलें होतीं. आणि त्याचा आवाज मेघाच्या गडगडण्यासारखा गंभीर होता. (३०) तो मुलगा जन्मल्याबरोबर ब्रह्मादिक सर्व देव आणि इंद्रादिक मुख्य मुख्य देव त्या मुलाची स्तुति करूं लागले, व जयघोष करूं लागले. त्यावेळीं लागलेच अप्सरांचे समुदाय चोहोंकडे नाचूं लागले. (३१) मोठमोठे तपस्वी मुनि आणि मुनीश्वर ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद ह्यांत असणाऱ्या माहेश्वर मंत्रांनीं माझी ( त्या मुलाची ) स्तुति करून मला नमस्कार करूं लागले. (३२) ब्रह्मदेव श्रीविष्णु, रुद्र, इंद्र, प्रत्यक्ष श्रीसदाशिव, पार्वती, बृहस्पति, चंद्र, हा तेजस्वी सूर्य, वायु, अग्नि, (३३) ईशान, निर्ऋति, यक्ष, यम, वरुण, विश्वेदेव, रुद्र आणि वसु, हे सर्वजण पराक्रमी देव तसाच (३४) लक्ष्मी, प्रत्यक्ष इंद्राणी, ज्येष्ठा देवी, सरस्वती, अदिति, दिति, स्मृति,

सुशीला सुमनास्तथा ॥३४॥ वृषेन्द्रश्च महातेजा धर्मो धर्मात्मजस्त-
था ॥ आवृत्य मां तथा लिंगे तुष्टुवुर्मुनिसत्तम ॥३५॥ शिलादोऽपि मु-
निर्दृष्ट्वा पिता मे तादृशं तदा ॥ प्रीत्या प्रणम्य तुष्टात्मा तुष्टावेष्टप्रदं
सुतम् ॥३६॥

शिलाद उवाच ॥ भगवन् देवदेवेश त्रियंबक ममाव्यय ॥ पुत्रोऽसि
जगतां यस्मात्त्राता दुःखाच्च किं पुनः ॥३७॥ रक्षको जगतां यस्मा-
त्पिता मे पुत्र सर्वग ॥ अयोनिज नमस्तुभ्यं जगद्योने पितामह ॥३८॥
पिता पुत्र महेशान जगतां च जगद्गुरो ॥ वत्स वत्स महाभाग पाहि-
मां परमेश्वर ॥३९॥ त्वयाहं नंदितो यस्मान्नंदी नाम्ना सुरेश्वर ॥ त-
स्मान्नंदय मां नंदिन्नमामि जगदीश्वरम् ॥४०॥ प्रसीद पितरो मेऽद्य

---

लज्जा, धृति, नंदा, भद्रा, सुरभि, सुशीला, आणि सुमना (३५) तसेच हा महा-पराक्रमी वृषेश्वर, धर्म, आणि धर्माचा मुलगा हे सर्वजण माझे भोंवतीं गोळा होऊन, हे सनत्कुमारा, लिंगाची ( श्रीशिवाची ) स्तुति करूं लागले. (३६) शिलादऋषीही, मी अशा अलौकिक सामर्थ्याचा मुलगा जन्मास आलेला पाहून मोठ्या संतोषानें मला नमस्कार करून, मी त्याचे इच्छेप्रमाणें पुत्र झालों ह्मणून माझी स्तुति करूं लागला.

(३७) शिलाद ह्मणाला—परमेश्वरा, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस, तुला त्रियंबक ह्मणतात, तुझा नाश होत नाहीं, तूं सर्व जगांचें दुःख दूर करितोस. तूं माझा तर प्रत्यक्ष मुलगा झाला आहेस, मग माझें दुःख हरण कर असें तुला पुनः काय सांगावयाचें आहे ? तें तूं करशीलच.(३८) ज्या अर्थी तूं सर्व जगांचें दुःख दूर करितोस, त्या अर्थी तूं सर्वांचा आईबाप आहेस. आतां तूं माझा पुत्र झाला आहेस, तरी तुला वाटेल तेव्हां वाटेल तेथें जाण्याचें सामर्थ्य आहे. तूं योनीपासून जन्मला नाहींस, तुला नमस्कार असो. तूं सर्व जगाचा मूलपुरुष आहेस, तूं सर्व जगाचा पितामह आहेस. (३९) हे महेश्वरा, तूं सर्व जगाचा पिता आहेस, व पुत्रही आहेस. तूं सर्व त्रैलोक्याचा गुरु आहेस. मुला, अरे मुला, तूं मोठा भाग्यवान् आहेस, तूं परमेश्वर आहेस तूं माझें रक्षण कर. (४०) तूं जन्मास आल्याबरोबर तूं मला आनंदविलेस, ह्मणून देवाधिदेवा तुझें नांव मी नंदी असें ठेवितों, हे नंदि, तूं मला नेहमीं असाच आनंद दे, मी तुला नमस्कार करितों. तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस. (४१) तूं मजवर कृपा कर, तूं

रुद्रलोकं गतौ विभो ॥ पितामहश्च भो नंदिन्नवतीर्णे महेश्वरे ॥४१॥ ममैव जननं लोके सफलं जगतां प्रभो॥अवतीर्णस्ततो नंदिन् रक्षार्थं महामीश्वरः ॥४२॥ तुभ्यं नमः सुरेशान नंदीश्वर सुरेश्वर ॥ पुत्र पाहि महाबाहो देवदेव जगद्गुरो ॥४३॥ पुत्रं त्वामेव नंदीश मत्वा यत्कीर्तितं मया॥क्षम्यतां क्षम्यतां वत्स स्तवस्तव्य सुरासुरैः॥४४॥एवं स्तुत्वा तु तं बालं प्रणम्य बहुमानतः ॥ मुनीश्वरान् स संप्रेक्ष्य शिलादोवाच सुव्रतः ॥४५॥

शिलाद उवाच ॥ पश्यध्वं मुनयः सर्वे महाभाग्यं ममाव्ययम् ॥ नंदी यज्ञांगणे देवश्चावतीर्णो यतः प्रभुः॥४६॥मत्समः कः पुमान् लोके देवो वा दानवोऽपि च॥एष नंदी यतो जातो यज्ञभूमौ हिताय मे॥४७

शैलादिरुवाच ॥ मया सह पिता हृष्टः प्रणम्य च महेश्वरम् ॥ उ-

---

प्रत्यक्ष श्रीशिव आहेस, तूं माझे पोटीं जन्मास आलास ह्मणून आतां माझे आई-बाप आणि आजा रुद्रलोकास गेले. (४२) नंदिकेश्वरा, तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस. तूं माझे पोटीं जन्मास आलास, त्यामुळें माझ्या जन्माचें सार्थक्य झालें. माझें रक्षण करावयासाठीं प्रत्यक्ष तूं महादेवच माझे पोटीं जन्मलास. (४३) तूं सर्व देवांचा अधिपति आहेस, तूं नंदिकेश्वर आहेस, तूं देवेंद्र आहेस, तूं मोठा पराक्रमी आहेस, तूं देवाधिदेव आहेस, तूं त्रैलोक्याचा गुरु आहेस, तुला नमस्कार असो. (४४) नंदिकेश्वरा, तूं सर्व देवांचा मुख्य देव असतां, मी तुला वारंवार मुलगा मुलगा ह्मणून ह्मटलें ह्याबद्दल तूं मला क्षमा कर. देव आणि दैत्य देखील तुझी स्तुति करितात, इतकी तुझी योग्यता मोठी आहे. (४५) सनत्कुमारा, त्या सदाचारी शिलादानें त्या मुलाची (अल्पवयस्क माझी नंदीची) अशा रीतीनें आदरपूर्वक स्तुति करून, मला वरचेवर नमस्कार घातले, आणि सर्व मुनींकडे पाहून तो शिलाद ह्मणाला.

(४६) शिलाद ह्मणाला—हे ऋषीश्वरहो, माझें सुदैव कसें आहे तें पहा. माझ्या सुदैवाला कोठेंही विघ्न नाहीं. कां तर प्रत्यक्ष हा परमेश्वर नंदिकेश्वर माझ्या यज्ञांगणांत जन्मास आला. (४७) हा नंदिकेश्वर परमात्मा माझें कल्याण करावयासाठीं यज्ञभूमींत माझा मुलगा ह्मणून जन्मास आला. त्यामुळें माझ्यासारखा दैववान् पुरुष देवांत किंवा दैत्यांत कोणीतरी आहे काय ?

(४८) नंदिकेश्वर ह्मणाला—सनत्कुमारा, सर्व ऋषींस असें बोलून माझा बाप शिलादऋषि मोठ्या आनंदानें महादेवास नमस्कार करून, जशी एखाद्या गरीब

टजं स्वं जगामाशु निधिं लब्ध्वेव निर्धनः ॥४८॥ यदा गतोऽहमुटजं- शिलादस्य महामुने ॥ तदा वै दैविकं रूपं त्यक्त्वा मानुष्यमास्थितः ॥४९॥ मानुष्यमास्थितं दृष्ट्वा पिता मे लोकपूजितः ॥ ललाप दुःखितोऽत्यर्थं स्वजनैश्च समावृतः ॥५०॥ जातकर्मादिकं चैव चकार मम सर्ववित् ॥ शालंकायनपुत्रो वै शिलादः पुत्रवत्सलः ॥५१॥ उपदिष्टा हि तेनैव ऋक्शाखा यजुषस्तथा ॥ सामशाखासहस्रं च सांगोपांगं महामुने ॥५२॥ आयुर्वेदं धनुर्वेदं गांधर्वं वास्तुलक्षणम् ॥ हस्तिनां चरितं चैव नराणां चैव लक्षणम् ॥५३॥ संपूर्णे सप्तमे वर्षे ततोऽथ मुनिसत्तमौ ॥ मित्रावरुणनामानौ तपोयोगबलान्वितौ ॥५४॥ तस्याश्रमं गतौ दिव्यौ द्रष्टुं मां चाज्ञया विभोः ॥ ऊचतुश्च महात्मानौ मां निरीक्ष्य मुहुर्मुहुः ॥५५॥ तात नंद्ययमल्पायुः सर्वशास्त्रार्थपारगः ॥ न दृष्ट-

---

मनुष्याला पैशाची मोठी थोरली ठेव सांपडली, ह्मणजे ती घेऊन तो आनंदानें घरास जातो; तसा मला घेऊन लागलाच आपल्या आश्रमास गेला. (४९) मुनिश्रेष्ठा सनत्कुमारा, जेव्हां मी आपल्या शिलादऋषि पित्यावरोबर त्याच्या आश्रमास गेलों, तेव्हां लागलेंच माझें दैविक स्वरूप नाहींसें होऊन मनुष्याचें स्वरूप झालें. (५०) माझें पूर्वीचें दैविकरूप नाहींसें होऊन मनुष्यरूप झालें तें पाहतांच माझ्या लोकमान्य पित्याला अतिशय वाईट वाटलें, व तो त्या दुःखामुळें आपल्या सर्व नातलगांसहित मोठमोठ्यानें रडूं लागला. (५१) असो. मग त्या सर्वज्ञ शिलादानें माझें जातककर्म वगैरे सर्व संस्कार केले. तो शिलादऋषि शालंकायनाचा मुलगा असून तो मजवर फारच प्रेम करीत होता. (५२) हे मुनिश्रेष्ठा सनत्कुमारा, त्या शिलादऋषीनेंच मला ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद यांच्या हजार हजार शाखा शिकविल्या, व अंगें आणि उपांगें हीं शिकविलीं. (५३)आयुर्वेद, धनुर्वेद, गायनकला, जमिनीच्या लक्षणांचें ज्ञान, हत्तींची परीक्षा, मनुष्यांची परीक्षा वगैरे जितकीं कांहीं ज्ञानें मनुष्यास अवश्य असलीं पाहिजेत तितकीं सर्व ज्ञानें मला शिकविलीं. (५४) माझें वय सात वर्षांचें पुरें होतें न होतें इतक्या सुमारास माझें सर्व अध्ययन पूर्ण झालें. मित्रावरुण नांवाचे दोघे मुनीश्वर मोठे तपस्वी होते त्यांच्या अंगीं योगांची अलौकिक शक्ति होती. (५५) ते दोघेजण याच सुमारास मला पाहण्याच्या उद्देशानेंच माझ्या बापाच्या ह्मणजे शिलादऋषीच्या आश्रमास आले; आणि सनत्कुमारा, ते दोघेजण वरचेवर वरचेवर मजकडे न्याहाळून पाहून शिलादऋषीस ह्मणाले. (५६) ताता ( बापा )

मेव चाप्यस्य आयुर्वर्षार्धतः परम् ॥५६॥ इत्युक्तवति विप्रेंद्र शिलादः पुत्रवत्सलः ॥ समालिंग्य च दुःखार्तो रुरोदातीव विस्वरम् ॥५७॥ हा पुत्र पुत्र पुत्रेति पपात च महीतले ॥ अहो विधेर्बलं चैव विधातुश्चेति कीर्तितम् ॥५८॥ तस्य चार्तस्वरं श्रुत्वा तदाश्रमनिवासिनः ॥ निपेतुर्विंव्हलास्सर्वे रक्षां चक्रुश्च मंगलाम् ॥५९॥ तुष्टुवुश्च महादेवं त्रियंबकमुमापतिम् ॥ हुत्वा त्रियंबकेनैव मधुना चैव संप्लुताम् ॥ दूर्वामयुतसंख्यातां सर्वद्रव्यसमन्विताम् ॥६०॥ पिता विगतसंज्ञश्च तथा चैव पितामहः ॥ विचेष्टश्च बभूवासौ मृतवन्निपपात च॥६१॥ मृत्योर्भीतोऽहमचिराच्छिरसा चाभिवंद्य तम् ॥ मृतवत्पतितं साक्षात्पितरं च पितामहम् ॥ प्रदक्षिणीकृत्य च तं रुद्रजाप्यपरोऽभवम् ॥६२॥ हृत्पुंडरी-

---

शिलादऋषे, हा तुझा मुलगा नंदी सर्व शास्त्रांत पारंगत झाला आहे खरा; परंतु दुःखाची गोष्ट अशी आहे कीं, तो अल्पायुषी आहे, फार तर काय सांगावें ! परंतु तो सहा महिन्यांपेक्षां जास्त दिवस वांचेल असेंही दिसत नाहीं. (५७) त्या मित्रावरुण ऋषींनीं असें ह्मटल्याबरोबर, सनत्कुमारा, त्या मुलास प्राणापेक्षां जास्त मानणाऱ्या माझ्या बापास ( शिलादऋषीस ) अतिशय वाईट वाटलें. त्यानें मला पोटाशीं घट्ट आंवळून धरिलें, आणि तो मोठा गळा काढून ओक्साबोक्सी रडूं लागला. (५८) तो लागलाच अरे माझ्या मुला, अरे माझ्या मुला, असें ह्मणून धाडकन जमिनीवर पडला. तो ह्मणाला, मला माझ्या दैवाचें सामर्थ्य समजून आलें, व ब्रह्मदेवाचेंही सामर्थ्य समजून आलें. (५९) त्याचें तें केविलवाणें रडणें ऐकून आश्रमांत राहणारे सर्व मुनि दुःखानें व्याकुळ होऊन जमिनीवर पडले. व त्यांनीं माझें कल्याण व्हावें ह्मणून माझे हातांत रक्षाबंधन घातलें. (६०) त्यांनीं त्रियंबक पार्वतीपति महादेवाची स्तुति केली. त्रियंबक मंत्रानें मधाची आहुती दिली व सर्व प्रकारचीं पूजाद्रव्यें घेऊन त्यांनीं दहालक्ष दूर्वा श्रीशिवास वाहिल्या. (६१) माझा बाप शिलादऋषि आणि आजा शालंकायन ऋषि, हे तर तसेच जमिनीवर बेशुद्ध होऊन पडले होते. त्यांची हालचाल वगैरे कांहींएक होत नव्हती. ते मेल्यासारखे जमिनीवर पडले आहेत असें वाटत होतें. (६२) असो. मला मरण येणार असें समजतांच मलाही मरणाची मोठी भीति वाटली; मी लागलाच तेथून उठलों, आणि जमिनीवर प्रेतासारख्या पडलेल्या त्या माझे बापास आणि आजास अगोदर नमस्कार केला; व त्यांस प्रदक्षिणा करून मी एकाग्रमनानें रुद्रजप करूं लागलों. (६३) मी आपल्या हृदय-

कसुषिरे ध्यात्वा देवं त्रियंबकम् ॥ त्र्यक्षं दशभुजं शान्तं पंचवक्त्रं सदाशिवम् ॥६३॥ सरितश्चान्तरे पुण्ये स्थितं मां परमेश्वरः ॥ तुष्टोऽब्रवीन्महादेवः सोमः सोमार्धभूषणः ॥६४॥

शिव उवाच ॥ वत्स नंदिन् महाभाग मृत्योर्भीतिः कुतस्तव ॥ मयैव प्रेषितौ विप्रौ मत्समस्त्वं न संशयः ॥६५॥ वत्सैतत्तव देहस्य लौकिकं परमार्थतः ॥ नास्त्येव दैविकं दृष्टं शिलादेन पुरा तव ॥६६॥ देवैश्च मुनिभिः सिद्धैर्गन्धर्वैर्दानवोत्तमैः ॥ पूजितं च पुरा वत्स दैविकं नंदिकेश्वर ॥६७॥ संसारस्य स्वभावोऽयं सुखं दुःखं पुनः सुखम् ॥ नृणां योगरत त्याज्यस्सर्वदैव विवेकिनाम् ॥६८॥ एवमुक्त्वा तु मां साक्षात्सर्वदेवेश्वरेश्वरः ॥ कराभ्यां सुशुभाभ्यां च उभाभ्यां परमेश्वरः ॥ पस्पर्श भगवान्रुद्रः प्रणतार्तिहरो हरः ॥६९॥ उवाच च महादे-

---

कमलांत परमेश्वर श्रीशंकराचें ध्यान केलें, या परमेश्वराला तीन नेत्र आहेत, ह्मणून त्याला त्रियंबक असें नांव पडलें आहे. त्याला दहा हात आहेत, त्याचें स्वरूप शांत आहे, त्याला पांच तोंडें आहेत, त्याला सदाशिव ह्मणतात. (६४) मी नदीच्या स्वच्छ पाण्यांत गळयाइतका बुडेतों उभा राहून तपश्चर्या करीत होतों. तें पाहून परमेश्वराच्या मनांत माझ्या विषयीं दया आली, आणि मग मस्तकावर अर्धचंद्र धारण करणारे श्रीशिव पार्वतीसह मजजवळ येऊन मला ह्मणाले.

(६५) शिव ह्मणाले– मुला नंदिकेश्वरा, तूं मोठा दैववान् आहेस, तुला मरणाचें भय कशाचें ? मीच ते मित्रावरुण नांवाचे दोघे ऋषि येथें पाठविले होते. तूं खरोखर माझ्यासारखाच अमर आहेस, ह्यांत संशय नाहीं. (६६) मुला नंदिकेश्वरा, हें तुझें लौकिक शरीर आहे, वास्तविक शरीर नव्हे. तूं जन्मास आल्यावेळचें वास्तविक दैविक शरीर शिलादानें पाहिलें नाहीं काय ? (६७) नंदिकेश्वरा, तूं जन्मलास तेव्हां देवांनीं, मुनीश्वरांनीं, सिद्धांनीं, गंधर्वांनीं व दैत्यांनीं देखील तुझ्या दैविक शरीराची पूजा केली. (६८) प्रपंचाचा स्वभावच असा आहे कीं, मनुष्यप्राण्यांस कधीं सुख व्हावें व कधीं दुःख व्हावें. सारखें सुख किंवा सारखें दुःख कोणासच कधीं असत नाहीं. ह्यासाठीं हे शिवयोगसाधन करणाऱ्या नंदिकेश्वरा, त्याबद्दल कोणी विवेकी मनुष्यानें दुःख करूं नये. (६९) असें बोलून त्या देवाधिदेव व शरण येणाऱ्या लोकांचीं दुःखें दूर करणाऱ्या श्रीशिव परमात्म्यानें आपले कल्याणकारक असे दोन्ही हात माझ्या अंगावर फिरवून मला कुरवाळिलें; (७०) व आनंदानें वृषभध्वज श्रीशिव आपल्या सर्व प्रम-

वस्तुष्टात्मा वृषभध्वजः॥ निरीक्ष्य गणपांश्चैव देवीं हिमवतः सुताम्॥ मामालोक्य च तुष्टात्मा महादेवः सुरेश्वरः ॥७०॥

ईश्वर उवाच ॥ अमरो जरया त्यक्तो नित्यं दुःखविवर्जितः॥ अक्षयश्चाव्ययश्चैव सपिता ससुहृज्जनः ॥७१॥ इष्टो मम सदा चैव मम पार्श्वगतः सदा ॥ मद्बलश्चैव भविता महायोगबलान्वितः ॥७२॥ एवमुक्त्वा च मां देवो भगवान्सगणस्तदा ॥ कुशेशयमयीं मालां समुन्मुच्यात्मनस्तथा ॥ आबबंध महातेजा महादेवो वृषध्वजः ॥७३॥ तया च मालया चैव शुभया कण्ठसक्तया ॥ त्र्यक्षो दशभुजश्चैव द्वितीय इव शंकरः ॥७४॥ तत एव समादाय हस्तेन परमेश्वरः ॥ उवाच ब्रूहि किं तेऽद्य ददामि वरमुत्तमम् ॥७५॥ ततो जटाश्रितं वारि गृहीत्वा हारनिर्मलम् ॥ उक्त्वा नदी भवस्वेति उत्ससर्ज महेश्वरः ॥७६॥ ततः सा दिव्यतोया च पूर्णा सितजला शुभा ॥ पद्मोत्पलवनोपेता प्रावर्तत

---

थगणांकडे, देवी श्रीपार्वतीकडे आणि मजकडे पाहून सर्वांस उद्देशून ह्मणाले.

(७१) शिव ह्मणाले—हा नंदी अमर आहे, ह्यास ह्मातारपण नाहीं, हा नेहमीं आनंदांत राहील. ह्याला दुःख कसें तें होणार नाहीं. ह्याचा क्षय होणार नाहीं, ह्याचा नाश होणार नाहीं, ह्याचा बाप शिलादऋषि आणि ह्याचे सर्व इष्टमित्र सुखानें राहतील. (७२) हा मुलगा नंदिकेश्वर माझा फार आवडता आहे, हा नेहमीं माझ्याजवळ राहील, माझ्यासारखाच हा बलवान् आहे, हा महायोगी असून बलवान् आहे.(७३) सर्व प्रमथगणांसमक्ष मला शिव असें ह्मणाले. आणि त्या वृषभध्वज महादेवांनीं आपले गळ्यांतील कमलांची माळा काढून माझे गळ्यांत घातली. (७४) त्या वेळेस गळ्यांत असलेल्या त्या शुभकर माळेनें तो नंदिकेश्वर, तीन डोळ्यांचा, दहा हातांचा दुसरा शंकरच कीं, काय? असा शोभूं लागला. (७५) व असें करून त्यांनीं आपल्या हातांनीं मला उचलून आपल्या मांडीवर घेतलें, आणि मला ह्मटलें, मुला आणखी मी तुला कोणता चांगला वर देऊं तें मला सांग ह्मणजे देतों.(७६) नंतर शिवांनीं माझ्या जटांवरील मोत्यांच्या माळेसारखें पांढरें शुभ्र पाणी घेऊन हें पाणी नदी होवो असें ह्मणून ते जमिनीवर सोडून दिलें. (७७) त्या पाण्यापासून लागलीच मोठी थोरली नदी उत्पन्न झाली तिचें पाणी फार निर्मळ असून ती दोहोंकांठापर्यंत तुडुंब भरलेली होती, त्या नदींत सूर्यविकासी आणि चंद्रविकासी कमलांचीं मोठमोठीं वनें होतीं.

महानदी॥७७॥तामाह च महादेवो नदीं परमशोभनाम् ॥यस्माज्जटोदकादेव प्रवृत्ता त्वं महानदी ॥७८। तस्माज्जटोदका पुण्या भविष्यसि सरिद्वरा ॥ त्वयि स्नात्वा नरः कश्चित्सर्वपापैः प्रमुच्यते ॥७९॥ ततो देव्या महादेवः शैलादिनमजः प्रभुः ॥ पुत्रस्तेऽयमिति प्रोच्य पादयोस्तन्यपातयत् ॥८०॥ सा मामाघ्राय शिरसि पाणिभ्यां परिमार्ज्य च॥ पुत्रप्रेम्णाभिषिंचिच्च स्रोतोभिः स्तनजैस्त्रिभिः ॥ पयसा शंखगौरेण देवदेवं निरीक्ष्य सा ॥८१॥ तानि स्रोतांसि त्रीण्यस्याः स्रोतस्विन्यभवत्तदा ॥नदीं त्रिस्रोतसं देवो भगवानवदद्भवः ॥८२॥ त्रिस्रोतसं नदीं दृष्ट्वा वृषः परमहर्षितः ॥ ननाद नादात्तस्माच्च सरिदन्या ततोऽभवत्॥ वृषध्वनिरिति ख्याता देवदेवेन सा नदी ॥८३॥ जांबूनदमयं चित्रं सर्वरत्नमयं शुभम् ॥ सदिवश्च च्युतं दिव्यं निर्मितं विश्वकर्मणा ॥ मकु-

---

(७८)त्या नदीचा सुंदरपणा पाहून ते महादेव त्या नदीस ह्मणाले, अगे नदि, तूं ह्या नंदिकेश्वराच्या जटेंतील पाण्यापासून उत्पन्न झाली आहेस, (७९) ह्मणून तूं जटोदका ह्या नांवानें प्रसिद्ध नदी होशील. तूं फार पवित्र आणि सर्व नद्यांत श्रेष्ठ अशी नदी होशील, तुझ्या पाण्यांत जो कोणी मनुष्य स्नान करील तो सर्व पातकांपासून मुक्त होईल. (८०) नंतर जन्म मरण नसणाऱ्या परमेश्वर श्रीशिवांनीं मला ( नंदीला ) हा नंदी तुझा मुलगा आहे असें ह्मणून पार्वतीच्या पायांवर घातलें. (८१) लागलेंच पार्वतीनें मला दोन्ही हातांनीं कुरवाळून माझें मस्तक हुंगलें. मला पाहतांच तिच्या मनांत मजविषयीं पुत्रप्रेम उत्पन्न झालें. त्यामुळें तिच्या स्तनांतून दुधाच्या तीन धारा निघूं लागल्या ते दूध शंकरासारखें पांढरें शुभ्र होतें. तिनें शंकराकडे पाहत पाहत त्या दुधाचा मजवर अभिषेक केला. (८२) पार्वतीच्या स्तनांतून ज्या दुधाच्या तीन धारा निघाल्या त्या धारामुळें तीन प्रवाह असणारी एक नदी उत्पन्न झाली, त्या नदीला श्रीशिवांनीं त्रिस्रोतसा नदी असें नांव दिलें. (८३) त्या तीन प्रवाह असणाऱ्या नदीला पाहतांच वृषाला ( नंदीला ) मोठा आनंद वाटला; आणि त्या आनंदानें त्यानें एकवेळ मोठ्यानें सिंहनाद केला; त्या आवाजापासून आणखी दुसरी एक नदी उत्पन्न झाली. त्या नदीचें नांव देवाधिदेव श्रीशिवांनीं वृषध्वनि असें ठेविलें. व ती नदी पुढें त्याच नांवानें प्रसिद्ध झाली. (८४) नंतर त्या वृषभध्वज श्रीशिवांनीं विश्वकर्म्यानें मोठ्या चातुर्यानें तयार केलेला सोन्याचा व त्यावर जागोजाग

टं च बबंधेशो मन्मूर्ध्नि वृषभध्वजः ॥८४॥ कुंडले शुशुभे दिव्ये वज्रवैडूर्यशोभिते ॥ आबबंध महादेवः स्वयमेव महेश्वरः ॥८५॥ मां तथाभ्यर्चितं व्योम्नि दृष्ट्वा मेघैः प्रभाकरः ॥ मेघांभसा चाभ्यषिंच्य शैलादिनमथो मुने ॥ तस्याभिषिक्तस्य तथा प्रवृत्ता स्रोतसा भृशम् ॥८६॥ यस्मात्सुवर्णान्निसृत्य नद्येषा संप्रवर्तते ॥ स्वर्णोदकेति तामाह देवदेवस्त्रियंबकः ॥८७॥ जांबूनदमयाद्यस्माद्द्वितीया मुकुटाच्छुभा ॥ प्रावर्तत नदी पुण्या ऊचुर्जांबूनदीति ताम् ॥ एतत्पंचनदं नाम जटेश्वरसमीपगम् ॥८८॥ यः पंचनदमासाद्य स्नात्वा जप्येश्वरेश्वरम् ॥ पूजयेच्छिवसायुज्यं प्रयात्येव न संशयः ॥८९॥ अथ देवो महादेवः सर्वभूतपतिर्भवः ॥ देवीमुवाच शर्वाणीमुमां गिरिसुतामजाम् ॥९०॥ देवि नंदी-

---

रत्नें बसविलेला एक शानदार मुकुट घेऊन, तो स्वतः आपल्याच हातानें माझ्या मस्तकावर घातला. (८५) तशीच दोन हिऱ्यांचीं रत्नजडित कुंडलें विश्वकर्म्यानें मजकरितां तयार केलीं होतीं; तीं शिवांनीं स्वतः माझ्या दोन्ही कानांत घातलीं.(८६) शंकरांनीं मला अशा रीतीनें नटविलेलें पाहून सूर्यास मोठा संतोष झाला. त्या संतोषानें त्यानें आकाशांतून मजवर पर्जन्याची वृष्टि केली. मेघांनीं आकाशांतून मजवर इतकी पर्जन्यवृष्टि केली कीं, त्या पाण्याचे मोठे मोठे असे अनेक प्रवाह वाहूं लागले. (८७) नंदिकेश्वराच्या मस्तकावर सोन्याचा मुकुट घालून कानांत रत्नकुंडलें घातलीं; त्यामुळें सूर्यानें आकाशांतून नंदिकेश्वरास अभिषेक करण्यासाठीं इतकी पर्जन्यवृष्टि केली कीं, त्या पाण्याचे अनेक प्रवाह वाहूं लागले. तें पाहून देवाधिदेव श्रीशिवांनीं त्या प्रवाहरूपांनीं वाहणाऱ्या नदीस ती नदी सुवर्णापासून झाली ह्मणून तिला स्वर्णोदका असें नांव दिलें. (८८) नंदिकेश्वराच्या मस्तकावर सोन्याचा मुकुट घातला त्यावेळीं त्या मुकुटापासून आणखी एक कल्याणकारक आणि पवित्र नदी निघाली तिला जांबूनदी असें नांव पडलें. ह्याच पांच नद्या पुढें पंचनद ह्या नांवानें प्रसिद्धीस आल्या, ह्या सर्वांची उत्पत्ति नंदिकेश्वराच्या जटेपासून निघालेल्या नदीच्या उत्पत्तीस अनुसरून आहे.(८९) जो कोणी मनुष्य ह्या पंचनदाजवळ जाऊन त्यांत स्नान करील आणि जप्येश्वर नांवाच्या शिवलिंगाची पूजा करील; तो शिवसायुज्य पावेलच पावेल ह्यांत कांहीं संशय नाहीं. (९०) मग परमेश्वर, सर्व प्राणिमात्रांचा अधिपति व असें नांव असणारा श्रीशिव देव, अजा, शर्वाणी, उमा, गिरिकन्या अशीं अनेक नांवें असणाऱ्या देवी पार्वतीस ह्मणाला. (९१) देवि, पार्वती, ह्या नंदीला

श्वरं देवमभिषिंचामि भूतले ॥ गणानप्याहरिष्यामि किंवा त्वं मन्य-
से शुभे ॥९१॥ तस्य तद्वचनं श्रुत्वा भवानी हृषितानना ॥ स्मयन्ती
वरदं प्राह भवं भूतपतिं पतिम् ॥९२॥

देव्युवाच ॥ सर्वलोकाधिपत्यं च गणेशानां तथैव च ॥ सर्वमर्हति
देवेश शैलादिस्तनयो मम॥९३॥ततः स भगवान्देवः सर्वभूतेश्वरेश्वरः॥
सस्मार गणपान् दिव्यान् देवदेवो वृषध्वजः॥९४॥स्मरणादेव रुद्रस्य
संप्राप्तास्ते गणेश्वराः ॥ सर्वे सहस्रहस्ताश्च सहस्रायुधपाणयः ॥९५॥
त्रिनेत्राश्च महात्मानस्त्रिदशैरभिवंदिताः ॥ कोटिकालाग्निसंकाशा ज-
टामुकुटधारिणः ॥९६॥ दंष्ट्राकरालवदना नित्यबुद्धाश्च निर्मलाः ॥ को-
टिकोटिगणैस्तुल्यैरात्मनां च गणेश्वराः ॥९७॥ गायन्तश्च द्रुवन्तश्च नृ-

---

पृथ्वीवर अभिषेक करावा असें मला वाटतें, आणि ह्यासाठीं मी आपल्या सर्व प्रमथगणांस येथें बोलाविणार आहे. तर ह्याविषयीं तुझें मत कसें काय आहे तें मला सांग. (९२) श्रीशिवाचें असें बोलणें ऐकतांच पार्वतीस मोठा आनंद झाला नंतर; ती हंसत हंसत संतुष्ट मनानें वर देणाऱ्या, व भूतपति, भव अशीं अनेक नांवें असणाऱ्या आपल्या पतीस शिवास ह्मणाली.

(९३) पार्वती ह्मणाली—श्रीशिवा, आपण ह्या नंदीला सर्व लोकांचें आधिपत्य, द्या, तसेंच सर्व प्रमथगणांचें आधिपत्य द्या. देवाधिदेवा, हे सर्व अधिकार चालविण्याला हा नंदिकेश्वर अगदीं योग्य आहे, हा प्रत्यक्ष माझा मुलगा आहे. (९४) आपण करीत आहों त्या कामाला पार्वतीचेंही अनुमोदन मिळतांच परमेश्वर देवाधिदेव श्रीशिवांनीं अंगीं अलौकिक सामर्थ्य असणाऱ्या आपल्या मुख्य मुख्य प्रमथगणांचें स्मरण केलें. (९५) वृषभध्वज श्रीशिवांनीं प्रमथगणांचें स्मरण करितांच ते सर्व गणेश्वर तेथें येऊन शिवापुढें उभे राहिले. सर्वांसच हजार हजार हात होते व प्रत्येकजणानें आपल्या हजार हातांत हजार आयुधें घेतलेलीं होतीं. (९६) प्रत्येकास तीन तीन डोळे होते ते सर्वजण मोठ्या मनाचे होते, त्यांस देव देखील नमस्कार करीत. प्रळयकालच्या कोट्यावधि अग्नीसारखे ते तेजस्वी होते, प्रत्येकाच्या मस्तकावर मुकुट असून किती एकांनीं आपल्या जटाच मुकुटासारख्या बांधल्या होत्या. (९७) त्यांच्या तोंडांत अकराळ विकराळ दाढा होत्या. ते नेहमीं ज्ञानसंपन्न असत, त्यांचे हातून दुर्वर्तन कधींहि घडत नसे. त्या प्रत्येक गणेश्वराबरोबर त्याच्या सारखेच कोट्यावधि प्रमथगण होते. (९८) ते मोठमोठे बलवान् प्रमथगण कोणी गात होते, कोणी पळत

त्यन्तश्च महाबलाः ॥ मुखाडंबरवाद्यानि वादयन्तस्तथैव च ॥९८॥ रथैर्नागैर्हयैश्चैव वायुमर्कटवाहनाः ॥ विमानेषु तथारूढा हेमचित्रेषु वै गणाः ॥९९॥ भेरीमृदंगवाद्यैश्च पणवानकगोमुखैः ॥ वादित्रैर्विविधैश्चान्यैः पटहैरेकपुष्करैः ॥१००॥ भेरीमुरजसन्नादैराडंबरकडिंडिमैः ॥ मर्दलैर्वेणुवीणाभिर्विविधैः पणवैरपि ॥१०१॥ दर्दुरैस्तलघातैश्च कच्छपाद्यैरनेकशः ॥ वाद्यमानैर्महायोगा आजग्मुर्देवसंसदम् ॥१०२॥ ते गणेशा महासत्वाः सर्वदेवेश्वरेश्वराः ॥ प्रणम्य देवीं देवं च इदं वचनमब्रुवन् ॥१०३॥

प्रमथगणा ऊचुः ॥ भगवन्देवदेवेश त्रियंबक वृषध्वज ॥ किमर्थं च स्मृता देव आज्ञापय महाद्युते ॥१०४॥ किं सागरांश्छोषयामो यमं वा

---

होते, कोणी नाचत होते, तसेच कोणी कोणी तोंडानें अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत होते. (९९) कोणी रथांत बसून आले, कोणी हत्तीवर बसून आले, कोणी घोड्यांवर बसून आले, कोणी वाऱ्यावर बसून आले कोणी आपल्या माकडांवर बसून आले, व कितीएक गणेश्वर सोन्याच्या विमानांत बसून आले. (१००) कोणी भेरी वाजवीत होते, कोणी मृदंग वाजवीत होते, कोणी अशाच तऱ्हेचीं दुसरीं वाद्यें वाजवीत होते, कोणी पणवा, कोणी आनक, कोणी गोमुख, कोणी पटह कोणी पुष्कर अशीं अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत होते. (१०१) कोणी कोणी गणेश्वर भेरी, मुरज, वगैरे वाद्यें वाजवीत होते, कोणी आडंबरक, डिंडिम, मर्दल, वेणु, वीणा पणव वगैरे अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत होते. (१०२) कोणी दर्दुर कोणी टाळया; कोणी कच्छप वगैरे ज्यास जें आवडेल अशा रीतीचीं अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत ते मोठमोठे पराक्रमी गणधर परमेश्वर श्रीशिवाच्या सभेस आले. (१०३) ते सर्व गणेश्वर मोठे बलाढ्य होते, इंद्रादिक सर्व देवांपेक्षां त्यांचें सामर्थ्य जास्त होतें, ते श्रीशिवाजवळ येऊन शिवास आणि पार्वतीस नमस्कार करून असें ह्मणूं लागलें.

(१०४) गण बोलले—परमेश्वरा, तूं सर्व देवांचा अधिपति आहेस, तुला त्रियंबक ह्मणतात, तुला वृषध्वज ह्मणतात, तूं मोठा तेजस्वी आहेस, तूं आमचें कां स्मरण केलेंस तें आह्मांस सांग. आह्मी तुझें काम आतांचे आतां करूं. (१०५) आह्मी समुद्रांस कोरडे करून टाकूं, किंवा यमास त्याच्या चाकर नोकरांसह मारून टाकूं यमाला मृत्यूसहित आणि अग्निसाहित मारून टाकूं किंवा

सह किंकरैः ॥ हन्मो मृत्युसहायं वा सवन्हिमथ पद्मजम् ॥१०५॥ वज्रेन्द्रं सह देवैश्च सह विष्णुं च वायुना ॥ आनयामः सुसंक्रुद्धा दैत्यान्वा सह दानवैः॥१०६॥कस्याद्य व्यसनं घोरं करिष्यामस्तवाज्ञया ॥ कस्य वाद्योत्सवो देव सर्वकामसमृध्दये ॥१०७॥ तांस्तथावादिनः सर्वान्गणेशान्भवसंमतान् ॥ उवाच देवः संपूज्य कोटिकोटिगणाप्रभुः ॥१०८॥

ईश्वर उवाच ॥ शृणुध्वं यत्कृते यूयमिहाहूता जगद्धिताः ॥ श्रुत्वा च प्रयतात्मानः कुरुध्वं तदशंकिताः ॥१०९॥ नंदीश्वरोऽयं पुत्रो नः सर्वेषामीश्वरेश्वरः ॥ प्रियोग्रनायकश्चैव सेनानीर्वः सुबुद्धिमान् ॥११०॥ तमिमं मम संदेशाद्यूयं सर्वेऽपि संमताः ॥ सेनान्यमभिषिंचध्वं महायोगपतिं पतिम् ॥१११॥ एवमुक्ते भगवता गणपाः सर्व एव ते ॥ एवमस्त्विति संमंत्र्य संभारानाहरंस्ततः ॥११२॥ तस्माच्छिवाश्रयं दिव्यं

---

ब्रह्मदेवास मारूं. (१०६) इंद्राला सर्व देवांसह, विष्णूसह आणि वायूसह बांधून आणूं आह्मी एकवेळ रागावलों, ह्मणजे दैत्यांस दानवांसह धरून आणूं. (१०७) आह्मी कोणास त्रास द्यावा ह्याची आह्मांस आज्ञा कर, ह्मणजे आह्मी त्याची दुर्दशा करितों. किंवा परमेश्वरा, कोणाचा आतां सर्व प्रकारचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां उत्सव करणें आहे किंवा काय ? तें सांग.(१०८) अशा तऱ्हेनें बोलणाऱ्या व श्रीशिवास अतिशय प्रिय असणाऱ्या त्या कोट्यावधि गणेश्वरांस, श्रीशिव त्यांच्या बोलण्यास मान देऊन त्यांस ह्मणाले.

(१०९) श्रीशिव ह्मणाले— हे गणेश्वरहो, तुह्मी सर्वजण त्रैलोक्याचें हित करणारे आहां, तुह्मांस मीं येथें कशाकरितां बोलाविलें तें तुह्मांस सांगतों, ऐकून घ्या. आणि तें माझें ह्मणणें ऐकून घेऊन त्याप्रमाणें मनांत कोणतीही शंका न घेतां हें काम लक्ष्य लावून करा. (११०) हा नंदिकेश्वर आमचा मुलगा आहे, हा सर्वांचा मुख्य देव आहे, हा मोठा बुद्धिमान् आहे. ह्याला मी तुह्मां सर्वांचा मुख्य सेनापति नेमितों. (१११) तुह्मी सर्वजणही मला मान्यच आहां, हा नंदी मोठमोठ्या योगी लोकांचाही अधिपति आहे, तुह्मी सर्वजण ह्याला माझ्या सांगण्याप्रमाणें सेनापतीचा अधिकार दिल्याबद्दलचा अभिषेक करा. (११२) शिव परमात्म्यांनीं असें ह्मटल्यावर सर्व गणेश्वरांनीं तें शिवाचें ह्मणणें मान्य केलें. आणि ते आपआपसांत विचार करून मला अभिषेक करावयाकरितां लागणाऱ्या सामानाची जुळवाजुळव करूं लागले. (११३) त्यांनीं मला अभिषेकाच्या वेळीं

जांबूनदमयं शुभम् ॥ आसनं मेरुसंकाशं मनोहरमुपाहरन् ॥११३॥ नैकस्तंभमयं चापि चारुचामीकरप्रभम् ॥ मुक्तादामावलंबं च मणिरत्नावभूषितम् ॥११४॥ स्तंभैश्च वैडूर्यमयैः किंकिणीजालसंयुतम् ॥ संचारान्तरसंयुक्तं मंटपं विश्वतोमुखम् ॥ कृत्वा चक्रुश्च तन्मध्ये तदासनवरं शुभम् ॥११५॥ तस्याग्रतः पादपीठं नीलवज्रावभासितम् ॥ चक्रुः पादप्रतिष्ठार्थं कलशौ चास्य पार्श्वगौ ॥ संपूर्णौ परमांभोभिररविंदावृताननौ ॥११६॥ कलशानां सहस्रं च सौवर्णं राजतं तथा ॥ ताम्रजं मृन्मयं चैव सर्वतीर्थांबुपूरितम् ॥११७॥ छत्रं शतशलाकं च जांबूनदमयं शुभम् ॥ शंखहारांबुगौरेण पृष्ठेनापि विराजितम् ॥११८॥

---

बसण्याकरितां मोठें थोरलें मेरु पर्वताएवढें एक सिंहासन आणिलें; त्यावर शिवपार्वतीलाही बसण्याची जागा होती, तें सिंहासन सोन्याचें असून फार सुंदर, कल्याणकारक, आणि मनोहर होतें. (११४) अभिषेकाच्या समारंभाकरितां त्यांनीं एक शानदार मांडव तयार केला. त्या मांडवाला पुष्कळ खांब होते, आणि ते सर्व उत्तम बावनकशी सोन्याचे केलेले असल्यामुळें शोभत होते; त्यामांडवांत जागोजाग मोत्यांच्या माळा लोंबत सोडलेल्या होत्या, व मांडवाला जागोजाग हिरे माणकें जडलेलीं होतीं. (११५) मांडवाचे खांब वैडूर्यमण्यांनीं मढवून काढल्यासारखे दिसत होते, मांडवांत जागोजाग लहान लहान घंटा बांधलेल्या होत्या मांडवांत जावयाचे यावयाचे रस्ते सरळ आणि शोभिवंत होते. त्या मंडपाला चोहोंकडे दरवाजे होते. असा मांडव आधीं तयार करून त्या मांडवांत तें उत्तम सिंहासन ठेविलें. (११६) त्या सिंहासनाच्या पुढें पाय ठेवायाचें एक लहानसें सिंहासन त्यांनीं तयार केलें तें इंद्रनीलमण्याचें असल्यामुळें फारच सुरेख दिसत होतें, त्या पाय ठेवण्याच्या सिंहासनाच्या बाजूला दोन कलश उत्तम स्वच्छ पाण्यांनीं भरून ठेविलेले होते. आणि त्या दोन कलशांचीं तोंडें कमळाच्या पानांनीं झांकलेलीं होतीं. (११७) तेथें आणखीं हजारों कलश भरून ठेविलेले होते, त्यांत कांहीं सोन्याचे, कांहीं रुप्याचे तसेच कांहीं तांब्याचे व कांहीं मातीचे होते. ते सर्व कलश तीर्थोदकानें भरलेले होते. (११८) त्यांनीं माझ्या मस्तकावर धरण्याकरितां एक छत्र तयार केलें. त्यास शंभर काड्या होत्या, तें सर्व सोन्याचें असून डौलदार होतें, त्या छत्राची पाठ शंखासारखी, पुष्पमालेसारखी, आणि पाण्यासारखी निर्मळ असल्यामुळें फार शोभत होती.

व्यजनं चंद्रशुभ्रं च हेमदण्डं सुचामरम् ॥ ऐरावतः सुप्रतीको गजावेतौ च पूजितौ ॥ मकुटं कांचनं चैव निर्मितं विश्वकर्मणा ॥११९॥ कुण्डले चामले दिव्ये वज्रं चैव वरायुधम् ॥ जांबूनदमयं सूत्रं केयूरद्वयमेव च ॥ हारं च मणिचित्रांगं निर्मितं विश्वकर्मणा ॥१२०॥ संभाराणि तथान्यानि विविधानि बहून्यपि ॥ समन्तान्निन्युरव्यग्रा गणपा देवसंमताः ॥१२१॥ ततो देवाश्च सेंद्राश्च सनारायणकास्तदा ॥ मुनयो भगवान् ब्रह्मा नव ब्रह्माण एव च॥ वेदाश्च लोकाः सर्वे ते तत्राजग्मुर्मुदान्विताः ॥१२२॥ तेष्वागतेषु सर्वेषु भगवान्परमेश्वरः ॥ सर्वकार्यविधिं कर्तुमादिदेश पितामहम् ॥१२३॥ पितामहोऽपि भगवान् नियोगादेव तस्य तु ॥ चकार सर्वं विधिवदभिषेकं समाहितः॥१२४॥ अर्चयित्वा ततो ब्रह्मा स्वयमेवाभिषेचयत् ॥ ततो विष्णुस्ततः शक्र

---

(११९) त्यांनीं मजकरितां एक पंखा तयार केला, तो चंद्रासारखा पांढरा पांढरा शुभ्र होता. त्यांनीं मजकरितां एक चवरी तयार केली तिचा मागील दांडा सोन्याचा होता. माझी मिरवणूक काढावयाच्या वेळीं मला बसण्याकरितां ऐरावत आणि सुप्रतीक नांवाचे दोन हत्ती आणले होते, ते हत्ती सर्व जगांत प्रसिद्ध आहेत. विश्वकर्म्यांनें माझ्या मस्तकावर घालण्याकरितां एक सुंदर सोन्याचा मुकुट तयार केला. (१२०) दोन कानांत घालण्याकरितां दोन सुंदर कुंडलें तयार केलीं, आणि मजकरितां एक वज्र तयार केलें. तें सर्व आयुधांत चांगलें होतें. मजकरितां त्यांनीं सोन्याचें यज्ञोपवीत तयार केलें, व दोन्ही दंडांत घालण्याकरितां दोन बाहुभूषणें तयार केलीं. विश्वकर्म्यांनें माझ्या गळ्यांत घालण्याकरितां एक कंठी तयार केली, तींत मध्यें मध्यें रत्नें घातलीं असल्यामुळें ती फार सुंदर दिसे. (१२१) माझ्या अभिषेकसमारंभाकरितां दुसऱ्या ज्या ज्या वस्तूंची अवश्यकता होती त्या त्या सर्व वस्तु त्या सर्व शिवगणांनीं कोणत्याही प्रकारची धांदल न होतां स्वस्थपणानें आणल्या. (१२२) माझ्या अभिषेकसमारंभाकरितां मग इंद्रादिक तेहतीस कोटि देव, श्रीविष्णु, मुनीश्वर, परमेश्वर ब्रह्मदेव तसेच नऊ ब्रह्मदेव चार वेद, त्रैलोक्यांतील सर्व लोक हे सर्व तेथें आनंदानें एकत्र जमा झाले. (१२३) ते सर्व लोक तेथें आलेले पाहून परमेश्वर श्रीशिवांनीं अभिषेक समारंभाचा सर्व विधि करण्यास ब्रह्मदेवास आज्ञा केली. (१२४) श्रीशंकरांनीं आज्ञा केल्यावर ब्रह्मदेवानें शिवाच्या आज्ञेप्रमाणें यथाविधीनें माझ्या अभिषेक समारंभाचें सर्व कृत्य केलें. (१२५) मग ब्रह्मदेवानें स्वतः माझी पूजा

ऋषयश्च सहामरैः ॥१२५॥ वासोयुगं तथा दिव्यं गंधं दिव्यं तथैव च ॥ केयूरं कुण्डले चैव मकुटं हारमेव च ॥१२६॥ छत्रं शतशलाकं च वालव्यजनमेव च ॥ दत्तं महात्मना तेन ब्रह्मणा परमेष्ठिना ॥१२७॥ ऋषयस्तुष्टुवुश्चैनं पितामहपुरोगमाः ॥ स्तुतवत्सु ततस्तेषु विष्णुः सर्वजगत्पतिः ॥ शिरस्यंजलिमाधाय तुष्टाव च समाहितः ॥१२८॥ प्रांजलिः प्रायशो भूत्वा जयशब्दं चकार ह ॥ ततो गणाधिपास्सर्वे ततो देवास्ततोऽसुराः ॥१२९॥ एवं स्तुतश्चाभिषिक्तो देवैः सब्रह्मकैस्तदा ॥ उद्वाहश्च कृतस्तत्र नियोगात्परमेष्ठिनः ॥१३०॥ मरुतां च सुता देवी सुयशाख्या बभूव या ॥ लब्धं शशिप्रभं छत्रं तयोरत्नविभूषितम् ॥१३१॥ चामरैश्चामरासक्तहस्ताग्रैः स्त्रीगणावृतम् ॥ सिंहासनं

---

करून मला तीर्थोदकानें अभिषेक केला. ब्रह्मदेवाचें अभिषेक करणें झाल्यावर श्रीविष्णु, इंद्र ऋषि, आणि तेहतीस कोटि देव ह्यांनीं मजवर तीर्थोदकाचा अभिषेक केला. (१२६) अभिषेक झाल्यावरोबर ब्रह्मदेवानें मला दोन दिव्यवस्त्रें दिलीं. माझ्या कपाळास उत्तम सुवासिक गंध लाविलें, व नंतर दोन्ही दंडांत दोन बाहुभूषणें घातलीं, कानांत रत्नांचीं कुंडलें घातलीं, आणि मस्तकावर सोन्याचा मकुट घालून गळ्यांत मोत्यांच्या माळा घातल्या. (१२७) माझ्या मस्तकावर शंभर काड्यांचें छत्र धरून मला वाळयाच्या विंझण्यानें वारा घातला. तो ब्रह्मदेव फार मोठ्या मनाचा असून त्यानें हें सर्व कृत्य शिवाच्या आज्ञेप्रमाणें केलें. (१२८) मग सर्व ऋषीश्वरांनीं आणि ब्रह्मादिक देवांनीं माझी स्तुति केली. ते सर्वजण देव तशा रीतीनें माझी स्तुति करीत आहेत असें पाहून सर्व त्रैलोक्याचा अधिपति श्रीविष्णु ह्यांनीं आपले दोन्ही हात कोंपरापासून जोडून मस्तकास लाविले व सावधानमनानें माझी स्तुति केली. (१२९) विष्णु तसेच हात जोडून मजसमोर उभे राहिले, आणि वेळोवेळीं त्यांनीं माझा जयजयकार केला. तें पाहून सर्व गणेश्वरांनीं, तेहतीस कोटि देवांनीं, आणि त्यानंतर सर्व दैत्यांनीं माझा जयजयकार केला. (१३०) अशा तऱ्हेनें इंद्र ब्रह्मदेव वगैरे सर्व मुख्य मुख्य देवांनीं मला अभिषेक केला. आणि परमेश्वर श्रीशिवाच्या आज्ञेप्रमाणें माझें तेथें लग्नही केलें. (१३१) मरुद्गणाची मुलगी जी सुयशा नांवाची होती ती मला स्त्री मिळाली. आह्मां दोघांला चंद्रासारखें पांढरें शुभ्र छत्र मिळालें. तें छत्र त्यावर अनेक प्रकारचीं रत्नें वसविलीं असल्यामुळें शोभत होतें. (१३२) माझें सुयशा स्त्रीबरोबर लग्न होतांच आह्मीं दोघें त्या सोन्याच्या सिंहासनावर

च परमं तया चाधिष्ठितं मया ॥१३२॥ अलंकृता महालक्ष्म्या मकुटाद्यैः सुभूषणैः ॥ लब्धो हारश्च परमो देव्याः कण्ठगतस्तथा॥१३३॥ वृषेन्द्रश्च सितो नागः सिंहः सिंहध्वजस्तथा ॥ रथश्च हेमछत्रं च चंद्रबिंबसमप्रभम् ॥ अद्यापि सदृशः कश्चिन्मया नास्ति विभुः कचित् ॥१३४॥ सान्वयं च गृहीत्वेशस्तथा संबंधिबांधवैः ॥ आरुह्य वृषमीशानो मया देव्या गतः शिवः ॥१३५॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने नंदीशोत्पत्तितद्गाणपत्यप्रदानं नाम त्रिंशोऽध्यायः ॥

---

बसलों. त्या सिंहासनाच्या आजूबाजूस उभ्या राहून शेंकडो स्त्रिया आपल्या हातांत चवऱ्या घेऊन मजवर वारीत होत्या. (१३३) प्रत्यक्ष महालक्ष्मीनें सुयशा देवीच्या अंगावर अलंकार घातले. मस्तकावर मकुट घालून तिच्या गळ्यांत मोठी थोरली मोत्यांची माळ घातली. (१३४) त्या समारंभांत मला मोठा थोरला एक बैल, पांढरा हत्ती, सिंह, सिंह ध्वजावर असणारा एक रथ, सुवर्णाचें चंद्रासारखें पांढरें शुभ्र दिसणारें छत्र, इतक्या उत्तम उत्तम वस्तु आंदण मिळाल्या. माझ्यासारखा भाग्यवान् पुरुष दुसरा कोणीही आजपर्यंत मीं पाहिला नाहीं. (१३५) मग श्रीशिव माझ्या सर्व वंशांतील लोकांस व नातलग लोकांस बरोबर घेऊन नंदीवर बसून पार्वतीसह आपल्या स्थानास गेले.

ह्याप्रमाणें नीलकंठनागनाथ नांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं नंदीश्वराची उत्पत्ति आणि त्यास गाणपत्याचा अभिषेक केल्याचें वर्णन असलेला हा तिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथैकत्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ ईशानसंहितायाम् ॥ अगस्त्य उवाच॥ उत्पत्तिं शंखराजस्य चक्रराजस्य चैव हि ॥ विस्तरेण वदेदानीं विष्णोर्विश्वेश्वरस्य मे ॥१॥ स कथं लब्धवान् विष्णुर्देवदेवात्त्रिशूलेनः ॥ शंखचक्रे महाबुद्धे कस्मिन्काले सुरार्चितः ॥२॥

स्कंद उवाच ॥ शृणुष्वेकमना विप्र कथां कथयतो मम ॥ वेदगुह्यां महाघघ्नीं सर्वमांगल्यवर्धिनीम्॥३॥आदाविदं जगत्कृत्स्नं ब्राम्हं स्थावरजंगमम् ॥ नष्टमासीत्तमोभूतमभवच्च शिवेच्छया ॥४॥ न ब्रह्मा न हरिर्नेन्द्रो न सूर्यो न निशाकरः ॥ न दिशो न च भूम्यादिर्लोकास्सर्वे न सुव्रत ॥५॥ तमोभूते तदा देवः परमात्मा शिवः परः ॥ प्रकृतिं स्वामवष्टभ्य क्षोभयित्वा च लीलया ॥ तस्यां संजनयामास ब्रह्माणं विष्णु

---

श्रीशिवास नमस्कार असो. स्कंदपुराणांत ईशानसंहितेंत हा कथाभाग आहे तो असा—(१) अगस्त्य ह्मणतात कार्तिकेया, सर्व लोकांचा अधिपति व सर्व देवांस मान्य असणाऱ्या श्रीविष्णूच्या दोन हातांत शंख आणि चक्र अशीं दोन आयुधें आहेत त्या दोन आयुधांची मूळ उत्पत्ति कशी झाली ? (२) आणि तीं दोन्हीं आयुधें त्रिशूल धारण करणाऱ्या श्रीशिवापासून विष्णूस कशीं मिळालीं ? आणि कोणत्या वेळीं मिळालीं ? हा सर्व कथाभाग तूं मला सांग. तूं मोठा बुद्धिमान् आहेस. असा अगस्त्याचा प्रश्न ऐकून—

(३) कार्तिकेय ह्मणाले—हे ब्राह्मणश्रेष्ठ अगस्त्यऋषे हा सर्व कथाभाग मी तुला सांगतों तूं एकाग्रमनानें ऐकून घे. हा कथाभाग वेदांत देखील महत्वाचा मानलेला असून हा ऐकिला असतां मोठमोठ्या पापांचा नाश होतो आणि सर्व प्रकारच्या कल्याणांची वृद्धि होते. (४) अगोदर हें सर्व ब्रह्मदेवानें निर्माण केलेलें स्थावर जंगम विश्व श्रीशिवाच्या इच्छेप्रमाणें नाहींसें झालें व जिकडे तिकडे अंधारच अंधार झाला. (५) त्यावेळीं ब्रह्मदेव नव्हता, श्रीहरि नव्हता, इंद्र नव्हता, सूर्य नव्हता, चंद्र नव्हता, दिशा नव्हत्या, पृथ्वी वगैरे सात लोक नव्हते, चवदा लोक नव्हते. सारांश, सदाचारी अगस्त्यऋषे, त्यावेळीं कांहींएक नव्हतें. (६) जिकडे तिकडे अंधारच अंधार पसरला होता तेव्हां परमेश्वर पराशिव आपल्या प्रकृतीस आपले जवळ आकर्षण करून बसला होता आणि त्याचवेळीं त्यानें लीलेनें मायेस खवळून सोडून तिच्या पोटीं ब्रह्मदेव आणि विष्णु ह्या

ह्येवं च॥६॥स्वयमेव तमःपारे शिवः कारणपूरुषः॥ प्रकृतिं स्वामवष्टभ्य यश्चात्मन्यवसत्सुखी ॥७॥ ब्रह्मा विष्णुश्च तावादौ प्रलयाब्धौ निपातितौ॥तमसा शिवमज्ञात्वा बालाविव विचेरतुः ॥८॥ प्रलयाब्धौ निमज्य तावुन्मज्जंतौ पुनः पुनः॥ चकितौ रोदमानौ च भृशं भीताविवार्भकौ ॥९॥ दृष्ट्वेदृशीमवस्थां तु तयोर्देवः सदाशिवः॥ तत्तमो नाशयामास तयोरुपकृते तदा ॥१०॥ बलेन घोषयामास ज्ञानं च प्रददौ तयोः॥ शिवेच्छया हतभयौ प्रबलौ च जलोपरि ॥ किंचिज्ज्ञानसमापन्नौ ब्रह्मविष्णू बभूवतुः ॥११॥ तावन्योन्यमजानन्तावहंकारपरायणौ ॥ अन्योन्यं प्रेक्षतुः क्रोधाद्भृशं संरक्तलोचनौ ॥१२॥ को भवानिति चान्योन्यं गर्जमानौ पुनः पुनः ॥ कर्ताहं जगतश्चेति स्रष्टाहमिति सत्तमः॥संहर्ता चाहमिति तौ पुनः पुनरवोचतुः ॥१३॥ बाहुभिः समसज्जेतां तावन्योन्यं महाबलौ ॥ ब्रह्मविष्णू समागम्य त्वन्योन्यं चापि जघ्नतुः ॥ मुष्टि-

---

दोघांस उत्पन्न केलें. (७) आणि स्वतः तो पराशिव तशा दाट अंधारांत आपल्या शक्तीनें मायेस आकर्षण करून आपण आपल्या आत्मानंद स्वरूपांत निमग्न राहिला. (८) त्यावेळीं अगोदर ते ब्रह्मदेव आणि विष्णु त्या प्रलयकाळच्या वेळच्या समुद्रांत पडले ते तमोगुणामुळें शिवास यथार्थ रीतीनें न जाणतां वेड्यासारखे इकडे तिकडे फिरूं लागले. (९) ते प्रलयसमुद्रांत वरचेवर वरचेवर बुडूं लागले वर येऊं लागले व अतिशय घाबरून जाऊन भ्यालेल्या मुलांसारखे रडूं लागले. (१०) अशी त्यां दोघांची अवस्था झालेली पाहून परमेश्वर श्रीशिवांनीं त्या दोघांवर उपकार करण्यासाठीं त्यावेळीं तो सर्व अंधकार एकदम नाहींसा केला. (११) व आपल्या आंगच्या अलौकिक सामर्थ्यानें त्या दोघांस श्रीशिवांनीं ज्ञान शिकविलें. त्यामुळें श्रीशिवाच्या इच्छेनें ते दोघेजण प्रबळ होऊन निर्भयपणानें समुद्राच्या पाण्यावर फिरूं लागले. आणि त्या दोघांस कांहीं थोडें शिवज्ञान झालें. (१२) त्या दोघांनींही एकमेकांस ओळखिलें नाहीं ते दोघे गर्वानें फुगून गेले, व ते दोघे रागानें डोळे लाल करून एकमेकांकडे पाहूं लागले. (१३) ते एकमेकांस तूं कोण ? तूं कोण ? असें मोठमोठ्यानें ओरडून विचारूं लागले. आणि मी ह्या जगाचा कर्ता, मी ह्या जगाचा उत्पन्नकर्ता, मी ह्या जगाचा संहारकर्ता असें आपल्यास पुनः पुनः ह्मणूं लागले. (१४) ते दोघेजणही मोठे बळकट होते ते दोघेजण एकमेकांवर हात उगारून मारण्यास धांवले आणि ते दोघे परस्पर मारामारी करूं लागले त्यांनीं परस्परांशी मुठींनीं, गुडघ्यांनीं, व

भिर्जानुभिश्चैव शिरोभ्यां चापि जघ्नतुः ॥१४॥ दिव्यं वर्षसहस्रं तु ब्रह्मविष्ण्वोः परस्परम् ॥ युद्धमेवमभूद्विप्र क्रुद्धयोरप्स्वनारतं ॥१५॥ तदा वर्षसहस्रान्ते तावुभौ श्रमकर्शितौ ॥ विषण्णौ पेततुस्तस्मिन् जलोपरि महाबलौ ॥१६॥ शीर्णजर्जरितांगौ तु पतितौ वीक्ष्य शंकरः ॥ कृपया जीवयामास स्वशक्त्या तौ सदाशिवः ॥१७॥ स्वप्नोत्थितावुभावेव तत्क्षणाच्च बभूवतुः ॥ जलोपरि महान्तौ तावुपविष्टौ बभूवतुः ॥१८॥ तत्रोपविष्टयोस्तावद्ब्रह्मविष्ण्वोर्महात्मनोः ॥ मध्ये समभवल्लिंगं सहसा स्थूलमैश्वरम् ॥१९॥ सूर्यकोटिप्रतीकाशं तेजःपुंजमकल्मषम् ॥ अनादिमध्यपर्यन्तं नूनं तदमितद्युति ॥२०॥ तद्दृष्ट्वा सहसा लिंगं ब्रह्मविष्णू ह्युत्तमौ ॥ विस्मयं ययतुस्तावत्किमेतदिति चोत्थितम् ॥२१॥ ऊर्ध्वाधः परितस्तस्य प्रेक्षमाणौ मुहुर्मुहुः ॥ प्रशान्तरोषाव-

---

मस्तकांनीं पुष्कळ मारामारी केली. (१५) असो. अगस्त्यऋषे, ते दोघे (ब्रह्म विष्णु) रागानें फार खवळले होते, त्या दोघांचें समुद्राच्या पाण्यांत देवांचीं एक हजार वर्षेपर्यंत अहोरात्र मोठें तुंबळ युद्ध झालें. (१६) मग एक हजार वर्षे पर्यंत अहोरात्र युद्ध झाल्यावर ते दोघेही अगदीं थकून गेले, त्यांचीं तोंडें सुकून गेलीं व ते दोघे मोठे बळकट होते खरे तरी व्याकुळ होऊन समुद्राच्या पाण्यावर बेशुद्ध पडले. (१७) त्या दोघांच्या आंगांचे सांधे ढिले झाले, व ते बेशुद्ध होऊन पाण्यावर प्रेतासारखे पडले अशी त्या दोघांची अवस्था पाहून श्रीसदाशिवांनीं त्या दोघांस आपल्या शक्तीनें पुनः सावध केले. (१८) झोंपेंतून जागें झाल्यासारखी त्या दोघांची अवस्था झाली व पाण्यावर ते दोघेजणही पूर्वीप्रमाणें उठून बसले. (१९) ते मोठे पराक्रमी ब्रह्मदेव आणि श्रीविष्णु उठून बसल्याबरोबर त्या दोघांच्या मध्यें एकाएकीं एक मोठें थोरलें शिवलिंग उत्पन्न झालें. (२०) तें शिवलिंग एककोटि सूर्यासारखें तेजस्वी होतें, तें केवळ तेजाचा गोळा असल्यासारखें दिसत असून तें कोणत्याही तऱ्हेनें दोष देण्यासारखें नव्हतें, त्याला आदि, मध्य, अंत ह्या तिन्हीही अवस्था नव्हत्या, त्याची खरोखर अतिशय कांति होती. (२१) तें अलौकिक तेजस्वी शिवलिंग एकदम पाहतांच त्या दिव्य सामर्थ्य आंगीं असणाऱ्या ब्रह्मदेव आणि विष्णूस मोठें आश्चर्य वाटलें आणि ते मनांत ह्मणूं लागले कीं, "आतांचे आतां एकाएकीं हें काय उत्पन्न झालें"! (२२) ते दोघेजण त्या शिवलिंगाच्या खालीं वर चोहोंकडे वारंवार वारंवार पाहू

न्योन्यमूचतुर्विस्मयाननौ॥२२॥ किमेतदावयोर्मध्ये चोत्थितं तु महाजलात् ॥ सूर्यकोटिप्रतीकाशं तेजःपुंजमनौपमम् ॥२३॥ चक्षुर्हणं महास्थूलमाद्यन्तरहितं शुभम् ॥दृष्ट्वावयोर्भृशं प्रीतिरभवल्लिंगमुत्तमम्॥२४॥ नूनमेतस्य लिंगस्य प्रभावात्परमेष्ठिनः ॥ आवां जातौ महाभागौ ब्रह्मविष्णू महाबलौ ॥२५॥ अन्धत्वमावयोः पूर्वमेतस्मान्नात्र संशयः ॥ प्रणाशितं तमः पश्चाद्देवेन करुणात्मना ॥२६॥ बलं ज्ञानं च रोषं च द्वेषं युद्धं च वै पुनः ॥ मूर्च्छा च संज्ञा लाभश्च एतस्मादावयोर्ध्रुवम् ॥२७॥ आवयोर्मोहनाशार्थं संदेहोच्छित्तये सताम् ॥ लिंगमेतत्समुत्पन्नं मूलमेव तथावयोः ॥२८॥ एतल्लिंगस्य पश्यावो मूर्धानं मूलमेव च ॥ करवावः स्तुतिं पश्चात्तुष्ट्यै लिंगस्य भक्तितः ॥२९॥ इत्येवमुक्त्वा तौ

---

लागले, त्यांच्या मनांतील परस्परांविषयींचें वैर नाहींसें झालें व ते आश्चर्यमुद्रेनें एकमेकांस ह्मणूं लागले. (२३) आपणां दोघांमध्यें एकाएकीं पाण्यांत हें काय उत्पन्न झालें ? हें एककोटि सूर्यासारखें तेजस्वी असून ह्याची तुलना करितां येण्यासारखा पदार्थ आजपर्यंत आह्मीं कधींही पाहिला नाहीं. (२४) ह्या लिंगाला पाहतांच आमचे डोळे दिपून जातात, हें फारच मोठें आहे, ह्याला आदि, मध्य, अंत ह्या तिन्ही अवस्था नाहींत, हें सुंदर आहे. ह्या उत्तम लिंगास पाहिल्याबरोवर आपणां दोघांचीही ह्या लिंगावर भक्ति बसली. (२५) खरोखर ह्या परमेश्वराच्या लिंगाच्या सामर्थ्यानें आपण ब्रह्मदेव आणि विष्णु हे दोघेही मोठे दैवशाली उत्पन्न झालों. (२६) आपण पूर्वीं काळ्या कुट्ट अंधारांत आंधळे होऊन पडलों होतों ते तरी ह्या लिंगास यथार्थ रीतीनें न जाणल्यामुळेंच पडलों ह्यांत संशय नाहीं. मग मागाहून ह्या परमेश्वराच्या मनांत दया येऊन तो आंधार तरी ह्या परमेश्वरानेंच नाहींसा केला. (२७) आपणां दोघांस शक्ति, शहाणपण, राग, वैर, युद्ध बेसावधपणा, सावधपण, लाभ वगैरे सर्व ह्या परमेश्वरानेंच दिले. (२८) आपणां दोघांस इतका वेळ जी कांहीं अज्ञानदशा होती त्या अज्ञानदशेचा नाश करण्याकरितां व विद्वान लोकांचे मनांत कांहीं संशय आले तर ते दूर करण्याकरितां हें शिवलिंग निर्माण झालें, हें लिंगच आपणां दोघांचें मूल उत्पत्तिस्थान आहे. (२९) आतां आपण दोघे आधीं हें लिंग वर किती उंच आहे आणि खालीं किती खोल आहे तें पाहूं नंतर ह्या लिंगाची आपणांवर कृपा होण्यासाठीं लिंगाची स्तुति करूं. (३०) ते समुद्राच्या पाण्यावर बसलेले महापराक्रमी ब्रह्मदेव

देवौ ब्रह्मविष्णू जले स्थितौ॥ऊर्ध्वमाचक्रमे ब्रह्मा विष्णुश्चाधो महाबलः ॥३०॥ मूलं लिंगस्य मूर्धानं चोभौ द्रष्टुं समीच्छया ॥ दिव्यं वर्षसहस्रं तु लिंगस्याधोर्ध्वमुत्तमौ ॥ गत्वा गत्वा प्रविश्रान्तावशक्तौ द्रष्टुमीशितुः ॥३१॥ पुनर्वर्षसहस्रेण नालं वाप्तुं सुरोत्तमौ॥ निवृत्यागत्य तं देशं तस्थतुः खिन्नमानसौ ॥३२॥ ततस्तस्मै प्रणम्योभौ पुनः पुनररिंदमौ ॥ कृतांजलिपुटौ भूत्वा चक्रतुः स्तुतिमुत्तमाम् ॥३३॥

ब्रह्मविष्णू ऊचतुः ॥ नमोऽस्तु शिवलिंगाय शुद्धलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु बुद्धिलिंगाय ज्ञानलिंगाय ते नमः ॥३४॥ नमो विज्ञानलिंगाय ज्योतिर्लिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु ब्रह्मलिंगाय ज्ञप्तिलिंगाय ते नमः ॥३५॥ नमोऽस्तु सत्वलिंगाय रजोलिंगाय ते नमः ॥ नमः प्रकृतिलिंगाय तमोलिंगाय ते नमः ॥३६॥ नमः प्रधानलिंगाय मायालिंगाय ते

---

आणि विष्णु असा परस्पर विचार करून ब्रह्मदेव वर आकाशाकडे गेला आणि विष्णु खालीं पाताळांत गेला (३१) ह्या लिंगाचें मूळ खालीं किती खोल आहे ! आणि हें लिंग वर किती उंच आहे ? हें पाहण्याकरितां ते दोघेही देवांचीं एक हजार वर्षें लोटतील इतका काळ होईपर्यंत रात्रंदिवस फिरले. परंतु त्या परमेश्वराच्या लिंगाचा अंत त्या दोघांसही लागला नाहीं. (३२) त्या लिंगाचा तर अंत लावूंच लावूं अशा दृढनिश्चयानें ते देवाधिदेव ब्रह्मदेव आणि विष्णु पुनः आणखी देवांचीं एक हजार वर्षें होईपर्यंत फिरले परंतु त्यांस अंत लागला नाहीं तेव्हां ते निराश होऊन तेथून माघारे फिरून आपल्या पूर्वस्थलास आले. (३३) नंतर आपल्या शत्रूंचा पुरा मोड करणाऱ्या त्या दोघां ब्रह्मदेव आणि विष्णूंनीं आपले हात जोडले आणि त्या शिवलिंगासमोर उभे राहून भक्तिभावानें चांगल्या तऱ्हेनें लिंगाची स्तुति केली.

(३४) ब्रह्मदेव आणि विष्णु ह्मणाले—परमेश्वरा, तूं शिवलिंग आहेस, तुला नमस्कार असो, तूं शुद्धलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं बुद्धिलिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं ज्ञानलिंग आहेस, तुला नमस्कार असो. (३५) तूं विज्ञानलिंग आहेस, तुला नमस्कार असो, तूं ज्योतिर्लिंग आहेस, तुला नमस्कार असो, तूं ब्रह्मलिंग आहेस तुला नमस्कार असो; तूं ज्ञप्तिलिंग आहेस तुला नमस्कार असो. (३६) तूं सत्वलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं रजोलिंग आहेस, तुला नमस्कार असो, तूं प्रकृतिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं तमोलिंग आहेस तुला नमस्कार असो. (३७) तूं प्रधानलिंग आहेस तुला नमस्कार असो,

नमः ॥ नमो निर्गुणलिंगाय नमः सगुणलिंगिने॥३७॥ नमश्चैतन्यलिंगाय महा लिंगाय ते नमः॥नमोऽस्तु चित्तलिंगाय बुद्धिलिंगाय ते नमः॥३८॥ नमोऽहंकारलिंगाय नमो वैकारलिंगिने ॥ नमस्तामसलिंगाय शब्दलिंगाय ते नमः ॥३९॥ नमोऽस्त्वाकाशलिंगाय स्वर्गलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु वायुलिंगाय दीप्तिलिंगाय ते नमः ॥४०॥ नमस्तेऽस्त्वग्निलिंगाय रसलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु जललिंगाय गंधलिंगाय ते नमः ॥४१॥ नमोऽस्तु भूमिलिंगाय घ्राणलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु जिह्वालिंगाय चक्षुलिंगाय ते नमः ॥४२॥ त्वग्लिगाय नमस्तेऽस्तु श्रोत्रलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तूपस्थलिंगायानंदलिंगाय ते नमः ॥४३॥ नमोऽस्तु पायुलिंगायोत्सर्गलिंगाय ते नमः॥नमोस्तु पादलिंगाय गतिलिंगाय ते नमः ॥४४॥ नमोस्तु पाणिलिंगाय नतिलिंगाय ते नमः ॥ न-

---

तूं मायालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं निर्गुणलिंग आहेस तुला नमस्कार असो; तूं सगुणलिंग आहेस तुला नमस्कार असो. (३८) तूं चैतन्यलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं महालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं चित्तलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं बुद्धिलिंग आहेस तुला नमस्कार असो. (३९) तूं अहंकारलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वैकारलिंगी आहेस तुला नमस्कार असो, तूं तामसलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं शब्दलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४०) तूं आकाशलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं स्वर्गलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वायुलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं दीप्तिलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४१) तूं अग्निलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं रसलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं जललिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं गंधलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४२) तूं भूमिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं घ्राणलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं जिह्वालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं नेत्रलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४३) तूं त्वक्लिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं श्रोत्र (कर्ण) लिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं उपस्थलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं आनंदलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४४) तूं पायुलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं उत्सर्गलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं पादलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं गतिलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४५) तूं पाणिलिंग आहेस

मोऽस्तु वाग्विलिंगाय वचोलिंगाय ते नमः ॥४५॥ नमोऽस्तु शक्तिलिंगाय तत्वलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु वनलिंगाय ब्रह्मलिंगाय ते नमः ॥४६॥ नमोऽस्तु विष्णुलिंगाय रुद्रलिंगाय ते नमः॥नमस्त्रिशक्तिलिंगाय त्र्यग्निलिंगाय ते नमः ॥४७॥ नमस्त्र्यक्षरलिंगाय त्रयीलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु हेमलिंगाय रत्नलिंगाय ते नमः ॥४८॥ नमोऽस्तु रसलिंगाय ज्योतिर्लिंगाय ते नमः ॥ नमोस्तु भाग्यलिंगाय धनलिंगाय ते नमः ॥४९॥ नमो लोहकलिंगाय शिलालिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु सूत्रलिंगाय फललिंगाय ते नमः ॥५०॥ नमोऽस्तु रसलिंगाय भिषग्लिंगाय ते नमः ॥ नमोऽस्त्वायुधलिंगाय युद्धलिंगाय ते नमः ॥५१॥ नमोऽस्तु वेदलिंगाय युगलिंगाय ते नमः ॥ नमोस्तु वर्णलिंगाय धर्मलिंगाय ते नमः ॥५२॥ नमोऽस्त्वाश्रमलिंगाय कोशलिंगाय ते नमः ॥

---

तुला नमस्कार असो, तूं नतिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वाणिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वचोलिंग आहेस तुला नमस्कार असो, (४६) तूं शक्तिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं तत्वलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वनलिंग आहेस, तुला नमस्कार असो. तूं ब्रह्मलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४७) तूं विष्णुलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं रुद्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं त्रिशक्तिलिंग ( इच्छा ज्ञान आणि क्रिया ) आहेस तुला नमस्कार असो, तूं त्र्यग्नि ( दक्षिणाग्नि, गार्हपत्य आहवनीय ) लिंग आहेस तुला नमस्कार असो.(४८)त्र्यक्षर (आकार उकार मकार) लिंग आहेस तुला नमअसो, तूं त्रयी ( वेद ) लिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं सुवर्णलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं रत्नलिंग आहेस तुला नमस्कार असो. (४९) तूं रस ( जल ) लिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं ज्योतिर्लिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं भाग्यलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं धनलिंग आहेस तुला नमस्कार असो, (५०) तूं लोहलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं शिलालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं सूत्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं फललिंग आहेस तुला नमस्कार असो. (५१) तूं रसलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वैद्यलिंग आहेस तुला नमस्कार असो; तूं आयुधलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं युद्धलिंग आहेस तुला नमस्कार असो. (५२) तूं वेदलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं युगलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वर्णलिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं धर्मलिंग आहेस तुला नमस्कार असो. (५३) तूं आश्र-

नमोऽस्तु वज्रलिंगाय कर्मलिंगाय ते नमः ॥५३॥ नमोऽस्तु तर्कलिंगाय लोकलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु यक्षलिंगाय रजोलिंगाय ते नमः ॥५४॥ नमोऽस्तु गुह्यलिंगाय भूतलिंगाय ते नमः ॥ नमः किन्नरलिंगाय नमः कूष्माण्डलिंगिने ॥५५॥ नमः किंपुरुषलिंगाय नमो वेताललिंगिने ॥ नमो गंधर्वलिंगाय सिद्धलिंगाय ते नमः ॥५६॥ सुविद्याधरलिंगाय नमो देवर्षिलिंगिने ॥ नमो ब्रह्मर्षिलिंगाय नमो राजर्षिलिंगिने ॥५७॥ नमोऽस्तु योगलिंगाय पक्षिलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु गर्भलिंगाय नमो नक्षत्रलिंगिने ॥५८॥ नमो मनुष्यलिंगाय विप्रलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु क्षत्रलिंगाय वैश्यलिंगाय ते नमः ॥५९॥ नमोऽस्तु शूद्रलिंगाय अन्त्यलिंगाय ते नमः ॥ नमो जरायुलिंगाय नरलिंगाय ते नमः ॥६०॥ नमोऽस्तु पशुलिंगाय मृगलिंगाय ते नमः ॥

---

मलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं कोशलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वज्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं कर्मलिंग आहेस आहेस तुला नमस्कार असो. (५४) तूं तर्कलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं लोकलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं यक्षलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं रजोलिंग आहेस तुला नमस्कार असो. (५५) तूं गुह्यलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं भूतलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं किन्नरलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं कूष्मांण्ड ( राक्षसभेद ) लिंगी आहेस तुला नमस्कार असो, (५६) तूं किंपुरुषलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वेताललिंगी आहेस तुला नमस्कार असो, तूं गंधर्वलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं सिद्धलिंग आहेस तुला नमस्कार असो. (५७) तूं सुविद्याधरलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं देवर्षिलिंगी आहेस तुला नमस्कार असो, तूं ब्रह्मर्षिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं राजर्षिलिंगी आहेस तुला नमस्कार असो. (५८) तूं योगलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं पक्षिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं गर्भलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं नक्षत्रलिंगी आहेस तुला नमस्कार असो. (५९) तूं मनुष्यलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं ब्राह्मणलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं क्षत्रियलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वैश्यलिंग आहेस तुला नमस्कार असो, (६०) तूं शूद्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं अंत्यलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं जरायुलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं नरलिंग आहेस तुला नमस्कार असो. (६१) तूं पशुलिंग आहेस तुला नमस्कार

नमोऽस्तूद्भिदलिंगाय वृक्षलिंगाय ते नमः॥६१॥नमोऽस्त्वण्डजलिंगाय पक्षिलिंगाय ते नमः॥ नमः स्वेदजलिंगाय क्रिमिलिंगाय ते नमः ॥६२॥ नमोऽस्तु ब्रह्मलिंगाय क्रियालिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु तीर्थलिंगाय क्षेत्रलिंगाय ते नमः ॥६३॥ नमोऽस्तु कृच्छ्रलिंगाय तपोलिंगाय ते नमः॥ नमोऽस्तु दानलिंगाय होमलिंगाय ते नमः॥६४॥ नमोऽस्तु पूजालिंगाय जपलिंगाय ते नमः ॥ नमः प्रणामलिंगाय ध्यानलिंगाय ते नमः ॥६५॥ नमोऽस्तु मंत्रलिंगाय तंत्रलिंगाय ते नमः॥ नमोऽस्तु दीक्षालिंगाय दक्षिणालिंगिने नमः ॥६६॥नमोऽस्तु क्रूरलिंगाय सौम्यलिंगाय ते नमः॥ नमोऽस्तु स्थूललिंगाय सूक्ष्मलिंगाय ते नमः ॥६७॥ नमोऽस्तु रागलिंगाय द्वेषलिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु मदलिंगाय मोहलिंगाय ते नमः ॥६८॥नमोऽस्तु लोभलिंगाय क्रोधलिंगाय ते नमः ॥ नमो मात्सर्यलिं-

---

असो, तूं मृगलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं उद्भिदलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं वृक्षलिंग आहेस तुला नमस्कार असो, (६२) तूं अंडजलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं पक्षिलिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं स्वेदजलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं क्रिमिलिंग आहेस तुला नमस्कार असो. (६३) तूं ब्रह्मलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं क्रियालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं तीर्थलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं क्षेत्रलिंग आहेस तुला नमस्कार असो. (६४) तूं कृच्छ्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं तपोलिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं दानलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं होमलिंग आहेस तुला नमस्कार असो. (६५) तूं पूजालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं जपलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं प्रणाम ( नमस्कार ) लिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं ध्यानलिंग आहेस तुला नमस्कार असो. (६६) तूं मंत्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं तंत्रलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं दीक्षालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं दक्षिणालिंग आहेस तुला नमस्कार असो. (६७) तूं क्रूरलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं सौम्यलिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं स्थूललिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं सूक्ष्मलिंग आहेस तुला नमस्कार असो. (६८) तूं रागलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं द्वेषलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं मदलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं मोहलिंग आहेस तुला नमस्कार असो, (६९) तूं लोभलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं क्रोधलिंग आहेस तुला नमस्कार असो. तूं मात्सर्यलिंग

गाय शोकलिंगाय ते नमः ॥६९॥नमोऽस्त्वनादिलिंगाय रसलिंगाय ते नमः ॥ नमः पिपासालिंगाय क्षुधालिंगाय ते नमः ॥७०॥ नमोऽस्तु तीक्ष्णलिंगाय तृषालिंगाय ते नमः ॥ नमोऽस्तु दमलिंगाय शमलिंगाय ते नमः ॥७१॥नमोऽस्तु शांतिलिंगाय नमो विज्ञप्तिलिंगिने ॥ अलिंगाय विलिंगाय सुलिंगाय नमो नमः॥७२॥ सर्वलिंगाय सर्वाय सर्वभूताय ते नमः ॥ सर्वेश्वराय शांताय ह्युमाकान्ताय मीढुषे ॥७३॥ सर्वज्ञाय विशिष्टाय सर्वमांगल्यदायिने ॥ भक्तानुकंपिने नित्यं नमस्ते परमेश्वर॥ क्षमस्व दर्शयात्मानं पाहि चास्मान्नमो व्रतान् ॥७४॥ एतस्माच्च परं रूपं यत्तत्परतरं तव ॥ विभो दर्शय देवेश साकारं परमेश्वर ॥७५॥ इति स्तुतो लिंगमूर्तिर्भगवान्परमेश्वरः ॥ देवयोर्दर्शयामास स्वरूपम-

---

आहेस तुला नमस्कार असो, तूं शोकलिंग आहेस तुला नमस्कार असो. (७०) तूं अनादिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं रसलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं पिपासालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं क्षुधालिंग आहेस तुला नमस्कार असो. (७१) तूं तीक्ष्णलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं तृषालिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं दमलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं शमलिंग आहेस तुला नमस्कार असो. (७२) तूं शांतिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं विज्ञप्तिलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं अलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं विलिंग आहेस तुला नमस्कार असो, तूं सुलिंग आहेस तुला नमस्कार असो.(७३) तूं सर्वलिंग आहेस तुला नमस्कार असो, तुला सर्व (शर्व) ह्मणतात तुला नमस्कार असो, तुला सर्वभूत ह्मणतात तुला नमस्कार असो. तूं सर्वेश्वर आहेस तुला नमस्कार असो, तुझा स्वभाव शांत आहे तुला नमस्कार असो, तूं पार्वतीचा पति आहेस तुला नमस्कार असो. तुला मीढुष ह्मणतात तुला नमस्कार असो. (७४) तूं सर्वज्ञ आहेस तुला नमस्कार असो, तूं सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेस तुला नमस्कार असो, तूं सर्व प्रकारचीं कल्याणें प्राप्त करून देतोस तुला नमस्कार असो, तूं भक्तलोकांवर दया करणारा आहेस तुला नमस्कार असो, तूं परमेश्वर आहेस तुला नेहमीं नेहमीं नमस्कार असो. परमेश्वरा, तूं आमच्या अपराधांची क्षमा कर, आह्मीं तुला नेहमीं नमस्कार करण्याचेंच व्रत घेतलें आहे तूं आमचें रक्षण कर. (७५) आह्मीं हें जें तुझें स्वरूप पाहिलें त्यापेक्षां श्रेष्ठ असें जें स्वरूप असेल तें साकाररूप देवाधिदेवा परमेश्वरा तूं आह्मांस दाखव. (७६) ब्रह्मदेवानें आणि श्रीविष्णूनें अशी स्तुति केल्यावर लिंगस्वरूपी परमेश्वर श्रीशि-

मलं परम् ॥७६॥ लिंगमध्ये ततोरूपं ज्योतिर्मात्रमनौपमम् ॥ सुसूक्ष्मं निर्मलं शुद्धस्फटिकज्योतिसन्निभम् ॥७७॥ सर्वज्ञं सर्वभूतस्थं सर्वभूतगुहाशयम् ॥ सर्वरूपं सदा शांतं शिवाख्यममृतं परम् ॥७८॥ तद्दृष्ट्वा परमं रूपं शिवस्य परमात्मनः ॥ प्रणामं चक्रतुर्भक्त्या ब्रह्मविष्णू मुहुर्मुहुः ॥७९॥ ततः परं महारूपं लिंगमध्ये व्यवस्थितम् ॥ चतुर्बाहुमुदारांगं सूर्यकोटिसमप्रभम् ॥८०॥ नानामणिसमाकीर्णं नानालक्षणलक्षितम् ॥ सौम्यं सुसौम्यवदनं त्रिनेत्रं सुमनोहरम् ॥८१॥ ऊर्ध्वदक्षिणहस्तेन बिभ्राणं परशुं शिवम् ॥ सारषट्कयुतं शास्त्रं षट्दर्शनमयं शुभम् ॥८२॥ वेदं चतुर्वै पादं च चतुःषष्ठिकलामयम् ॥ मृगं वामोर्ध्व-

---

वानें आपलें निष्पाप व श्रेष्ठ स्वरूप त्या दोघांस दाखविलें. (७७) त्यावेळीं लिंगाच्यामध्यें त्या दोघांस अलौकिक असें रूप दिसलें तें अतिशय तेजस्वी असून त्याची बरोबरी करूं शकेल असा दुसरा पदार्थ नव्हता, तें फारच सूक्ष्म असून निर्मळ होतें, लखलखित स्फटिक मण्यासारखी त्याची कांति होती. (७८) तें तेज सर्वज्ञ होतें, तें तेज सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत राहणारें होतें, तें सर्व प्राणिमात्रांच्या अंतरात्म्यांत राहणारें तेज होय. तें सर्वतोपरी सुंदर होतें, तें नेहमीं शांत होतें, त्याला शिव असें नांव असून तें मुख्य मोक्षस्थानच होय. (७९) परमेश्वर श्रीशिवाचें तें अलौकिक स्वरूप पाहून ब्रह्मदेवानें आणि श्रीविष्णूनें त्यास वारंवार वारंवार नमस्कार केले. (८०) तें श्रेष्ठ तेज लिंगाच्या मध्यभागीं होतें, त्याला चार हात असून त्याचें सौंदर्य अलौकिक होतें, एक कोटिसूर्यांसारखें तें तेजस्वी होतें, (८१) त्याच्या आंगावर अनेक प्रकारचे रत्नांचे अलंकार होते, त्या रूपाच्या आंगीं अनेक चांगल्या चांगल्या प्रकारचीं लक्षणें असलेलीं दिसत होतीं. तें स्वरूप फार शांत असून त्याचें तोंड फारच सतेज दिसत होतें, त्यास तीन डोळे होते, तें स्वरूप फारच मोहक होतें. (८२) त्यानें उजवे बाजूकडील सर्वांच्या वरच्या हातांत कुऱ्हाड घेतली होती, त्याला शिव असें नांव होतें, ज्यांत चांगलीं चांगलीं सहा तत्वें सांगितलीं आहेत असें षट्दर्शन नांवाचें शास्त्र त्यानें आपलें एका हातांत घेतलें होतें, (८३) ज्यांत चौसष्ट कला आहेत असे चार वेद त्यानें आपल्या डावेकडील बाजूचे वरील हातानें धरलेल्या हरणाच्या चारी पायांसारखे शोभत होते तो हरिण पायास बळकट धरल्यामुळें बाहेर निसटून जाण्याचा यत्न करीत असल्यासारखा दिसत

हस्तेन बिभ्राणं च बहिर्मुखम्॥८३॥वामांकगां शिवां मायां शक्तिं तां वामबाहुना ॥ दृढमाश्लिष्य तद्वामकुचाचुंबनतत्परम् ॥८४॥ धर्मार्थकाममोक्षादीन् दिशन्तं दक्षपाणिना ॥ वरदाख्येन संयुक्तं चारुचंद्रकलार्चितम् ॥८५॥ विज्ञानेंदुकलाबद्धजटामुकुटधारिणम् ॥ शक्त्या दक्षिणहस्तेन समाश्लिष्टं दृढं मुदा ॥८६॥ तस्या वामकराबद्धलीलाब्जपरिवीजितम् ॥ तस्या नेत्राख्यभृंगाभ्यामापीतवदनांबुजम् ॥८७॥ अतीव रमणीयायास्तरुणाया मुखांबुजम् ॥ चारुदृक्तरुणांगायाः सुचुंबन्तं मुखालिना ॥८८॥ अरुणं तरुणं शान्तमतीव करुणाकरम् ॥ अरुणाब्जासनासीनं रमणीयांगमुत्तमम् ॥८९॥ लिंगमध्ये महादेवमेवं दृष्ट्वा सुरोत्तमौ ॥ प्रणामं चक्रतुर्भक्त्या स भूयोग्रं प्रवृद्धया ॥९०॥ ततो जलदगंभीरस्वरेण परमात्मवान् ॥ तावुत्थाप्याह भगवान् भगवन्तौ सुसादरम् ॥९१॥

---

होता.(८४) त्याच्या डावे अंगास पार्वती नांवाची मायाशक्ति असून तिला त्यानें डाव्या हातानें घट्ट आंवळून धरून तिचे डावेकडील स्तनाचा त्यास स्पर्श होत होता (८५) तो आपले वरदहस्तानें आपल्या भक्तांस धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चार प्रकारच्या पुरुषार्थांची प्राप्ति करून देत असे, त्याच्या मस्तकावर चंद्राची सुशोभित कला शोभत होती, (८६) ज्ञानरूपचंद्रकलेनें ज्यानें आपल्या मस्तकावरील जटा मुकुटासारख्या बांधल्या होत्या, तसेंच पार्वतीदेवीनें मोठ्या आनंदानें उजव्या हातानें त्यास आंवळून धरिलें होतें. (८७) पार्वतीनें आपल्या डाव्या हातांत एक लीला कमल घेतलें होतें व त्या कमलानें ती त्यास हळु हळु वारा घालीत होती व तिचे दोन्ही डोळे भुंग्यासारखे श्रीशिवाच्या मुखकमलाकडे सारखे गुंतून राहिले होते. (८८) पार्वतीचें स्वरूप तर फारच मनोहर असून तिचें वय तरुण होतें, त्या तरुणांगीचें मुखकमल सुंदर नेत्र असणारे श्रीशिव आपल्या मुखरूप भ्रमरांनीं चुंबन घेऊन शोभवीत होते. (८९) त्यांचें रूप लाल असून त्यांचें वय तरुण होतें, त्यांची मुद्रा फारच शांत, व अतिशय दयाळू होती. ते लाल रंगाच्या कमलावर बसले होते, त्यांचें शरीर फारच सुंदर आणि मनोहर होतें. (९०) असो, त्या तेजोमय लिंगांत अशा रीतीचें श्रीशिवाचें रूप पाहून देवश्रेष्ठ ब्रह्मदेव आणि विष्णु यांच्या मनांत शिवाविषयीं भक्ति जास्त जास्त वाढली आणि त्यामुळें ते शिवास वारंवार नमस्कार करूं लागले. (९१)तें पाहून तेव्हां मेघगर्जनेसारख्या गंभीर शब्दानें त्या दोघांस उठवून श्रीमहादेव ह्मणाले.

ईश्वर उवाच ॥ युवयोः सुप्रसन्नोहं भक्त्या निर्व्याजगर्भया॥ स्तोत्रेणानेन च भृशं वृणुतामीप्सितान्वरान् ॥९२॥ इत्युक्तौ तौ भगवता ब्रह्मविष्णू सुरोत्तमौ ॥ तमूचतुः प्रणम्योभौ भक्त्या प्रणतकंधरौ॥९३॥

ब्रह्मविष्णू ऊचतुः ॥ भवे भवे भवेद्भक्तिर्भवे त्वयि शिवे भव॥ आवयोरनिशं श्रीमान् ब्रह्मविष्णवोरिहैव तु ॥९४॥ कः स्तोत्रेण तथैतेन त्वां तोष्यति सदाशिव ॥ स्तस्य श्रीरचला शश्वत्प्रभवेत्त्वत्प्रसादजा ॥९५॥ यज्ञतीर्थव्रतार्चाभिर्हुतजप्यादिभिश्च यत् ॥ फलं भवेन्नृणां देव पूजान्ते च विशेषतः ॥ एतौ भवेतां भगवन् यदि तुष्टोसि नौ वरौ ॥९६॥ तदादिश च यत्कार्यमावाभ्यां परमेश्वर ॥ दासभूतौ तव विभो किमावां करवाव ते ॥९७॥ ततस्तावाह भगवान् पुनरेव महे-

---

(९२) शिव ह्मणाले— तुह्मी दोघांनीं माझी निष्कपटपणानें भक्ति केली त्यामुळें मी तुह्मां दोघांस प्रसन्न झालों, तुह्मीं माझें स्तोत्र केलें त्यामुळें तर मला फारच संतोष झाला तर आतां तुमच्या मनास आवडतील ते मला वर मागा ते मी देण्यास तयार आहें. (९३) परमेश्वर श्रीशिवांनीं असें ह्मटल्यावर ते सर्व देवांत प्रमुख असणारे ब्रह्मदेव आणि विष्णु शिवास नमस्कार करून व नम्रतेनें मान खालीं करून शिवास ह्मणाले.

(९४) ब्रह्मदेव आणि विष्णु ह्मणाले--- श्रीशिवा, प्रत्येक जन्मांत प्रत्येक जन्मांत तुझीच भक्ति आह्मांस असावी, आह्मां दोघांवर जर तुला कृपा करावयाची असेल तर हीच कृपा कर कीं, ह्या जन्मांतही तुझीच भक्ति आह्मांस असावी. (९५) आह्मीं जें कांहीं तुझें स्तोत्र केलें तें स्तोत्र जो कोणी मनुष्य करील त्याला श्रीशिवा तुझे कृपेनें अखंडित संपत्ति मिळो. (९६) कोणी लोक यज्ञ करितात, कोणी तीर्थयात्रा करितात, कोणी व्रत करितात, कोणी अर्चा करितात, कोणी हवन करितात कोणी जप वगैरे करितात कोणी पूजेकडेच आपलें तनु मन धन खर्च करितात तर अशीं सत्कर्मैं करणारांस जें कांहीं फळ मिळत असेल तेंच फळ आह्मीं तुझें केलेलें स्तोत्र पठन करणारास होवो. असो परमेश्वरा, तूं आह्मांस प्रसन्न होऊन वर देण्यास तयार झालाच आहेस तर हे दोन वर आह्मांस दे. (९७) परमेश्वरा, तुझें आमच्याजवळ काय काम असेल तें आह्मांस सांग, परमेश्वरा आह्मी दोघे तुझ्यादासासारखे आहोंत आह्मीं आतां तुझें काय काम करावें तें सांग. (९८) असें त्यांचें बोलणें ऐकून परमेश्वर श्रीशिव त्यांस पुनः

श्वरः ॥ युवयोः पूर्वमेवास्ति मयि भक्तिरहैतुकी ॥ स्तोत्रप्रजापे च फलं भविष्यति यथोक्तवत् ॥९८॥ सर्वदानफलावाप्तिं सर्वयज्ञव्रतादिना ॥ सर्वतीर्थजपादीनां चाप्नोति स्तोत्रपाठकः ॥९९॥ लिंगमभ्यर्च्य पूजान्ते यः स्तोत्रं पठते नरः ॥ तस्य कामाः प्रसिध्यन्ति देवैरपि सुदुर्लभाः ॥१००॥ निष्कामस्तुतिमात्रेण मयि भक्तो भवेन्नरः ॥ सोऽन्ते मामेति मल्लोकमथवा कामवानपि ॥१०१॥ यक्षराक्षससर्पाद्या भूतप्रेतादयोऽपि वा॥ न दर्शयंति तं देवा यः स्तोत्रं पठति स्थितम् ॥१०२॥ सायं प्रातः पठेद्यस्तु नित्यं स्तोत्रमिदं शुभम् ॥ सोऽहमेव दिवा साक्षाद्भक्त्या भक्तिमतां वरौ ॥१०३॥ इत्युक्त्वा भगवान् यो वै ब्रह्माणं

---

ह्मणाले-सज्जनहो, तुह्मां दोघांची मजविषयीं पूर्वीपासूनच भक्ति आहे, तुह्मीं जें माझें स्तोत्र केलें तें स्तोत्र करणाराला जें कांहीं फळ मिळावें ह्मणतां तें तसें मिळेल. (९९) आणखी मी तुह्मांस असें सांगतों कीं, सर्व प्रकारचीं दानें केलीं असतां जें कांहीं फळ मिळतें, सर्व प्रकारचे यज्ञ आणि व्रतें केलीं असतां जें कांहीं फळ मिळतें, सर्व प्रकारचीं तीर्थें आणि जप केले असतां जें कांहीं फळ मिळतें, तेंच फळ तुह्मीं दोघां ब्रह्मदेव आणि विष्णु यांनीं जें माझें स्तोत्र केलें आहे तें पठण करणारांस मिळेल. (१००) लिंगाची पूजा करून पूजा झाल्यावर जो कोणी मनुष्य हें स्तोत्र ह्मणेल त्याच्या मनांतील सर्व इच्छा पूर्ण होतील. सर्व गोष्टी मनाजोग्या होणें देवांदिकांसही दुर्लभ आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु, हें स्तोत्र पाठ करणाराच्या इच्छा खात्रीनें पूर्ण होतील. (१०१) जो कोणी मनुष्य निष्काम रीतीनें माझी भक्ति करील तो मरणानंतर माझे लोकास (कैलासास) येईल. निष्कामपणानें माझी भक्ति न करितां मनांत कांहीं उद्देश धरून जरी कोणी भक्ति करील तरी तो देखील कैलासास येईल. सारांश, कोणत्याही रीतीनें केलेली माझी भक्ति व्यर्थ होणार नाहीं. (१०२) जो कोणी मनुष्य हें स्तोत्र पठण करीत बसला असेल त्याचे सभोंवतीं सर्व देव त्याचें रक्षण करण्यास उभे असतात. यक्ष, राक्षस, सर्प वगैरे, तसेच भूत, प्रेत, पिशाच वगैरे जर कोणी त्याचे धर्मकृत्यांत विघ्न करण्यास आले तर त्याचें दर्शन देखील त्यास होऊं देत नाहींत. (१०३) हे ब्रह्मदेवा, हे विष्णो, तुह्मी माझे परम भक्त आहां, जो कोणी मनुष्य रात्रीं, सकाळीं, नेहमीं आणि दिवसां माझें हें कल्याणकारक स्तोत्र करील तर तो मनुष्य प्रत्यक्ष माझेंच स्वरूप होईल ह्यांत संशय नाहीं. (१०४) असें ब्रह्मदेवास आणि विष्णूस सांगून पुनः विश्वेश्वर परमात्मा श्रीशिव त्रैलोक्य

चाह वै पुनः ॥ विष्णुं च विश्वकर्तारं विश्वकर्मा महेश्वरः ॥१०४॥

ईश्वर उवाच ॥ ब्रह्मन् शृणु महाबुद्धे विष्णो त्वं च सुरेश्वर ॥ शृणु मे वचनं सौम्यं सर्वलोकहितप्रदम् ॥१०५॥ पूर्वसृष्टं जगत्सर्वं त्वदादिकमज प्रभो ॥ संहृत्य मायया चाथ चैतया चोरुसंस्थया ॥ संक्षिप्यात्मनि संस्थाप्य त्वैनां च जगदीश्वरीम् ॥१०६॥ एक एव विशुद्धात्मा शिवः सूक्ष्मः परात्परः ॥ अहमास्ते वहोः कालाग्निर्विकारो यदृच्छया ॥१०७॥ सिसृक्षुश्च स चेदानीमेनां संक्षुभ्य पावनीम् ॥ अस्यां त्वां जनयामास ब्रह्मन् ब्रह्माणमुत्तमम् ॥१०८॥ ततो मे बुद्धिरभवत्पातारं स्रष्टुमोजसा ॥ सृष्टो प्रकल्प्य विष्णुं त्वां चासृजं त्वेनमुत्तमम् ॥१०९॥ अस्यां जातौ युवां मत्तो ब्रह्मविष्णू सुरोत्तमौ ॥ स्रष्टुं पातुं यथा पूर्वं

---

उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवास आणि विष्णूस उद्देशून ह्मणाले.

(१०५) शिव ह्मणाले–ब्रह्मदेवा ऐक, तूं मोठा बुद्धिमान् आहेस, विष्णो, तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस. मी तुह्मांस स्वस्थपणानें कांहीं सांगतों तें तुह्मी नीट ऐकून घ्या. माझें सांगणें सर्व लोकांच्या कल्याणाकरितां आहे. माझ्या सांगण्यापासून कोणाचें अनहित होणार नाहीं. (१०६) हे जन्ममरण नसणाऱ्या ब्रह्मदेवा, तुह्मी दोघेही प्रबळ आहां असो. पूर्वीं तुह्मांसुद्धां मीं हें सर्व त्रैलोक्य उत्पन्न केलें आणि आपल्या मायेनें पुनः मी ह्याचा संहार करून ह्या मायेला मी आपल्या आत्म्यांत ठेवून सुखानें राहतो. ही जी माझे मांडीवर बसलेली माया तुह्मांला दिसत आहे ती त्रैलोक्याची स्वामिनी आहे, (१०७) मायेला मी आपल्या स्वरूपांत लीन करून मी एकटाच राहतो, मी निष्पाप स्वभावाचा आहें, मला शिव ह्मणतात, मी सूक्ष्म आहे आणि मोठ्याहून मोठा आहे. मी अनंतकाळपर्यंत माझ्या इच्छेनें मी एकटाच राहतों. (१०८) मला जेव्हां सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा झाली तेव्हां मीं ह्या पवित्र मायेस खवळिलें आणि तिच्यापोटीं ब्रह्मदेवा, सद्गुणी अशा तुला पुत्ररूपानें उत्पन्न केलें. (१०९) तुला उत्पन्न केल्यावर कांहीं काळानें मला अशी बुद्धि उत्पन्न झाली कीं, ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या सृष्टीचा संरक्षण करणारा कोणी तरी उत्पन्न करावा अशा विचारानें मीं विष्णूस उत्पन्न केलें. (११०) हे ब्रह्मदेवा, हे श्रीविष्णो, तुह्मी दोघेजण सर्व देवांत श्रेष्ठ आहां, तुह्मी दोघे मजपासूनच ह्या मायेच्या पोटीं जन्मास आलां, तुमच्यापैकीं एका ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करावी आणि दुसऱ्या श्रीविष्णूनें

जगतो लोकपावनौ ॥११०॥ दास्यामि स्रष्टुं शक्तिं ते स्वयं सृजसि सत्तम ॥ यया रक्षति विष्णुश्च रक्षाशक्तिं च विष्णवे ॥१११॥ युवयोः पितरावावामंबिकात्र्यंबकाभिधौ ॥ युवयोः पितरौ देवौ जगतां नात्र संशयः ॥११२॥ मयैवाधिकृतौ पूर्वं पतितौ च जलोपरि ॥ मयैव रक्षितौ पश्चाद्वा*लज्ञानप्रदायिना ॥११३॥ अहंकारवशं प्राप्तौ मामज्ञात्वा युवां पुनः ॥ युद्धश्रान्तौ च कारुण्यान्मयैव परिरक्षितौ ॥११४॥ युवयोर्मोहनाशार्थं लिंगमेतत्प्रदर्शितम् ॥ विश्वरूपं जगद्रूपमाद्यन्तमचलं शिवम् ॥११५॥ युवयोः स्तोत्रतुष्टेन मयैव परमात्मना ॥ लिंगमध्ये परं रूपं दर्शितं योगिभिः स्मृतम् ॥११६॥ युवामृते जगन्नाथौ न कश्चिदपि दृष्टवान् ॥ चक्षुषा जायमानश्च जनिष्यो जात एव च ॥११७॥ योगि-

---

सृष्टीचें रक्षण करावें. अशीं दोघांकडे मीं दोन कामें वांटून दिलीं. (१११) हे श्रेष्ठा ब्रह्मदेवा, मी तुला स्वतः सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति देतों, त्या शक्तीच्या सहाय्यानें तूं सृष्टि उत्पन्न कर आणि श्रीविष्णूस रक्षण करण्याची मी शक्ति देतों, त्या शक्तीच्या आधारानें हा विष्णु तूं उत्पन्न केलेल्या सृष्टीचें रक्षण करील. (११२) ही पार्वती आणि मी शंकर हे आह्मी दोघे तुह्मांदोघांचे आईबाप आहोंत, आह्मी दोघे परमेश्वर आहोंत, आह्मी जसे तुह्मां दोघांचे आईबाप आहोंत, तसेच सर्व त्रैलोक्याचेही आईबाप आहोंत ह्यांत संशय नाहीं. (११३) मीच तुह्मां दोघांस अगोदर अधिकारावर नेमिलें, त्यानंतर तुह्मी पाण्यांत पडला तेव्हां मींच तुह्मांस कालज्ञान देऊन तुमचें रक्षण केलें. (११४) पुनः तुह्मीं मला यथार्थ रीतीनें न जाणतां गर्वानें फुगून गेलां व परस्पर युद्ध करून अगदीं थकून गेलां तेव्हां मींच तुह्मांवर दया करून तुमचें रक्षण केलें. (११५) तुमचें दोघांचें अज्ञान नाहींसें करवयासाठीं मीं तुह्मांस हें लिंग दाखविलें, हें लिंग त्रैलोक्यस्वरूप आहे, हें सर्व जगाचें मूळ आहे, ह्याला जन्म नाहीं व मरणही नाहीं, ह्यास चंचलपणा नसून हें कल्याणकारक आहे. (११६) तुह्मीं माझें स्तोत्र केलें त्यामुळें माझे मनास फार समाधान वाटलें, तेव्हां मी परमेश्वर असल्यामुळें तुह्मांस लिंगामध्यें मीं आपलें दिव्य रूप दाखविलें. ह्या रूपाचे योगीश्वर लोक नेहमीं चिंतन करितात. (११७) तुह्मी दोघेही सर्व जगाचे अधिपति आहां, तुमच्या खेरीज हें माझें अलौकिक रूप कोणीही पाहिलें नाहीं, ज्यानें माझें दिव्य रूप आपल्या प्रत्यक्ष डोळ्यानें पाहिलें असा मनुष्य आतां कोणी नाहीं, पुढें कधीं होणार नाहीं व मागें कधीं झाला नाहीं. (११८) फार काय सांगूं? माझें जें स्वरूप

---

* कालज्ञानप्रदायिना

नोऽपि न पश्यंति मन्मूर्तिं ध्यानचक्षुषा ॥ युवयोर्दर्शितं यत्तदक्षरं निष्कलं परम् ॥११८॥ यदेतच्छक्तियुक्तं च हस्तपादादिसंयुतम् ॥ रूपं मम सुदुर्दर्शं योगिनामपि शांकरम् ॥११९॥ एतद्रूपं सुभक्तानां सर्वमांगल्यदं शुभम् ॥ जपतां ध्यायतां नित्यमर्चितां च यतात्मनाम् ॥१२०॥ युवां च लिंगमध्ये मां सदाभ्यर्च्चयतं स्थितौ ॥ अभ्यर्चितोऽहं दास्यामि कामानिह सुदुर्लभान् ॥१२१॥ यस्माद्यो हि यजेद्रूपमेतद्भक्त्या ममानिशम् ॥ अंबिकात्र्यंबकं सौम्यं तस्मान्नान्योऽस्ति मे प्रियः॥१२२॥ तस्येहाप्यखिलान् भोगान् क्षिप्रं दास्यामि दुर्लभान् ॥ सगणं तं प्रणेष्यामि मत्समीपं मृतं नरम्॥१२३॥ युवां चार्चयतां भक्त्या लिंगं कृत्वा सुनिर्मलम् ॥ सृष्ट्वा पश्चाज्जगत्सर्वं मामन्ते समवाप्स्यथ ॥१२४॥ त्वया

---

तुह्मीं प्रत्यक्ष आपल्या दृष्टीनें पाहिलें तें योगीश्वर लोकांस ध्यान दृष्टीनेंही पहावयास मिळत नाहीं, तें अविनाशी, निष्प्रपंच आणि श्रेष्ठ आहे. (११९) जें हें शक्तिसहित मीं आपलें रूप तुह्मांस दाखविलें. ज्याला हात पाय वगैरे अवयव स्पष्ट दिसतात तें साकार शंकरस्वरूप देखील योगीश्वरांस दृष्टीस पडणें अशक्य आहे. मग निराकार स्वरूप दृष्टीस पडण्याची तर गोष्ट लांबच राहिली. (१२०) हें माझें स्वरूप सद्भक्तांच्या मात्र दृष्टीस पडतें. हें सर्व प्रकारचीं कल्याणें करून देत असून सुंदर आहे. जे माझे भक्त माझा नेहमीं जप करितात, माझें नेहमीं ध्यान करितात, जे नेहमीं पूजन करितात, ज्यांचीं इंद्रियें ज्यांच्या ताब्यांत आहेत अशा इंद्रियनिग्रहवान् लोकांस मात्र तें माझें साकार आणि निराकार रूप दिसतें, इतरांस दिसत नाहीं. (१२१) तुह्मी दोघेही आतांपासून नेहमीं लिंगांत माझी पूजा करीत जा. तुह्मीं माझी अशा रीतीनें पूजा केली ह्मणजे तुमच्या मनांत ज्या ज्या इच्छा असतील व त्या पूर्ण होणें फार अशक्य असलें तरी त्या मी पूर्ण करीन. (१२२) ह्यासाठीं जो कोणी मनुष्य हें माझें शिवपार्वती नांवाचें साकारस्वरूप नेहमीं भक्तिभावानें पूजा करील त्यापेक्षां मला दुसरा कोणीही प्रिय नाहीं. (१२३) त्याचे ह्या लोकांतील आणि परलोकांतील सर्व सुखोपभोग मिळण्यास अशक्य असले तरी मी त्यास मिळवून देईन. व मरणानंतर मी आपले गण पाठवून त्यास आपले जवळ शिवलोकास घेऊन जाईन. (१२४) तुह्मी आतां मनोहर शिवलिंग करून त्याची अगोदर पूजा करा आणि मग सृष्टि उत्पन्न करणें, रक्षण करणें वगैरे कामें करा, ह्मणजे अंतकाळीं तुह्मी दोघेही मला येऊन मिळाल. (१२५) हे ब्रह्मदेवा, तूं सर्व जग उत्पन्न केलें असें पाहून सर्व लोक

सृष्टं जगद्दृष्ट्वा त्वामेवादिमिति प्रभो ॥ निश्चित्य त्वां यजिष्यन्ति ध्यानेन च जपेन च ॥१२५॥ त्वया सृष्टमिदं सर्वं रक्षिष्यत्येव केशवः ॥ अवतारशतान् कृत्वा दैत्यान्हत्वा सहस्रशः ॥१२६॥ एष विष्णुश्च विविधैर्मानवैश्चापि मानदः ॥ पूजां लप्स्यति च त्वं च मत्प्रसादान्न संशयः ॥१२७॥ देवानामसुराणां च यक्षराक्षसपक्षिणाम् ॥ त्वदर्चकानां त्वं चापि प्रयच्छस्व समीहितान् ॥१२८॥ इत्युक्ते देवदेवेन शिवेन परमात्मना ॥ प्रणम्य भगवान्विष्णुः शिवं वचनमब्रवीत् ॥१२९॥

विष्णुरुवाच ॥ तुष्टेन भवता देव रक्षाशक्तिरियं शिव ॥ दत्ता मह्यं जगन्नाथ रक्षिष्याम्यनया कथम् ॥१३०॥अवतारशतान्कृत्वा दानवान्सुमहाबलान् ॥ ब्रह्मदत्तवरैर्दृप्तान् विहनिष्याम्यहं कथम् ॥१३१॥ निरायुधोऽहं निर्वीर्यो निःशक्तिश्च महेश्वर॥ कथं जगदिदं व्याप्तं रक्षिष्याम्य·

---

तुलाच मूलपुरुष असें मानून तुझी सर्वजण पूजा करितील, तुझें ध्यान करितील व तुझा जप करितील. (१२६) तूं जी सृष्टि उत्पन्न करशील त्या सृष्टीचें हा श्रीविष्णु रक्षण करील ह्या रक्षणासाठीं शेंकडो अवतार घेऊन हजारो दैत्यांस मारील. (१२७) ह्या विष्णूचाही हजारों मनुष्यें मान सन्मान करतील, आणि लोकांनीं ह्यास मान द्यावा अशी योग्यताही याचे अंगीं आहे. सारांश, माझ्या कृपेनें तूं (ब्रह्मदेव) आणि हा विष्णु दोघेही जगांत पूज्य व्हाल ह्यांत शंका नाहीं. (१२८) ब्रह्मदेवा, जे कोणी देव, दैत्य, यक्ष, राक्षस, पक्षी वगैरे तुझी मनोभावानें सेवा करितील त्यांचे मनोरथ पूर्ण होतील असे वर देत जा. वर देण्याचा अधिकार तुला आहे. (१२९) ह्याप्रमाणें देवाधिदेव श्रीशिवानें असें ह्मटलें असतां परमात्मा श्रीविष्णु शिवास नमस्कार करून असें ह्मणाला——

(१३०) विष्णु ह्मणाला—— परमेश्वरा, तूं मला प्रसन्न झालास आणि मला ही सृष्टि रक्षण करण्याची शक्ति ( अधिकार ) दिली, तरी पण त्रैलोक्यपते देवा ह्या एकाच शक्तीच्या साधनानें दुसरें कांहीं अजिंक्य आयुध मजपाशीं असल्यावांचून माझ्या हातून ह्या सृष्टीचें रक्षण कसें होईल? (१३१) हा ब्रह्मदेव दैत्यांचे तपश्चर्येच्या मानानें त्यांस पाहिजे तसे अडचणीचे वर देईल, त्यामुळें ते दैत्य उन्मत्त होतील, अशा हजारो हजार बलवान दैत्यांस मी शेंकडो जन्म घेऊन तरी कसा मारूं? हें काम माझे शक्तिबाहेर आहे. (१३२) मजपाशीं कोणतेंही शस्त्र किंवा अस्त्र नाहीं, महेश्वरा, माझ्या अंगांत तसा अलौकिक पराक्रम नाहीं, माझ्या अंगीं तशी शक्ति नाहीं, मग हें सर्व जग दैत्य वगैरे बलाढ्य लोकांनीं

सुरारिभिः ॥१३२॥ इत्युक्तो भगवांश्छर्वो हरिणा विश्वमूर्तिना ॥ तमाह मेघनादेन स्वरेण हरिमीश्वरः ॥१३३॥

शिव उवाच ॥ आयुधं चाद्य दास्यामि तपोविघ्नापनुत्तये ॥ देवारिणां निहत्यै च रक्षायै जगतामिह ॥१३४॥ इत्युक्त्वा भगवान्विष्णुं देवदेव उमापतिः ॥ एकाग्रमनसा ध्यानमगमत्परमेश्वरः ॥१३५॥ ध्यायतस्तस्य देवस्य प्रादुरासीत्तमोनुदम् ॥ चारुनेत्रत्रयादस्त्रं सहस्रादित्यसन्निभम् ॥१३६॥ अग्नेः सोमाच्च सूर्याच्च तन्मयाल्लोचनत्रयात् ॥ त्रितेजोमयमत्युग्रं ज्ञानास्त्रं भक्तपंजरम् ॥१३७॥ नाभौ सोमोऽमृतमयो ह्यरेषु भगवान्रविः ॥ प्रान्तेषु भगवानग्निश्चक्रस्य स्याच्छिवात्मनः ॥ ॥१३८॥ स चक्रो मतिमान्भूत्वा किं करोमीत्यभाषत ॥ कृतांजलिकरस्तस्थौ बहुबाहुस्त्रिलोचनः॥१३९॥ तं चक्रं पाणिना लभ्यं विष्णवे प्रद-

---

व्यापल्यावर ह्याचें रक्षण माझ्या हातानें कसें होईल? (१३३) विश्वमूर्ते श्रीविष्णूनें शिवास असें ह्मटल्यावर मेघगर्जनेसारख्या गंभीर शब्दानें श्रीशिव त्यास ह्मणाले

(१३४) शिव ह्मणाले—विष्णो, ह्याबद्दल तूं कांहीं काळजी करूं नकोस, मी आतां तुला एक आयुध ( शस्त्र ) देतों, त्या शस्त्रानें तपश्चर्येला जीं जीं विघ्नें येतील तीं सर्व दूर होतील, त्याच आयुधानें तूं दैत्यांचा पराजय करून येथें सर्व त्रैलोक्याचें रक्षण करशील. (१३५) भगवान् देवाधिदेव, पार्वतीपति श्रीशिव विष्णूस असें ह्मणाले आणि मग त्यांनीं एकाग्रमनानें कांहीं वेळ निश्चल ध्यान केलें. (१३६) ते श्रीशिव अशा रीतीनें एकाग्र मनानें ध्यान करीत असतां त्यांच्या सुंदर तीन डोळ्यांपासून एक अस्त्र निघालें तें एक हजार सूर्यांसारखें तेजस्वी होतें. (१३७) अग्नि, चंद्र आणि सूर्य असे तीन श्रीशिवाचे नेत्र होत त्या तीन नेत्रांचे तीन वेगवेगळे गुण एकाच्याच आंगीं असणारें असें अतिशय भयंकर ज्ञानास्त्र उत्पन्न झालें. तें अस्त्र शिवभक्तांचें मूर्तिमंत रक्षण करणारें कवच होय. (१३८) तें चक्र मूर्तिमंत शिवस्वरूपच होतें, त्या चक्राच्या मध्यभागीं जलस्वरूप असा चंद्र होता, त्याच्या बारा अरांमध्यें सूर्य असून त्याच्या सभोंवतीं अग्नीचें वेष्टन होतें. (१३९) असो. अशा रीतीचें तें सुदर्शन चक्र प्रकट होऊन मी काय करूं ? असें शिवास ह्मणालें आणि हात जोडून श्रीशिवापुढें उभें राहिलें. त्या सुदर्शन चक्राला पुष्कळ हात असून तीन डोळे होते. (१४०) तें सुदर्शन चक्र श्रीशिवांनीं आपल्या हातांनीं घेतलें आणि विष्णूस दिलें, तेव्हां

दो शिवः ॥ विष्णोर्वै दक्षिणं बाहुमभजत्सोऽपि हर्षितः ॥१४०॥ ततो देवस्य वै शंभोर्महाचक्राद्विनिःसृता ॥ दैत्यप्राणहरा घोरा सर्वरत्नविचित्रिता ॥ सच्छास्त्ररूपिणी दिव्या षडधारा स्त्रीस्वरूपिणी ॥१४१॥ आज्ञप्ता शंभुना चापि विष्णुमेव समाश्रिता ॥ वाममाश्रित्य वै बाहुं विष्णोस्तस्य स्थिताऽभवत् ॥१४२॥ ततो देवी जगद्धात्री भवानी सा परात्परा ॥ शिवांकसंस्थिता दध्यौ विष्णोरर्थे शिवाज्ञया ॥१४३॥ तस्या वक्त्रात्समुत्पन्नः शंखराजः शशिप्रभः ॥ सर्वदेवमयः शांतः सर्वशत्रुनिबर्हणः ॥ सोऽप्याज्ञप्तस्तया देव्या विष्णोः पार्श्वमथागमत् ॥ ॥१४४॥ देव्या नेत्रात्समुत्पन्नं पद्मं हेममयं शुभम् ॥ रमालयं मनोहारि सर्वलोकविभूषणम् ॥१४५॥ तं च विष्णुं महात्मानमाज्ञया पद्ममुत्तमम् ॥ समाश्रयत्ततो विष्णुर्विस्मयं परमं ययौ ॥१४६॥ पूर्वं तु द्विभुजो

---

तें चक्रही मोठ्या संतोषानें विष्णूच्या उजव्या हातांत जाऊन बसलें. (१४१) देवाधिदेव श्रीशिवाच्या त्या मोठ्या चक्रापासून एक शक्ति निघाली, ती शक्ति दैत्यांचा जीव घेण्यास सर्वतोपरी समर्थ होती, ती भयंकर असून तिच्यावर सर्व प्रकारचीं रत्नें जडलेलीं असल्यामुळें ती सुशोभित दिसत होती, ती सर्वशास्त्रस्वरूप होती, ती फार सुंदर असून तिला सहा धारा असून ती बायकोचें रूप घेऊन श्रीशिवापुढें उभी राहिली. तीच कौमोदकी गदा होय. (१४२) त्या गदेला शिवांनीं विष्णूकडेच जावयास सांगितलें, त्याप्रमाणें ती विष्णूच्या डाव्या हातांत जाऊन राहिली. (१४३) त्यानंतर परमेश्वरी, त्रैलोक्यजननी, श्रेष्ठांपेक्षां श्रेष्ठ ती पार्वती शिवाच्या मांडीवर बसली होती तिनें शिवाच्या आज्ञेप्रमाणें विष्णूकरितां एखादें आयुध देण्याचा विचार केला. (१४४) तिच्या मुखापासून उत्तम शंख निघाला तो चंद्रासारखा स्वच्छ होता. तो, सर्व देवतास्वरूप असून शांत होता, आणि सर्व शत्रूंचा पुरा नाश करणारा होता, त्या शंखालाही देवी पार्वतीनें आज्ञा केल्यावरून तो श्रीविष्णूच्या जवळ आला. (१४५) पार्वतीच्या डोळ्यापासून एक सुवर्णकमल उत्पन्न झालें तें दिसण्यांत फारच सुंदर होतें, तें लक्ष्मीचें राहावयाचें घरच होय. तें फार मनोरम असून सर्व त्रैलोक्यांत त्याच्यासारखी दुसरी सुंदर वस्तु कोठेंही नव्हती. (१४६) तें सुंदर कमळही परमेश्वर श्रीशिवाच्या आज्ञेप्रमाणें श्रीविष्णूकडेच आलें तें कमल आपलेकडे येतांच विष्णूस मोठें आश्चर्य वाटलें. (१४७) पूर्वी श्रीविष्णूला दोन हात होते; त्या दोन हातांत शिवांनीं

विष्णुः गदां चक्रं च हर्षितः ॥ दधार शंभुनाज्ञतः स तु चिंतामवापह ॥१४७॥ द्विभुजोऽहं कथं त्वद्य चायुधानां चतुष्टयम् ॥ धरिष्यामि त्वया दत्तावुभौ शंखांबुजावपि ॥१४८॥ एवं चिंतयतस्तस्य विष्णोर्देव्याः प्रसादतः ॥ प्रादुरास्तां करौ पीनौ ताभ्यां तौ चाप्यधारयत् ॥१४९॥ ततो विष्णुः प्रसन्नात्मा शंखचक्रगदाधरः ॥ नमस्कृत्य शिवं शान्तं कृतार्थोऽस्मीत्यभाषत ॥१५०॥ ततो जलदगंभीरघोषेण भगवांश्छिवः ॥ विष्णुमाह महात्मानं कृतार्थोऽस्मीति केशव ॥१५१॥ इत्युक्त्वान्तर्दधे देवः परमात्मा सदाशिवः ॥ सह देव्याः क्षणादेव पश्यतोर्ब्रह्मकृष्णयोः ॥१५२॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने शंखचक्राद्युत्पत्तितत्प्रदानं नामैकत्रिंशोऽध्यायः ॥

---

प्रथम दिलेलीं सुदर्शन चक्र आणि कौमोदकी गदा हीं दोन आयुधें घेऊन तर विष्णूस मोठा आनंद झाला. पुनः आणखी पार्वतीनें दिलेल्या दोन वस्तु पाहून विष्णूस मोठा विचार पडला. (१४८) तो मनांत ह्मणूं लागला कीं, मला हात दोन आहेत आणि शिवपार्वतींनीं आयुधें दिलेलीं तर चार आहेत तेव्हां मी आतां हे पार्वतीनें दिलेलें शंख आणि कमळ कसें धारण करूं ? (१४९) असा श्रीविष्णु चिंता करीत आहे तोंच देवी पार्वतीच्या कृपेनें विष्णूला आणखी दोन मजबूत हात उत्पन्न झाले आणि त्या दोन हातांत त्यानें शंख आणि कमल हें घेतलें. (१५०) त्या चार हातांत शंख, चक्र, गदा आणि कमल हीं आयुधें घेतां आलेलीं पाहून विष्णूस मोठा आनंद झाला, मग त्यानें शांत स्वभावाच्या शिवास नमस्कार करून मी आतां कृतार्थ झालों असें ह्मटलें. (१५१) श्रीविष्णुचें असें आनंदाचें बोलणें ऐकून त्या महाप्रतापी विष्णूस मेघगर्जनेसारख्या गंभीर शब्दानें शिव ह्मणाले विष्णो, तुझे मनोरथ पूर्ण झालेले पाहून मलाही फार संतोष वाटला. (१५२) असो इतकें बोलून परमेश्वर श्रीशिव पार्वतीसहित तत्काल त्या ब्रह्मदेवाच्या आणि विष्णूच्या समक्ष गुप्त झाले.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठनागनाथनांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेंश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं, शंख चक्र वगैरे आयुधांची उत्पत्ति आणि तीं आयुधें विष्णूस अर्पण करणें नांवाचें वर्णन असलेला हा एकतिसावा अध्याय संपला.

## ॥ अथ द्वात्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ स्कंद उवाच ॥ ततः कृतयुगस्यादौ दैत्या हि वलगर्विताः ॥ ब्रह्मणो वरदप्ताश्च सर्वलोकानबाधयन् ॥१॥ स्वस्थानात्प्रच्युता देवा ब्रह्मणो वरदर्पितैः ॥ दैत्यैः प्रवाधितास्तूर्णं ब्रह्माणं वरदं ययुः ॥२॥ ब्रह्मणो मतमादाय ते देवा मुनिभिः सह ॥ क्षीरोदं प्राप्य वै विष्णुं स्तुत्वा ददृशुरच्युतम् ॥३॥ सर्वं विज्ञापयामासुर्दैत्यानां च विचेष्टितम् ॥ विष्णवे देवताः सर्वाः खिन्नास्तु भृशपीडिताः ॥४॥ विष्णुश्चापि तदा देवानाहाहंकारसंयुतः ॥ दानवान् संहरिष्यामि नासह्यं मम विद्यते ॥५॥ ब्रह्मणो वरदप्तांस्तु ह्यपि पौरुषसंयुतान् ॥ यूयं गच्छध्वममरा विश्रंभध्वं गतज्वराः ॥६॥ इत्युक्ता देवतास्सर्वाः समाश्वस्ता यथागतम् ॥ ययुस्तस्मान्मुकुंदेन सुरा मुदितमा-

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ स्कंदपुराणांत हा पुढील कथाभाग आहे. (१) कार्तिकेय ह्मणाले— शिवपार्वतीपासून विष्णूस मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें शंख, चक्र, गदा आणि पद्म हीं आयुधें मिळाल्यावर, मग पुढें कृतयुगाच्या अगोदर दैत्यलोक सामर्थ्यामुळें फार उन्मत्त झाले. त्यास ब्रह्मदेवाचें वरदान असल्यामुळें ते सर्वांस अजिंक्य होऊन, सर्व लोकांस पीडा देऊं लागले. (२) त्या दैत्यांस वरदान असल्यामुळें ते गर्वानें फुगून गेले त्यांनीं सर्व देवांस राज्यभ्रष्ट करून त्यांस अगदीं त्राहि त्राहि करून सोडिलें. तेव्हां ते सर्व देव लौकरच वर देणाऱ्या ब्रह्मदेवास शरण गेले. (३) ब्रह्मदेवाचा उद्देश काय आहे हें समजल्यावर ते देव मुनीश्वरांस बरोबर घेऊन क्षीरसमुद्रास गेले; आणि तेथें त्यांनीं अविनाशी अशा श्रीविष्णूचें दर्शन घेतलें. (४) आणि त्या दैत्यांच्या त्रासानें अगदीं वेजार झालेल्या देवांनीं दैत्यांच्या उद्धटपणाची सर्व हकीकत विष्णूस सांगितली. (५) ती ऐकून गर्वानें फुगून जाऊन श्रीविष्णु त्या सर्व देवांस ह्मणाले. देवहो, आतां तुह्मी कांहीं काळजी करूं नका, मी स्वतः सर्व दैत्यांस मारून टाकीन, मला ही गोष्ट सहज करितां येणार आहे, ह्यांत मला कांहीं कठिण नाहीं. (६) त्या दैत्यांस ब्रह्मदेवाचें वरदान असल्यामुळें जरी ते उन्मत्त झाले आहेत, व जरी ते फार बळकट आहेत; तरी त्यावद्दल तुह्मी कांहीं काळजी करूं नका. हे देवहो, तुह्मी माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवून विनधोक आपापल्या स्थानास जा. (७) असें विष्णूचें अभय वचन मिळतांच, सर्व देवांच्या

नसाः ॥७॥ गतेषु देवसंघेषु विष्णुश्चापि महामनाः ॥ मेने कृतार्थमात्मानं भव्यं लोकस्य रक्षणे ॥८॥ न मत्समोऽस्ति देवेशो कश्चिदप्यरिकर्शनः ॥ ब्रह्मसृष्टं जगत्सर्वं मयेदानीं न रक्षितम् ॥ विनशिष्यत्युतेदं तु न कश्चिदपि रक्षिता ॥९॥ स्वतो विशिष्टं मां मत्वा शिवोऽपि परमेश्वरः ॥ रक्षायां मां स संस्थाप्य स्वामिवत्स्वमकल्पयत् ॥१०॥ इति निश्चित्य गर्वेण शिवमायाविमोहितः ॥ विष्णुर्दानवनाशाय चक्रमुद्धर्तुमैक्षत ॥११॥ कराभ्यां गृण्हतस्तस्य चक्रः पर्वतवत् स्थितः ॥ न शशाक चालयितुमुद्धर्तुमपि वै कुतः ॥१२॥ ततः खिन्नश्च सहसा विष्णुर्भूमौ पपात च ॥ किमेतदिति गोविंदश्चिन्तामाप दुरत्ययाम् ॥१३॥

---

जिवांत जीव आला. आणि सर्व देव आपलें काम झालें असें समजून आल्या वाटेनें परत गेले. (८) देवांचे समुदाय परत गेल्यावर त्या मोठ्या मनाच्या विष्णूनें सर्व लोकांचें रक्षण करण्याची शक्ति आपल्या अंगीं आहे असें समजून आपले जन्माचें सार्थक्य मानिलें. (९) तो आपल्या मनाशींच ह्मणूं लागला. सर्व देवांत माझ्या सारखा श्रेष्ठ देव दुसरा कोणीच नाहीं. शत्रूचा नाश करण्यास मजखेरीज दुसरा कोणी समर्थ नाहीं; ह्या वेळीं जर मीं सृष्टीचें रक्षण करणार नाहीं तर हे ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेलें सर्व त्रैलोक्य लयास जाईल. ह्याचें नांव देखील मागें राहणार नाहीं. कारण माझ्याखेरीज जगाचें रक्षण करणारा कोणी नाहींच. (१०) परमेश्वर श्रीशिवाला देखील कळून चुकलें आहे कीं, माझ्यापेक्षां विष्णु बलवान् आहे; ह्मणून त्यानें मजकडे सर्व लोकांचें रक्षण करण्याचें काम सोपविलें आणि स्वामीपण आपलेकडे राखून ठेविलें. शिवानें सृष्टि रक्षणाचें काम मजकडे सोपविलें नसतें तर त्याच्या हातून सृष्टि रक्षणाचें काम खचित झालें नसतें. (११) अशा रीतीनें शिवाच्या मायेमुळें अज्ञानपणा येऊन श्रीविष्णु गर्वानें फुगून गेला; व दैत्यांचा नाश करण्यासाठीं सुदर्शनचक्र वर उचलण्यास पाहूं लागला. (१२) त्यानें तें सुदर्शनचक्र दोन्ही हातांनीं धरून वर उचलण्याचा यत्न केला; परंतु तें जागेवरूनही हालेना. तें पर्वतासारखें जागच्याजागीं निश्चळ राहिलें. तें चक्र जाग्यावरून देखील हाललें नाहीं, मग तें उचलण्याची गोष्ट कशाला पाहिजे? (१३) चक्र आपल्यास जागेवरून देखील हालविण्याची शक्ति नाहीं असें पाहतांच विष्णूस फार वाईट वाटलें. व त्या दुःखानें तो जमिनीवर धाडकन खालीं पडला; आणि असें कां झालें ह्मणून श्रीविष्णु फार काळजी करूं ला-

एतस्मिन्नेव काले तु चक्रं चान्तर्दधे क्षणात् ॥ खिन्नस्य पश्यतो विष्णोः पतितस्य महीतले ॥१४॥ स तं चक्रमदृष्ट्वा तु द्विगुणं दुःखितोऽभवत् ॥ रुरोद सुस्वरं विष्णुः सबाष्पः साश्रुलोचनः ॥१५॥ किमेतन्मे बलं कस्मान्नष्टमित्येव चिंतयन् ॥ बहुचिंत्याथ दीनात्मा विष्णुः कमललोचनः ॥१६॥ प्रसादातिशयाच्छंभोः पुराहमजितोऽभवम् ॥ ब्रह्मणोऽप्यद्य चक्रस्य न शक्तश्चालनेऽपि हि ॥१७॥ चक्रोऽपि मां परित्यज्य मम भाग्यपरिक्षयात् ॥ गतः कुत्रापि यश्चक्रो बलं चापि ममाशु वै ॥१८॥ अहंकारसमाविष्टो नूनं ब्रह्मवदप्यहम् ॥ तेनाहमीदृग्भूतोऽस्मि देवदेवस्य मायया ॥ तमेव शरणं यामि शिवं शाश्वतमव्ययम् ॥१९॥ स भक्तपंजरो देवः पुनश्चापि समर्चितः ॥ प्रसादयिष्यति मम

---

गला. (१४) श्रीविष्णु जमिनीवर पडून अशा तऱ्हेनें अतिशय काळजी करीत आहे, इतक्यांत तें सुदर्शनचक्रही त्याच्या दृष्टीदेखत नाहींसें झालें. (१५) तें चक्र एकाएकीं दिसेनासें झाल्याबरोबर तर विष्णूस पहिल्यापेक्षां दुप्पट दुःख झालें. त्याच्या डोळ्यास पाणी आलें, आणि डोळ्यांत आंसवें आणून तो मोठ्यानें गळा काढून रडूं लागला. (१६) कमळांप्रमाणें डोळे असणारा श्रीविष्णु अतिशय काळजी करूं लागला, व त्यामुळें तो अगदीं निराश होऊन गेला. तो ह्मणाला. माझ्या अंगीं इतकें अलौकिक सामर्थ्य असतां एकाएकीं तें नाहींसें कसें झालें ? ह्या गोष्टीची तो एकसारखी काळजी करूं लागला. (१७) पूर्वी मजवर श्रीशिवाची अतिशय कृपा असल्यामुळें प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाही मी आटोपलों नाहीं; त्याच मला आतां माझें सुदर्शन चक्र जागेवरून हालविण्याची देखील शक्ति राहिली नाहीं. काय माझी स्थिति झाली पहा! (१८) माझ्या पुण्याचें बळ नाहींसें झाल्यामुळें माझें सुदर्शन चक्र देखील मला सोडून देऊन कोणीकडे निघून गेलें. व त्या चक्राच्या मागोमाग (लागलेंच) माझें सामर्थ्यही नाहींसें झालें. (१९) ह्यावरून मला तर खचित असें वाटतें कीं, ब्रह्मदेवाप्रमाणेंच मीही गर्वानें फुगून गेलों ह्मणून माझी अशी दुर्दशा झाली. मी देवाधिदेव श्रीशिवाच्या मायेमुळें अगदीं अज्ञान झालों. ह्यासाठीं मी आतां त्याच परमेश्वर श्रीशिवाला शरण जातों, तो परमेश्वर चिरकाल राहणारा आणि अविनाशी आहे. (२०) तो परमेश्वर श्रीशिव भक्तांचें रक्षण करणारा आहे; पुनः जर मी त्याची पूजा केली तर तो मजवर खचित अनुग्रह करील. आणि माझें नाहींसें झालेलें चक्र

चक्रं चापि प्रदास्यति ॥२०॥ इत्येवं निश्चयं कृत्वा विष्णुरुत्थाय तत्र वै ॥ संशोध्यात्मानमव्यग्रो दध्यौ मंत्र जपन्मुनिः ॥२१॥ नित्यशो नियमेनैव लिंगं सम्यक् समाहितः ॥ पद्मैर्दशशतैर्भक्त्याऽपूजयत्पुरुषोत्तमः ॥२२॥ जिज्ञासमानो भगवान्विष्णोर्भक्तिं सदाशिवः ॥ संख्यान्यूनं सहस्राणां पद्मानां माययाऽकरोत् ॥२३॥ पुनश्चान्यानि संभृत्य संख्यां न्यूनामवेक्ष्य सः ॥ बहुशो भगवान्विष्णुः खिन्नात्मा दुःखितोऽभवत् ॥२४॥ कदाचित्स हरिः क्रोधात्संख्यान्यूनमुदीक्ष्य च ॥ पद्मानां च सहस्राणां ज्ञात्वा देवस्य चेष्टितम् ॥२५॥ तत उध्दृत्य नयनमात्मनः पद्मसन्निभम् ॥ लिंगे समर्पयामास संख्यापूर्त्यै जनार्दनः ॥२६॥ ततस्तुतोष भगवांच्छिवः कारणकारणम् ॥ आत्मानं दर्शयामास विष्णवे विश्वमूर्तिमान् ॥२७॥ दृष्ट्वा देवं महेशानं सूर्यकोटिसमप्रभम् ॥ नानाभू-

---

माझें मला परत देईल. (२१) असा निश्चय करून विष्णु जमिनीवरून उठला आणि तेथेंच आपली आत्मशुद्धि करून मनाची सर्व व्याकुलता सोडून देऊन मुनीचें व्रत घेऊन शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करूं लागला. (२२) विष्णूनें दररोज नियमानें एकाग्र मनानें लिंगपूजा करून लिंगास भक्तिभावानें हजार कमळें वाहावयाचा नेम केला. (२३) परमेश्वर श्रीशिवालाही विष्णूची आपल्याविषयीं भक्ति कशी काय आहे, तें पाहण्याची इच्छा झाली; आणि त्याकरितां मुद्दाम विष्णूनें वाहावयास आणलेल्या हजार कमळांपैकीं एक कमळ त्यांनीं मायेनें गुप्त केल्यामुळें, विष्णु कमळें मोजतांना त्याला एक कमळ कमी येऊं लागलें. (२४) पुनः त्यानें आणखी हजार कमळें आणलीं; परंतु तो मोजून पाहतो तों एक कमी पडूं लागलें. असें त्यानें पुष्कळ वेळ केलें, परंतु प्रत्येक वेळीं एक कमळ कमीच पडूं लागलें. त्यामुळें विष्णूस वाईट वाटून त्याचें मन उदास झालें. (२५) आपण प्रत्येक वेळ हजार कमळें आणीत असून मोजतांना एक कमी भरतें असें पाहून विष्णूस मोठा राग आला. आणि पुनः त्याचे लक्षांत आलें कीं, ही सर्व शिवाची माया आहे दुसरें कांहीं नाहीं. (२६) मग त्या श्रीविष्णूनें कमळासारखा सुशोभित दिसणारा आपला उजवा डोळा उपटून काढिला आणि कमी पडलेल्या एका कमळाच्याऐवजीं शिवलिंगावर वाहिला. (२७) तें विष्णूचें कृत्य पाहतांच परमेश्वर श्रीशिवाला मोठा संतोष झाला, व त्या त्रैलोक्यस्वरूप श्रीशिवानें सर्व कारण वस्तूंला मूळकारण असणारें आपलें स्वरूप श्रीविष्णूस दाखविलें. (२८) श्रीविष्णूनें त्या परमेश्वर श्रीशिवास पाहिलें. एक कोटि सूर्यांसारखें शिवाचें

तगणैर्जुष्टं सांबमर्द्धेंदुमौलिनम् ॥२८॥ जानुभ्यामवनिं गत्वा नमस्कृत्य यथाविधि ॥ मूर्ध्नि पादांबुजौ कृत्वा पपात भुवि शूलिनः ॥ वाक्यं चाह महादेवं गिरा गद्गदया हरिः ॥२९॥

विष्णुरुवाच ॥ प्रसीद भगवन्मह्यमहंकाररतात्मने ॥ त्वयि विस्मृतचित्ताय निर्वीर्यायाल्पचक्षुषे ॥३०॥ प्रसीद जन्ममरणजराशोकोर्मिसंकुले ॥ अगाधे भवसिन्धौ मे पतितस्य महेश्वर ॥३१॥ रागद्वेषमदक्रोधलोभमोहमहाग्रहैः ॥ प्रसीद मे गृहीतस्य सर्वसर्वेश्वरामल ॥ ॥३२॥ प्रसीद क्षान्तविक्षेपाक्षिप्तांवाचित्त शंकर ॥ त्र्यक्षाद्य चाक्षिजाताशुशुक्षणिक्षपितांगज॥३३॥प्रसीद सितसंसिक्तभसितालिप्तविग्रह॥ ससितांगासितग्रीव सुसितोक्षगतिप्रिय ॥३४॥ प्रसीदांबालतालिंगिताभी-

---

स्वरूप तेजस्वी होतें, त्यांच्या बरोबर अनेक भूतगण होते, त्यांच्या बरोबर देवी पार्वती असून त्यांच्या मस्तकावर अर्धचंद्र शोभत होता. (२९) असो. विष्णूनें शिवास पाहतांच जामिनीला गुडघे लावून यथाविधि नमस्कार केला, आणि आपले दोन्ही हात जोडून व ते मस्तकास लावून तो श्रीशिवापुढें जमिनीवर लोटांगण घालूं लागला; श्रीविष्णु सद्गगित कंठानें महादेवास ह्मणूं लागला.

(३०) विष्णु ह्मणाला—हे परमेश्वरा, तूं मजवर कृपा कर. मी गर्वानें अतिशय फुगलों त्यामुळें मला तुझी आठवण देखील राहिली नाहीं; माझ्या अंगांत कांहींच सामर्थ्य नाहीं. मी फार क्षुल्लक दृष्टीचा आहें. (३१) मी संसारसमुद्रांत पडलों आहें ह्या समुद्रांत जन्म, मरण, ह्मातारपण दुःख वगैरे लाटा उसळत असून ह्या समुद्राचा अंत लागत नाहीं. ह्या समुद्रांत मी बुडत आहें तर ह्यांतून तूं कृपा करून मला वर काढ. (३२) विषयसुख, वैर, अहंकार, राग, आशा आणि अज्ञान ह्या सुसरींनीं मला गिळून टाकिलें आहे, ह्यांपासून माझी मुक्तता कर. तूं सर्व प्राणिमात्रांचा अधिपति आहेस, तुला शर्व ह्मणतात, तुझ्या अंगीं कोणताही दोष नाहीं. (३३) तूं भक्तजनांचे अपराध क्षमा करितोस, परमेश्वरा, तुजवर पार्वतीचें मन फार आसक्त आहे, तुला शंकर ह्मणतात, तुला तीन नेत्र आहेत, त्यांपैकीं तिसरा कपाळावरील नेत्र सर्वांत श्रेष्ठ आहे. त्या नेत्रांतील अग्नीनें तूं मदनास जाळून टाकिलेंस, तूं मजवर कृपा कर. (३४) परमेश्वरा, तूं आपले अंगास पांढरें शुभ्र भस्म लाविलें आहेस त्यामुळें तुझें अंग पहिल्यापेक्षां फारच पांढरें दिसतें. तुझें स्वरूप गोरें असून तुझा गळा नील रंगाचा आहे, तुला शुभ्र वृषभावर प्रयाण करण्याची फार आवड आहे, तूं मजवर कृपा कर. (३५) तुझ्या

घ्सुरभूरुह ॥ अंबाकररुहाग्रात्तलेखाभूषणभूषित॥३५॥ प्रसीद मे महाकाल कालकोमलकंधर ॥ आलीजनप्रियालील मायालंवितविग्रह॥३६॥ प्रसीदापिंगदीर्घान्तजटाविवृतपश्चिम ॥ पिंगाक्षाक्षर यक्षेष्ट मांगल्यालय माधव ॥३७॥ प्रसीदांबालोचनाब्जप्रबोधकरभास्कर ॥ गंगाभूषण चंद्रार्धखण्डमण्डितमस्तक ॥३८॥ प्रसीद योगिध्येयाद्यज्ञानरूपमहेश्वर ॥ महामहिम मायाविन् महादेव महेश्वर ॥३९॥ नमस्ते कोटिसूर्याभतेजसे भुवनेश्वर ॥ ब्रह्मादिदेवसंगीतपुण्यकीर्ते प्रजार्चित ॥४०॥ तरुणादित्यसंकाश करुणाकर शंकर ॥शरणं भव मे भो त्वं मरणार्ति-

---

शरीराला पार्वती देवीनें प्रेमानें दोन्ही हातानें आलिंगन दिलें आहे, तूं भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा प्रत्यक्ष कल्पवृक्ष आहेस. पार्वतीच्या हाताच्या नखांचे वण तुझ्या आंगावर उमटले असल्यामुळें ते अलंकार घातल्यासारखे दिसतात, तूं मजवर कृपा कर. (३६) परमेश्वरा, तूं मजवर कृपा कर. तुला महाकाल ह्मणतात, तुझा गळा निळ्या रंगाचा असून तो फार नाजूक आहे. परमेश्वरा, पार्वतीच्या मैत्रिणी तिच्याजवळ असतां त्यांच्यासमक्ष तूं पार्वतीबरोबर क्रीडा करितोस; तुझ्या शरीराला मायादेवी ( पार्वती ) नेहमीं चिकटलेली आहे. (३७) परमेश्वरा, तूं मजवर कृपा कर. तुझ्या मस्तकावरील जटा पिंगट रंगाच्या असून त्या फार लांब आहेत, व त्या जटांचें टोंक पश्चिम दिशेकडे वळलेलें आहे. तुझे डोळे पिंगट रंगाचे असून तूं अविनाशी आहेस; तुला यक्षलोक फार आवडतात, तूं मंगलकारक वस्तूंची खाण आहेस. तूं लक्ष्मीचा पति आहेस. (३८) परमेश्वरा, तूं मजवर कृपा कर. परमेश्वरा, पार्वतीच्या नेत्ररूप कमलांस तूं सूर्यासारखा आनंद देतोस, तूं आपले मस्तकावर अलंकारासारखी गंगा धारण केली आहेस, तुझ्या मस्तकावर अर्धचंद्र आहे. (३९) परमेश्वरा तूं मजवर कृपा कर, योगिश्वर लोक तुझें नेहमीं ध्यान करितात, तूं सर्व त्रैलोक्याचा मूलपुरुष आहेस, तूं ज्ञानस्वरूप आहेस, तुला महेश्वर असें ह्मणतात, तुझी कीर्ति फार मोठी आहे, तुझ्याबरोबर माया असते ह्मणून तुला मायी ह्मणतात, मायेचें खरें स्वरूप तुला कळून चुकलें आहे, तूं महादेव आहेस, तूं महेश्वर आहेस (४०) एक कोटि सूर्याच्या तेजासारखें तुझें रूप तेजस्वी आहे, तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस, ब्रह्मादिक देव तुझी कीर्ति मोठ्या आवडीनें गातात. तुझी कीर्ति फार पवित्र आहे, सर्व प्रजा तुझी पूजा करितात. तुला नमस्कार असो. (४१) दोन प्रहरच्या वेळच्या सूर्यासारखें तुझें स्वरूप तेजस्वी आहे, तूं मोठा दयाळु आहेस, तूं क-

विनाशन ॥४१॥ परमेश्वर पद्माक्ष पुरशासन पूरुष ॥ नमस्ते नाकनाथार्चितांघ्रिपंकज केशव ॥४२॥ नमो हिरण्यकेशाय शोचिष्केशाय धीमते ॥ नमस्ते शिपिविष्टाय पृश्निगर्भाय मन्यवे ॥४३॥ उमाकुचाग्रसंमर्दकुंकुमारुणवक्षसे ॥ सुवर्णायादिदेवाय देवगर्भाय वेधसे ॥४४॥ सुद्युम्नायादिकवये ब्रह्मगर्भाय मन्यवे ॥ सुशुचे भ्राजसे देव नमस्ते तिग्मरोचिषे ॥४५॥ भूतनाथाय कालाय सृष्टिसंहारकारिणे ॥ सुवर्त्मने विशुद्धाय कृष्णायामिततेजसे ॥४६॥ नमः शिवाय रुद्राय नीलकण्ठाय भूयसे ॥ दिगंवराय सांवाय त्र्यंवकायादिचक्रिणे ॥४७॥ नमो वामाय घोराय सद्याय पुरुषाय च ॥ ईशानाय च शांताय शाश्वतायान्तकारिणे॥४८॥ भक्तार्तिभेदिने भुक्तिमुक्तिदायादिवेदिने ॥वेदवेद्याद्यविद्याय

---

त्याण करणारा आहेस. परमेश्वरा, तूं माझें रक्षण कर. तूं मरणाचें दुःख नाहींसें करणारा आहेस. (४२) तुला परमेश्वर ह्मणतात, तुझे डोळे कमळांसारखे आहेत, तूं त्रिपुरांस शिक्षा केलीस, तूं सर्वांचा मूलपुरुष आहेस, तुझ्या पदकमलांची देवेंद्र देखील पूजा करितो, तुला केशव असेंही ह्मणतात, तुला नमस्कार असो. (४३) तुला हिरण्यकेश ( सोन्यासारखे लाल रंगाचे केंस असणारा ), शोचिष्केश, धीमान्, शिपिविष्ट, पृश्निगर्भ अशीं नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो.(४४) पार्वतीचे स्तनावरील कुंकू लागून तुझा ऊर लाल झाला आहे तुझा वर्ण फार चांगला आहे, तूंच मूलदेव आहेस, तूं सर्व देवाचें मूलस्थान आहेस, तूंच ब्रह्मदेव आहेस तुला नमस्कार असो. (४५) तुला सुद्युम्न, आदिकवि, ब्रह्मगर्भ, मन्यु, सुशुचा, भ्राजा, देव, तिग्मरोचि अशीं नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (४६) तूं प्राणिमात्रांचा अधिपति आहेस, तुला काल ह्मणतात, तूंच जग उत्पन्न करितोस. आणि तूंच जगाचा संहार करितोस. तुला सुवर्त्मा, विशुद्ध, कृष्ण आणि अमिततेजा अशीं नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (४७) तुला शिव, रुद्र, नीलकंठ; भूयस् , दिगंबर, सांब, त्र्यंबक, आणि आदिचक्री, अशीं नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (४८) तुला वाम, घोर, सद्य, पुरुष, ईशान, शांत, शाश्वत, अनंतकारि अशीं अनेक नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (४९) तूं भक्तलोकांचीं दुःखें दूर करितोस, आणि भक्तांस ह्या लोकींचीं आणि परलोकींचीं सुखें ( मुक्ति ) मिळवून देतोस, तूं मूलज्ञानी आहेस, तूं वेदांच्या द्वारानें जाणावयासारखा आहेस, तूंच मूलविद्या आहेस, तूं धरा आणि

धरामायाविनोदिने ॥४९॥ मांगल्यदायिने नित्यं मांगल्याय त्रिशूलिने॥ निराशिषे नमस्तुभ्यमाशिषां पतये नमः ॥५०॥ धर्माय भक्तवर्माय सर्वकर्मैकसाक्षिणे ॥ नमस्ते नरसिंहारे नरकारे नरेश्वर ॥५१॥ पंचपंचकनिष्पंच सचराचरपंचक ॥ खेचराचाररहित दुराचारापहारिणे॥५२ सर्वज्ञाय विशिष्टाय सर्वाभिष्टुतकर्मणे ॥ सर्वसार नमस्तेऽस्तु सर्वेश्वर सदाशिव ॥५३॥ सर्वाधार महायोगिन् योगगम्य पुरुष्टुत ॥ योगाधार निराधार धराधर नमोऽस्तु ते ॥५४॥ अनाथाय विनाथाय नाथनाथाय शूलिने ॥ नमोऽस्त्वनाथनाथाय सोमनाथाय शंभवे॥५५॥ नमस्ते ब्रह्मकेशाय विष्णुनेत्राय शोचिषे ॥ सूर्योदराय रुद्राय रुक्मिणे

---

माया ह्यांची करमणूक करणारा आहेस, तुला नमस्कार असो, (५०) तूं आपल्या भक्तांचें कल्याण करितोस, तूं नेहमीं कल्याणस्वरूप आहेस, तुझ्या हातांत त्रिशूल आहे, तूं निरिच्छ आहेस, तूं सर्व आशीर्वादांचा अधिपति आहेस तुला नमस्कार असो, तुला नमस्कार असो. (५१) तूं धर्मस्वरूप आहेस, तूं भक्तांच्या अंगांतील चिलखत आहेस, प्रत्येक प्राणिमात्र जीं जीं बरीं वाईट कामें करितात तीं तीं सर्व तुला माहीत आहेत; तूं नरसिंहाचा शत्रु आहेस, तूं दुर्गतीचा शत्रु आहेस, आणि तूं सर्व मनुष्यांचा राजा आहेस, तुला नमस्कार असो. (५२) तूं पंचवीस तत्वस्वरूप आहेस, तुला पंचमहाभूतांचा संबंध नाहीं, तूं स्थावर जंगम प्राण्यांचा विस्तार करणारा आहेस, आकाशांत फिरणाऱ्या प्राण्यांचे गुणधर्म तुझ्यांत नाहींत, तूं दुराचाराचा नाश करितोस, त्या तुला नमस्कार असो. (५३) तूं सर्वज्ञ आहेस, तूं सर्वांहून श्रेष्ठ आहेस, सर्व लोक तुझ्या कृत्याची फार प्रशंसा करितात इतकीं तुझीं कृत्यें चांगलीं आहेत, तूं सर्व वस्तूंत सारभूत ( महत्वाची) वस्तु आहेस, तूं सर्वांचा अधिपति आहेस, तुला सदाशिव असें ह्मणतात, अशा तुला नमस्कार असो. (५४) तूं सर्व प्राणिमात्रांस आधार आहेस, तूं मोठा योगीश्वर आहेस, तुझें स्वरूप योगांच्या साधनानें समजतें, तुला पुरुष्टुत ह्मणतात, तूं योगास आधार देणारा आहेस, तुला आधार देणारा दुसरा कोणी नाहीं, तूं पृथ्वीला आधारभूत आहेस, त्या तुला नमस्कार असो. (५५) तुझा कोणी धनी नाहीं, तुला विनाथ ( धनी नसणारा ) असें ह्मणतात, त्रैलोक्यांत जे मुख्य मुख्य अधिकारी आहेत त्यांचा तूं मुख्य अधिकारी आहेस, तुझ्या हातांत शूल आहे, तूं अनाथ ( दीन ) लोकांचा अधिपति ( रक्षण करणारा ) आहेस, तुला सोमनाथ ह्मणतात, तुला शंभु ह्मणतात त्या तुला नमस्कार असो. (५६) तुला ब्रह्म-

सोमचेतसे ॥५६॥ सूक्ष्मज्ञानकुठाराय वरेण्यायादिमूर्तये ॥ नमस्ते भूतचापाय शांताय विषयेषवे ॥५७॥ नमस्ते लोकमालाय ग्रहाकल्पाय मुण्डिने ॥ नमस्ते दण्ड्यदण्डाय शक्तिशूलकपालिने ॥५८॥ नमः शेषकलापाय मायाशिष्टाय मायिने ॥ महेश्वराय महते विश्वनाथाय विष्णवे ॥५९॥ सर्वार्चिताय शर्वाय सर्वायामृतमूर्तये ॥ नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं सदाशिव ॥६०॥ यदज्ञानात्कृतं सर्वं क्षमस्व मम शंकर ॥ मा भूदेवमितः पश्चादहंकारावृतं मनः ॥६१॥त्वत्प्रसादान्महेशान सर्वावस्थासु सर्वदा ॥ चरणांबुजयोस्तेऽस्तु मनो मे जन्मजन्मनि ॥६२॥ करुणाकर कारुण्यं कुरु मे शरणार्थिनः ॥ अणु वानणु वा

---

केश, विष्णुनेत्र, शोचिष्, सूर्योदर, रुद्र, रुक्मी, सोमचेताः अशीं नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (५७) तुझी ज्ञानरूप कुऱ्हाड फार तीक्ष्ण आहे ( तूं मोठा ज्ञानी आहेस ), तूं सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेस, तूं मूळपुरुष आहेस, पंचमहाभूत हे तुझें धनुष्य असून इंद्रियगोचर विषय हे तुझे बाण आहेत; तुझा स्वभाव फार शांत आहे त्या तुला नमस्कार असो (५८) हे सात लोक तुझ्या माला आहेत, नऊ ग्रह हे तुझे अलंकार आहेत, तूं आपल्या गळ्यांत मनुष्यांच्या मस्तकांच्या माला घालितोस. तूं अपराधी लोकांस शिक्षा करितोस, शक्ति, शूल आणि कपाल हे तिन्हीही पदार्थ तूं आपल्या हातांत घेतोस, त्या तुला नमस्कार असो (५९) तूं आपल्या अंगावर शेषनाग अलंकारा सारखा घेतोस, तूं मायेपेक्षां फार श्रेष्ठ आहेस, तुला मायी ह्मणतात, तुला महेश्वर ह्मणतात, तूं श्रेष्ठ (मोठा) आहेस, तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस, तुला विष्णु ह्मणतात, त्या तुला नमस्कार असो. (६०) सर्व प्राणिमात्र तुझी पूजा करितात, तुला शर्व ह्मणतात तसेंच सर्व असेंही ह्मणतात तूं अमृतस्वरूप आहेस; हे सदाशिवा, त्या तुला नमस्कार असो, नमस्कार असो, नमस्कार असो. (६१) श्रीशंकरा, माझ्या हातून अज्ञानपणामुळें आजपर्यंन्त जे कांहीं अपराध झाले असतील, त्या सर्वांची तूं मला क्षमा कर. आणि आतांपासून पुढें केव्हांही माझें मन पुनः गर्विष्ठ होऊं नये, असा वर दे. (६२) हे महेश्वरा, मी कोणत्याही स्थितींत असो, जन्मोजन्मीं माझें मन तुझ्या कृपादृष्टीनें नेहमीं तुझ्या पदकमलांचीच भक्ति करो, दुसरें कांहीं नको. (६३) तूं मोठा दयाळू मनाचा आहेस, मी तुला शरण आलों आहें, तूं मजवर कृपा कर. हे परमेश्वरा, माझे हातून लहान असो किंवा मोठें असो, समजून असो

देव ज्ञानतोऽज्ञानतोऽपि वा ॥६३॥ यत्कृतं मनसा वाचा कर्मणा च मया शिव ॥ भक्तोऽयमिति मामीक्ष्य सुप्रसन्नेन चक्षुषा ॥ तत्सर्वं मम विश्वेश क्षमस्वोमाहृताहृत ॥६४॥ इति स्तुतः स भगवान् विष्णुना प्रभविष्णुना ॥ आह गंभीरया वाचा भक्त्या तुष्टो महेश्वरः ॥६५॥

ईश्वर उवाच ॥ अपि दोषसहस्राणां सहस्राणि तवाच्युत ॥ स्तोत्रेणानेन भक्त्या च क्षांतान्यद्य मया हरे ॥६६॥ नापराधः कृतः कश्चित्त्वया गोविंदमय्यपि ॥ तमोनिवृत्तये चक्रो मया नीतो दयालुना ॥६७॥ भक्तानापदि यः स्वामी नापद्भ्यो रक्षति प्रभुः ॥ स स्वामी न भवेद्विष्णो नात्र कार्या विचारणा ॥६८॥ अहंकारवशं प्राप्तं ज्ञात्वा त्वामहमीश्वरः ॥ अहंकारविनाशाय चक्रमाहृतवानिह ॥६९॥ पद्मानां परिपूर्त्यै त्वं नेत्रं चोध्दृतवानसि ॥ कर्मणा तेन चानेन स्तोत्रेणाहं प्रहर्षितः ॥७०॥ चक्रं च तव दास्यामि पुनश्चान्यांस्तथायुधान् ॥ सुदुर्ले

---

किंवा नसमजून असो, (६४) जे कांहीं मनानें वाचेनें आणि कृतीनें बरें वाईट कृत्य झालें असेल त्या सर्वांची हा माझा भक्त आहे अशी कल्पना करून तूं कृपादृष्टीनें मला क्षमा कर. तूं विश्वाचा अधिपति आहेस, परमेश्वरा, तुला पार्वतीनें वश केलें आहे, आणि वश केलें नाहीं, अशी स्थिति आहे. (६५) ह्या प्रमाणें जयशील श्री विष्णूनें भगवान् श्री शिवाची स्तुति केल्यावर त्याच्या भक्तीमुळें प्रसन्न होऊन श्री शंकर त्यास गंभीर शब्दानें ह्मणाले—

(६६) श्रीशिव ह्मणाले–विष्णो, तुझ्या हातून हजारो हजार अपराध झाले असले तरी तुझ्या भक्तीमुळें आणि तूं केलेल्या माझ्या स्तोत्रामुळें मी आतां तुला ते सर्व क्षमा केले आहेत. (६७) गोविंदा, तूं माझा अपराध कांहीं केलास असें नाहीं; तरी पण तुझें अज्ञान दूर करण्याकरितां माझे मनास तुझी दया येऊन तें तुझें सुदर्शनचक्र मीं नाहींसें केलें. (६८) विष्णो, जो स्वामी आपले भक्त संकटांत पडले तर त्यांचें संकट दूर करून त्यांतून त्यास सोडवीत नाहीं, तो स्वामी नव्हे ह्यांत संशय नाहीं. (६९) तुला गर्व झाला असें समजतांच, तो तुझा गर्व नाहींसा करावयासाठीं मीं तुझा स्वामी असल्यामुळें तुझें सुदर्शनचक्र येथें आणिलें. (७०) तूं मला नित्य हजार कमलें वाहत होतास त्यांत एक कमी झाल्या बरोबर तूं आपला कमलासारखा डोळा काढून मला वाहिलास, ह्या तुझ्या करण्यानें आणि तूं केलेल्या माझ्या स्तोत्रानें मला मोठा संतोष झाला. (७१) तूं सुदर्शन चक्राची

भानपि वरान् वरयस्व मनोगतान् ॥ वरदोऽहं प्रदास्यामि नात्र कार्या विचारणा॥७१॥ इत्युक्त्वा भगवांश्चछर्वः खड्गं त्वर्कमयं शुभम् ॥ ददौ वर्म च कृष्णाय मेघरूपं शरावहं ॥७२॥ हलं च मुसलं चैव ददौ शमदमौ यमौ ॥ धनुर्बाणं च भगवान् पंचभूतगुणात्मकम् ॥७३॥ ददौ कंजमयीं मालां मुकुटं ज्योतिषां मुखम् ॥ छंदोमयं सुपर्णं च गरुडं कश्यपात्मजम् ॥७४॥ पुनः किमिच्छसि हरे मत्तो यद्यस्ति तद्वद ॥ निःशंकस्तत्प्रदास्यामि नात्र कार्या विचारणा ॥७५॥ इत्युक्तो भगवान्विष्णुस्तथेत्युक्त्वाब्रवीत् पुनः ॥ नमस्कृत्य जगन्नाथं सर्वकारणकारणम् ॥७६॥ अहं च तव वै दास्यं करिष्यामि च शंकर ॥ अहंकार प्रशान्त्यर्थं सर्वदा परमेश्वर ॥७७॥ तस्मादादिश मे दास्यं नित्यधा कर्तुमीश्वर ॥ कृपां यच्छ जगन्नाथ यदि तुष्टोऽसि मे शिव ॥७८॥ इत्थम-

---

आतां काळजी करूं नकोस. तें चक्र मी तुझें तुला परत देतों, आणि दुसरींही इतरांस कधींच न मिळणारीं आयुधें देतों. तुझ्या मनांत जे वर मागून घ्यावयाचे असतील ते माझ्यापासून मागून घे. ते वर देण्यास मी तयार आहें. मनांत कोणतीही शंका घेऊं नकोस. (७२) असें बोलून भगवान् श्रीशिवांनीं विष्णूला सूर्यासारखी तेजस्वी सुंदर तरवार दिली, एक चिलखत दिलें व एक मेघरूप भाता दिला. (७३) एक नांगर, एक मुसळ, तसेच शम, दम, यम पंचभूतात्मक धनुष्य बाण ह्या वस्तु परमेश्वर श्रीशिवांनीं विष्णूस दिल्या (७४) तशीच कमलांची माळा, अतिशय शोभिवंत दिसणारा सोन्याचा मुकुट, छंदस्वरूप, चांगले पंख असणारा कश्यपाचा मुलगा गरुड ह्या वस्तु शिवांनीं विष्णूस दिल्या. (७५) आणखी पुनः श्रीशिव विष्णूस ह्मणाले, पुनः तुला माझ्या पासून काय पाहिजे आहे तें मला सांग. तूं जें माझ्याजवळ मागशील, तें मी तुला विनदिक्कत देतों. त्यावद्दल तूं मनांत कांहीं संकोच धरूं नकोस. (७६) श्रीशिवांनीं विष्णूस असें ह्मटल्यावर, बरें आहे असें ह्मणून पुनः श्रीविष्णु सर्वकारणांस मूलकारण असणाऱ्या त्रैलोक्यपति श्रीशिवास नमस्कार करून ह्मणाला. (७७) हे परमेश्वरा, श्रीशंकरा, मला जो गर्व झाला होता तो समूळ नाहींसा होण्याकरितां आतां पासून मी तुझें नेहमीं दास्य करीत जाईन. (७८) हे जगदीश्वरा, श्रीशिवा, जर तूं मला प्रसन्न झाला आहेस असें ह्मणतोस, तर परमेश्वरा, मी तुझें नेहमीं कोणतें दास्य करावें तें मला कृपा करून सांग. (७९) ह्याप्रमाणें

भ्यर्थितः शंभुर्विष्णुना प्रभविष्णुना ॥ आह गंभीरया वाचा विष्णुं विश्वेश्वरः शिवः ॥७९॥

ईश्वर उवाच ॥ यदीच्छसि हरे दास्यं मम कर्तुं सदानघ ॥ मेघो भूत्वा वहस्व त्वं मां प्रीत्या सर्वदा हरे ॥ तेन मां ब्राह्मणा देवाश्चाहुर्वै मेघवाहनम् ॥८०॥ चतुष्पाद्वृषरूपी त्वं ब्रह्मणः पुत्रतां गतः ॥ धर्मः सर्वार्चितः शश्वद्वाहनो मे भवानिशं ॥८१॥ ध्वजे च मम गोविंद तेन मां वृषभध्वजम् ॥ आहुर्वृषभवाहं च सूरयो वेदतत्पराः ॥८२॥ विष्णुमाह च किं विष्णो वरं दास्यामि चापरम् ॥ वरं प्रब्रूहि भद्रं ते यदिच्छसि महामते ॥८३॥ इत्युक्तो भगवान्विष्णुः शिवमाह कृतांजलिः॥ यदि तुष्टोऽसि मे देव भक्तिस्त्वय्यचलास्तु मे ॥८४॥ यया सुदुर्लभान्कामानपि प्राप्नोति मानवः ॥ यया विहीनः पुरुषो भक्त्या विद्यासहस्रवित्॥ यः सोऽपि श्वपचो देव त्वयि हीनो न संशयः॥८५॥ तस्माद्भक्त्या कृ-

---

महासमर्थ श्रीविष्णूनें शिवाची विनंति केल्यावर त्रैलोक्यपति श्रीशिव गंभीर आवाजानें त्या विष्णूस ह्मणाले.

(८०) श्रीशिव ह्मणाले. हे निष्पाप स्वभावाच्या श्रीविष्णो, जर तूं नेहमीं माझें दास्य करावें असें इच्छितोस तर मेघाचें रूप घेऊन आनंदानें आपल्या पाठीवर नित्य मला वागवीत जा. असें तूं केलेंस ह्मणजे सर्व ब्राह्मण आणि वेद मला मेघवाहन अशा नांवानें हांक मारीत जातील. (८१) हे श्रीविष्णो, चार पाय असणारा वृषभस्वरूप तूं आहेस तूं ब्रह्मदेवाचा मुलगा झलास; धर्म हा सर्व प्राणिमात्रांस मान्य आहे ह्यासाठीं तूं माझें नेहमीं वाहन हो. (८२) हे गोविंदा, तूं माझें ध्वजावर रहात जा. त्यामुळें वेद जाणणारे विद्वान् लोक मला वृषभध्वज आणि वृषभवाहन असें ह्मणतील. (८३) शिव विष्णूस ह्मणाले, विष्णो, मी तुला आणखी दुसरा कोणता वर देऊं तें तूं मला सांग तुझें कल्याण असो, तूं बुद्धिमान् आहेस, तुला जें पाहिजे असेल तें सांग. (८४) शिवांनीं असें ह्मटल्यावर परमेश्वर विष्णु हात जोडून शिवास ह्मणाले, देवा, जर तूं मला प्रसन्न झाला आहेस तर तुझ्या विषयीं माझ्या मनांत निश्चल भक्ति असावी असा वर मला दे (८५) परमेश्वरा, ही तुझी भक्ति ज्या मनुष्याचे अंगीं आहे त्याचे मनोरथ पूर्ण होणें कितीही दुरापास्त असलें, तरी ते पूर्ण होतात. आणि ज्या मनुष्याचें अंगीं तुझी भक्ति नाहीं तो हजार विद्या जाणणारा असला तरी तो चांडाळ समजावा, तो नीच होय, ह्यांत संशय नाहीं. (८६) परमेश्वरा, ती भक्ति अंगीं असली ह्मणजे मनुष्य

तार्थोऽहं यदि युक्तो महेश्वर ॥ भविष्यामि महादेव तां देहि मम शंकर ॥८६॥

ईश्वर उवाच ॥ भक्तिर्मय्यचला तेऽस्ति निर्व्यलीका च केशव ॥ पुनश्चानपगा सास्तु मत्प्रसादात्सदैव हि ॥ इत्युक्त्वान्तर्दधे देवः परमात्मा सदाशिवः ॥८७॥

स्कंद उवाच ॥ रहस्यमेतद्गदितं सर्वपापक्षयावहम् ॥ सर्वसंपत्करं पुण्यं शिवभक्तिप्रवर्धनम् ॥८८॥ न देयमेतद्विप्रेंद्र यस्य कस्य चिदुत्तमम् ॥ त्वयापि शिवभक्ताय देयं सर्वात्मना त्विदं ॥८९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने पुनरपिविष्णोश्चक्रादिप्रदानं नामद्वात्रिंशोऽध्यायः ॥

---

कृतार्थ होतो ह्यासाठीं ती भक्ति माझे अंगीं असल्यानें मी कृतार्थ होईन. ह्मणून मला तुझी भक्तिच दे.

(८७) शिव ह्मणाले– विष्णो माझ्या विषयीं तुझ्या मनांत अचल आणि निष्कपट भक्ति आहेच, तरी पण माझ्या कृपेनें ती पुनः तुझ्या ठिकाणीं निश्चल होईल. असें बोलून परमेश्वर श्रीशिव गुप्त झाले.

(८८) कार्तिकेय ह्मणाला— सनत्कुमारा हें मी तुला फार महत्वाचें कथानक सांगितलें, हें सर्व पातकांचा नाश करितें, ह्यामुळें सर्व प्रकारची संपत्ति मिळते, हें फार पुण्यकारक असून शिवाविषयीं भक्ति वाढविणारें आहे. (८९) हे ब्रह्मणश्रेष्ठा, हें कथानक तूं भलत्या सलत्या मनुष्यास सांगूं नकोस. तूंही ज्ञाताच आहेस, जो कोणी शिवभक्त असेल त्यासच सांगावें.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठ नागनाथ नांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं पुनः श्रीविष्णूस चक्र वगैरे अर्पण करणें हें वर्णन असलेला. हा बत्तिसावा अध्याय संपला.

## ॥ अथ त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥शिवरहस्ये ॥ दूर्वासा उवाच ॥ द्वापरान्ते सुरम्यायां द्वारवत्यां यथासुखम् ॥ त्रासिताखिलभूपालो न्यवसत्कंसकेशिहा ॥१॥ स कदाचित्सुतार्थं तु जांववत्या प्रसादितः ॥ वैनतेयं समारुह्य प्रययौ गंधमादनम् ॥२॥ सर्वर्तुसुखदं रम्यं नानाद्रुमलताकुलम् ॥ शांतपक्षिमृगाकीर्णं सुरसिद्धनिषेवितम् ॥३॥ जंवूजंवीरनारिंगपूगपुन्नागचंपकैः ॥ कदंवाशोककंकालवकुलांकोलकिंशुकैः॥४॥ सालसर्जार्जुनप्लक्षैर्भूर्जशोभांजनांजनैः ॥ मधूकासनखर्जूरशाकाम्लातकपीलुभिः ॥५॥ बीजपूरैर्नारिकेलैः कर्णिकारैः सुपुष्पितैः ॥ पारिजातैः सकर्पूरैः सिंधुवारैश्च केसरैः ॥६॥ कंदर्पस्य शराकारैः सहकारैर्मनोहरैः ॥ चिरविल्वैः स बिल्वैश्च तथान्यैश्चोपशोभितम् ॥७॥ यत्र सा बदरी पुण्या नित्यं पुष्पफलान्विता ॥ शिवध्यानरतैः शान्तैर्मुनिभिश्चो-

---

श्रीशिवास नमस्कार असो. शिवरहस्यांत हा पुढील कथाभाग आहे (१) दूर्वासा ह्मणाले—द्वापर युगाच्या शेवटीं मनोरम दिसणाऱ्या द्वारकेंत सर्व त्रैलोक्यांतील शत्रु राजांस त्रासवून सोडणारा, कंसास व केशिराक्षसास मारणारा श्रीकृष्ण मोठ्या आनंदानें राहत होता. (२) जांबुवती नांवाच्या त्याच्या बायकोनें माझे पोटीं मुलगा व्हावा अशी विनंति केली. तेव्हां तिचें ह्मणणें मान्य करून तो श्रीशिवाचें आराधन करावयासाठीं गरुडाचे पाठीवर बसून गंधमादन पर्वतावर गेला. (३) गंधमादन पर्वतावरील स्थान सर्व ऋतूंत सुखकारक असें होतें, तें फार मनोहर असून तेथें अनेक प्रकारचीं झाडें आणि वेली होत्या. त्याठिकाणीं सर्व शांत स्वभावाचे पशु पक्षी होते, हिंसकप्राणी तेथें मुळींच नव्हते, देव आणि सिद्धलोक राहत होते. (४) तेथें जंबू, जंवीर, नारिंग, सुपारी, पुन्नाग, चांफा, कदंब अशोक, कंकाल, वकुल, आक्रोड, किंशुक (पळस) (५) साल, सर्ज, अर्जुन, वड, भूर्ज, शोभांजन, अंजन, मधूक, असन, खजूर, शाक, आम्लातक, पीलु, (६) बीजपूर, नारिकेल, कर्णिकाराचीं फुललेलीं झाडें, पारिजात, कापूर, सिंधुवार आणि केसर वगैरे अनेक प्रकारचीं झाडें होतीं. (७) प्रत्यक्ष मदनाचे बाण आहेत असे दिसणारे आंब्याचे वृक्ष तेथें फार मनोहर दिसत होते; चिरविल्वाचीं, बेलांचीं, तशींच दुसरीं अनेक प्रकारचीं झाडें पुष्कळ असल्यामुळें तें स्थळ फार मनोरम दिसत होतें. (८) तेथें बदरिकाश्रम नांवाचें स्थान होतें, तें फार पवित्र असून तेथें फुलें आणि फळें पुष्कळ होतीं. तेथें शिवध्यानांत निमग्न अ-

पशोभिता ॥८॥ तत्राश्रमपदे दिव्ये स्थितं स्कंदमिवापरम् ॥ उमपन्युं मुनिश्रेष्ठं देवर्षिगणसेवितम् ॥९॥ ततो भक्त्या यथान्यायमुपगम्याभिवंद्य च ॥ वासुदेवो जगद्वंद्यो भूमावुपविवेश ह ॥१०॥ सोऽपि सर्वार्थतत्वज्ञश्चाणूरान्तकमच्युतम् ॥ संपूज्याभ्यागतं प्रेम्णा प्रहस्येदमथाब्रवीत् ॥११॥

उपमन्युरुवाच ॥ प्राप्स्यसे तनयान्कृष्ण बहूनमितविक्रमान् ॥ विपुलं च तथैश्वर्यं भार्याश्चापि सहस्रशः ॥१२॥ तपः सुमहदास्थाय तोषयेशानमव्ययम् ॥ इहैव तेजस्तपसां निधिं देवमुमापतिम् ॥१३॥ भौमान्मनोरथान्दिव्यान्स्वर्गं वद्यं च तत्पदम् ॥ प्रसन्ने प्राप्स्यसे शंभौ निर्वाणमपि चोत्तमम् ॥१४॥ श्रीमान् यादववंशेऽस्मिन् पुरा ह्यासीन्महीपतिः ॥ शशबिंदुरिति ख्यातश्चक्रवर्ती महाद्युतिः ॥१५॥ संतोष-

---

सणारे शांत स्वभावाचे मुनीश्वर रहात असल्यानें त्या वनास अलौकिक शोभा आली होती. (९) त्या सुंदर आश्रमांत कार्तिकेयाप्रमाणें दिसणारा उपमन्यु नांवाचा मुनीश्वर रहात होता. देव आणि ऋषि ह्यांचे समुदाय त्याची सेवा करीत होते. (१०) त्या उपमन्यु ऋषीच्या आश्रमांत जाऊन भक्तिभावानें सर्व लोकांस मान्य असणाऱ्या श्रीकृष्णानें मुनीश्वरापुढें साष्टांग नमस्कार घातला; व त्याचे पुढें नम्रतेनें जमिनीवर बसला. (११) तो मुनीश्वर मोठा ज्ञानी होता. त्यानें चाणूर दैत्याचा नाश करणाऱ्या श्रीकृष्णाचा, हा आपले घरीं पाहुणा आला आहे असें समजून, तो मुनि योग्य रीतीनें आदरसत्कार करून प्रेमभावानें त्याकडे पाहून हंसून त्यास ह्मणाला.

(१२) उपमन्यु ह्मणाला— श्रीकृष्णा, तुला पुष्कळ मुलगे होतील, आणि ते पराक्रमी होतील; तसेंच तुला ऐश्वर्यही पुष्कळ मिळेल व बायकाही हजारों मिळतील. (१३) तूं येथेंच मोठी खडतर तपश्चर्या करून अविनाशी तेजाचा व तपश्चर्येचा निधि देवाधिदेव असा जो पार्वतीपति श्रीशिव त्याचें मन प्रसन्न कर. (१४) एक वेळ तो श्रीशिव तुला प्रसन्न झाला, ह्मणजे ह्या मृत्युलोकांतील सर्व सुखें मिळतील, स्वर्गांतील सुखें मिळतील, व जेथें अतिशय सुख आहे असें ह्मणतात तो मोक्षही तुला मिळेल. (१५) ह्या विषयीं तुला कांहीं इतिहास सांगतों ऐक. ह्या यादव वंशांत पूर्वी एक राजा होऊन गेला, तो शशबिंदु ह्या नांवानें प्रसिद्ध होता; तो चक्रवर्ती राजा असून मोठा पराक्रमी होता. (१६) त्यानें

यित्वा देवेशं विधिवत्कृष्ण धूर्जटिम् ॥ लेभे भार्यासहस्राणां शतं सर्वगुणान्वितम् ॥१६॥ सुतानां प्रयुतं चैकं कन्यास्तावत्य एव हि ॥ आयुरारोग्यमैश्वर्यं भोगांश्चैव तथाक्षयान् ॥१७॥ षष्टिं पुत्रसहस्राणां सगरोऽपि गुणाकरः ॥ प्राप्तवान् संप्रसाद्येशं वाराणस्यां स भूपतिः ॥१८॥ मुनयो मनवश्चापि समाराध्येह शंकरम् ॥ स्वगोत्रवंशकर्तारो जातास्तीर्थकृतो परे ॥१९॥ सनत्कुमारकपिलजैगिषव्यपुरोगमाः ॥ प्रसाद्य परमां सिद्धिं संप्राप्ताः पार्वतीपतिम् ॥२०॥ उशनाव्यासवाल्मीकिगर्गवत्सांगिरादयः ॥ प्रसादात्त्रिपुरघ्नस्य ग्रंथकारास्त्विहाभवन् ॥२१॥ कश्यपो ब्रह्मपुत्रोऽपि स्रष्टुकाम इमाः प्रजाः ॥ सुदुश्चरं तपस्तेपे गृणन् ब्रह्म सनातनम् ॥२२॥ तं चाहेदमथो रुद्रो मारीचं तुष्टमानसः ॥ स्रष्टा त्वं सर्वभूतानां भविष्यस्यजरामरः ॥२३॥ इत्युक्तस्तु ततस्तेन गो-

---

यथाविधीनें शिवाचें अराधन करून त्यास प्रसन्न केलें. श्रीकृष्णा, त्यामुळें त्याला सर्व गुणसंपन्न अशा सुंदर सुस्वरूप शंभर हजार बायका मिळाल्या. (१७) शिवाच्या कृपेनें त्या शशबिंदु राजाला दहा लक्ष मुलगे आणि दहा दक्ष मुली झाल्यां, त्याच्या आयुष्याची वृद्धि झाली, व त्याला अरोग्य, ऐश्वर्य, आणि सुखोपभोग अक्षयकाळपर्यन्त भोगावयास मिळाले. (१८) सगर राजाही मोठा गुणवान् होऊन गेला. त्यानें काशीक्षेत्रांत शिवाचें आराधन करून शिवास प्रसन्न करून घेतल्यामुळें त्याला साठ हजार मुलें झालीं. (१९) मुनीश्वर आणि मनु ह्यांनींही येथें श्रीशिवाची अनेक काळपर्यन्त आराधना केली ; त्यामुळें शिवाचे कृपेनें कितीएक गोत्रकर्ते, कितीएक वंशकर्ते आणि दुसरे कितीएक तीर्थ करणारे (धर्मसंस्थापक) झाले. (२०) सनत्कुमार, कपिल, जैगिषव्य वगैरे मुख्य मुख्य ऋषीश्वर पार्वतीपति श्रीशिवाला प्रसन्न करून घेण्यासाठीं उत्तम तपश्चर्या करून उत्कृष्ठ सिद्धि पावले. (२१) शुक्राचार्य, व्यास, वाल्मीकि, गर्ग, वत्स, अंगिरा, वगैरे मोठ मोठे ऋषि ह्यालोकीं त्रिपुरांचा नाश करणाऱ्या श्रीशिवाच्या कृपेनें मोठ मोठे ग्रंथकार झाले. (२२) ब्रह्मदेवाचा मानसपुत्र कश्यपऋषिही ही सर्व प्रजा उत्पन्न करण्याच्या इच्छेनें, सनातन ब्रह्मस्वरूपाकडे लक्ष लावून शिवाची अराधना करूं लागला. (२३) मग कश्यपाच्या तपश्चर्येनें शिव प्रसन्न होऊन त्यास ह्मणाले, तूं सर्व प्राणिमात्रांचा उत्पन्नकर्ता होशील. तुला वृद्धपणा आणि मरण असणार नाहीं. (२४) उपमन्यु ह्मणाले, श्रीकृष्णा, मग त्या श्रीशिवाच्या अनुग्रहानें

विदः परमात्मना ॥ ससर्ज विविधाकारं जगदेतच्चराचरम् ॥२४॥ भृगुर्देवीपतिश्चैव कामांगारेस्त्रिलोचनात् ॥ विद्यास्थानानि सर्वाणि दिव्याण्यस्त्राण्यवाप्तवान् ॥२५॥ संस्पर्धिनौ तु भूतेशमाराध्य मयभौवनौ ॥ उभावपि हि लोकेऽस्मिन् संजातौ शिल्पिनां वरौ ॥२६॥ एवं देवास्तथा दैत्या मनुष्याश्च सहस्रशः ॥ प्राप्ताश्चाभिमतान् कामान् प्रसाद्य परमेश्वरम् ॥२७॥ दौर्भाग्यव्याधिदौर्गत्यदारिद्र्यभयनाशनम् ॥ सर्वकामार्थदं विष्णो को न सेवेत्तमीश्वरम् ॥२८॥ ततस्त्वमखिलान्कामान् प्राप्स्यसे सुरनायकात् ॥ सपत्नीकान्महादेवात्सत्यमेतद्ब्रवीमिते ॥२९॥ अतीतानागतं यस्माद्वर्तमानं च नित्यशः ॥ विदितं मे हृषीकेश प्रसादात्तस्य धीमतः ॥३०॥ अथाब्रवीत्पुनर्विष्णुरुपमन्युं तपोनिधिम् ॥ कृतांजलिपुटो भूत्वा देवेंद्र इव वाक्पतिम् ॥३१॥ यथा पश्याम्यहं देव-

---

मारीच ऋषीनें अनेक प्रकारचें हें सर्व स्थावरजंगम विश्व उत्पन्न केलें. (२५) देवीपति भृगुऋषीनें मदनाचें अंग जाळून टाकणाऱ्या व तीन नेत्र असणाऱ्या श्रीशिवाच्या कृपेनें सर्व प्रकारच्या विद्या आणि सर्व प्रकारचीं उत्तम उत्तम अस्त्रें संपादन केलीं. (२६) मागें परस्परांशीं स्पर्धा करणारे मय आणि भौवन नांवाचे दोघे दैत्य होते; त्या दोघांनींही शिवाचें आराधन करून त्यास प्रसन्न करून घेतलें. तेव्हां श्रीशिवाच्या कृपेनें ते दोघेही मोठे प्रसिद्ध कारागीर झाले. (२७) अशा रीतीनेंच देव, तसेच दैत्य, हजारों मनुष्यें यांनीं परमेश्वर श्रीशिवाचें आराधन केलें. व श्रीशिवाच्या कृपेनें त्यांच्या मनांत ज्या ज्या इच्छा होत्या त्या त्या पूर्ण करून घेऊन ते सुखी झाले. (२८) श्रीविष्णो, शिवाची भक्ति केल्यानें दुर्दैव, व्याधि, दारिद्र्य, नरकयातना वगैरे सर्व प्रकारच्या दुःखांचें निरसन होऊन, सर्व प्रकारचे मनोरथ परिपूर्ण होऊन, मनाला सुख मिळतें. तेव्हां त्या शिवाचें आराधन कोण करणार नाहीं? (२९) तसें तूंही पार्वतिपति सुरश्रेष्ठ श्रीशिवाचें मनोभावानें आराधन करशील तर शिवपार्वतीच्या कृपेनें तुझ्या मनांतील सर्व इच्छा पूर्ण होतील हें मी तुला अगदीं खरें सांगतों. (३०) श्रीकृष्णा, त्या बुद्धिमान् परमेश्वर श्रीशिवाच्या कृपेनें येथें आजपर्यन्त झालेल्या, होत असलेल्या, आणि पुढें होणाऱ्या अशा दररोजच्या हजारो गोष्टी मला माहीत आहेत. (३१) असें उपमन्यूचें बोलणें ऐकून पुनः श्रीकृष्णानें त्या तपोनिधि उपमन्युऋषीला हात जोडून, इंद्रानें जसें बृहस्पतीस विचारावें, तसें उपमन्यूस विचारलें (३२) हे उपमन्युऋषे, तूं मोठा दैववान् आहेस, तुझ्या कृपेनें मला महेश्वर पार्वतीपति

मुमाकान्तं महेश्वरम् ॥त्वत्प्रसादान्महाभाग तथा त्वं कर्तुमर्हसि॥३२॥ एवमुक्त्वा ततस्तस्मात्प्राप्य दीक्षां स केशवः ॥ शिवमाराधयामास विधिवन्नियमस्थितः॥३३॥मासमेकं फलाहारो द्वितीयं सलिलाशनः ॥ तृतीयं च चतुर्थं च पंचमं वायुभोजनः॥ पादेनैकेन चातिष्ठन्मासे षष्ठे बलानुजः ॥३४॥ तावद्वर्षमुखे दिव्यं तेजःपुंजमनुत्तमम् ॥ तस्य मध्यगतं चापि देवदेवं सहोमया ॥ अपश्यद्देवसंघानां गतिमार्तिहरं हरम् ॥३५॥ वृत्तम् ॥ किरीटिनं जटिनं शूलपाणिं व्याघ्राजिनं गदिनं चंद्रमौलिम् ॥ पिनाकिनं शत्रुहणं सुदंष्ट्रं शुभांगदं व्यालयज्ञोपवीतम् ॥३६॥दिव्यां मालामुरसानेकवर्णां समुद्वहन्तं गुल्फदेशावलंबां॥चंद्रं य-

---

श्रीशिव ह्याचें दर्शन होईल असें कर. ( शिव दर्शन होण्याचा मला उपाय सांग ) (३३) असें ह्मणून श्रीकृष्णानें उपमन्यु मुनीपासून शिवदीक्षा घेतली, आणि तेव्हांपासून तो नियम धरून यथाविधीनें शिवाचें आराधन करूं लागला. (३४) त्यानें एक महिना फळें खाऊन तपश्चर्या केली, दुसऱ्या महिन्यांत नुसतें पाणी पिऊनच त्यानें तपश्चर्या केली, तिसरा महिना, चौथा महिना आणि पांचवा महिना हे तीन महिने त्यानें वायु भक्षण करून तपश्चर्या केली, सहाव्या महिन्यांत तर बलरामाचा धाकटा भाऊ श्रीकृष्ण एका पायावर उभा राहून कांहीं एक न खातां न पितां सारखा उभा राहून अहोरात्र तपश्चर्या करूं लागला. (३५) अशा स्थितींत एक वर्ष लोटल्यावर त्याचे दृष्टीस शिवस्वरूप पडलें, तें फारच अलौकिक आणि तेजःपुंज होतें, त्यारूपाची बरोबरी करूं शकेल असा जगांत दुसरा पदार्थच नव्हता, त्या शिवस्वरूपाच्या सभोंवतीं तेजोवलय असून, त्या तेजोमंडलांत दोघे शिवपार्वती होते. तेच देवांचे सर्वतोपरी रक्षणकर्ते असून ते लोकांचें दुःख दूर करणारे परमेश्वर होत. (३६) त्या श्रीशिवांच्या मस्तकावर उत्तम मुकुट होता, त्यांच्या मस्तकावर जटा होत्या, त्यांच्या हातांत शूल होता, त्यांच्या अंगावर वाघाचें कातडें होतें, त्यांच्या हातांत गदा होती, त्यांच्या मस्तकावर चंद्र होता, त्यांचे हातांत अजगव धनुष्य होतें, तें धनुष्य शत्रूचा नाश करण्यास समर्थ होतें, त्यांच्या दाढा चांगल्या होत्या, त्यांच्या मणगटांत सुंदर भूषण होतें, त्यांच्या गळ्यांत सर्पांचें यज्ञोपवीत होतें. (३७) त्यांच्या गळ्यांत उरावर लोंबणारी एक माला होती ती अनेक रंगाची असल्यामुळें शोभत होती. ती पायांच्या घोंट्यापर्यंत लोंबत होती, शरदृतूंत रात्रीं परिवेष केलेला चंद्र जसा शोभावा, तसे श्री-

थावत्परिवेषसंस्थम् वर्षात्यये तद्वदपश्यदेनम् ॥३७॥ ततः स भगवानाह गौरीशो यदुनंदनम् ॥ सुप्रीतोऽहं भृशं तेऽद्य पश्य मां वरयस्व च ॥३८॥ उन्नाम्य च मुखं कृष्णः प्रहृष्टोऽसौ महामते ॥ स्तुतवांस्तं महादेवं स्तुतं ब्रह्मादिभिः सुरैः ॥३९॥ वृत्तम् ॥ ओंकारमुच्चार्य विलोक्य देवमन्तःशरीरे निहितं गुहायाम् ॥ तमस्तुवद्ब्रह्ममयैर्वचोभिरानंदपूर्णाश्रुविलोचनोऽसौ ॥४०॥

कृष्ण उवाच ॥जयाष्टमूर्ते शिव कालकेतो जयांबिकाकान्त जयान्धकारे ॥ अनन्यभक्तस्य च चारुचंद्रचूडामणे शंकर मे प्रसीद ॥४१॥ नमोऽस्तु ते शाश्वत पुण्यराशे भूतेंद्रियान्तःकरणैकयोने ॥ भक्तप्रियेशाज सुरेश हंस जगत्पते नाथ विशुद्धकीर्ते ॥४२॥ न कारणं वेद्मि त-

---

शिव दिसत होते. (३८) नंतर तो पार्वतीपति श्रीशिव त्या यादवश्रेष्ठ श्रीकृष्णास ह्मणाला श्रीकृष्णा, मी आतां तुला प्रसन्न झालों आहें, तूं मजकडे पहा आणि तुला काय वर पाहिजे असेल तो माझ्याजवळ मागून घे; तो मी देण्यास तयार आहें. (३९) श्रीशिवाचें असें अभयवचन ऐकतांच कृष्णानें वर तोंड करून आनंदानें श्रीशिवाच्या तोंडाकडे पाहिलें, आणि बुद्धिमाना जैमिने, ब्रह्मादिक देव त्या परमेश्वर श्रीशिवाची स्तुति करितात त्या श्रीशिवाची तो स्तुति करूं लागला. (४०) कृष्णानें अगोदर ॐ कार मंत्राचा उच्चार केला आणि आपल्या हृदयरूप गुहेंत असणाऱ्या परमेश्वर श्रीशिवाकडे पाहिलें; आणि डोळ्यास आनंदाश्रु आल्यावर त्यानें ब्रह्ममयवाणीनें श्रीशिवाची स्तुति केली.

(४१) कृष्ण ह्मणाला—हे शंकरा, तुझ्या आठ मूर्ति आहेत तुझा जय असो तूं यमधर्मास शिक्षा केलीस, तुझा जय असो, तूं पार्वतीचा पति आहेस तुला नमस्कार असो, तूं अंधकासुराचा शत्रु आहेस तुला नमस्कार असो, उत्तम रीतीनें शोभणारा चंद्र तुझे मस्तकावर आहे, तुला शंकर ह्मणतात; मी तुझा एकनिष्ठ भक्त आहें, तूं मजवर कृपा कर. (४२) तूं चिरकाल राहणारा असून पुण्यवान् आहेस तुला नमस्कार असो, परमेश्वरा, हीं पंचमहाभूतें, पांच कर्मेंद्रियें आणि पांच ज्ञानेंद्रियें, आणि अन्तःकरण ह्या सर्वांचें तूंच मूळ आहेस, तूं भक्तलोकांचें कल्याण करणारा आहेस, तूं परमेश्वर आहेस, तुला जन्म नाहीं, तूं देवांचा देव आहेस, तुला हंस ह्मणतात, तूं त्रैलोक्याचा अधिपति आहेस, तूं धनी आहेस, तुझी निष्पाप कीर्ति आहे. (४३) हे

वेश सृष्टौ संहारकार्ये च तथा न वेद्मि ॥ आदिं न मध्यं च तथैव नांतं त्वामेकमीशं वरदं वरेण्यम् ॥४३॥ ब्रह्मर्षिसत्यर्षितपर्षिभिश्च श्रुतर्षिराजर्षिमहर्षिभिश्च ॥ देवर्षिभिश्चाप्यमलस्वभावैस्संस्तूयसे त्वं च सुरेश शंभो ॥४४॥ पंचेंद्रियार्थश्च मनश्च कृत्स्नं ये वायवः सप्त तथैव वन्हिः ॥ ये वा दिविष्ठाः पितरश्च देवास्तेषां परं त्वां मुनयो गृणंति ॥४५॥ शृणोष्यकर्णः परिपश्यसि त्वमचक्षुरेको बहुरूपरूपः॥ अपादहस्तो जवनो गृहीता त्वं वेत्सि सर्वं न च सर्ववेद्यः ॥४६॥ यथाग्निरेको बहुधा समिध्यते विकारभेदैरविकाररूपः ॥ तथा भवान् सर्वगतैकरूपी रूपाण्यनेकान्युपयुंजसीश ॥४७॥ यस्त्वां ध्रुवं वेत्ति विभुं गुहाशयं कविं पुराणं पुरुषं महान्तम् ॥ हिरण्मयं वेदविदां परां गतिं

---

परमेश्वरा तुला सृष्टि उत्पन्न करण्याचें आणि सृष्टीचा संहार करण्याचें कांहीं कारण आहे असें मला तर वाटत नाहीं, तुला जन्म नाहीं, तुला तरुणपण नाहीं, तुला मरण नाहीं, तूं एकटा आहेस, तूं ईश्वर आहेस, तूं वर देणारा आहेस, तूं श्रेष्ठ आहेस. (४४) ब्रह्मर्षि, सत्यर्षि, तपर्षि, श्रुतर्षि, राजर्षि, महर्षि आणि देवर्षि वगैरे जे निष्पाप स्वभावाचे लोक आहेत, ते सर्व लोक तुझी स्तुति करितात. शंभो तूं सर्व देवांचा मुख्य देव आहेस, (४५) हीं पांच इंद्रियें, आणि त्या त्या इंद्रियांच्या विषयाच्या वस्तु, हें मन, हे सगळे सात वायु, तसाच अग्नि आकाशांत राहणारे लोक, पितर आणि देव ह्या सर्वांपेक्षां तूं श्रेष्ठ आहेस. तुला मुनीश्वर लोक एकनिष्ठपणानें भजतात. (४६) तूं कान नसतांना ऐकतोस, तूं डोळे नसतां पाहतोस, तूं एकरूप आहेस आणि अनेकरूपही आहेस; तुला पाय नाहींत तरी तूं पळतोस, तुला हात नाहींत तरी तूं घेतोस, तुला सर्व कांहीं समजत आहे, तुला सर्ववेत्ता असें ह्मणतात. (४७) एक असून जरी अग्नि निर्विकार आहे तरी त्यावर लांकडें घातलीं ह्मणजे त्याला निरनिराळे विकार होऊन तो अनेक प्रकारचा झालेला दिसतो; तसा तूं परमेश्वर सर्व ठिकाणीं व्यापलेला आहेस, तरी तूं कारणपरत्वें अनेक प्रकारचीं रूपें घेतोस. (४८) जो कोणी पुरुष तुला तूं ध्रुव आहेस तूं समर्थ आहेस, तूं भक्तलोकांचे हृदयरूप गुहेंत राहतोस, तूं ज्ञाता आहेस, तूं अनादिकालापासून आहेस, तूं पुरुष आहेस, तूं मोठा आहेस, तूं सुवर्णरूप आहेस, तूं वेद जाणणाऱ्या लोकांचा मुख्य रक्षक आहेस असें जाणतो; तो बुद्धिमान् मनुष्य ह्या सर्व जगांत जितके कांहीं बुद्धिमान् लोक आ-

स बुद्धिमान् बुद्धिमतोऽत्यतिष्ठति ॥४८॥ एको रुद्रस्त्वं करोषीह विश्वं त्वं पालयस्यखिलं विश्वरूप ॥ त्वामेवान्ते विलयं विंदतीदं नमामि त्वामादिदेवं पुराणम् ॥४९॥ एको वेदो बहुशाखो ह्यनंतस्त्वामेवैकं बोधयत्यात्मरूपम् ॥ वेद्यं ये त्वां शरणं संप्रपन्नास्तेषां शांतिः शाश्वती नेतरेषाम् ॥५०॥ स्तुवंति त्वां सततं सर्वदेवा नमंति त्वां ऋषयः क्षीणदोषाः ॥ शान्तात्मानः सत्यसंधा वरिष्ठा विशंति त्वामेव ते ध्याननिष्ठाः ॥५१॥ नमो भवायास्तु भवोद्भवाय कालाय शर्वाय हराय तुभ्यम् ॥ नमोऽस्तु रुद्राय कपर्दिने ते नमोऽग्नये देव नमः शिवाय ॥५२॥ चिन्मात्रमत्यन्तमनंतशक्ति सनातनं त्वां परमं परेभ्यः ॥ नमास्यतस्त्वं शरणार्थमीश प्रसीद भूताधिपते नमस्ते ॥५३॥ न ते गुणानां परिमा-

---

हेत त्या सर्वांपेक्षां मुख्य समजला जातो. (४९) तूं एकटा रुद्र आहेस, दुसरा कोणी रुद्र नाहीं, तूं स्वतः हें सर्व विश्व उत्पन्न करितोस, तूं विश्वरूप घेऊन सर्व विश्वाचें संरक्षण करितोस, आणि तुझ्यांतच शेवटीं हें सर्व जग लय पावतें; तूं आदिदेव आहेस तूं अनादिकालापासून आहेस, (५०) वेद हा एकच आहे तरी त्याच्या शाखा पुष्कळ आहेत, त्याचा अंत लागत नाहीं, असें जरी आहे, तरी तो देखील असें ह्मणतो कीं, तूंच ( महादेवच ) आत्मस्वरूप आहेस, तुझेंच यथार्थ ज्ञान झालें पाहिजे, जाणून घेण्यासारखा तूंच आहेस. त्या तुला जें लोक शरण येतात, त्यांसच चिरकाल राहणारी शांति मिळते; इतरांस मिळत नाहीं. (५१) तुझी सर्व देव नेहमीं स्तुति करितात, निष्पाप स्वभावाचे ऋषीश्वर तुला नेहमीं नमस्कार करितात, ज्यांचें मन शांत आहे जे कोणी नेहमीं खरेंच बोलतात, जे लोक श्रेष्ठ आहेत, जे लोक नेहमीं तुझेंच ध्यान करितात ते सर्व तुझ्याच रूपाला येऊन मिळतात. (५२) तुला भव ह्मणतात, भवोद्भव ह्मणतात, तशींच काल, शर्व, हर, रुद्र, कपर्दी, अग्नि, देव आणि शिव अशीं तुला अनेक नांवें आहेत, त्या तुला नमस्कार असो. (५३) तूं चित्स्वरूप आहेस ( तूं चैतन्यस्वरूप आहेस ), तुला अंत नाहीं, तुझी शक्ति अमर्याद आहे, तूं अनादिकालापासून आहेस, जगांत ज्या श्रेष्ठ वस्तु आहेत त्या सर्वांपेक्षां तूं श्रेष्ठ आहेस, मी तुला नमस्कार करितों, मी तुला शरण आलों आहें, परमेश्वरा, तूं मजवर कृपा कर. तूं प्राणिमात्रांचा अधिपति आहेस तुला नमस्कार असो. (५४) तुझ्या गुणांचा अंत लागत नाहीं, ते असंख्य आहेत, तुझ्या तेजाचा अंत लागत नाहीं,

णमस्ति न तेजसो नापि बलस्य ऋद्धेः ॥ पितेव लोकस्य चराचरस्य त्वमेव देवेश गुरुर्गरीयान् ॥५४॥ नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमो नमः सर्वत एव शर्व ॥ नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमोनमस्ते ॥५५॥ स्त्युत्वाऽनया स्तुतश्चैवं प्रोवाचेदं सुरारिहा ॥ समालिंग्य मुदा देवो देवकीकुलनंदनम् ॥५६॥

ईश्वर उवाच ॥ यशस्वी तेजसा युक्तो दिव्यज्ञानसमन्वितः॥अक्षतो निर्जरश्चापि दुःखामयविवर्जितः ॥५७॥ मत्प्रसादाद्यदुश्रेष्ठ भविष्यसि न संशयः ॥ यत्ते काम्यं ददाम्यद्य ब्रूहि तच्चांबुजेक्षण ॥५८॥ प्रणिपत्य स तं मूर्ध्ना वासुदेवो जगत्पतिम् ॥ जैमिनेऽयमजं देवं महादेवमथाब्रवीत् ॥५९॥

कृष्ण उवाच॥धर्मे दृढत्वं यदि शत्रुघातमैश्वर्यमग्र्यं परमं बलं च॥

---

तुझ्या शक्तीचा अंत लागत नाहीं, तुझ्या ऐश्वर्याचा अंत लागत नाहीं. तूं ह्या सर्व स्थावर जंगम विश्वाचा आईबापच आहेस; हे देवाधिदेवा, परमेश्वरा, तूं सर्व त्रैलोक्याचा मुख्य गुरु आहेस. (५५) तूं पुढें आहेस तुला नमस्कार असो, तूं मागें आहेस तुला नमस्कार असो, श्रीशिवा, तूं चोहोंकडे व्यापलेला आहेस तुला नमस्कार असो, तुला हजारवेळां नमस्कार असो, पुनःही आणखी वारंवार तुला नमस्कार असो. (५६) अशा तऱ्हेनें श्रीकृष्णानें शिवाची मनोभावानें स्तुति केल्यावर दैत्यांचा नाश करणारे श्रीशिव संतोषानें देवकीच्या पोटीं जन्मास येऊन सर्व वंशास आनंद देणाऱ्या श्रीकृष्णास कडकडून भेटून ह्मणाले.

(५७) शिव ह्मणाले — श्रीकृष्णा, तूं यशस्वी होशील, तूं तेजस्वी होशील, तुझ्या अंगीं दिव्यज्ञान येईल, तुला क्षय नाहीं, तुला ह्मातारपण नाहीं, तुला दुःख आणि रोग वगैरे कांहींएक होणार नाहीं, (५८) माझ्या कृपेमुळें तूं सर्व यादवांत श्रेष्ठ होशील, ह्यांत कांहीं संशय नाहीं. श्रीकृष्णा, तुझे डोळे कमळासारखे सुशोभित आहेत, तुझ्या मनांत काय इच्छा आहे ती मला सांग; ती मी आतांचे आतां पूर्ण करितों (५९) जैमिने ऋषे, असें महादेवाचें बोलणें ऐकून तो श्रीकृष्ण जमिनीस मस्तक लावून नमस्कार करून त्रैलोक्याचा पति व देवाधिदेव अशा श्रीशिवास असें ह्मणूं लागला.

(६०) कृष्ण ह्मणाला— श्रीशिवा, तुझी जर मजवर कृपा असेल तर माझा धर्मावर दृढ निश्चय असावा, माझ्या हातून शत्रूंचा नाश व्हावा, मला अतिशय

वृणोमि पुत्रांश्च सहस्रशोऽत्र भक्तिर्दृढा मेऽस्तु तव प्रसादात्॥ ६०॥ अथाह रुद्रो मुदितो मुरारिमेवं भविष्यत्यखिलं तवैतत् ॥ पुत्रादिकं केशव केशिशत्रो नाहं वृथा जातु वदे मृषा वा ॥६१॥ प्रीता प्रियाप्याह पिनाकपाणेः सुपर्णकेतुं गिरिराजकन्या ॥ ददाम्यहं ते वसुदेवसूनो प्रकामरूपत्वमिहार्थसिद्धिम् ॥६२॥ रामासहस्राणि च षोडशैव तासु प्रियत्वं च तथाक्षयत्वं ॥ सौभाग्यमप्यप्रतिमां च कांतिं सौख्यं वहूनप्यपरांश्च भोगान् ।६३।दत्वैतांस्तु वरान्विष्णोः सभार्योऽसौ वृषध्वजः॥ स्तूयमानो मुनिश्रेष्ठैर्ययौ कैलासपर्वतम् ॥६४॥

दूर्वासा उवाच ॥ कृष्णोऽप्यन्तर्हिते ब्रह्मन् सानुगे परमेश्वरे ॥ ऋषेराश्रममागत्य सर्वमेतन्न्यवेदयत् ॥६५॥ ततस्तेनाभ्यनुज्ञातोदाशार्ह उपमन्युना ॥ जगाम मुदितोऽत्यर्थं पुरीं द्वारावतीं शुभाम् ॥६६॥ पू-

---

संपत्ति मिळावी, माझ्या अंगीं अलौकिक सामर्थ्य असावें, मला हजारों मुलें व्हावींत. (६१) असें कृष्णाचें बोलणें ऐकून श्रीशिवास मोठा संतोष होऊन शिव ह्मणाले. श्रीकृष्णा, तूं केशि दैत्याचा नाश केलास त्यावरून तूं मूळचाच पराक्रमी आहेस, तूं मला ह्मणतोस तितके सर्व माझ्या कृपेनें तुला होईल. मी कधींही खोटें बोलत नाहीं. (६२) त्याचवेळीं पर्वतराज हिमालय ह्याची मुलगी देवी पार्वती संतुष्ट होऊन श्रीकृष्णास ह्मणाली, गरुडध्वजा, वसुदेवपुत्रा श्रीकृष्णा, तूं अतिशय तेजस्वी होशील अष्टमहासिद्धि तुला अनुकूल होतील. (६३) तुला सोळा हजार स्त्रिया होतील, तितक्या सर्व स्त्रिया तुझ्या आवडत्या होतील. तुझा शत्रूपासून नाश होणार नाहीं, तूं मोठा भाग्यशाली होशील, तूं अलौकिक सौंदर्यवान् होशील, तुला पुष्कळ सुख मिळेल, व इतर सर्व प्रकारचे सुखोपभोग तुला घ्यावयास मिळतील; असा माझा तुला वर आहे. (६४) असे शिवपार्वतींनीं कृष्णास वर दिले व मग मोठ मोठे ऋषीश्वर ज्यांची स्तुति करितात ते वृषभध्वज श्रीशिव कैलास पर्वतास निघून गेले.

(६५) दूर्वास ऋषि ह्मणाले—जैमिने मग परमेश्वर श्रीशिव आपल्या परिवारासह गुप्त झाल्यावर, कृष्ण उपमन्यु ऋषीच्या आश्रमास परत आले; आणि त्यांनीं तेथें झालेली सर्व हकीकत उपमन्यु ऋषीस सांगितली. (६६) मग उपमन्यु ऋषीची आज्ञा घेऊन दशार्हराजाचे वंशांत जन्मलेला श्रीकृष्ण मोठ्या संतोषानें आपल्या सुशोभित दिसणाऱ्या द्वारकेस गेला. (६७) द्वारावतीस जाऊन पोहों-

जितोऽसौ महीपालैस्तस्यां रेमे हरिश्चिरम् ॥ सर्वैश्वर्यगुणैर्युक्तो हरपादार्चनेरतः ॥६७॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने कृष्णस्य पुत्रादिवरप्रदानं नाम त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥

---

चल्यावर तेथील अधिकारी लोकांनीं कृष्णाचा आदर सत्कार केला. शिवकृपेनें त्याचे अंगीं सर्व प्रकारचे गुण येऊन त्याला सर्व प्रकारचें ऐश्वर्य मिळालें, मग तो शिवचरणाची पूजा करून द्वारकेंत चिरकाळ सुखानें राहिला.

ह्याप्रमाणें श्रीनीकंठनागनाथ नांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचार संग्रहांतील शिवाधिक्य कथनापैकीं कृष्णाला पुत्रादिकांचें वरदान मिळाल्याचें वर्णन असलेला हा तेहतिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ सूतसंहितायां॥ यज्ञवैभवखण्डे ॥ सूत उवाच ॥ भूयोऽपि देवदेवस्य प्रसादस्य तु वैभवम् ॥ प्रवक्ष्यामि समासेन शृणु तच्छ्रद्धया सह ॥१॥ महादेवप्रसादेन खलु विष्णुपदं द्विजाः ॥ ब्रह्मेंद्रादिपदं चापि न स्वतः सर्वदेहिनाम् ॥२॥ वृत्तम् ॥ शिवप्रसादेन विना न भुक्तयः शिवप्रसादेन विना न मुक्तयः ॥ शिवप्रसादेन समो न विद्यते शिवप्रसादादधिको न विद्यते ॥३॥ शिवप्रसादेन शिवस्य सन्निधिः शिवप्रसादेन विशुद्धिरात्मनः ॥ शिवप्रसादेन युतस्य सुव्रता न जन्मनाशौ भवतः सदैव तु ॥४॥ शिवप्रसादेन युतः स्वयं शिवः शिवप्रसादश्च शिवप्रसादतः॥५॥ ब्रह्मनारायणाद्याश्च देवता अखिला अपि ॥ विजायन्ते च नश्यंति ह्याज्ञयैव प्रसादिनः ॥६॥ पांसवः पर्वतायन्ते पांसूयन्ते च पर्वताः ॥ शिवप्रसादयुक्तानामाज्ञ-

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ स्कंद पुराणांत सूतसंहितेंत यज्ञवैभवखण्डांत पुढील कथाभाग आहे. (१) सूत ह्मणाले—ऋषीश्वरहो, पुनः ही मी तुह्मांला देवाधिदेव श्रीशिवाच्या प्रसादाचें माहात्म्य संक्षिप्त रीतीनें सांगतों; तें तुह्मी भक्तिभावानें लक्ष्य देऊन ऐका. (२) ब्राह्मणहो, महादेवाच्या प्रसादानेंच खरोखर भक्तांस वैकुंठलोकाची प्राप्ति होते अथवा ब्रह्मलोक वगैरे पदांची प्राप्ति होते; उगीच सर्व प्राणिमात्रांस हीं स्थानें मिळत नाहींत, हीं स्थानें शिवप्रसादानेंच प्राप्त होतात. (३) शिवाच्या प्रसादावांचून विषयसुखें मिळत नाहींत, शिवाच्या प्रसादावांचून मोक्षपदाची प्राप्ति होत नाहीं, शिवाच्या प्रसादासारखा दुसरा कोणताही पदार्थ नाहीं; व शिवाच्या प्रसादापेक्षां श्रेष्ठ असा कोणताही पदार्थ नाहीं; (४) शिवाच्या प्रसादानें शिवाच्या संनिधीस मनुष्य जातो शिवाच्या प्रसादानें आपली शुद्धता होते; हे सदाचारी ब्राह्मणहो, ज्या मनुष्यावर शिवाचा प्रसाद झाला आहे, त्याला पुनः कधींही जन्ममरणाचे फेऱ्यांत पडावें लागत नाहीं. (५) ज्यावर शिवाचा प्रसाद झाला आहे, तो मनुष्य प्रत्यक्ष श्रीशिवच होय; हा शिवप्रसाद तरी शिवाच्या प्रसादामुळेंच होतो उगीच होत नाहीं (६) श्रीविष्णु, ब्रह्मदेव आणि इतर तेहतीस कोटि देव हे देखील प्रसादी पुरुषांच्या आज्ञेनेंच जन्मास येतात आणि मरणही पावतात. (७) ज्या लोकांवर शिवाचा प्रसाद झाला आहे, त्यांच्या आज्ञेनें धुळीचा कण पर्वतासा-

यैव तु केवलम्॥७॥प्रसादस्य च माहात्म्यं शिवस्य परमात्मनः॥ अपि देवा न जानंति श्रुतयश्च न संशयः ॥८॥ पुरा कश्चिद्द्विजश्रेष्ठः सर्वलक्षणसंयुतः ॥ सत्यसंधाभिधः शुद्धो विष्णुभक्तो विशेषतः ॥९॥ अमूत्तेन कृतं सर्वं श्रुतिस्मृत्युदितं मुदा ॥ प्रतिष्ठा च कृता विष्णोर्बहुशः पंडितोत्तमाः ॥१०॥ आराधितश्च भगवान्विष्णुर्विश्वजगन्मयः ॥ दिने दिने महाभक्त्या सुगंधकुसुमादिभिः ॥११॥ वैष्णवा विविधा मंत्रास्तेन जप्ता दिने दिने॥ सर्वस्वं विष्णवे दत्तं सत्यसंधेन सादरम् ॥१२॥ प्रभुर्नारायणः श्रीमान् शंखचक्रगदाधरः ॥ प्रत्यक्षमभवत्तस्य प्रसन्नः पंकजेक्षणः ॥१३॥ तं दृष्ट्वा सत्यसंधस्तु प्रसन्नेंद्रियमानसः ॥ प्रणम्य दण्डवद्भूमौ भक्त्या परमया सह ॥१४॥ गंधपुष्पादिभिर्दिव्यैः समाराध्य यथाबलम् ॥ स्तोतुमारभते विष्णुं विश्वलोकैककारणम् ॥१५॥

सत्यसंध उवाच ॥ विष्णवे सर्वलोकानां हेतवे विविधात्मने ॥ शौ-

---

रखा होतो, व पर्वत धुळीच्या कणासारखे होतात. (८) परमेश्वर श्रीशिवाच्या प्रसादाचें माहात्म्य देवांसही समजत नाहीं, आणि वेदांसही समजत नाहीं; ह्यांत संशय नाहीं. (९) पूर्वी कोणी एक सत्यसंध नांवाचा सर्व लक्षण संपन्न ब्राह्मण होता; तो फार निष्पाप स्वभावाचा होता, तो बहुतकरून श्रीविष्णूची भक्ति करीत असे (१०) वेदांत आणि स्मृतींत जे जे आचार पाळावे ह्मणून सांगितले आहेत; ते ते सर्व आचार त्यानें पाळिले. हे विद्वान् विद्वान् ब्राह्मणहो, त्यानें अनेक वेळ नवीन देवालयें बांधून श्रीविष्णूच्या प्रतिष्ठा केल्या. (११) त्रैलोक्य स्वरूप परमेश्वर श्रीविष्णूची त्यानें रोज रोज सुवासिक फुलें वगैरेंनीं भक्तिपूर्वक आराधना केली. त्या सत्यसंधानें (१२) रोज रोज अनेक प्रकारच्या वैष्णवमताच्या मंत्रांचा पाठ केला. व आदरपूर्वक आपलें सर्व द्रव्य श्रीविष्णूस अर्पण केलें. (१३) तेव्हां परमेश्वर शंख, चक्र आणि गदा धारण करणारा कमलाप्रमाणें सुंदर नेत्र असणारा श्रीविष्णु प्रसन्न होऊन त्या सत्यसंधापुढें प्रत्यक्षरूपानें येऊन उभा राहिला. (१४) त्या श्रीविष्णूला पहातांच सत्यसंधाच्या मनाला आणि डोळ्यांला मोठा आनंद वाटला; व त्यानें मोठ्या भक्तीनें श्रीविष्णूपुढें साष्टांग नमस्कार घातला. (१५) उत्तम उत्तम प्रकारच्या गंध फूल वगैरे पदार्थांनीं आपल्या शक्तीप्रमाणें त्यानें श्रीविष्णूची पूजा केली, आणि सर्व त्रैलोक्याचा मूलपुरुष अशा विष्णूची त्यानें स्तुति करण्यास आरंभ केला.

(१६) सत्यसंध ह्मणाला—हे श्रीविष्णो, तूं सर्व लोकांस मूलकारण आहेस,

रिणे पद्मनाभाय पद्मायाः पतये नमः ॥१६॥ गोविंदाय गवां नित्यं पालकाय परात्मने ॥ दामोदराय देवानां शत्रुनाशैकहेतवे॥१७॥हरये हारकेयूरकटकादिविभूषणैः॥अलंकृताय कल्याणशरीराय नमो नमः॥१८॥

सूत उवाच॥एवं भक्त्या हरिं स्तुत्वा सत्यसंधो महाद्विजः ॥ प्रसादं कुरु मे देव मुच्येयं येन वंधनात् ॥ इति संप्रार्थयामास सत्यसंधो जनार्दनम् ॥१९॥ जनार्दनोऽपि भगवान् सर्वभूतहिते रतः ॥ सत्यवागनसूयश्च सम्यग्ज्ञानमहोदधिः ॥ प्राह गंभीरया वाचा सत्यसंधं प्रतिद्विजम् ॥२०॥

जनार्दन उवाच ॥ सत्यसंध महाभाग मम भक्तिपरायण ॥ श्रौतस्मार्तैकनिष्ठानामुत्तमोत्तम सुव्रत ॥२१॥ नाहं संसारमग्नानां साक्षा-

---

तुझीं अनेक स्वरूपें आहेत, तुला शौरी ह्मणतात, पद्मनाभ ह्मणतात, तूं लक्ष्मीचापति आहेस, तुला नमस्कार असो. (१७) तुला गोविंद ह्मणतात, तूं नेहमीं गाईचें रक्षण करितोस, तूं परमात्मा आहेस, तुला दामोदर ह्मणतात, तूं देवांचे शत्रु ( दैत्य ) मारणारा आहेस, तुला नमस्कार असो. (१८) तुला हरि ह्मणतात, तुझ्या अंगावर मोत्यांच्या माळा, अंगद, कडींतोडे वगैरे अलंकार आहेत, त्यामुळें तूं फारच शोभतोस. तुझें रूप फारच मनोहर आहे, तुला नमस्कार असो नमस्कार असो.

(१९) सूत ह्मणाले—ह्याप्रमाणें त्या ब्राह्मणश्रेष्ठ सत्यसंधानें भक्तिभावानें विष्णूची स्तुति करून त्यास ह्मटलें, परमेश्वरा माझी संसारवंधनापासून ज्या रीतीनें सुटका होईल अशी कृपा कर. याप्रमाणें त्या सत्यसंधानें विष्णूची प्रार्थना केली. (२०) परमेश्वर श्रीविष्णुही सर्व प्राणिमात्रांचें कल्याण करण्यास नेहमीं तत्परच होता तो सत्य भाषण करणारा असून कोणाचाही हेवा करीत नसे, तो सारासार विचाराचा प्रत्यक्ष महासमुद्रच होय. तो श्रीविष्णु गंभीर शब्दानें त्या सत्यसंध नांवाच्या ब्राह्मणश्रेष्ठाला ह्मणाला.

(२१) श्रीकृष्ण ह्मणाला— सत्यसंधा, तूं मोठा दैवशाली आहेस, तूं माझी भक्ति मनापासून करितोस. वेदानें करावीं ह्मणून सांगितलेलीं कर्मे आणि स्मृतींनें करावीं ह्मणून सांगितलेलीं कर्मे करणारे जितके लोक आहेत, त्या सर्वांत तूं श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहेस, तूं सदाचारी आहेस. (२२) संसार समुद्रांत बुडणाऱ्या लोकांची प्रत्यक्ष रीतीनें मुक्तता करण्यास मला सामर्थ्य नाहीं. संसार दुःखांतून

त्संसारमोचकः ॥ ब्रह्मादिदेवताश्चान्या नैवं संसारमोचकाः ॥२२॥ शिव एव हि जंतूनां महासंसारवर्तिनाम् ॥ संसारमोचकः साक्षात्सर्वज्ञः सांब ईश्वरः ॥२३॥ न तस्य कारणं कार्यं वस्तुतो विद्यतेऽनघ ॥ न तत्समश्चाभ्यधिकश्चेतनो विद्यते क्वचित् ॥२४॥ मम ब्रह्मादिदेवानामपि साक्षाच्छिवाज्ञया ॥ भोगमोक्षप्रदः पुंसां प्रसादो जायतेऽनघ ॥२५॥ मम ब्रह्मादिदेवानामपि तस्य प्रसादतः ॥ विज्ञानादित्रयं तस्मात्स एव भवमोचकः॥२६॥ प्रसादो मुक्तिदः साक्षाच्छिवात्सत्यादिलक्षणात् ॥ अंबिकासहितादस्मात्सर्वज्ञादेव नान्यतः ॥२७॥ अतः पूर्णप्रसादाय सत्यसंध मम प्रिय ॥ महादेवं महात्मानं भज कारुणिकोत्तमम् ॥२८॥ महादेवं समाश्रित्य वांछितं नाप्नुयाद्यदि ॥ महादेवं महादेवा-

---

मुक्तता करणारे ब्रह्मदेव वगैरे इतर तेहतीस कोटि देव हे ही नव्हेत. (२३) हा संसार समुद्र फार गहन आहे ह्यांत गटंकळ्या खाणाऱ्या ( बुडणाऱ्या ) प्राणिमात्रांची संसार दुःखांतून मुक्तता करण्यास श्रीशिव मात्र एकटा समर्थ आहे. तो सर्व कांहीं जाणतो तो पार्वतीपति श्रीशिव सर्व जगाचा ईश्वर आहे. (२४) हे निष्पाप स्वभावाचे सत्यसंधा, वास्तविक विचार करून पाहिलें तर त्याला कारणही नाहीं आणि कार्यही नाहीं, ह्यासर्व त्रिभुवनांत त्याच्यासारखा किंवा त्यापेक्षां जास्त शक्तीचा प्राणीच नाहीं. (२५) मला, ब्रह्मदेव वगैरे प्रमुख प्रमुख देवांला, इतर तेहतीस कोटि देवांला, आणि मनुष्याला शिवाच्या आज्ञेप्रमाणें शिवाचा प्रसादच विषयोपभोगाचें सुख आणि मोक्षसुख मिळवून देतो. (२६) मला आणि ब्रह्मदेव वगैरे सर्व देवांला त्या श्रीशिवाच्या प्रसादानेंच ज्ञातृ, ज्ञान आणि ज्ञेय हीं तीन प्रकारचीं ज्ञानें झालीं; तोच संसार दुःखांतून प्राणिमात्रांची मुक्तता करण्यास समर्थ आहे, (२७) श्रीशिव हा " सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म " असा परब्रह्मस्वरूप आहे, तो पार्वतीसह असतो तो सर्वज्ञ आहे. त्या शिवाचा प्रसाद झाला तरच मोक्ष मिळतो, इतर देवांचा प्रसाद झाला तर मुक्ति मिळत नाहीं. (२८) हे सत्यसंधा, तूं मला मनापासून आवडतोस, ह्मणून मी तुला हिताची गोष्ट सांगतों कीं, तुजवर पूर्णप्रसाद व्हावा असें जर तुला वाटत असेल तर तूं त्या महात्मा व दयाळु स्वभावाच्या श्रीशिवाची आराधना कर. (२९) महादेवाची आराधना करूनही जर आपली इच्छा पूर्ण झाली नाहीं तर महादेवाखेरीज इतर देवांची आराधना करून काय व्हावयाचें आहे? ह्यासाठीं शेवटपर्यन्त महा-

त्कथमन्यं समाश्रयेत् ॥२९॥ नामतश्चार्थतश्चापि महादेवो महेश्वरः ॥ तदन्याः केवलं देवा महादेवादृतेऽनघ ॥३०॥ महादेवं विना यो मां भजते श्रद्धया सह ॥ नास्ति तस्य विनिर्मोक्षः संसाराज्जन्मकोटिभिः ॥३१॥ सर्वमुक्तं समासेन मम भक्तस्य तेऽनघ ॥ शिवादन्यं परित्यज्य शिवं सांबं सदा भज ॥३२॥

सूत उवाच ॥ एवमुक्त्वा ततः श्रीमान् किरीटी गरुडध्वजः ॥ सर्वविज्ञानसंपन्नस्तत्रैवान्तरधीयत ॥३३॥ सत्यसंधो महाधीमान् महाविष्णोः प्रसादतः ॥ परित्यज्याखिलान्देवानाश्रितोऽभवदीश्वरम् ॥३४॥ ईश्वरस्य प्रसादेन सत्यसंधो महाद्विजः ॥ ज्ञानं वेदांतजं लब्ध्वा विमुक्तो भवबंधनात् ॥३५॥ भवन्तोऽपि द्विजश्रेष्ठाः शिवादन्यत्तु दैवतम् ॥ परित्यज्य प्रसादाय भजध्वं शिवमव्ययम् ॥३६॥ सर्वमुक्तं समासेन

---

देवाचीच आराधना करणें बरें. (३०) तो महादेव नांवाप्रमाणें अर्थशःही महादेव ( श्रेष्ठ देव ) च आहे, हे निष्पापस्वभावाच्या सत्यसंधा, त्या महादेवाखेरीज इतर देवता फक्त देवच होत महादेव नव्हत त्यांचे अंगीं महादेवासारखी अलौकिक शक्ति नाहीं. (३१) महादेवाला न भजतां, जो कोणी मनुष्य मलाच ( विष्णूला ) भक्तिभावानें भजतो, त्यानें कोट्यावधि जन्म घेतले तरी त्याची संसारांतून मुक्तता होत नाहीं. (३२) हे निष्पाप स्वभावाच्या सत्यसंधा मला जें कांहीं सांगावयाचें होतें तें मीं तुला थोडक्यांत सांगितलें. आणखी पुनःही मी तेंच सांगतों कीं, शिवाखेरीज इतर देव सोडून देऊन तूं शिवाचीच आराधना कर.

(३३) सूत ह्मणतात—ऋषीश्वरहो, सत्यसंधास इतकें सांगून तो श्रीमान्, मस्तकावर मुकुट असणारा, ध्वजावर गरुड असणारा, व ज्ञातृ, ज्ञेय आणि ज्ञान हीं तिन्ही विज्ञानें अंगीं असणारा श्रीविष्णु तेथल्या तेथेंच गुप्त झाला. (३४) सत्यसंधही मोठा बुद्धिमान होता त्यानें श्रीविष्णूच्या कृपेनें त्याच्या सांगण्याप्रमाणें सर्व देवांस सोडून एका श्रीशिवाचेंच आराधन केलें. (३५) त्यामुळें परमेश्वर श्रीशिवाच्या कृपेनें त्या ब्राह्मणश्रेष्ठ सत्यसंधास वेदांतशास्त्राचें ज्ञान होऊन तो संसाररूप बंधनांतून ( जन्ममरणाच्या फेऱ्यांतून ) सुटला. (३६) ह्याप्रमाणेंच तुह्मीही सर्व ऋषीश्वरहो, श्रीशिवाखेरीज बाकीचे सर्व देव सोडून, प्रसाद व्हावयासाठीं त्या अविनाशी परमेश्वर श्रीशिवाचेंच आराधन करा. (३७) हे मुनीश्वर ब्राह्मणहो, हें मी तुह्माला सत्यसंधाचें सर्व चरित्र संक्षेपानें सांगितलें, त्यावर पूर्ण

युष्माकं मुनिपुंगवाः ॥ मम वाक्येऽतिविश्वासं कुरुध्वं यत्नतो द्विजाः ॥३७॥ वृत्तम् ॥ अतिरहस्यमिदं कथितं मया श्रुतिपरंपरया च समागतम् ॥ मुनिपरंपरया च समागतं न कथितव्यमशिष्टजनस्य तु ॥३८॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने सत्यसंधस्य मुक्तिप्रदानं नाम चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥

---

विश्वास ठेवून मनोभावानें प्रसाद व्हावयासाठीं तुह्मी शिवोपासना करा. (३८) हें सत्यसंध ब्राह्मणाचें चरित्र फार महत्वाचें आहे, हें श्रुतिपरंपरेनें व शास्त्रपरंपरेनें आलेलें आहे. जे कोणी दुर्वर्तनी आणि असभ्य लोक आहेत त्यांस हें चरित्र कधींही सांगू नये.

ह्याप्रमाणें श्रीनीलकंठनागनाथ नांवाच्या मोठ्या विद्वानानें केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनापैकीं सत्यसंधाला मोक्षप्राप्ति झाल्याचें वर्णन असलेला हा चौतिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ पंचत्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे शिवरहस्ये ॥ ब्रह्मर्षयो जगद्वंद्या नैमिषारण्यवासिनः ॥ प्रवृत्तेषु पुराणेषु वंद्यासु ललितासु च ॥ कथासु शौनकाद्यास्ते पप्रच्छुः सूतमुद्यताः ॥१॥

ऋषय ऊचुः ॥ अस्माकं संशयः कश्चित्सुमहान् हृदि वर्तते ॥येनाज्ञा इव संजाताश्छेत्तुं तं च त्वमर्हसि ॥२॥ को देवः परमो ज्यायान् कथं चाराध्यते हि सः ॥ आराधिते फलं किं स्यादेतत्सत्यं ब्रवीहि नः ॥३॥

सूत उवाच॥ पुरैतदेव विप्रेंद्राः पृष्टो जैमिनिना मुनिः ॥ सत्यं यदाह दूर्वासास्तच्छृणुध्वमतंद्रिताः ॥४॥ हिमवच्छिखरे रम्ये सिद्धचारणसेविते ॥ विलक्ष्मीकृतदेवेंद्रमंदिरे चारुकंदरे ॥५॥ मृगपक्षिगणाकीर्णे लतापादपसंकुले ॥ सर्वर्तुसुखदे पुण्ये गंगामलजलाप्लुते ॥६॥ ददर्शादित्यसंकाशं तत्रोन्नतशिलातले ॥ दूर्वाससमथात्रेयं जैमिनिर्मुनिसत्त-

---

श्रीशिवास नमन असो. (१) स्कांदांतल्या शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जगाला वंद्य असे ब्रह्मर्षि नैमिषारण्यांत राहत असतां जुन्या, वंद्य, सुंदर कथा निघाल्या, तेव्हां शौनकप्रमुख सर्व ऋषींनीं सूतास प्रश्न केला.

(२) ऋषि ह्मणाले—हे सूतमहर्षे, आमच्या मनांत मोठा एक संशय उत्पन्न झाला आहे, त्यामुळें आह्मी अज्ञानाप्रमाणें झालों आहोंत, तर त्या संशयाचें निरसन करा. (३) सर्व देवांमध्यें श्रेष्ठ देव कोण? त्याची आराधना कशी करावी? आराधना केली असतां फळ काय मिळतें? हें सर्व सत्य सत्य तूं आह्मांस सांग.

(४) सूत ह्मणाला—हे मुनिजनहो, अशाच अर्थाचा प्रश्न पूर्वीं जैमिनीनें दुर्वासाला विचारिला होता; दूर्वासानें त्याला जें सांगितलें, तेंच मी तुह्मांस सांगतों ऐका. (५) सिद्ध चारण जेथें नेहमीं राहतात, ज्यामुळें इंद्राच्या घरची लक्ष्मी नाहींशी झाली होती, ( ह्मणजे स्वर्गापेक्षां हिमालय शिखराची संपत्ति जास्त होती ) जेथें सुंदर सुंदर गुहा आहेत, अशा हिमालयाच्या शिखरावर (६) हजारो मृगगण फिरत आहेत, व कोट्यावधि तऱ्हेचीं झाडें आहेत तेथें नेहमींच सर्व ऋतु असल्यामुळें तें स्थान सुखकर झालें आहे अशा त्या शिखरावर पुण्यकर निर्मळ गंगेचें पाणी पडत असल्यामुळें सभोंवतालची जमीन भिजलेली आहे. (७) अशा त्या हिमालयाच्या शिखरावर एका ठिकाणीं उंच अशा एका दगडावर सूर्याप्रमाणें भासणारा अत्रीचा मुलगा दुर्वास बसला होता; त्या मह-

मः ॥७॥ कश्यपागस्त्यसंवर्तवसिष्ठच्यवनांगिरैः ॥ कण्वमाण्डव्यवाल्मीकिभृगुतंडिविभांडकैः ॥८॥ शांडिल्यगौतमोदंकयाज्ञवल्क्योपमन्युभिः ॥ जातुकर्णभरद्वाजदेवरातपराशरैः ॥९॥ गर्गादिभिस्तथान्यैश्च वेदवेदांतपारगैः ॥ ब्रह्माणमिव तत्रस्थमृषिभिः परिवारितम् ॥१०॥ विस्मयोत्फुल्लनेत्रोऽसौ दूर्वासमकल्मषम् ॥ प्रणिपत्योपगम्याथ पप्रच्छेदं स जैमिनिः॥११॥

जैमिनिरुवाच ॥ सर्वशास्त्रप्रवक्तारं सर्वानुग्रहकारणम् ॥ पृच्छामि श्रद्दधानस्त्वां व्यामोहितमना मुने ॥१२॥ शिवं केचित्प्रशंसंति ब्रह्माणमपरे जनाः ॥ केचिदत्र प्रशंसंति नारायणमनामयम् ॥१३॥ सूर्यं केचित्सहस्रांशुं लोकपालांस्तथापरे॥ केचिदग्निं पितॄन् केचिद्देवीं केचिन्महर्षयः ॥१४॥ पूर्तं केचित्तथैवेष्टं धर्मं चाहुः परं विभो ॥ ज्ञानं केचित्तपस्त्वेके सदाचारं तथा परे ॥१५॥ इत्थं व्यवस्थिते लोके धर्माधर्म-

---

र्षीला जैमिनीनें पाहिलें. (८) कश्यप, अगस्त्य, संवर्त, वसिष्ठ, च्यवन, अंगिरा, कण्व, मांडव्य, वाल्मीकि, भृगु, तंडि, विभांडक, (९) शांडिल्य, गौतम, उदंक याज्ञवल्क्य, उपमन्यु, जातुकर्ण्य, भरद्वाज, देवरात, पराशर, (१०) गर्ग वगैरे ऋषींसह व इतर वेदवेदांतांत पारंगत असलेल्या ब्राह्मणांसह तेथें दूर्वासा बसला होता तो ऋषिसमाजांत बसलेल्या ब्रह्मदेवाप्रमाणें शोभत होता. (११) अशा निष्कल्मष दूर्वासाला पाहून आश्चर्यानें जैमिनीचे डोळे प्रफुल्ल झाले. नंतर त्या मुनीला नमस्कार करून जैमिनीनें प्रश्न केला.

(१२) जैमिनि म्हणाला—हे मुने, सर्व·शास्त्रांचें अध्ययन करविण्याची ज्याची योग्यता आहे, सर्वांवर अनुग्रह करण्याची ज्याची शक्ति आहे, अशा तुला मी श्रद्धा पूर्वक प्रश्न करितों. कारण माझें मन मायेनें मोहित झालें आहे. (१३) कांहीं लोक शिवाची प्रशंसा करतात, कांहीं लोक ब्रम्ह्याची प्रशंसा करतात, कांहीं लोक अनामय नारायणाची प्रशंसा करतात, (१४) कांहीं लोक सहस्रकिरण सूर्याची प्रशंसा करतात, कांहीं लोक लोकपालांची प्रशंसा करतात, कांहीं लोक अग्नीची व कांहीं लोक पितरांची प्रशंसा करतात, कांहीं लोक देवीची प्रशंसा करतात, (१५) कांहीं लोक पूर्ताची, कांहीं लोक प्रिय धर्माची, कांहीं लोक ज्ञानाची, कांहीं तपाची, आणि कांहीं लोक सदाचाराची प्रशंसा करतात, (१६) याप्रमाणें जर धर्माधर्माची व्यवस्था जगांत राहिली, तर सर्व लोक फार तर

विधौ नराः ॥ व्यामोहमेव गच्छन्ति विद्वांसोऽपि महामते ॥१६॥ यद्वेतेषु परं कृत्यमनुष्ठेयं महात्मभिः ॥ ब्रह्मर्षेऽर्हसि तद्वक्तुं सर्वज्ञोऽसीति मे मतः ॥१७॥

दूर्वासा उवाच ॥ अचिंत्यमजमीशानमनादिनिधनं विभुम् ॥ योगींद्रहृदयांभोजविकासिनमनामयम् ॥१८॥ अशेषजगदुत्पत्तिस्थितिसंहरणादिषु ॥ हेतुभूतं महात्मानमभिवंद्य सदोदितम् ॥१९॥ प्रश्नार्थमेतद्गहनं प्रवक्ष्यामि शृणुष्व तत् ॥ यथाऽऽह मे पुरा स्कंदो ब्रह्मचारी महायशाः ॥२०॥ प्रधानव्यक्तपुरुषकालानां परमो हि यः ॥ ज्यायान् स एव षट्त्रिंशः शिव इत्यभिधीयते ॥२१॥ तस्मादेव जगत्सर्वं सर्गकाले प्रजायते ॥ तस्मिन्नेव पुनस्तच्च प्रलये संप्रलीयते ॥२२॥ यच्च किंचिज्जगत्यस्मिन्दृश्यते श्रूयतेऽपि वा ॥ अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्यास्तेऽसौ महेश्वरः ॥२३॥ सांख्यं योगः पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा ॥ ज्ञानान्येतानि पंचैव ज्ञेयश्चैकोऽत्र शंकरः ॥२४॥ ईशानः स शिवो वि-

---

काय विद्वान लोक देखील मोह पावतात. (१७) हे ब्रह्मर्षे, यांमध्यें मोठमोठ्या लोकांनीं श्रेष्ठ आचरण कसें करावें ? तें सांग कारण तूं सर्वज्ञ आहेस, अशी माझी समजूत आहे.

(१८)दूर्वास ह्मणाले—ज्याचें चिंतन करणें मोठें कठिण आहे, जो अज असून ज्याला ईशान ह्मणतात, ज्याला जनन व मरण नसून जो सर्वांचा प्रभु आहे, जो योग्यांच्या हृदयकमलाला प्रफुल्लित करतो, व जो अनामय असून (१९) सर्व जगाच्या उत्पत्तीला, स्थितीला संहाराला कारण झाला आहे, अशा महात्म्या परब्रह्म वस्तूला नमस्कार करून (२०) या तुझ्या गहन प्रश्नाचा अर्थ सांगतों, तो ऐक. जसें पूर्वीं महायशस्वी ब्रह्मचारी स्कंदानें मला सांगितलें तसेंच मी तुला सांगतों. (२१) प्रधान, व्यक्त, पुरुष, काल यांच्यापेक्षां जो श्रेष्ठ आहे, तोच छत्तीस कलांनीं (तत्वांनीं ) युक्त असा श्रेष्ठ शिव होय. (२२) सृष्टीच्या वेळेस त्याच्यापासूनच हें सर्व जग उत्पन्न होतें, व शेवटीं लयाच्या वेळेस त्याच्याच ठिकाणीं हें जग लय पावतें. (२३) या जगामध्यें जें कांहीं दिसतें, व जें कांहीं ऐकलेलें आहे, तें सर्व व्यापून व त्याच्या आंत बाहेर सर्व ठिकाणीं व्याप्त होऊन तो महेश्वर राहिला आहे. (२४) सांख्य, योग, पाशुपत, पांचरात्र, व वेद, हीं पांच ज्ञानाचीं साधनें आहेत; या पांच शास्त्रांनीं फक्त शिवालाच तेवढें समजून घ्यावयाचें आहे. (२५) तोच ईशान, शिव, विष्णु, कृष्ण, नारायण, हरि, चतुर्मुख ब्रह्मा,

ष्णुः कृष्णो नारायणो हरिः ॥ ब्रह्मा चतुर्मुखो धाता वेधोऽग्निर्हव्यवाहनः ॥२५॥ सर्वज्ञः स पिता त्वष्टा प्राणः कालोऽच्युतोऽक्षयः ॥ क्षेत्रज्ञोऽर्कोऽष्टमूर्तिश्च कपाली शाश्वतो हरः ॥२६॥ स विभुर्भूतिदः शास्ता भर्गो देवः प्रजापतिः ॥ वामदेवो महेंद्रश्च तीर्थकृच्च तपोनिधिः ॥२७॥ धर्माध्यक्षो जगद्योनिः विश्वात्मा पुरुषोऽव्ययः ॥ धर्मो योगीश्वरो योगी विश्वमूर्तिर्विभावसुः ॥२८॥ कर्मसाक्षी जगच्चक्षुर्मंत्रो मंत्र्यंबिकाधवः ॥ ज्ञानात्मा परमात्मा च पितृराजो दिवस्पतिः ॥२९॥ इत्याद्याश्चादिमुनिभिः संज्ञाभेदाः पृथग्विधाः ॥ शास्त्रेषु कथिताः शंभोर्लोकव्यामोहकारकाः ॥३०॥ एकं यदि भवेच्छास्त्रं ज्ञानं निःसंशयं भवेत् ॥ बहुत्वादिह शास्त्राणां ज्ञानतत्वं सुदुर्लभम् ॥३१॥ बहवोऽपि यथा मार्गा विशंत्येके महत्पुरम् ॥ तथा ज्ञानानि सर्वाणि विशंत्येकं तमीश्वरम् ॥३२॥ परस्परविरुद्धार्थांस्त्यक्त्वा शास्त्रार्थविस्तरान् ॥ पूज्यो ध्येयो

---

धाता, वेधा, हव्यवाहन असा अग्नि, (२६) सर्वज्ञ, जगाचा पिता, त्वष्टा, प्राण, अच्युत, अक्षय असा काल, क्षेत्रज्ञ, सूर्य; अष्टमूर्ति, कपाली, शाश्वत असा हर. (२७) तोच विभु, ऐश्वर्य देणारा, शासन करणारा, भर्ग, देव, असा प्रजापति, वामदेव, महेंद्र, तपस्वी तीर्थंकर. (२८) वगैरे सर्व तोच आहे. व धर्माचा अध्यक्ष तोच असून जगाच्या उत्पत्तीला कारण तोच आहे. तोच विश्वात्मा असून अव्यय पुरुष तोच आहे. योगीश्वर धर्म तोच असून योगी तोच आहे. विश्वमूर्ति सूर्य तोच असून. (२९) कर्मसाक्षी तोच आहे. जगाचे डोळे तोच असून सर्वमंत्र तोच आहे. व मंत्रयुक्तही तोच आहे. श्रीपार्वती मातोश्रीचा पति तोच असून ज्ञानात्मा तोच आहे. परमात्मा तोच असून पितृराज व देवांचा पति तोच आहे. (३०) हे मुने हीं त्या शिवाचीं निरनिराळीं नांवें पुरातन मुनींनीं निरनिराळ्या शास्त्रांमध्यें घालून ठेविलीं आहेत, त्यामुळें सर्व जगाला मोह पडतो. (३१) एकच शास्त्र असतें तर निःसंशय ज्ञान उत्पन्न होत होतें. शास्त्रें पुष्कळ असल्यामुळें, ज्ञानतत्व जगांत दुर्लभ होऊन राहिलें आहे. (३२) जगामध्यें ज्याप्रमाणें एकाच शहराला जाण्याचे अनेक रस्ते दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें सर्वशास्त्रांत असलेले ज्ञानमार्ग त्या एकट्या शिवाकडेच जाऊन मिळतात. (३३) याकरितां शास्त्रांमध्यें जे परस्पर विरुद्ध असे अर्थविस्तार दिसून येतात ते सर्व सोडून मानवांनीं त्या एकट्या शिवाचेंच ध्यान करावें, व सर्वदा त्याचीच पूजा क-

हरस्तस्मादेक एव सदा नृभिः ॥३३॥ आश्चर्यवान्विभुर्भोक्ता धन्यश्चासौ वृषध्वजः ॥ येषां प्रसन्नस्तेऽपीह धन्याश्चाश्चर्यसंपदः ॥३४॥ अत्र ते कथयिष्येऽहमितिहासं पुरातनम् ॥ विष्णोः सनत्कुमारस्य संवादं पापनाशनम् ॥३५॥ ब्रह्मसूनुर्महातेजा जगत्सदसदात्मकम् ॥ सनंदनाग्रजो योगी सोऽपश्यद्दिव्यचक्षुषा ॥३६॥ सविलासं महाकायं कदाचिद्यमुनान्हदे ॥ दृष्ट्वाह सोऽपि राजानं सहस्रशिरसं कविम् ॥३७॥ त्वमाश्चर्यशरीरोऽसि मान्यो धन्यश्च मे मतः ॥ इह काले हि कालिंद्या न्हदे चरसि निर्भयः ॥३८॥ सोऽप्येवमाह तं वाग्मी किमाश्चर्यं मुने मम ॥ का च वा धन्यता सेव्या धन्येयं यमुना नदी ॥३९॥ कौतुकात्तां समभ्येत्य धन्यासि त्वमथाब्रवीत् ॥ नित्यमाश्चर्यभूतासि नक्राहिझषसंकुला ॥४०॥ प्रत्याह यमुना चेदं सैवमुक्ता स्वरूपिणी ॥ नाहं श्लाघ्या न चाश्चर्यो धन्येयं स्वर्धुनी विभो ॥४१॥ यस्यां मत्सदृशा वव्हो

---

रावी. (३४) आश्चर्यकारक प्रभु भोक्ता असून तो वृषध्वज धन्य आहे व ज्यांना तो ईश्वर प्रसन्न झाला आहे, ते पुरुष देखील जगांत धन्य होत. (३५) या विषयीं एक जुनी कथा तुला सांगतों ऐक. त्या कथेंत विष्णुसनत्कुमारांचा पापनाश करणारा संवाद आहे. (३६) महातेजस्वी, सनंदनाचा वडील भाऊ, व योगी अशा ब्रह्मदेवाच्या मुलानें हें सदसद्रूपी जग दिव्य ज्ञानदृष्टीनें पाहिलें. (३७) तेव्हां कांहीं वेळानें यमुनेच्या डोहांत विलास करणारा, मोठ्या शरीराचा व पाताळाचा राजा, अशा श्रेष्ठ सहस्रशीर्षाला पाहून त्यानें ह्मटलें कीं. (३८) हे शेषा, तुझें हें शरीर फारच आश्चर्यकारक आहे. तूं सर्वांना मान्य असून धन्य आहेस, असें माझ्या मतानें वाटतें अर्थात् तूं यावेळेस या यमुनेच्या डोहांत कांहीं भीति न वाळगतां स्वच्छंद फिरतोस. (३९) हें ऐकून त्याला शेष ह्मणाला हे ब्रह्मपुत्रा, मुने, यांत आश्चर्य तें काय पाहिलेंस व माझी धन्यता तुला कोणती दिसली? खरोखर ही यमुना धन्य आहे. (४०) असा त्या दोघांचा संवाद चालला असतां तितक्यांत कौतुकानें यमुनेला पाहून त्या मुनीनें ह्मटलें कीं, यमुने, तूं धन्य आहेस, कारण किती सुसरी, किती मोठ मोठे मासे, व किती हजारो तऱ्हेचे सर्प तुझ्या ठिकाणीं आहेत पहा. (४१) याप्रमाणें मुनीचें वाक्य ऐकून यमुना मूर्तिमंत उभी राहून ह्मणाली. हे मुने, मी कांहीं इतक्या प्रशंसेला पात्र नाहीं, आणि माझ्या ठिकाणीं आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. हे प्रभो खरोखर जगांत धन्य ह्मणजे ती भागीरथी होय. (४२) कारण गंगेंत स्नान करून शेंकडो लोक उद्ध-

न लक्ष्यन्ते समागताः ॥ स्वर्गारोहणनिःश्रेणिः स्वांभोभिः पूरितार्णवा ॥४२॥ गत्वाहेदमथैतां च गंगां त्रिपथगां तदा ॥ आश्चर्यभूता लोकानां धन्यासि त्वं सरिद्वरे ॥४३॥ मातेव पासि भूतानि सर्वाण्यपि हि सर्वदा ॥ सर्वकामप्रदा देवि श्रेयोवृद्धिकरी सताम् ॥४४॥ जन्हुराजसुता चासि सगरात्मजपावनी ॥ साप्याह तं ऋषिं नाहं धन्या नाश्चर्यवत्युत ॥४५॥ श्लाघ्यश्चाश्चर्यभूतोऽयं हिमवान् सरितां पिता ॥ स चोवाच तथैवाद्रिराजानं वनवाससम् ॥४६॥ सोऽप्यब्रवीन्मुने नाहं धन्यश्चाश्चर्यवांस्तथा ॥ धन्या भूर्जगदाधारभूतेयं भूतभावनी ॥४७॥ स गां गत्वाभ्युवाचेदं विभुर्विश्वंभरां ततः ॥ धन्या त्वं पर्वताधारे सर्वाश्चर्योपबृंहिता ॥४८॥ सा तमाह महाब्रह्मन्नाहमेवं यथात्थ माम् ॥

---

रून जातात, तसें माझ्या ठिकाणीं मुळींच दिसत नाहीं, व माझ्या ठिकाणीं हजारो नद्या मिळाल्या आहेत, त्याप्रमाणें तिच्या ठिकाणीं पुष्कळ नद्या मिळाल्या नसून ती स्वतःजातीनेंच मोठी आहे. अर्थात् आपल्या विपुल पाण्यानें समुद्राला तिनें भरून काढिलें आहे. (४३) असें यमुनेचें वाक्य ऐकून, तेथपर्यंत जाऊन मुनीनें गंगेला ह्मटलें कीं, हे गंगे, तूं जगांत धन्य आहेस. हे सरिच्छ्रेष्ठे, तूं आश्चर्यकारक आहेस. (४४) कारण, पहा प्रत्यक्ष मातोश्रीप्रमाणें तूं सर्व प्राण्यांचें पालन करतेस, व सर्व प्राण्यांचे मनोरथ पूर्ण करतेस, व सर्व श्रेयांची वृद्धि करतेस. (४५) तूं जन्हुराजाची मुलगी असून सगराच्या मुलांला पावन करतेस. याप्रमाणें त्या मुनीचें वाक्य ऐकून गंगा ह्मणाली. हे मुने, तूं ह्मटल्या प्रमाणें मीं कांहीं धन्य नाहीं, व माझ्या ठिकाणीं आश्चर्य करण्या सारखें कांहीं नाहीं. (४६) कारण ज्याच्या पासून माझा जन्म आहे, व माझ्या सारख्या शेंकडो नद्या, ज्याच्यापासून जन्मल्या आहेत, तो हिमालय धन्य होय, व तोच आश्चर्य करण्या योग्य आहे. असें ऐकून हिमालयाला मुनीनें ह्मटलें, हे पर्वता, तूं धन्य आहेस. (४७) तेव्हां हिमालयानें मुनीला ह्मटलें कीं, हे मुने, मी कांहीं धन्य नाहीं, आश्चर्य करण्यायोग्यही नाहीं. कारण माझें सर्व ओझें सहन करणारी ही पृथ्वी धन्य आहे, व आश्चर्य करण्यासारखी आहे; कारण ती सर्व जगाला आधारभूत असून सर्व प्राण्यांला पवित्र करत्ये. (४८) असें ऐकून तो मुनि भूमीजवळ येऊन ह्मणाला कीं, हे पृथ्वी तूं धन्य आहेस. कारण सर्व जगाचें पोषण तुझ्यामुळें होत असून सर्व पर्वतांना तूं आश्रय देणारी आहेस. व तुझ्या ठिकाणीं आश्चर्य करण्यासारखे अनेक गुण आहेत. (४९) हें मुनिवाक्य ऐकून पृथ्वी ह्म-

यतोऽपामप्रमेयानां नौरिवोर्ध्वमहं स्थिता ॥४९॥ उपगम्याथ तानाह स-
मुद्रान्स तपोनिधिः ॥ यूयं धन्या तथाश्चर्यरूपिणो जगदंशुकाः ॥५०॥
तमूचुस्ते रसात्मानो यथात्थ न तथा वयम् ॥ श्लाघ्यश्चाश्चर्यभूतात्मा
पर्जन्यो जन्मभूर्हि नः ॥५१॥ प्रशशंसाथ पर्जन्यं कौतुकाविष्टमानसः ॥
धन्यश्चाश्चर्यभूतस्त्वं मेघो भूत्वेह वर्षसि ॥५२॥ स उवाच न धन्योऽहं
धन्या नक्षत्रमातरः ॥ याभिर्दृष्टस्तु वर्षामि जलेनापूरयन्महीम् ॥५३॥
सोऽब्रवीद्थ ता गत्वा वाय्वाधारास्तु तारकाः ॥ धन्या भवंत्यो मा-
न्याश्च गृहाणां जगतामपि ॥५४॥ तमाहुस्ता न धन्याः स्म न स्वच्छं-
दाश्च कर्हिचित् ॥ आश्चर्यवांस्तथा धन्यः सोमोऽस्माकं प्रभुस्तदा॥५५॥
ततस्तमुपगम्यासौ बभाषेदं सविस्मितम् ॥ सोमाश्चर्यस्वरूपोऽसि ध-

---

णाली, हे मुने, मी कसली धन्य आहें? ज्यांच्या आश्रयानें मी तरतें, ते समुद्र ख-
रोखर धन्य आहेत. कारण त्या समुद्रांच्या पाण्यांत एखाद्या नावेप्रमाणें होऊन मी
राहिलें आहें. (५०) नंतर मुनीनें समुद्रापर्यंत येऊन ह्मटलें कीं, समुद्रहो तुह्मी
धन्य आहांत; कारण आश्चर्य करण्यासारखे सर्व गुण तुमच्या अंगीं आहेत ते
असे; एखाद्याच्या अंगाचें आच्छादन करावयास ज्याप्रमाणें वस्त्र असावें, त्या-
प्रमाणें सर्व जगाला आच्छादन करणाऱ्या वस्त्राप्रमाणें तुह्मीं सभोंवतीं व्याप्त हो-
ऊन राहिला अहांत. (५१) नंतर समुद्र त्याला ह्मणतात हे मुने, तूं जशी ह्मणालास तशी
ही आमची योग्यता नाहीं. कारण इतकें पाणी आह्मांला पर्जन्यापासून मिळालें आहे
अर्थात् आमचा जन्म पर्जन्यापासून झाला आहे. मग तो पर्जन्य आमच्यापेक्षां धन्य नव्हे
काय?(५२) मग तो मुनि पर्जन्याला ह्मणाला, हे पर्जन्या, तूं मेघस्वरूप होऊन जगांत
सर्व पाणीच पाणी करून टाकतोस, अर्थात् तूं धन्य आहेस. (५३) मग पर्जन्य ह्मणाला
मी कसला धन्य? खऱ्या खऱ्या धन्य ह्मणजे नक्षत्रमातोश्री होत कारण त्यांची दृष्टि
माझ्यावर पडल्याशिवाय माझ्या ठिकाणीं पाणी येत नाहीं. नक्षत्रांनीं पाहिल्या नंतर
मी पृथ्वीवर वृष्टि करतों. (५४) असें ऐकून तो मुनि नक्षत्रगणांपर्यंत जाऊन ह्म-
णाला, नक्षत्रहो, तुमच्या आधारानें वायु राहतो तुमच्यामुळें पर्जन्याची उत्पत्ति
होते, अर्थात् तुह्मी धन्य अहांत, व सर्व जगांत ग्रहांमध्यें तुह्मी मान्य आहांत.
(५५) हें ऐकून नक्षत्रें ह्मणालीं हे मुने, आह्मी कांहीं धन्य नाहीं व स्वच्छंद ना-
हीं. आमचा प्रभु चंद्र हा धन्य आहे, व आश्चर्यकारक आहे. (५६) नंतर चं-
द्रापर्यंत येऊन विस्मित होऊन मुनि ह्मणाला, हे सोमा, तुझें हें रूप अतिशय

न्यस्त्वं भो द्विजाधिप ॥५६॥ एवमुक्तोऽब्रवीत्सोमो नाहं धन्यो न चात्मवान् ॥ मत्तो ज्यायान्निधिर्धाम्नां सर्वाश्चर्यमयो रविः ॥५७॥ स उपेत्याथ चादित्यं भक्त्या तं प्रशशंस ह ॥ प्रशस्यमानः सोऽप्याह ब्रह्मर्षिं विश्वसंभवः ॥५८॥ नाहं तथा मुनिश्रेष्ठ भाषसे मां यथाऽधुना ॥ धन्याश्च पितृरूपास्ते देवा ये तर्पयंति माम् ॥५९॥ मंत्रमूर्तीन्सुरांश्चासौ तथा तानप्यथाब्रवीत् ॥ धन्या यूयं तदाश्चर्यविग्रहाः परमेश्वराः ॥६०॥ इत्युक्तास्ते तथोचुस्तं न च धन्या न चेश्वराः ॥ अग्निर्हि परमोऽस्माकं नानाश्चर्यस्वरूपवान् ॥६१॥ हव्यकव्यावहः सोऽथ प्रत्युवाच हिमक्षयम् ॥ श्लाघ्यस्त्वमग्ने भर्ता च देवानां विश्वकृद्विभुः ॥६२॥ स चाह तमनिंद्यात्मा नाहमेवं परंतपाः ॥ धन्या यज्ञाः फलोदग्रा जगदानंदकारकाः ॥६३॥ अब्रवीत्स ततो यज्ञान्यूयं श्रेष्ठास्तु तेऽब्रुवन्॥ दीक्षितश्चाश्रयोऽस्माकं धन्यश्चाश्चर्यमूर्तिमान्॥६४॥ स गत्वाथ तमप्याह

---

आश्चर्यकारक असून जगांत तूं धन्य आहेस. (५७) तेव्हां सोम मुनीला. ह्मणाला मुने, मी कांहीं धन्य नाहीं, व सुस्वरूपी नाहीं. सर्व तेजाचें स्थान सूर्य हा माझ्यापेक्षां धन्य आहे, व आश्चर्यकारक आहे. (५८) नंतर सूर्याजवळ येऊन त्या मुनीनें भक्तीनें त्याची प्रशंसा केली. नंतर सूर्य ह्मणाला हे मुने, (५९) तूं जसें ह्मणतोस तसा कांहीं मी नाहीं. ते पितृस्वरूपी देव धन्य आहेत. कारण त्यांच्यापासून माझी तृप्ति होते.(६०) नंतर मंत्रमूर्ति देवाजवळ येऊन मुनि ह्मणाला देवहो, तुह्मी धन्य आहांत, तुमचीं शरीरें आश्चर्यकारक आहेत, तुह्मी परमेश्वर आहांत. (६१) असें बोलल्यानंतर मुनीला देव ह्मणाले, मुने आह्मी धन्य नाहीं, व आह्मी परमेश्वरही नाहीं. आह्मांला गति देणारा अग्नि धन्य असून तो श्रेष्ठ आहे, व तो आश्चर्यस्वरूपी आहे. (६२) तो हव्यकव्यांचा स्वीकार करीत असतो. असें ऐकून मुनि अग्नीला ह्मणाला. अग्ने, सर्व देवांचा प्रभु तूं असून धन्य आहेस, व विश्वकर्ता आहेस. (६३) नंतर अग्नि ह्मणाला मुने, अशा तऱ्हेनें निर्दोष शरीराचा मी नाहीं जगाला आनंद देणारे व फळ देणारे ते यज्ञ धन्य आहेत. (६४) नंतर मुनीनें यज्ञाला ह्मटलें कीं, यज्ञहो, तुह्मी श्रेष्ठ आहांत. नंतर यज्ञ ह्मणाले हे मुने, आह्मी धन्य नाहीं, आह्मास आश्रय देणारा यजमान (यज्ञ करणारा दीक्षित) धन्य होय, व तो आश्चर्यकारक शरीराचा आहे. (६५) नंतर मुनि दीक्षिताजवळ जाऊन दीक्षितास ह्मणाला, हे दीक्षिता, तूं निष्कल्मष असून धन्य आहेस, व पूज्य असून सर्व

यजमानमकल्मषम् ॥ धन्यस्त्वमसि पूज्यश्च यज्ञधर्माश्रयस्तथा॥६५॥ पितेवात्र त्वमेवैको भूतानां प्रीणनाद्विभुः ॥ स एवमुक्तस्तेनार्यो जगादेदं सुभाषितम् ॥६६॥ अग्निहोत्रफला वेदाः शीलवृत्तफलं श्रुतम् ॥ रतिपुत्रफला नारी दत्तभुक्तफलं धनम्॥६७॥ शासितारोऽत्र नो वेदास्ते धनुर्वेदपंचमाः ॥ सर्वार्थदर्शिनो नित्या जगदुत्पत्तिहेतवः॥६८॥ पप्रच्छ स ततो वेदान् शब्दब्रह्मैकविग्रहान् ॥ पुराणस्मृत्यलंकारान् सषडंगपदक्रमान्॥६९॥धन्या भवन्तः पुण्याश्च ज्ञानाश्चर्यप्रकाशकाः॥ तेनेत्युक्तास्तमूचुस्ते ब्रह्मास्येभ्यो वयं किल ॥७०॥ आविर्भूतास्ततश्चासौ धन्यश्चाश्चर्यवान्प्रभुः ॥ स तदोपेत्य धातारं प्रतिपत्त्येदमब्रवीत् ॥७१॥ देवाश्चर्यमयस्त्वेको भवान् धन्यश्च शाश्वतः ॥ स चैवोक्तस्तमाहेदं मामैवं वद पुत्रक ॥७२॥ विष्णुर्धन्यश्च पूज्यश्च स्रष्टा देवो ममा-

---

यज्ञांस आश्रय देणारा आहेस. (६६) तूं सर्व प्राण्यांना संतोष देतोस, सर्वांना तूं पित्याप्रमाणें भासतोस. याप्रमाणें बोलल्यानंतर तो दीक्षित ह्मणाला. (६७) हे मुने अग्निहोत्राचें फल सांगणारे ते वेद सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेत. कारण पुष्कळ वेळ वेदांचें श्रवण केलें असतां पुढें सांगितलेलीं फळें मिळतात, उत्तम शील व उत्तम वर्तन प्राप्त होतें, व स्त्री ही रतीच्या वेळेस पुत्र देणारी होते व धन दान केलें असतां तें बहुविध फळ देणारें होतें. या सर्वाला मूलकारण वेद आहेत. (६८) धनुर्वेदासह ते पांच वेद आह्मांस शासन करणारे आहेत. सर्व तत्वें दाखविणारे वेदच असून निरंतर जगाच्या उत्पत्तीला, पालनाला, नाशाला कारण वेदच आहेत. (६९) नंतर मुनीनें वेदांला ह्मटलें कीं वेदहो, जगांत तुह्मी धन्य अहांत. कारण तुमचें शरीर शब्दब्रह्मस्वरूपी असून त्या शरीरावर पुराणरूपी व स्मृतिरूपी अलंकार शोभतात. व षडंग, पद, क्रम वगैरेनीं तुह्मी सुशोभित दिसतां (७०) अर्थात् तुह्मी धन्य असून पुण्यकर अहांत, व आश्चर्यकारक ज्ञानाला प्रकाशणारे अहांत. नंतर मुनीला वेद ह्मणतात, हे मुने, आह्मी धन्य नसून आमची उत्पत्ति ज्याच्या तोंडापासून झाली आहे, (७१) तो ब्रह्मदेव धन्य आहे, व आश्चर्यकारक आहे, नंतर ब्रह्मदेवाजवळ येऊन नमस्कार करून मुनि ह्मणाला हे चतुर्मुखा, (७२) सर्व देवांमध्यें आश्चर्यकारक तूं एक असल्यामुळें शाश्वत व धन्य तूं एकटाच दिसतोस. असें ऐकून ब्रह्मा ह्मणाला, मुने, पुत्रा, असें तूं बोलूं नको. (७३) कारण अशा मला देखील त्या विष्णूनें उत्पन्न केलें. याकरितां सर्व

प्यसौ ॥ आश्चर्यभूतो जगतां जगदादिः सनातनः ॥७३॥ सर्वैश्वर्यगुणोपेतो ह्यमेयाद्भुतविक्रमः ॥ स ततः कौतुकाविष्टो ययौ द्रष्टुमधोक्षजम् ॥७४॥ सनत्कुमारः क्षीराब्धौ सेव्यमानं महर्षिभिः ॥ भोगिभोगासनासीनं चतुर्बाहुं सनातनम् ॥७५॥ तत्फणामंडलोदर्चिर्मणिद्योतितविग्रहम् ॥ प्रणम्याथ स तं मूर्ध्ना क्षीरोदतनयाधवम् ॥७६॥ विनयावनतो धीमानिदं वचनमब्रवीत् ॥ आश्चर्यवान्भवानेको धन्यश्च जगतां पतिः ॥७७॥ न किंचिदन्यत्पश्यामि भूतं यद्भवता समम् ॥ त्वत्तः सर्वमिदं जातं जगत्स्थावरजंगमम् ॥७८॥ त्वय्येव लयमायाति विश्वात्मन्गरुडध्वज ॥ एवमुक्तः स तेनाह वासुदेवो जगद्गुरुः ॥७९॥ ब्रह्मर्षे न वयं धन्या न चाश्चर्याणि संति नः ॥ सर्वाश्चर्यमयी देवी चतुर्विंशाक्षरात्मिका ॥८०॥ व्यक्ताव्यक्तस्वरूपा च यया व्याप्तमिदं जगत् ॥ विभावरीं योगनिद्रां सदैवैतां भजाम्यहम् ॥८१॥ सा शक्तिर्देवदेवस्य स्वे-

---

जगाचा आदि सनातन विष्णु हा आश्चर्यकारक आहे. (७४) ज्याच्याजवळ सर्वैश्वर्यांचे गुण आहेत, ज्याचा पराक्रम वर्णन करावयास अशक्य आहे, तो विष्णु धन्य आहे. असें ऐकून तो मुनि कौतुकानें युक्त होऊन विष्णूला पाहण्याकरितां विष्णूकडे गेला. (७५) क्षीरसमुद्रामध्यें मोठमोठाले ऋषि ज्याची सेवा करीत बसले आहेत, जो शेषाच्या पर्यंकावर बसलेला आहे, ज्याला चार बाहु असून जो सनातन ह्मणवितो, (७६) व जो शेषाच्या फण्यावरच्या मण्यानें प्रदीप्त दिसतो; अशा रमापति विष्णूला मस्तकानें नमस्कार करून (७७) विनयानें वांकून विष्णूला सनत्कुमार म्हणाला. हे विष्णो, जगांत तूं एक धन्य असून जगाचा प्रभु तूं एकटाच आहेस. (७८) जगांत तुझ्या बरोबरीचा दुसरा कोणताही प्राणी मीं पाहिला नाहीं. तुझ्यापासूनच हें स्थावरजंगमरूपी जग निर्माण झालें आहे. (७९) व हे गरुडध्वजा, हें जग शेवटीं तुझ्याच ठिकाणीं लय पावतें. याप्रमाणें त्याचें वचन ऐकून जगद्गुरु विष्णु ह्मणाला (८०) ब्रह्मर्षे, मी कांहीं धन्य नाहीं, व माझ्या ठिकाणीं आश्चर्यकारक असें कांहींच नाहीं. सर्व आश्चर्यें चोवीस अक्षरस्वरूपी पार्वतीमध्यें आहेत. अर्थात् ती धन्य आहे. (८१) जिचें स्वरूप व्यक्त व अव्यक्त असून जिनें हें सर्व जग व्यापिलें आहे, जिला विभावरी असें म्हणत असून योगनिद्रा असें ह्मणतात, त्या योगनिद्रेचें भजन मी सर्वदा करीत असतों. (८२) ती शक्ति देवाधिदेवाला निरंतर अनुसरून राहते; व-

च्छयैवानुयायिनी ॥ जगत्स्थितिं विनाशं च करोत्युत्पत्तिमेव च॥८२॥
शिवां भगवतीं धन्यां धन्यास्ते ये यजंति ताम् ॥ परस्तस्या महादेवो
यः स एकोऽमरोत्तमः ॥८३॥ सर्वाकारो निराकारो महात्मा पार्वती-
पतिः ॥ तस्मात्परतरं नास्ति ज्ञानं ज्ञेयात्सनातनात् ॥८४॥ सर्वगोऽपि
जगद्धेतुः कर्मभिर्यो न लिप्यते॥ स एवानुपमाश्चर्यः प्रणतार्तिहरो हरः
॥८५॥ मूर्तामूर्तो महादेवो जगत्कर्ता वृषध्वजः ॥ जातोऽहमस्य वा-
मांगे ब्रह्मा चैवास्य दक्षिणे ॥८६॥ मुखेभ्यश्चतुरो वेदास्सांगोपांगाश्च
कृत्स्नशः ॥ स कदाचिन्मया दृष्टो धर्मासनगतोऽच्युतः ॥८७॥ आरा-
ध्य तपसोग्रेण सर्वभूतभवोद्भवः ॥ अर्धनारीश्वरवपुः सूर्यायुतसमप्र-
भः ॥८८॥ शशांकशतसंकाशश्चिन्मात्रो मात्रिको विभुः ॥ तत्रैकस्थं ज-
गत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ॥८९॥ दृष्टवानस्मि देवस्य देहे विश्वात्म-
रूपिणः ॥ स्तुतवांश्च ततो रुद्रं प्रणिपत्य तमीश्वरम् ॥९०॥ पुण्येनापि

---

त्या प्रभावानें जगाची उत्पत्ति, स्थिति, लय वगैरे करीत असते. (८३) अशा धन्य भगवतीचें भजन जे करतात, ते खरोखर धन्य होत. तिच्यापेक्षां श्रेष्ठ ह्मणजे अमरोत्तम तो एकटा शिवच आहे. (८४) तो पार्वतीचा पति सर्वाकार असून निराकार आहे. व महात्मा आहे. अशा सनातन ज्ञेयवस्तूपेक्षां श्रेष्ठ वस्तु कोण-तीही नाहीं, व त्याच्या ज्ञानापेक्षां दुसरें कोणतेंही ज्ञान श्रेष्ठ नाहीं. (८५) तो सर्वव्यापी असून जगाला कारण आहे. तथापि तो कर्मांनें लिप्त होत नाहीं तोच असदृश आश्चर्याचा असून शरण जाणाऱ्या प्राण्यांची पीडा हरण करणारा तो एकटाच आहे. (८६) साकार निराकार महादेवच जगाचा कर्ता असून सर्वां-पेक्षां श्रेष्ठ आहे. त्या वृषध्वजाच्या डाव्या अवयवापासून मी उत्पन्न झालों, व ब्र-ह्मदेव त्याच्या उजव्या अंगापासून उत्पन्न झाला. (८७) त्याच्या मुखापासून अंग-उपांगसहित चार वेद उत्पन्न झाले. तो परमात्मा धर्मासनावर बसला असतां एकदा त्याला मीं पाहिलें. (८८) जो श्रेष्ठ तपाच्या योगानें आराधना करावयास योग्य आहे, जो सर्व प्राण्यांना उत्पन्न करणारा महात्मा आहे, ज्याचें शरीर अर्ध-नारीनराकार आहे, ज्याचें तेज दहाहजार सूर्याप्रमाणें झळकत आहे. (८९) व शेंकडो चंद्रांप्रमाणें ज्याचा प्रकाश आहे, व जो आनंदरूप असून मात्रास्वरूप आहे, अशा त्या परमेश्वराच्या ठिकाणीं एकवटलेलें हें जग हजारो तऱ्हेनें होऊन निरनिराळ्या प्रकारांनीं बाहेर येतें. (९०) विश्वस्वरूपी त्या परमेश्वराच्या देहांत हें सर्व मीं पाहून त्याला नमस्कार करून त्या रुद्राची स्तुति केली. (९१) पुण्यकर

पवित्रेण रुद्राध्यायेन शूलिनम् ॥ प्रसन्नोऽसौ महाबाहुरुग्रधन्वाथ शांकरः ॥९१॥ प्रत्याह मां महातेजा कृष्णेत्यामंत्र्य सादरम् ॥ परमाष्टगुणैश्वर्यं सर्वज्ञत्वं च केशव ॥९२॥ अमोघवांछितत्वं च मत्प्रसादाद्भविष्यति ॥ मामेवमुक्त्वा देवोऽसौ तत्रैवांतरधीयत ॥९३॥ सर्वमेतत्सुखोदर्कं तत्प्रसादाच्च लब्धवान् ॥ यत्तदक्षरमव्यक्तं परं यस्मान्न विद्यते ॥९४॥ सर्वाश्चर्यतनुं शान्तं बुद्धिग्राह्यं निरामयम् ॥ विश्वतः पाणिपादं च विश्वतोऽक्षिशिरोमुखम् ॥९५॥ तं सदैवमजं देवं चिन्तयाम्यहमव्ययम् ॥ भुवनत्रयवंद्याय नमस्तस्मै महात्मने ॥९६॥ हृदि तत्पुरुषो यस्य मंत्रो वक्त्रे षडक्षरः ॥ कर्मणा मनसा वाचा सोमं सोमार्धधारिणम् ॥९७॥ सर्वज्ञं सर्वकर्तारं प्रणतोऽस्मि सदाशिवम् ॥ चतुःसमुद्रवलयां हिमविंध्यपयोधराम् ॥९८॥ धरां यद्भुंजते भूपाः प्रणिपातस्य तत्फ-

---

पवित्रकर रुद्राध्यायानें त्या शूलीचें स्तवन केल्याबरोबर उग्र धनुष्य धारण केलेला बाहुशाली शंकर मला प्रसन्न झाला. (९२) महातेजस्वी श्रीशिवानें "हे कृष्णा," असें संबोधन देऊन माझ्याशीं भाषण केलें. अरे, केशवा, श्रेष्ठ असें अष्टगुणैश्वर्य, सर्वज्ञत्व वगैरे गुण. (९३) व अमोघवांछितत्व (व्यर्थ न होणारी इच्छा) हें माझ्या प्रसादानें तुला मिळो. याप्रमाणें मला सांगून तो देव तेथेंच गुप्त झाला. (९४) अशा रीतीनें सुखोत्पत्तीचीं सर्व साधनें मला शंकराच्या कृपेनें प्राप्त झालीं. त्या अक्षर व अव्यक्त अशा शिवापेक्षां कोणीही श्रेष्ठ नाहीं. (९५) ज्याचें शरीर सर्वाश्चर्यकर असून शांत आहे. शरीर बुद्धीला ग्राह्य असून आरोग्यकर आहे, व ज्याचे हात व पाय चोहोंकडे असून ज्याचे डोळे व डोकीं चोहोंकडे आहेत (९६) अशा त्या अव्यय व जन्मरहित देवाचें चिंतन मी नेहमीं करतों. व त्रैलोक्याला वंद्य अशा त्या महात्म्याला नमस्कार करतों. (९७) ज्याच्या हृदयांत तत्पुरुष असून ज्याच्या वाक्यांत षडक्षर मंत्र आहे, व ज्यानें अर्धचंद्र शिरावर धारण केला आहे, अशा सोमाला (पार्वतीसहित शिवाला) कर्मानें, वाणीनें, व मनानें मी नमस्कार करितों. (९८) जो सर्वज्ञ असून सर्वकर्ता आहे, त्या सदाशिवाला नमस्कार करतो. चारी समुद्रांच्या मध्यभागीं जी राहते, (चार समुद्रच कंबरपट्टा जिनें कंमरेंत असा घातला आहे) व हिमालय व विंध्य हे दोन पर्वत जिच्या स्तनाच्या जागीं आहेत, (९९) अशा पृथ्वीचा उपभोग जे राजे घेतात, त्यांनीं शिवाला पुष्कळ नमस्कार करून पुष्कळ पुण्यसंग्रह केला आहे,

लम् ॥९९॥ वृत्तम् ॥ आचारहीनोऽपि निराकृतोऽपि प्रक्षीणसत्वो व्यसनान्वितोऽपि ॥ सकृन्महादेवकृतप्रणामो विध्वस्तदोषः परतामुपैति ॥१००॥ ब्रह्मादयस्ततो देवाः पितरोऽथ महर्षयः ॥ पूजयंति सदा तात शिवं सिद्धाश्च चारणाः ॥१०१॥ श्रोत्रादींद्रियरूपास्तु यस्येशानमुखा मुखाः ॥ शब्दादिविषयाहारा हरं केनार्चयन्ति तम्॥१०२॥ आराधितो यस्तु पुंसामैहिकामुष्मिकं फलम् ॥ ददाति भगवान् देवस्तमीशं को न पूजयेत् ॥१०३॥ पश्य शंकरमाराध्य मोदमानं शचीपतिम् ॥ यमं च वरुणं सूर्यं सोमं वैश्रवणं मनुम् ॥१०४॥ देवेंद्रत्वादिकं स्फीतं सर्वभूतेप्सितं पदम् ॥ शिवभक्तिद्रुमात्पुष्पं राजसात्सात्विकात्फलम् ॥१०५॥ अणिमा महिमा प्राप्तिः प्राकाम्यं लाघवं तथा ॥ ईशित्वं च वशित्वं च यत्र कामा वशायिताः ॥१०६॥ हतपत्त्यश्वमातंगे रुधिरारुणभूतले ॥

---

ह्मणूनच त्याचें फल ते भोगतात. (१००) आचारानें हीन असो, लोकांकडून भविष्कृत झालेला असो, क्षीणसत्व झालेला असो, व्यसनाधीन झालेला असो, परंतु एकवार त्यानें महादेवाला नमस्कार केला, ह्मणजे तात्काळ त्याचे सर्व दोष जळून जातात, व तो परतत्वाजवळ जाऊन यथेच्छ सुखोपभोग घेतो. (१०१) हे ताता, ब्रह्मादिदेव, पितर, महर्षि, सिद्ध, चारण वगैरे लोक नेहमीं शिवाची पूजा करतात. (१०२) श्रोत्रादि पांच इंद्रियें हींच त्या ईश्वराचीं पांच मुखें होत, व शब्दादि पांच विषय हे त्याचे आहार होत; अशा त्या ईश्वराची या जगांत कोण बरें पूजा करीत नाहीं? ( सर्व करतात हा भावार्थ होय. ) (१०३) त्याची आराधना केली असतां या लोकांतलें व परलोकांतलें अशीं दोन्ही सुखें जर मिळत आहेत, तर त्या ईशाची पूजा कोण करणार नाहीं? (१०४) शंकराची आराधना करून तो इंद्र कसा सुखानें राहिला आहे पहा? त्याप्रमाणें यम, वरुण, सूर्य, सोम, कुबेर, मनु वगैरे लोकांना शंकराच्या आराधनेनेंच पदव्या मिळाल्या आहेत. (१०५) सर्व प्राण्यांना मनाजोगतें फल देणारें स्वर्गपद व इंद्रत्व इंद्राला शिवाराधनेनेंच मिळालें आहे. राजस व सात्विक अशा शिवभक्तिरूप वृक्षाला सात्विक असें हें फल मिळतें. (१०६) अणिमा, महिमा, प्राप्ति, प्राकाम्य, लाघव; ईशित्व, वशित्व, गुरुत्व वगैरे आठ ऐश्वर्यें ( अष्टैश्वर्य ) शिवाच्या आराधनेनें आपोआप घरीं चालून येतात. (१०७) ज्या ठिकाणीं अनेक हत्ती, घोडे, पायदळ वगैरे प्राण्यांचा रक्तपात होतो, त्या समरांत जय मिळावयाचा असेल तर

**संग्रामे विजयश्चापि प्राप्यते तत्प्रसादतः ॥१०७॥ सुश्रोण्यो हंसगमनाः पीनोन्नतपयोधराः ॥ अकलंकशशांकाभवदना नीलमूर्धजाः॥१०८॥ सल्लापोल्लापकुशलाः पद्मगर्भसमत्विषः ॥ अनिर्देश्यवयोरूपा विभ्रमोद्भ्रान्तलोचनाः ॥१०९॥ रमयंति नराः स्वर्गे सुररामा मनोहराः ॥ दिव्यान्यतीव भोग्यानि दिव्यान्याभरणानि च ॥११०॥ तुष्टे सुतोपे देवेशे प्राप्यन्ते दिवि चेह वा ॥ क्रीडन्तः शिशवो यत्र लिंगं कृत्वा यजन्ति ये ॥१११॥ सैकतं मृण्मयं वापि भूपालाः स्युर्महाधिकाः ॥ अर्थानेके समाराध्य सकृदप्यत्र शूलिनम् ॥ प्रापुः कामांस्तथैवान्ये स्वर्गं मोक्षं तथा परे ॥११२॥ वृत्तम् ॥ संसारपारं परमीप्समानैराराधनीयो भगवानिहैकः ॥ तस्मात्तमाराधय चिन्तयेशं समर्चयैनं हि सनत्कुमार ॥११३॥ आराध्यैवं महादेवं सर्वज्ञं विश्वतोमुखम् ॥ क्षिप्रं प्रयासि तेनैव सायुज्यं नात्र संशयः ॥११४॥ एतत्ते सर्वमाख्यातं यत्पृष्टोऽहमि-**

---

श्रीशंकराची कृपा असली तरच जय मिळतो. (१०८) सुंदर ढुंगणाच्या, व हंसाप्रमाणें मंद मंद चालणाऱ्या, पुष्ट व उंच स्तन असणाऱ्या, निष्कल्मष चंद्राप्रमाणें शोभणारें मुख असलेल्या, कुरळ व काळे केस असलेल्या, (१०९) बोलण्यांत चतुर असलेल्या, उत्तर देण्यांत पटाईत असलेल्या, कमळांतल्या गाभ्याप्रमाणें अंगकांति असलेल्या, सोळा किंवा सतरा वर्षांचें वय असलेल्या, विलासानें डोळे फिरविणाऱ्या, (११०) अशा सुंदर अप्सरा स्त्रिया स्वर्गामध्यें शिवभक्ताचें मन प्रसन्न करावयास तत्पर असतात. दिव्य व उपभोग घ्यावयास योग्य अशीं आभरणें (१११) परमेश्वर प्रसन्न झाला असतां या लोकांत व परलोकांत मिळतात. लहान लहान मुलें लिंगाकार करून त्याची पूजा करतात, (११२) तें लिंग वाळूचें केलेलें असो, किंवा मातीचें केलेलें असो, त्याच्या पूजेनें तीं मुलें मोठमोठे राजे होऊन भूलोकावर राज्य करतात. कांहीं लोकांना पुरुषार्थांची इच्छा असली तरी पुरुषार्थ मिळतात. एकवार शिवाची पूजा केली तरी इच्छित वस्तूंचा लाभ, स्वर्ग, मोक्ष, वगैरे पुरुषार्थ मिळतात. (११३) हे सनत्कुमारा, संसाराच्या पैलतीराला जाण्याची ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं या लोकांत एकट्या शिवाची पूजा केली तर पुरें आहे. तर तूं त्या महादेवाची आराधना कर, त्याचें ध्यान कर, व त्याची पूजा कर. (११४) याप्रमाणें चोहोंकडे मुख असलेल्या सर्वज्ञ शिवाची आराधना तूं करशील तर त्याच्या प्रभावानें लौकरच सायुज्याला जाशील, यांत संशय नाहीं. (११५) हे मुने, तुझे जितके प्रश्न होते, तितक्या

ह त्वया ॥ पुण्यं पवित्रमायुष्यं रहस्यं परमाद्भुतम् ॥११५॥

दूर्वासा उवाच ॥ वृत्तम् ॥ इत्येवमाहामरमौलिमालामणिप्रभापिंजरितांघ्रिपद्मः ॥ पद्माधवोऽसौ महिमानमाद्यं वेदागमोद्गीतमजस्य शंभोः ॥११६॥ श्रुत्वेदं विष्णुना प्रोक्तं कर्मयोगं सुदुर्लभम् ॥ ब्रह्मसूनुः प्रहृष्टात्मा प्रययौ स्वाश्रमं ततः ॥११७॥ संभवोऽशेषलोकस्य यस्योच्छ्वासेन जायते ॥ निःश्वासकाले विप्रेंद्र संहारश्चापि धूर्जटेः ॥११८॥ वृत्तम् ॥ नरैश्च संसारमसारमापदां पदं विजानद्भिरनंतसौख्यदः ॥ गुरोः सकाशादवगम्य तत्वतः प्रपूजनीयः सुमनोभिरादरात् ॥११९॥ प्रणाममीशस्य शिरःफलं विदुस्तदर्चनं पाणिफलं दिवौकसः ॥ मनःफलं तद्गुणतत्वचिंतनं वचःफलं देवकथास्तवानि च ॥१२०॥ कुलं पवित्रं पितरः समुध्दता वसुंधरा तेन च पाविता मुने ॥ सनातनोऽना-

---

प्रश्नांस मीं यथाशक्ति उत्तर दिलें आहें. जें रहस्य तुला सांगितलें तें परम पुण्यकर असून पवित्र आहे, व अतिशय आश्चर्यकर आहे.

(११६) दूर्वास ऋषि ह्मणाले— ज्याच्या पायावर मोठमोठ्या देवांच्या डोक्यावरच्या किरीटांच्या रत्नमय माळा लोळत असल्यामुळें अर्थात् त्या पायावर जिकडे तिकडे कांतिच कांति झाली आहे, अशा पद्माधवानें (महा विष्णूनें) वेदोक्त व आगमोक्त शंभूचें पुरातन माहात्म्य सनत्कुमारास सांगितलें. (११७) विष्णूनें सांगितलेला दुर्लभ कर्मयोग ऐकून सनत्कुमार संतुष्ट होऊन आपल्या आश्रमाला निघून गेला. (११८) अशेष लोकांची सृष्टि नुसत्या त्या शिवाच्या उच्छ्वासानें होते व निश्वासानें सर्व लोकांचा संहार एका क्षणांत होऊन जातो. (११९) जे लोक निःसार अशा संसाराला आपत्तीचें घर ह्मणून समजतात, त्यांनीं अनंत सौख्य देणाऱ्या शिवतत्वाचें ज्ञान गुरूपासून मिळवून त्या शिवाची पूजा फुलांनीं आदरपूर्वक यथाशास्त्र करावी. (१२०) त्याला ( शिवाला ) नमस्कार करणें डोक्याचें सार्थक्य आहे, हाताचें सार्थक्य करावयाचें असेल तर शिवाची पूजा करावी. मनाचें सार्थक्य करावयाचें असेल तर शिवाच्या गुणांचें चिंतन करावें. वाणीचें सार्थक्य करावयाचें असेल तर ईशाच्या कथा सांगाव्या, व ईशाची स्तुति करावी, असें सर्व देव समजतात. (१२१) ज्या भक्ताच्या हृदयांत अनादि, अनंत शरीराचा शिव सर्वदा राहतो, ( जो नेहमीं शिवध्यान करतो ) त्याचें कुल पवित्र होय. व त्याचे सर्व पूर्वज उद्धरून जातात, फार काय? ही पृथ्वी देखील त्या भक्ताच्या योगानें

दिरनंतविग्रहो हृदि स्थितो यस्य सदैव शंकरः ॥१२१॥ अन्यो हि कोमनोऽभीष्टं समर्थो दातुमीश्वरात् ॥ तपस्तीर्थानि वेदाश्च यज्ञदानव्रत क्रियाः ॥१२२॥ शिवलिंगार्चनस्यैते कोट्यंशेनापि नो समाः ॥ तस्मात्त्वमपि विप्रर्षे विरूपाक्षपरो भव ॥१२३॥ वृत्तम् ॥ यदा धरेयं हरिणा समुध्दृता प्रजाश्च सृष्टाः परमेष्ठिना पुरा॥ शिवाज्ञया चापि मयाथ जैमिने तथैव ते सर्वमिदं प्रकाशितम् ॥१२४॥

जैमिनिरुवाच ॥ भगवन्कथितं सर्वं यत्पृष्टोऽसि मया प्रभो ॥ श्रुतं चैतन्मया भक्त्या नान्यत्प्रष्टव्यमस्ति मे ॥१२५॥

सूत उवाच ॥ स्कांदं पुराणमखिलं च यथा परीक्ष्य दूर्वाससा ज्वलनसूर्यसुधांशुधाम्ना ॥ पुण्यं शिवं शिवरहस्यमनुत्तमं हि प्रोक्तं महार्थमिह जैमिनये पुरैतत् ॥१२६॥ तेनापि मे तदधुना च मया तथैव श्रद्धावतां च कथितं भवतां मुनींद्राः ॥ शृण्वंति ये शिवरहस्यमिदं पवित्रं ये वा पठंति विधिवच्छिवभक्तियुक्ताः ॥१२७॥ ते देवराजचतुराननविष्णुसूर्यैः संपूजिता हरपुरीमुपयांति मर्त्याः ॥ यत्रैव सर्वभुव-

---

पुनीत होते. (१२२) मनाजोगतें फल देणार शिवावांचून दुसरा प्राणी जगांत कोण आहे बरें? तप, तीर्थ वेद, यज्ञ, दान व्रत, क्रिया, (१२३) वगैरे हीं शिवपूजेच्या कोटि अंशाची देखील बरोबरी करूं शकत नाहींत. याकरितां हे ब्राह्मणश्रेष्ठा, तूं देखील शिवपूजेंत रत हो. (१२४) ज्यावेळेस श्रीहरीनें पृथ्वीचा उद्धार केला, ज्यावेळेस ब्रह्मदेवानें सर्व प्रजेची सृष्टि केली तेव्हांच हे जैमिने, शिवाच्या आज्ञेनें हें सर्व मीं प्रकाशांत आणिलें.

(१२५) जैमिनि ह्मणाला— हे प्रभो, माझे जितके प्रश्न होते, तितक्यांस समर्पक उत्तरें मिळालीं. व मींही सर्व भक्तीनें ऐकिलीं आतां माझा कांहीं प्रश्न राहिला नाहीं.

(१२६) सूत ह्मणाले– अग्नि, सूर्य, चंद्र यांच्या प्रमाणें तेजस्वी अशा दूर्वासमुनीनें सर्व स्कांदपुराणाचें निरीक्षण करून शिवरहस्य जसें सांगितलें होतें, तसेंच मींही जैमिनीला हें पुरातन शिवरहस्य पूर्वी सागितलें. (१२७) हे मुनीश्वरहो, श्रद्धावान अशा तुह्मांस जशाचें तसेंच सांगितलें. असें हें पवित्रकर शिवरहस्य मनांत ठेवून याचें पठन व श्रवण शिवावर भक्ति ठेवून जे करतात. (१२८) ते लोक इंद्र, ब्रह्मा, विष्णु, सूर्य, यां सारख्या मोठमोठ्या देवांनाही मान्य होऊन शिवलोकाला जातात. प्रलयकालीं ज्याच्या ठिकाणीं सर्व लोक लय पावतात, व

नानि समुद्भवंति तिष्ठति यांति च पुनर्विलयं युगान्ते ॥ तस्मै समस्तसुखभोगनिबंधनाय नित्यं प्रवोधमुदिताय नमः शिवाय ॥१२८॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने विष्णुसनत्कुमारसंवादो नाम पंचत्रिंशोऽध्यायः ॥

---

ज्याच्या पासून या जगाची सृष्टि होते, ज्याच्या आश्रयानें हें जग राहतें, त्या शिवाला नमस्कार असो. तो शिव सर्व सुखोपभोगांचें स्थान (सुखभोग देण्याचा अधिकार शिवाच्या ताब्यांत आहे) असून स्वतः आपल्या आनंदस्वरूपानें सर्वदा संतुष्ट असतो ; त्या शिवाला नमस्कार असो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील विष्णुसनत्कुमारसंवादांतील पसतिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ षट्त्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे श्रीकालिकाखण्डे ॥ तृणबिंदुरुवाच ॥ भगवंच्छ्रोतुमिच्छामि ब्रह्मविष्णुपिनाकिनाम् ॥ मध्ये सर्वगुणोत्कृष्टः को देवो भोगमोक्षदः ॥ एतन्मे संशयं छिंदि सर्वज्ञस्त्वं मतो मम ॥१॥ अनिलाद उवाच ॥ साधु साधु महाप्राज्ञ गंभीरार्थमिदं वचः ॥ नालं वक्तुं मुनिश्रेष्ठ शक्तः शक्रगुरुस्तथा ॥२॥ तथापि वक्ष्ये निश्चित्य सर्वेभ्यो ह्यधिकः शिवः ॥ अत्र तत्कारणं वच्मि यथावृत्तं प्रसिद्धिमत् ॥३॥ नीलोत्पलदलश्यामो महाभारतचंद्रमाः ॥ कालीयः सर्वधर्मज्ञः पाराशर्यो यदृच्छया ॥४॥ नैमिषे मुनिमुख्यानामग्रे पठितुमुद्यतः ॥ न देवः केशवादन्य इति व्यासः पुनः पुनः ॥५॥ तस्यैकदेशदृष्टं तु श्रुत्वा वाक्यं द्विजोत्तमाः ॥ शिवभक्ताश्च तं किंचिदूचुः संक्रुद्धलोचनाः ॥६॥ तथा पृच्छामहे वाक्यमिदं ते यदि निश्चितम् ॥ काश्यां विश्वेश्वरस्याग्र इति सर्वे तमब्रुवन् ॥७॥ गत्वा वाराणसीं व्यासः पूर्वमोहान्म-

---

स्कांदपुराणांतील कालिकाखंडांत असा कथाभाग आहे. तृणबिंदु ह्मणाला— (१) हे ब्रह्मन्, ब्रह्मा, विष्णु, शंकर यामध्यें सर्व गुणांनीं उत्कृष्ट असा देव कोण आहे? व यांमध्यें भोग मोक्ष देण्याचा अधिकार कोणाला आहे? याविषयीं मला मोठा संशय आला आहे; तर आपण सर्वज्ञ आहांत, आपण माझ्या संशयाचें निरसन करा.

(२) अनिलाद ह्मणाले —हे महाप्राज्ञ ( हे बुद्धिमाना ) फार चांगलें-आहे, तुझा प्रश्न फार गंभीर अर्थाचा आहे. याला समर्पक सविस्तर उत्तर देणें साक्षात् बृहस्पतीच्या हातूनही व्हावयाचें नाहीं. (३) तथापि निश्चयानें सांगतों कीं, सर्व देवांपेक्षां शिवच अधिक आहे. याला प्रसिद्ध प्रसिद्ध कारणें सविस्तर सांगतों पहा. (४) नीलकमलाप्रमाणें सावळा असलेला, महाभारतांतला जणूं चंद्रच कालीचा मुलगा, सर्व धर्म जाणणारा असा जो वेदव्यास त्यानें नशीबानें (५) नैमिषारण्यांत प्रवेश करून तेथें असलेल्या सर्व मुनींमध्यें असें सांगितलें कीं, केशवाशिवाय दुसरा देव जगांत कोणी नाहीं; असें वरचेवर त्या समाजांत व्यासमुनि ह्मणाला. (६) कोणत्या एका भागांत वर्णन केलेलें पाहून जें विष्णुमहत्व व्यासानें सांगितलें, तें ऐकून ब्राह्मणश्रेष्ठ शिवभक्त रागानें डोळे लाल करून व्यासमहर्षीला ह्मणाले. (७) हे व्यासमुने, आह्मी असें सांगतों कीं, तुझें हें वाक्य निश्चयाचें असेल तर काशीस जाऊन विश्वेश्वरासमक्ष केशवाची स्तुति कर पाहूं. (८) असें ब्राह्मणांचें वाक्य ऐकून व्यासमुनीनें काशीला जाऊन

ह्यामुनिः ॥ ऊर्ध्वबाहुरुवाचोच्चैः शिवाग्रे श्रीपतिं स्तुवन् ॥८॥

व्यास उवाच ॥ शृण्वन्तु देवतास्सर्वा मुनयः क्षीणकल्मषाः॥ सत्यं सत्यं पुनः सत्यं न देवः केशवात्परः ॥९॥ इत्युक्तमात्रे सहसा नंदिना स्तंभितौ भुजौ ॥ निष्प्रयत्नगतिं दृष्ट्वा किमेतदिति शंकितः ॥१०॥ अजानंस्तस्य तत्कर्म परां चिन्तामथाविशत् ॥ ध्यानेन वीक्ष्यते यावत्तावत्पश्यति माधवम् ॥११॥ शंखचक्रगदापाणिं तार्क्ष्यस्थं पीतवाससम्॥ श्यामं चतुर्भुजं दीनं रुद्रकोपाग्नितापितम् ॥१२॥

विष्णुरुवाच ॥ अवलेपेन दुर्बुद्धे त्वया दुर्भाषितं महत् ॥ ममापि नाथमाक्षिप्य शिवं मां यत्प्रशंससि ॥१३॥ अत्र मे वचनं व्यास शृणु मूढ यथार्थवत् ॥ यच्छ्रुत्वा सर्वभूतानां शिव एव भवेन्मतिः ॥१४॥ यज्ञकर्ता च देवेन्द्रो वेदकर्ता च वाक्पतिः ॥ अहमेव जगत्कर्ता मम कर्ता महेश्वरः ॥१५॥ तस्य देवाधिदेवस्य कर्ता कोऽपि न विद्यते ॥

---

पूर्वीच्या मोहानेंच दोनी हात वर करून उंच स्वरानें शिवापुढें विष्णूची स्तुति केली.

(९) व्यास ह्मणाला— सर्व देवहो, सर्व ब्राह्मणहो, निष्कल्मष मुनिजनहो, ऐका, ऐका. केशवाशिवाय या जगांत दुसरा कोणीही देव श्रेष्ठ नाहीं, हें मी खरें खरें सांगतों. (१०) असें बोलल्या बरोबर नंदीनें व्यासाचे दोनी हात बांधून टाकिले. नंतर आपली स्थिति अशी निरुपायाची झालेली पाहून हें काय झालें? अशी शंका व्यासाच्या मनांत सहज उद्भवली. (११) नंदीश्वराचें तें कर्म न समजून व्यासाला मोठीच काळजी पडली. नंतर व्यासानें विष्णूचें ध्यान करून विष्णूला हृदयांत पाहिलें, तोच तो महाविष्णु व्यासापुढें आला. (१२) हातांत शंख, चक्र, गदा धरून गरुडावर वसून तो महाविष्णु आला होता, व पीतवस्त्र नेसून चतुर्भुज झाल्यामुळें तो शोभत होता. तरी तो सावळा विष्णु रुद्राच्या कोपानें तप्त होऊन दीन होऊन व्यासाला असें ह्मणाला.

(१३) विष्णु ह्मणाला दुष्टबुद्धे आतां तुझें हें गर्वाचें भाषण अतिशय वाईट झालें आहे. माझा जो प्रभु शिव, याची देखील त्वां निंदा केली, व माझी प्रशंसा केलीस. हें अतिशय वाईट झालें आहे. (१४) मूर्खा हे व्यासा, या विषयीं माझें यथार्थ भाषण ऐक. तें माझें भाषण ऐकिल्या बरोबर शिवाच्या ठिकाणीं सर्व प्राण्यांची बुद्धि होते. (१५) यज्ञाचा कर्ता इंद्र असून वेदांचा कर्ता बृहस्पति आहे, व मी जगांचा कर्ता आहें, व माझा कर्ता साक्षात श्रीशिव आहे. (१६) देवाधिदेव शिवाची सृष्टि

देवतानामहं देवो देवोऽस्माकं महेश्वरः ॥१६॥ शिवस्य पूज्यते लिंगं सर्वैर्देवासुरैर्नरैः ॥ शिवेन पूजितः को वा वदन्तु प्रतिवादिनः ॥१७॥ स्वनाम्ना ब्रह्मणा लिंगं मया कृष्णेश्वरं मुने ॥ सर्वापेक्षितसिध्द्यर्थं वाराणस्यां प्रतिष्ठितम् ॥१८॥ ॐ नमो वासुदेवाय शिवशास्त्रावतारिणे ॥ शिवलिंगार्चनव्यग्रचेतसे शिवजन्मने ॥ यथार्थवचसाऽनेन यो मां स्तौति प्रहर्षितः॥१९॥तस्याहं सुलभो व्यास नान्यस्याब्दशतैरपि॥ तस्मात्त्वं शरणं याहि जीवितं मे यदीच्छसि ॥२०॥ इत्युक्त्वान्तर्दधे विष्णुर्व्यासोऽपि भयविव्हलः ॥ जगाम शरणं देवं सर्वभावेन शंकरम् ॥२१॥ संत्यज्य तृणवद्देवान् ब्रह्मविष्ण्वादिकांस्तथा ॥२२॥ वृत्तम् ॥ यस्यास्ति शक्तिः स तु वा वदेतु प्रोर्ध्वीकरोत्वंगुलिकां पुरो मे ॥ कः पूजितः स्याच्छशिशेखरेण नाराधितो भूतपतिः सुरैः कैः ॥२३॥ किं वा न दृष्टं हि पितामहेन सुरासुरैर्वा मधुसूदनेन ॥ क्षीरोदमंथोद्भव-

---

करणारा देव जगांत कोणी नाहीं. सर्व इतर देवतांचा देव मी असून माझा देव श्रीमहेश्वर आहे. (१७) शिवाचे लिंगाची पूजा सर्व देव, असुर, मानव वगैरे सर्व लोक करतात, परंतु प्रतिवादी लोकहो, शिवानें कोणत्या देवाची पूजा केली आहे हे सांगा बरें ? (१८) ब्रह्मदेवानें आपल्या नांवाच्या लिंगाची व मी कृष्णेश्वर नांवाच्या लिंगाची प्रतिष्ठा काशीक्षेत्रांत केली आहे. (१९) 'ॐ नमो वासुदेवाय' पासून "शिवजन्मने" पर्यंत मंत्र ह्मणून जो माझी स्तुति आनंदानें करतो. (२०) त्या प्राण्यास मी लौकर प्रसन्न होतों. हे व्यासा, या शिवाय कोट्यावधि वर्षेपर्यंत बसून तप केलें तरी त्या तपश्चर्येला मी भुलणार नाहीं. माझ्या हातून वांचण्याची इच्छा जर तुला असली, तर त्या शिवाला शरण जा. (२१) असें बोलून तो महाविष्णु तेथेंच अंतर्धान पावला. इकडे तो व्यास विष्णूचें वाक्य ऐकून भीतीनें गांगरून गेला नंतर सर्व भावानें त्या शिवास तो व्यास शरण गेला. (२२) अर्थात ब्रह्मविष्णु वगैरे देव तृणाप्रमाणें भासूं लागले अर्थात त्यांचा त्याग करून शिवासच शरण गेला. (२३) लोकहो, ज्याचें सामर्थ्य असेल, त्यानें पुढें येऊन आपलें बोट वर करून सांगावें कीं, जगामध्यें भूतपतीची आराधना न करणारा कोण आहे? व श्रीचंद्रशेखरानें कोणत्या देवाची पूजा केली आहे ? (२४) ब्रह्मदेवानें, विष्णूनें, सुरांनीं असुरांनीं क्षीरसमुद्रांत उत्पन्न झालेल्या विषाला पाहिलें नाहीं काय? परंतु त्या वेळेस यांपैकीं कोणी तरी तें विष प्यावयास धजला काय ? तथापि एक शंकर

कालकूटं कंठे धृतं केन हरं विहाय ॥२४॥ एकेन दग्धं त्रिपुरं शरेण कामो ललाटाग्निहुताशनेन॥ भिन्नोऽधकः शूलवरेण येन कस्तेन सार्धं कुरुते विरोधम् ॥२५॥ जलौघकल्लोलतरंगतुंगा गंगा धृता येन जटाग्रभागे ॥ पादांबुजांगुष्ठनिपीडनेन पपात लंकाधिपतिर्विसंज्ञः ॥२६॥ सुरासुराणामपि यः समक्षं प्रध्वंसितो दक्षमखः क्षणेन॥ प्रणम्य दक्षोऽक्षयतां मखस्य लेभे वरं शंकरतोऽपि चाग्र्यम्॥२७॥ सर्वस्य पूजार्हमिहोत्तमांगं संपूज्यते लिंगवरं हरस्य ॥ अनेन पर्याप्तमतीव मूढाः प्रभुर्यदेवेच्छति तत्करोति ॥२८॥ ब्रह्मात्र लिंगे हरिरत्र जातः सुरासुराश्चेदमिहार्चयंति ॥ तथापि मूढा न विचारयंति को वाधिकोऽप्यस्ति समो हरस्य ॥२९॥ न वज्रचक्रांकसरोरुहांकं लिंगांकितं पश्य जगद्भगांकम् ॥ हस्तप्रवृद्धे सति कंकणे तु पश्यंति मूढाः खलु दर्पणेन॥३०॥

---

मात्र पुढें सरसावले, त्या शिवाय कोणी पुढें आला नाहीं. (२५) एका बाणाच्या योगानें ज्यानें त्रिपुरासुराला मारिलें, व कपाळावरच्या नेत्राग्नीनें ज्यानें काम जाळून टाकिला, श्रेष्ठ अशा शूलायुधानें अंधकासुराला मारिलें, त्या शंकराबरोबर विरोध कोण करणार आहे? (२६) जिच्या पाण्यांत अनेक उंच उंच लाटा उसळतात, अशी ती गंगा जटेच्या शेवटीं ज्यानें बांधून टाकिली आहे,ज्यानें आपल्या पायाचा नुसता आंगठा दावला तर लंकेश्वर हा धाडदिशीं जमिनीवर मूर्च्छित होऊन पडला. (२७) सुरासुरांसमक्ष दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस एका क्षणांत ज्यानें केला, अशा तऱ्हेनें यज्ञाचा नाश करून घेतला तरी पुनः ज्या शंकरापासूनच दक्षानें उत्तम उत्तम वर मिळविलें; (२८) अशा त्या शंकराचें शिर सर्वांना मान्य असल्यामुळें त्या शिवलिंगाची पूजा सर्व लोक करतात. हे मूर्खहो, आतां असें भाषण पुरे करा. प्रभु शिव हा मनांत येईल त्याप्रमाणें करीत असतो. (२९) ब्रह्मदेवाची उत्पत्ति याच लिंगापासून झाली आहे, व श्रीविष्णूची उत्पत्ति याच लिंगापासून झाली आहे, सुरासुर सर्व लोक या लिंगाची पूजा करतात. इतकें जरी आहे, तथापि मूर्ख लोक विचार करीत नाहींत कीं, शिवाहून अधिक कोणी नाहीं, व शिवाच्या बरोबरीचाही कोणी नाहीं. (३०) हें जग वज्र, चक्र, कमल यां चिन्हांनीं कांहीं युक्त नाहीं. परंतु "भग" या चिन्हानें व "लिंग" या चिन्हानें युक्त झालें आहे, ( या जगाचे अधिपति इंद्र, विष्णु, ब्रह्मा हे नव्हेत शिवच अधिपति आहे, असे यांतलें तात्पर्य आहे.) हातांतल्या कांकणाला पहावयास आरसा कशास पाहिजे? अर्थात् आरशांतून पाहणारे मूर्खच होत.

अनिलाद उवाच ॥ इदं पवित्रं स्तवनं प्रणीतं व्यासेन भक्त्या परमेश्वरस्य ॥ विमोक्षणायात्मभुजद्वयस्य निश्चेष्टकाष्ठोपलसन्निभस्य॥३१
व्यासाष्टकमिदं पुण्यं यः पठेच्छिवसन्निधौ ॥ संत्यज्य विष्णुलोकादीन् शिवलोकमवाप्नुयात् ॥३२॥ एवं संस्तुवतस्तस्य महर्षेर्भावितात्मनः ॥ अचिरेणैव कालेन स्मरारिर्वरदोऽभवत् ॥३३॥ ब्रह्मणा विष्णुना देव्या स्कंदार्केन्दुमरुद्गणैः॥नंदिचण्डमहाकालवीरभद्रादिभिर्वृतः॥३४॥
ईश्वर उवाच ॥ विप्रर्षे साहसं बाल्यान्माकार्षीः पुनरीदृशम् ॥ अविचार्य च मे कृत्यं लोको याति पराभवम् ॥३५॥ उत्पत्तिस्थितिसंहारकारकोऽहं हरीश्वरः ॥ मोक्षदः सर्वजंतूनां सर्वेशः सर्वशक्तिमान् ॥३६॥ मदंगस्वेदसंभूतौ ब्रह्मनारायणाविमौ॥मद्भक्तौ मत्समीपस्थौ मद्भक्तजनवत्सलौ ॥३७॥ योऽपि त्वया सदा विष्णुः स्तूयते नियतात्मना ॥ पश्यासौ सर्वकार्याणि त्यक्त्वा मामेव सेवते ॥३८॥ अनेकमुण्डकोटीभिरियं माला शिरोगता ॥ ब्रह्मणो हि कपालानि विनष्टस्य युगे

---

(३१) अनिलाद ह्मणाला— हें पवित्र परमेश्वराचें स्तवन व्यासानें भक्तीनें केलें आहे, सर्व चेष्टा खुंटल्यामुळें नुसत्या दगडाप्रमाणें जे दोन्ही हात भासत होते त्या हातांच्या मुक्ततेकरितां व्यासानें भक्तिपूर्वक हें स्तवन केलें. (३२) शिवाजवळ बसून दर दिवशीं हें व्यासाष्टक जो ह्मणतो, तो प्राणी वैकुंठ वगैरे लोक सोडून थेट शिवलोकाला जातो. (३३) याप्रमाणें स्तोत्र केल्यामुळें व्यासाचा आत्मा पुनीत झाला, अर्थात् लौकरच श्रीशंकर प्रसन्न होऊन वर देण्याकरितां, (३४) ब्रह्मा, विष्णु, देवी, स्कंद, अर्क, इंदु, मरुद्गण, नंदि, चंड, महाकाल, वीरभद्र वगैरे मंडळीसह येऊन व्यासाला ह्मणाले—

(३५) श्रीशंकर ह्मणाले– हे विप्रश्रेष्ठा, व्यासा, अज्ञानपणानें जें हें साहस केलेंस, तसें आतां पुनः करूं नको. माझ्या कृत्याचा विचार न करितां लोक याप्रमाणें पराभव पावतात. (३६) उत्पत्ति, स्थिति, संहार यांचा कर्ता मी असून सर्व प्राण्यांना मोक्ष देणारा मीच आहें. सर्वेश मीच असून सर्व शक्तिमान मीच आहें. (३७) ब्रह्मा आणि नारायण हे दोघे माझ्या अंगाच्या घामापासून उत्पन्न झाले. ते दोघे माझे भक्त असून माझ्या भक्तांवर अतिशय प्रेम करणारे आहेत. (३८) नियतात्मा होऊन ( मन ताब्यांत ठेवून ) ज्या विष्णूची स्तुति तूं करतोस तोच तिष्णु आपलें सर्व कार्य सोडून माझी सेवा करतो पहा. (३९) या माझ्या गळ्यांत जी रुंडमाळा शोभते, यांतले कोट्यावधि मुंडकीं प्रत्येक युगांत नष्ट झालेल्या

युगे ॥३९॥ याश्चास्मूरपरा माला ग्रीवाहस्तकटिस्थिताः ॥ नारायणस्य तनवो विनष्टस्य युगे युगे ॥४०॥ अव्यक्तान्मम लिंगात्तु ब्रह्मविष्णुपुरःसरम् ॥ चराचरमिदं सर्वं जगज्जातं न संशयः ॥४१॥ अपरं मम माहात्म्यं ब्रह्मपुत्रोऽतिविस्तरात् ॥ पृथक् सनत्कुमारस्ते कथयिष्यति मत्परः ॥४२॥ भुजौ ते नंदिना त्यक्तौ मद्वाक्यान्मत्परायण ॥ वरं ददामि ते श्रेष्ठं सर्वान्कामानवाप्स्यासि ॥४३॥

अनिलाद उवाच ॥ एवमुक्त्वा महादेवः सगणोऽतरधीयत ॥ व्यासो व्यासेश्वरं स्थाप्य तत्रैवाराधयन् स्थितः ॥४४॥ एतस्मात्कारणाद्वत्स नास्त्यन्योऽभ्यधिकः शिवात् ॥ सत्यं सत्यं पुनः सत्यं न देवः शंकरात्परः ॥४५॥ तस्मात्त्वं शरणं गच्छ यदीच्छसि परं पदम्॥ नान्ये मुक्तिप्रदा देवाः कल्पकोटिशतैरपि ॥४६॥ फलं येऽन्ये प्रयच्छंति भक्तानां त्रिदशाः क्वचित् ॥ तेऽप्याराध्य महादेवं तृणबिंदोऽन्यथा न हि ॥४७॥ उमाकांतस्य देवस्य गणैर्युक्तस्य कोटिशः ॥ ममर्द चरणौ ब्रह्मा

---

ब्रह्मदेवांचींच आहेत. (४०) गळ्यांत, कमरेंत, हातांत ज्या इतर माळा दिसतात, त्यांतलीं डोकीं युगायुगांत नष्ट झालेल्या नारायणांचीं आहेत. (४१) अव्यक्त अशा माझ्या लिंगापासून ब्रह्मा विष्णु वगैरे हें चराचर जग उत्पन्न झालें, यांत संशय नाहीं. (४२) दुसरें माझें माहात्म्य अतिशय विस्तारानें ब्रह्मदेवाचा मुलगा सनत्कुमार मत्पर होऊन पुढें निराळें वर्णन करील. (४३) माझ्या वाक्यानें (आज्ञेनें) नंदी तुझें हात सोडील, माझ्या ठिकाणीं आसक्ति ठेवलीस ह्मणून तुला श्रेष्ठ वर देतों. त्या योगानें तुझे मनोरथ पूर्ण होतील.

(४४) अनिलाद ह्मणाला— असें बोलून तो महादेव तेथेंच गणसहित अंतर्धान पावला. नंतर तो व्यास व्यासेश्वर नांवाच्या लिंगाची स्थापना करून त्याची आराधना करीत तेथेंच राहिला. (४५) ह्मणून सांगतों कीं, हे वत्सा, शिवाशिवाय मोठा देव दुसरा नाहीं. शंकराशिवाय श्रेष्ठ देव जगांत नाहीं, नाहीं, नाहीं, असें त्रिवार खरें खरें सांगतों. (४६) याकरितां तूं जर उत्तम पदाची इच्छा करीत असशील तर त्याच देवाला शरण जा. कोट्यावधि कल्पें जरी गेलीं तरी इतर देव कधींही मुक्त करणार नाहींत. (४७) इतर देव आपल्या भक्तांना जें कांहीं फल देतात, तें फल महादेवाची आराधना करून त्या पुण्याच्या जोरानें देत असतात. हे तृणबिंदो, त्याशिवाय स्वतंत्रपणें फल देण्यास त्यांना सामर्थ्य नाहीं (४८) कोट्यावधि गणांनीं युक्त होऊन बसलेल्या श्रीशंकराचे पाय ब्रह्मा हा चेपतो व वि-

पाणी विष्णुः समाहितः ॥४८॥ छत्रं शंभोर्दधारेंद्रो वायुर्मार्गं व्यशोधयत् ॥ अन्याश्च देवताः सर्वा जयशब्दं तथाऽब्रुवन् ॥४९॥ ब्रह्मविष्ण्वादयो देवा ये केचित्स्थाणुजंगमाः ॥ उमाधवस्य ते सर्वे बालक्रीडनका इव ॥५०॥ नास्त्येवातो महेशानात्कश्चित्तुल्योऽधिकोऽपि वा ॥ कोटिकोट्यायुषा कोटिकोटिजिव्हेन सर्वदा ॥५१॥ केनापि शक्यं नो वक्तुं शंभोर्माहात्म्यमप्यणु ॥ एष ते ज्ञानसद्भावो यथोक्तो लेशतो द्विज ॥५२॥ रहस्यो गोपनीयश्च वाच्यो भक्ताय केवलम् ॥ य इदं पठते ध्यायन् पाठयेद्वा शुचिस्तथा ॥ सर्वकामैस्तु संतृप्तः सोऽन्ते निर्वाणमाप्नुयात् ॥५३॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने व्यासभुजस्तंभनतद्विमोचनं नाम षट्त्रिंशोऽध्यायः ॥

---

ष्णु त्याचे हात चेपतो. (४९)श्रीशंकरावर श्वेतच्छत्र इंद्र धरीत असतो, वायु श्रीशंकराच्या राजधानींतले रस्ते झाडीत असतो. इतर देव त्याचे जयजयकार करीत असतात. (५०) ब्रह्मा विष्णु वगैरे देव व दुसरें सर्व स्थावरजंगम, हीं सर्व श्रीशंकराची बाळपणचीं खेळणीं असल्याप्रमाणें आहेत. (५१) त्या शंकरापेक्षां श्रेष्ठ किंवा त्याच्याबरोबरीचा जगांत कोणी नाहीं. कोटि कोटि आयुष्याच्या प्राण्यानें कोटि कोटि जिभांनीं सर्वदा (५२) श्रीशंभूच्या गुणांचें वर्णन केलें तरी पुरें होत नाहीं, फार काय ! त्या गुणांचा लेश सांगेन ह्मटलें तरी कोणाच्याा हातूनही वर्णन करवणार नाहीं. हे ब्राह्मणा, ज्ञानसद्भाव हा थोडक्यांत मीं तुला सांगितला. (५३) हें परम रहस्य आहे जपून ठेव. शिवभक्तांशिवाय इतरांस सांगूं नको. जो शुद्धपणें याचें पठन करील, ध्यान करील, तो पूर्णकाम होऊन शेवटीं मोक्षाला जाईल.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील व्यासभुजद्वयस्तंभविमोचन नांवाचा छत्तिसावा अध्याय संपला.

## ॥ अथ सप्तत्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ आदित्यपुराणे मनुरुवाच ॥ किं तच्छ्रेयस्करं तत्वं वेदान्तेषु प्रतिष्ठितम् ॥ कस्माद्विश्वमिदं जातं कस्मिन्वा लयमेष्यति ॥१॥ कस्य ब्रह्मादयो देवा वशे तिष्ठंति सर्वदा ॥ तदेकमथवानेकमुभयं वा वद प्रभो ॥२॥

भानुरुवाच ॥ शृणु पुत्र प्रवक्ष्यामि तत्वं यत्र प्रतिष्ठितम् ॥ तत्तत्वं यद्भगवतो रूपमीशस्य शूलिनः ॥३॥ विश्वं तेनाखिलं व्याप्तं नान्येनेत्यब्रवीच्छ्रुतिः ॥ न तस्य कर्म कार्यं वा बंधमुक्ती महेशितुः ॥४॥ आनंदरूपया गौर्या क्रीडति स्म महेश्वरः ॥ तया सह जगत्सर्वं सृजत्यवति हंति च ॥५॥ तस्याज्ञयाऽखिलं विश्वं वर्तते च नियंत्रितम् ॥ आदिसर्गे महादेवो ब्रह्माणमसृजत्प्रभुः ॥६॥ दक्षिणांगाद्विरूपाक्षः सृष्ट्यर्थं लीलया हरः ॥ तस्मै वेदान्पुराणानि दत्तवानग्रजन्मने ॥७॥ वासुदेवं जगद्योनिं सत्वोद्रिक्तं सनातनम् ॥ असृजत्पालनार्थं तं वामभागा-

---

श्रीशिवास नमन असो. आदित्यपुराणांत अशी कथा आहे. (१) मनु ह्मणाला वेदांतामध्यें कोणत्या तत्वाचें विवेचन केलें आहे? व कोणतें तत्व श्रेष्ठ आहे, असें वर्णन केलें आहे? (२) ब्रह्मादिदेव कोणाच्या ताब्यांत आहेत? तें तत्व एकच आहे? किंवा अनेक आहे? किंवा दोन प्रकारचें आहे? हें मला सांग.

(३) सूर्य ह्मणाला—हे पुत्रा, तें तत्व कोठें प्रतिष्ठित झालें आहे? व कोणतें तत्व श्रेष्ठ आहे, हें सर्व सांगतों, ऐक भगवान शूलधारी ईशाचें तत्व (शिवतत्व) एकच असून तेंच तत्व श्रेष्ठ आहे. (४) त्या तत्वानेंच हें सर्व जग व्यापिलेलें आहे. दुसरें कोणतेंही व्यापक तत्व नाहीं, असें श्रुति सांगत्ये. त्याला कर्म नाहीं, कार्य नाहीं, व त्या शिवाला बंध नाहीं, व मुक्ति नाहीं. (५) आनंदस्वरूपी गौरीसहित श्रीशंकर यथेच्छ क्रीडा करतात. तिला बरोबर घेऊन श्रीशिव जगाची सृष्टि, नाश, पालन वगैरे कर्में करतात. (६) त्या शिवाच्या आज्ञेनेंच हें सर्व जग चालतें, व त्याच्या आज्ञेनें हें जग बांधलें गेलें आहे. पहिल्या सृष्टीच्या वेळेस महादेवानें ब्रह्मदेवाची सृष्टि केली. (७) श्रीविरूपाक्षहरानें सृष्टि करावयाकरितां आपल्या उजव्या अंगापासून लीलेनें ब्रह्मदेवाला उत्पन्न केलें. नंतर त्याला चार वेद सर्व पुराणें दिलीं. (८) ज्या विष्णूंत सत्वगुण अधिक आहे, व जगाच्या उत्पत्तीला जो मूलकारण आहे, अशा सनातन श्रीविष्णूला महेश्वरानें ज-

न्महेश्वरः ॥८॥ विश्वं तस्माद्धि संजातं तस्मिंस्तिष्ठति शंकरे ॥ लयमेष्यति तत्रैव त्रयमेतत्स्वलीलया ॥९॥ अहं ब्रह्मा च विष्णुश्च शक्रश्चान्ये दिवौकसः ॥ अद्याप्युपायैर्विविधैस्तस्य दर्शनकांक्षिणः ॥१०॥ यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ॥ भर्गाद्विश्वस्य भरणाद्विश्वयोनेरुमापतेः ॥११॥ ब्रह्मविष्ण्वादयो देवा मुनयो मनवस्तथा ॥ सर्वे क्रीडनकास्तस्य देवदेवस्य शूलिनः ॥१२॥ तस्य भासैव सकलं भाति नान्येन किंचन ॥ तस्मिन्प्रकाशमाने हि नैव भांत्यनलादयः ॥१३॥ स एवैको न चानेको न द्विरूपः कदाचन ॥ न तस्मादधिकः कश्चिन्नाणीयानपि कश्चन ॥१४॥ न पश्यामि महादेवादधिकं देवतान्तरम् ॥ वेदा अपि तमेवार्थमाहुः स्वायंभुवेऽन्तरे ॥१५॥

वेदा ऊचुः ॥ ब्रह्मविष्ण्वेंद्रचंद्राद्या यस्य देवस्य किंकराः ॥ यस्य प्रसादाज्जीवंति स देवः पार्वतीपतिः ॥१६॥ न जानंति परं भावं यस्य

---

गाचें पालन करावयासाठीं आपल्या डाव्या अंगापासून उत्पन्न केलें. (९) हें जग त्या शंकरापासून झालें, व त्या शंकराच्या शरीरांतच शेवटीं हें लीन होतें. पालनही त्याच्याच हातून होतें. हीं तीनही कामें श्रीशिवच करीत असतो. (१०) मी ब्रह्मदेव, विष्णु, इंद्र, व इतर देव हे आह्मी सर्व अजूनही त्याचें दर्शन घ्यावें ह्मणून अनेक उपाय करितों. (११) जो जगाचें रक्षण करितो, व ज्याच्यापासून हें जग उत्पन्न होतें, त्या भर्ग उमापतीपर्यंत मन नांवाच्या इंद्रियास वेदवाणी धांवत जाऊन त्याचा शोध न लागल्यामुळें परत फिरते. (१२) ब्रह्मा, विष्णु वगैरे देव, मुनि, मनु हे सर्व प्राणी देवाधिदेव शिवाचीं खेळणीं आहेत (१३) त्या शिवाच्या प्रकाशानें जगांत उजेड पडतो, त्याच्याशिवाय दुसऱ्याचा प्रकाश पडत नाहीं तो शिव प्रकाशित असतांना अग्नि वगैरे देव त्यापुढें फिक्के पडतात. (१४) तो शिव एकच असून अनेक नाहीं. त्याचें रूप एकच आहे; त्याचीं अनेक रूपें नाहींत. त्याच्यापेक्षां मोठा जगांत कोणी नसून त्याच्यापेक्षां अणु पदार्थही जगांत दुसरा कोणता नाहीं. (१५) शिवाशिवाय दुसरा कोणीही श्रेष्ठदेव मला दिसून येत नाहीं. स्वायंभुव मनूचे वेळेस वेदांनीं त्या शिवाची अशी स्तुति केली कीं,—

(१६) वेद ह्मणाले—ब्रह्मा, विष्णु वगैरे देव ज्याचे दास आहेत, व ज्याच्या प्रसादामुळें हें सर्व जग जगलें आहे, तो देव साक्षात शिवच होय. (१७) ब्रह्मादिदेव ज्याचें तत्व जाणत नाहींत, व आह्मांस जें तत्व आजपर्यंत समजलें नाहीं,

ब्रह्मादयः सुराः ॥ अद्यापि न वयं विद्मः स देवस्त्रिपुरांतकः ॥१७॥ विश्वतश्चक्षुरीशोऽथ त्रिशूली विश्वतोमुखः ॥ जनकः सर्व भूतानामेक एव महेश्वरः ॥१८॥ न यथा कूर्मरोमाणि शृंगं न नरमस्तके ॥ न यथास्ति वियत्पुष्पं न तथास्ति हरात्परः ॥ शृण्वन्तु देवताः सर्वाः सत्यमस्मत्परं वचः ॥१९॥ नास्ति रुद्रान्महादेवादधिकं देवतांतरम् ॥ इति तेषां वचः श्रुत्वा भगवान्गिरिजापतिः ॥२०॥ प्रत्यक्षः समभूत्तेषां वेदानां मनुजाधिप ॥ सूर्यकोटिप्रतीकाशः सहस्राक्षः सहस्रपात् ॥२१॥ सहस्रशीर्षाः पुरुषः सूर्यसोमाग्निलोचनः ॥ स्थूलात्स्थूलतरः स्थाणुः सूक्ष्मात्सूक्ष्मतरः परः ॥२२॥ वेदानुवाच भगवान्देवदेवो महेश्वरः ॥ मत्प्रसादाद्भविष्यध्वं हे वेदा लोकपूजिताः ॥२३॥

भानुरुवाच ॥ एवं दत्वा वरं देवो वेदेभ्यो गिरिजापतिः ॥ पश्यतामेव वेदानां क्षणादन्तर्हितोऽभवत् ॥२४॥ तमेकं परमात्मानमादिकर्ता-

---

असा तो देव त्रिपुराला मारणारा शंकरच होय. (१८) त्या ईशाला डोळे चोहोंकडे आहेत, व त्या त्रिशूलधारी शंकराला मुखें चोहोंकडे आहेत, व सर्व प्राण्यांचा उत्पत्तिकर्ता एकटा शंकरच आहे. (१९) ज्याप्रमाणें कांसवाच्या शरीरावर रोमांच असत नाहींत, मानवाच्या डोक्यावर शिंगें असत नाहींत, आकाशाला फुलें येत नाहींत, त्याप्रमाणें शिवापेक्षां श्रेष्ठ देव दुसरा नाहीं. देवहो, सर्व तुह्मी आमचें सत्य वाक्य ऐका, ऐका. (२०) महादेव अशा रुद्रावांचून दुसरी श्रेष्ठ देवता नाहीं. याप्रमाणें भगवान पार्वतीपतीनें वेदांचें वाक्य ऐकिलें. (२१) हे मानवश्रेष्ठा, त्या वेदांना तो शिव प्रत्यक्ष झाला. त्यावेळेस तो शिव कोटिसूर्यांप्रमाणें प्रज्वलित दिसत असून, त्याचे अंगावर हजारो डोळे दिसत होते, व त्याला हजारो पाय आहेत, असें वाटलें; (२२) व त्याला हजारों डोकीं आहेत असें वाटत असून सूर्य, सोम ( चंद्र ), अग्नि हे तिघे त्याचे डोळे झाले होते. असा तो शिव स्थूल पदार्थांपेक्षां स्थूल असून सूक्ष्मांपेक्षां सूक्ष्म होता (२३) तेव्हां तो भगवान देवाधिदेव महेश्वर वेदांना बोलला कीं, वेदहो, तुह्मी माझ्या प्रसादानें जगामध्यें पूज्य व्हा.

(२४) सूर्य ह्मणाला—या प्रमाणें वेदांना वर देऊन सर्व वेद पाहत असतां एका क्षणांत तो महादेव गुप्त झाला. (२५) हे राजा असा तो परमात्मा आदिकर्ता असून सर्वांचा प्रभु आहे. त्या परमात्म्याची ( शिवाची ) भक्ति करून जो

रमीश्वरम् ॥ भक्त्या परमया राजन् ज्ञात्वा पाशैर्विमुच्यते ॥२५॥ विश्वेश्वरमुमाकान्तं विश्वान्तर्यामिणं विभुम् ॥ न ब्रह्माद्यैः समं ब्रूयाच्छक्तिभिर्नैव पार्वतीम्॥२६॥ ब्रूयाद्यदि समं शंभुं ब्रह्मविष्ण्वादिभिः सुरैः॥ यः कश्चित्तमसाविष्टः कदाचिन्नैव तं स्पृशेत् ॥२७॥ सर्वस्मादधिकं ब्रूयाद्भगवन्तमुमापतिम् ॥ भक्त्यैवानन्यया राजन् ज्ञायते भगवांश्छिवः॥२८॥ न दानैर्न तपोभिर्वा नाश्वमेधादिभिर्मखैः॥ तमेव शरणं गच्छ सर्वभावेन शंकरम्॥ भक्तिमास्थाय परमां परं निर्वाणमाप्नुहि ॥२९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने वेदानां वरप्रदानं नाम सप्तत्रिंशोऽध्यायः

---

ज्ञान करून घेतो (शिवाला जाणतो), तो सर्व पाशांतून मुक्त होतो. (२६) जो जगाचा प्रभु असून जगांत सर्वांतर्यामी होऊन राहतो, अशा पार्वतीपति प्रभूशीं ब्रह्मादिदेवांची बरोबरी करूं नये, व इतर शक्तींशीं पार्वतीची तुलना करूं नये. (२७) जो कोणी अज्ञानानें मोहित होऊन ब्रम्हा विष्णु, इंद्र वगैरे देवांना त्या श्रेष्ठ शिवाच्या बरोबरीचे समजतो, त्याचा स्पर्श देखील आपण करूं नये. (२८) सर्वांपेक्षां भगवान शिव मोठा आहे, असें ह्मणावें. त्या शिवावर अनन्य भक्ति केली तरच शिवतत्व कळतें. (२९) दानांनीं, तपांनीं, अश्वमेधादि यज्ञांनीं शिवतत्वाचें ज्ञान होत नाहीं. याकरितां सर्व भावानें शंकराला तूं शरण जा. त्याच्यावर चांगली भक्ति ठेवून श्रेष्ठ मोक्षपदाला जा. (पावशील).

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील वेदवरप्रदाननांवाचा सदतिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथाष्टात्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कांदे ॥ सूतसंहितायाम् ॥ यज्ञवैभवखण्डे ॥
ऋषय ऊचुः ॥ भवता सर्वमाख्यातं संक्षेपाद्विस्तरादपि ॥ इदानीं श्रो-
तुमिच्छामो ब्रह्मगीतामनुत्तमाम् ॥ यदि प्रसन्नो भगवन्स नो वक्तुमि-
हार्हसि॥१॥

सूत उवाच ॥ वक्ष्ये तामादरेणैव ब्रह्मगीतामनुत्तमाम् ॥ श्रद्धया
सहिता यूयं शृणुत ब्रह्मवित्तमाः ॥२॥ पुरा कल्पान्तरे देवाः सर्वे
संभूय सादरम् ॥ विचार्य सुचिरं कालं वेदानामर्थमुत्तमम् ॥३॥
संशयाविष्टचित्तास्तु तपस्तप्त्वा महत्तरम् ॥ अभिजग्मुर्विधातारं प्रष्टुं
देवा मुनीश्वराः ॥४॥ यत्रास्ते जगतां नाथः सर्वज्ञः सर्वकृत्प्रभुः ॥ म-
हाकारुणिकः श्रीमान् ब्रह्मा भक्तप्रिये रतः ॥५॥ तत्र देवा द्विजा गत्वा
ददृशुर्लोकनायकम् ॥ पृष्टवन्तस्तु सर्वेषां वेदानामर्थमादरात् ॥६॥ ब्र-
ह्मापि ब्रह्मविन्मुख्यः सर्वदेवैरभिष्टुतः ॥ प्राह गंभीरया वाचा वेदाना-
मर्थमुत्तमम् ॥७॥

---

श्रीशिवास नमन असो स्कंदपुराणांतील सूतसंहितेच्या यज्ञवैभव खंडांत सां-
गितलें आहे. (१) ऋषि ह्मणाले—संक्षेपानें व विस्तारानें जें जें सांगितलें, तें तें
सर्व ऐकिलें. तर आतां श्रेष्ठ ब्रह्मगीता ऐकण्याची इच्छा करतों. हे भगवन् आ-
पण जर प्रसन्न आहां तर आह्मांस सांगा.

(२) सूत ह्मणाले—ब्रह्मवेत्ते श्रेष्ठ लोकहो, ती श्रेष्ठ ब्रह्मगीता आदरानें सांगतों,
परंतु श्रद्धा ठेवून तुह्मी ऐका. (३) पूर्वी कल्पांतराच्या वेळेस सर्व देव एकत्र
जमून सर्वांनीं आदरपूर्वक उत्तम वेदार्थांचा विचार पुष्कळ कालपर्यंत केला.
(४) तरी सर्वांच्या मनांतला संशय कांहीं दूर झाला नाहीं. ह्मणून त्यांनीं दुर्धर
तप केलें. नंतर सर्व देव मोठ मोठे मुनि ब्रह्मदेवाला प्रश्न करावयास गेले. (५)
सर्व जगाचा प्रभु, सर्वज्ञ, सर्वकर्ता, प्रभु, मोठा करुणाशील, श्रीमान, भक्तप्रिय,
असा ब्रह्मदेव जेथें होता, तेथें ते सर्व गेले. (६) त्याठिकाणीं देव व ब्राह्मण जा-
ऊन लोकनायक ब्रह्माला पाहून, आदरपूर्वक त्यांनीं सर्व वेदार्थांचा प्रश्न केला.
(७) सर्व देवांनीं त्याची स्तुति केली, असा तो ब्रह्मवेत्ता ब्रह्मदेव उत्तम वेदार्थ
गंभीर वाणीनें सांगूं लागला.

रमीश्वरम् ॥ भक्त्या परमया राजन् ज्ञात्वा पाशैर्विमुच्यते ॥२५॥ विश्वेश्वरमुमाकान्तं विश्वान्तर्यामिणं विभुम् ॥ न ब्रह्माद्यैः समं ब्रूयाच्छक्तिभिर्नैव पार्वतीम्॥२६॥ ब्रूयाद्यदि समं शंभुं ब्रह्मविष्ण्वादिभिः सुरैः॥ यः कश्चित्तमसाविष्टः कदाचिन्नैव तं स्पृशेत् ॥२७॥ सर्वस्मादधिकं ब्रूयाद्भगवन्तमुमापतिम् ॥ भक्त्यैवानन्यया राजन् ज्ञायते भगवांश्छिवः॥२८॥ न दानैर्न तपोभिर्वा नाश्वमेधादिभिर्मखैः॥ तमेव शरणं गच्छ सर्वभावेन शंकरम्॥ भक्तिमास्थाय परमां परं निर्वाणमाप्नुहि ॥२९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने वेदानां वरप्रदानं नाम सप्तत्रिंशोऽध्यायः

---

ज्ञान करून घेतो (शिवाला जाणतो), तो सर्व पाशांतून मुक्त होतो. (२६) जो जगाचा प्रभु असून जगांत सर्वांतर्यामी होऊन राहतो, अशा पार्वतीपति प्रभूशीं ब्रह्मादिदेवांची बरोबरी करूं नये, व इतर शक्तींशीं पार्वतीची तुलना करूं नये. (२७) जो कोणी अज्ञानानें मोहित होऊन ब्रम्हा विष्णु, इंद्र वगैरे देवांना त्या श्रेष्ठ शिवाच्या बरोबरीचे समजतो, त्याचा स्पर्श देखील आपण करूं नये. (२८) सर्वांपेक्षां भगवान शिव मोठा आहे, असें ह्मणावें. त्या शिवावर अनन्य भक्ति केली तरच शिवतत्व कळतें. (२९) दानांनीं, तपांनीं, अश्वमेधादि यज्ञांनीं शिवतत्वाचें ज्ञान होत नाहीं. याकरितां सर्व भावानें शंकराला तूं शरण जा. त्याच्यावर चांगली भक्ति ठेवून श्रेष्ठ मोक्षपदाला जा. (पावशील).

यात्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील वेदवरप्रदाननांवाचा सदतिसावा अध्याय संपला.

## ॥ अथाष्टात्रिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कांदे ॥ सूतसंहितायाम् ॥ यज्ञवैभवखण्डे ॥ ऋषय ऊचुः ॥ भवता सर्वमाख्यातं संक्षेपाद्विस्तरादपि ॥ इदानीं श्रोतुमिच्छामो ब्रह्मगीतामनुत्तमाम् ॥ यदि प्रसन्नो भगवन्स नो वक्तुमिहार्हसि॥१॥

सूत उवाच ॥ वक्ष्ये तामादरेणैव ब्रह्मगीतामनुत्तमाम् ॥ श्रद्धया सहिता यूयं शृणुत ब्रह्मवित्तमाः ॥२॥ पुरा कल्पान्तरे देवाः सर्वे संभूय सादरम् ॥ विचार्य सुचिरं कालं वेदानामर्थमुत्तमम् ॥३॥ संशयाविष्टचित्तास्तु तपस्तप्त्वा महत्तरम् ॥ अभिजग्मुर्विधातारं प्रष्टुं देवा मुनीश्वराः ॥४॥ यत्रास्ते जगतां नाथः सर्वज्ञः सर्वकृत्प्रभुः ॥ महाकारुणिकः श्रीमान् ब्रह्मा भक्तप्रिये रतः ॥५॥ तत्र देवा द्विजा गत्वा ददृशुर्लोकनायकम् ॥ पृष्टवन्तस्तु सर्वेषां वेदानामर्थमादरात् ॥६॥ ब्रह्मापि ब्रह्मविन्मुख्यः सर्वदेवैरभिष्टुतः ॥ प्राह गंभीरया वाचा वेदानामर्थमुत्तमम् ॥७॥

---

श्रीशिवास नमन असो स्कंदपुराणांतील सूतसंहितेच्या यज्ञवैभव खंडांत सांगितलें आहे. (१) ऋषि ह्मणाले---संक्षेपानें व विस्तारानें जें जें सांगितलें, तें तें सर्व ऐकिलें. तर आतां श्रेष्ठ ब्रह्मगीता ऐकण्याची इच्छा करतों. हे भगवन् आपण जर प्रसन्न आहां तर आह्मांस सांगा.

(२) सूत ह्मणाले---ब्रह्मवेत्ते श्रेष्ठ लोकहो, ती श्रेष्ठ ब्रह्मगीता आदरानें सांगतों, परंतु श्रद्धा ठेवून तुह्मी ऐका. (३) पूर्वी कल्पांतराच्या वेळेस सर्व देव एकत्र जमून सर्वांनीं आदरपूर्वक उत्तम वेदार्थाचा विचार पुष्कळ कालपर्यंत केला. (४) तरी सर्वांच्या मनांतला संशय कांहीं दूर झाला नाहीं. ह्मणून त्यांनीं दुर्धर तप केलें. नंतर सर्व देव मोठ मोठे मुनि ब्रह्मदेवाला प्रश्न करावयास गेले. (५) सर्व जगाचा प्रभु, सर्वज्ञ, सर्वकर्ता, प्रभु, मोठा करुणाशील, श्रीमान, भक्तप्रिय, असा ब्रह्मदेव जेथें होता, तेथें ते सर्व गेले. (६) त्याठिकाणीं देव व ब्राह्मण जाऊन लोकनायक ब्रह्माला पाहून, आदरपूर्वक त्यांनीं सर्व वेदार्थांचा प्रश्न केला. (७) सर्व देवांनीं ज्याची स्तुति केली, असा तो ब्रह्मवेत्ता ब्रह्मदेव उत्तम वेदार्थ गंभीर वाणीनें सांगूं लागला.

ब्रह्मोवाच॥ अवाच्य एव वेदार्थः सर्वदा सर्वचेतनैः ॥ तथाऽपि वक्ष्ये भक्तानां युष्माकं श्रुणुतादरात् ॥८॥ अस्ति देवः स्वतः सिद्धः साक्षी सर्वस्य सर्वदा ॥ संसारार्णवमग्नानां साक्षात्संसारमोचकः ॥९॥ नीलकण्ठो विरूपाक्षः सांबः साक्षाद्घृणानिधिः ॥ आनंदरूपः संपूर्णो न ततोऽन्यत्तु किंचन ॥१०॥ अग्रे सर्वमिदं देवा आसीत्तन्मात्र आस्तिकाः ॥ सोऽवैक्षत जगत्सर्वमुत्सृजामीति शंकरः ॥११॥ यथा पूर्वं क्रमेणैव सुरानसृजत प्रभुः ॥ स्वतंत्रः शिव एवायं स हि संसारमोचकः ॥१२॥ देवदेवस्य रुद्रस्य स्वरूपं तस्य वैभवम् ॥ को वा जानाति नास्त्येव स्वयं जानाति वा न वा ॥१३॥ दुर्विज्ञेयो महादेवो महतामपि देहिनाम् ॥ प्रसादेन विना देवाः सत्यमेवोदितं मया ॥१४॥ प्रसादेन विना विष्णुर्न जानाति महेश्वरम् ॥ तथाऽहं च न जानामि देवताः सकला अपि ॥१५॥ प्रसादेन विना देवं ये जानंति सुरर्षभाः ॥ ते जानंति विना घ्राणं गंधं हस्तेन केवलम् ॥१६॥ प्रसादे सति विज्ञातुं श-

---

(८) ब्रह्मा ह्मणाला—कोणत्याही प्राण्याला वेदार्थ सांगणें फार कठिण आहे. तथापि भक्त अशा तुह्मांस सांगतों, आदरानें ऐका. (९) नेहमीं सर्व जगाला साक्षी होऊन राहिलेला तो देव स्वतःसिद्ध असून संसारसमुद्रांत बुडालेल्या लोकांना संसारांतून उद्धार करतो. (१०) नीलकंठ विरूपाक्ष सांब कृपानिधि असा तो शिव पूर्ण आनंदस्वरूपी आहे, त्याच्या पेक्षां दुसरा कोण श्रेष्ठ आहे? कोणीही नाहीं. (११) आधीं हें जग आपापल्या मात्रां सहित शिवाच्या ठिकाणीं लीन झालें होतें, व सर्व देव व इतर सर्व पदार्थ त्याच्या ठिकाणीं लीन झाले होते. नंतर हें सर्व मी सोडतों, असें ह्मणून जगाकडे शिवानें पाहिलें. (१२) नंतर प्रभूनें क्रमानें पूर्ववत् देवांची सृष्टि केली. असा तो शिव स्वतंत्र असून संसाराला सोडवितो. (१३) देवाधिदेव रुद्राचें स्वरूप व त्याचें वैभव जगांत कोण जाणतो? कोणीही जाणत नाहीं. तो स्वतः तरी आपलें रूप जाणतो, किंवा नाहीं, हें समजत नाहीं. (१४) मोठमोठ्या प्राण्यांना देखील शिवतत्व समजत नाहीं. हे देवहो, त्याच्या प्रसादांवाचून तें तत्व समजत नाहीं. हें खरें खरें सांगतों. (१५) प्रसादावांचून विष्णु महेश्वराला जाणत नाहीं. तसेंच मी व इतर देव त्याच्या प्रसादांशिवाय जाणूं शकत नाहींत. (१६) देवहो, प्रसादाशिवाय महादेवाला जाणतों असें ह्मणणारे नाकावांचून हातानें गंध जाणतों, असें ह्मणणाऱ्यांपैकीं आहेत. (१७) प्रसाद मिळाल्या नंतर मात्र महेश्वराला जाणतात. रुद्राच्या व पार्व-

क्यते परमेश्वरः ॥ प्रसादादेव रुद्रस्य शिवायाश्च तथैव च ॥१७॥ प-
रमाद्वैतविज्ञानं विष्णोः साक्षान्ममापि च ॥ यक्षराक्षसगंधर्वसिद्धा-
दीनामपीश्वराः ॥१८॥ परमाद्वैतविज्ञानं प्रसादादेव शूलिनः ॥ मनु-
ष्याणां च सर्वेषां पश्वादीनां तथैव च ॥१९॥ परमाद्वैतविज्ञानं प्रसा-
दादेव शूलिनः ॥ प्रसादे सति कीटो वा पतंगो वा नरोऽथवा ॥२०॥
देवो वा दानवो वाऽपि लभते ज्ञानमुत्तमम् ॥ एवंरूपः प्रसादस्तु शि-
वायाश्च शिवस्य च ॥२१॥ ज्ञायते न मया नान्यैर्नैव नारायणेन च ॥
तस्मान्मुमुक्षुर्मां विष्णुमपि त्यक्त्वा महेश्वरम् ॥२२॥ आश्रयेत्सर्वभा-
वेन प्रसादं कुरुते हि सः ॥ आदाने च तथा दाने न स्वतंत्रो महाहरिः
॥२३॥ तथैवाहं सुरश्रेष्ठाः सत्यमेव मयोदितम् ॥ विष्णुना चापरेणापि
महादेवं घृणानिधिम् ॥ विना जंतुं समुद्धर्तुं शक्यते न हि सत्त-
माः ॥२४॥ वृत्तम् ॥ हरिरहमपराः सुरासुराद्याः परमशिवप्रभया तिर-
स्कृताश्च ॥ रविकिरणैरखिलानि भांति यद्वत्परमशिवस्तत एव बोध-
कारी ॥२५॥ परमशिवसमुद्रेऽहं हरिः सर्वदेवा मनुजपशुमृगाद्याः
शीकरा एव सर्वे ॥ विमलमतिभिरेवं वेदवेदांतनिष्ठैर्हृदयकुहरनिष्ठो

---

तीच्या प्रसादानेंच (१८) साक्षात् विष्णूला व मला देखील श्रेष्ठ अद्वैत ज्ञान झालें. यक्ष, राक्षस, गंधर्व, सिद्ध वगैरे लोकांना देखील (१९) श्रेष्ठ अद्वैत ज्ञान शिवाच्या प्रसादानेंच झालें आहे. सर्व मानवांना, पशु वगैरे प्राण्यांना (२०) परम अद्वैत ज्ञान शिवाच्या प्रसादानें झालें. प्रसाद झाला असतां किडा, पतंग, मनुष्य, (२१) देव, दानव या सर्वांना उत्तम ज्ञान होतें. शिवपार्वतीचा प्रसाद एकूण अशा तऱ्हेचा आहे. (२२) मी व नारायण व दुसरे लोक कोणीही शिवाला जाणूं शकत नाहींत. याकरितां मुमुक्षूनें मला व विष्णूला सोडून (२३) सर्व भावानें शिवाचा आश्रय करावा. ह्मणजे शिव त्याच्यावर प्रसाद करितो. आदानांत (संग्रहांत) व दान करण्यांत हरि हा स्वतंत्र नाहीं. (२४) सुरश्रेष्ठहो, मीही स्वतंत्र नाहीं. हें मी खरें सांगतों. कृपानिधि महादेवाशिवाय विष्णूच्या व दुसऱ्याच्या हातून प्राण्याचा उद्धार होत नाहीं. (२५) हरि, मी इतर सुरासुर परशिवाच्या तेजापुढें तुच्छ आहोंत. सूर्याच्या किरणांपुढें इतर तेजस्वी पदार्थांचा प्रकाश पडेल काय? अर्थात परशिवच चांगला बोध करणारा आहे असें सिद्ध झालें. (२६) परशिवरूपी समुद्रांत मी, विष्णु, सर्व देव, मानव, पशु, मृग वगैरे थेंबाप्रमाणें राहिलों आहोंत. वेदवेदांतामध्यें जे पारंगत असून जे निर्मळ बुद्धीचे असतील;

वेदितुं शक्यते हि ॥२६॥ मायावलेनैव हरिं शिवेन समानमाहुः पुरुषाधमाश्च ॥ मोहेन केचिन्मम साम्यमाहुर्माया तु शैवी खलु दुस्तरेयम् ॥२७॥ खद्योतो यदि चण्डभानुसदृशस्तुल्यो हरिः शंभुना किं काष्ठं हरिचंदनेन सदृशं तुल्योऽहमीशेन च ॥ अज्ञानं यदि वेदनेन सदृशं देवैश्च तुल्या जनाः किं वक्ष्ये सुरपुंगवा अहमहो मोहस्य दुश्चेष्टितम् ॥२८॥ विष्णुभक्त्या च मद्भक्त्या नास्ति नास्ति परा गतिः ॥ शंभुभक्त्यैव सर्वेषां सत्यमेव मयोदितम् ॥२९॥ शिव एवास्ति नैवान्यदिति यो निश्चयः स्थिरः ॥ सदा स एव सिद्धान्तः पूर्वपक्षास्तथापरे ॥३०॥ अतः सर्वं परित्यज्य शिवादन्यत्तु दैवतम् ॥ तमेव शरणं गच्छेत्सद्यो मुक्तिं यदीच्छति ॥३१॥ अयमेव हि वेदार्थो नापरः परमास्तिकाः ॥ गृण्हामि परशुं तप्तं सत्यमेव न संशयः ॥३२॥ अयमेव हि वेदार्थो नापरः परमास्तिकाः ॥ अन्यथा चेत्सुराः सत्यं मूर्धा मेऽत्र पतिष्यति ॥३३॥ अयमेव हि सत्यार्थो नापरः परमास्तिकाः ॥ विश्वासार्थं शिवं

---

ते लोक आपल्या हृदयगुहेमध्यें परशिवाला पाहूं शकतील. (२७) नीच पुरुष मायेच्या बळानें शिव व विष्णु यांची योग्यता सारखी आहे, असें मानतात. कांहीं लोक मला त्याश्रेष्ठ शिवाच्या योग्यतेला आणून वासवितात, एकून शिवाची माया दुस्तर आहे खरी. (२८) काजवा जर प्रचंड सूर्यासारखा होईल तर शंभूच्या बरोबरीचा हरि होईल. सर्पण जर चंदनाची बरोबरी करील, तर मी शिवा बरोबरचा होईन. अज्ञान जर ज्ञानाच्या योग्यतेला जाईल तर देवाच्या बरोबरीला इतर मानव येऊन बसतील. हे देवहो, काय मोहाची दुष्ट चेष्टा आहे, पहा. (२९) विष्णूवर व माझ्यावर जो कोणी भक्ति करतो, त्याला चांगली गति होत नाहीं. शंभूवर भक्ति केलीतरच सद्गति मिळते, असें मीं सांगितलें आहे. (३०) शिवच आहे, दुसरें कोणतेंही नाहीं, असा जो स्थिर निश्चय आहे, त्यालाच सिद्धांत असें ह्मणतात, दुसरे सगळे पूर्वपक्ष आहेत. (३१) याकरितां इतर सर्व देवांचा त्याग करून शिवालाच शरण जावें. ह्मणजे. तात्काळ मुक्ति होते.( मुक्तीची इच्छा करणाऱ्यानें शिवालाच शरण जावें.) (३२) आस्तिकहो, हाच निश्चयाचा वेदार्थ आहे दुसरा नाहीं. गळ्यावर तापलेली कुऱ्हाड घेऊन खरें खरें सांगतों. (३३) आस्तिकहो, हाच वेदार्थ खरा आहे, दुसरा नाहीं. याच्या उलट जर असेल तर माझें डोकें येथें गळून पडो. (३४) आस्तिकहो, हाच खरा अर्थ आहे, दुसरा नाहीं. तुमच्या विश्वासाकरितां शिवाला शिवून तीन वेळ शपथ घेऊन असेंच सां-

स्पृष्ट्वा त्रिवः शपथयाम्यहम् ॥३४॥ तस्माद्वेदोदितो ह्यर्थः सत्यं सत्यं मयोदितम् ॥ अन्येनैवोदितो ह्यर्थो न सत्यः परमार्थतः ॥३५॥ वृत्तम् ॥ कथितमखिलदुःखध्वंसकं वः समस्तं परमशिवसुखात्मप्रापकं सद्य एव ॥ विगतसकलदोषा वेदवेदान्तनिष्ठा हृदयकुहरनिष्ठं कर्तुमर्हन्ति चैतत् ॥३६॥ सर्वमेतदतिशोभनं परं केवलं करुणयैव भाषितम् ॥ देवदेवचरणप्रसादतो नेतरद्धि कथनीयमास्तिकाः ॥३७॥

सूत उवाच ॥ ब्रह्मा देवानेवमुक्त्वा विशुद्धांस्त्यक्त्वा रुद्रध्याननिष्ठो बभूव ॥ देवाः सर्वे दण्डवद्भूमिभागे भक्त्या सार्धं पद्मयोनिं प्रणम्य ॥३८॥ हृष्टात्मानो सत्यबोधैकनिष्ठाः सद्यः स्वं स्वं देशमाहुर्मुनींद्राः ॥ इत्थं साक्षाद्ब्रह्मगीता भवद्भिः शुद्धज्ञानैरादरेण श्रुतैव ॥३९॥ मत्तः श्रद्धा भक्तियुक्तस्य विप्रा नित्यं देया नेतरस्यापि शुद्धा ॥४०॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने ब्रह्मगीता नाम अष्टत्रिंशोऽध्यायः ॥

---

गतों. (३५) मीं सांगितलेला हाच अर्थ खरा आहे, दुसऱ्यानें सांगितलेला अर्थ तो खरा नव्हे. (३६) सर्व दुःखांला नाश करणारें असून परशिवाची प्राप्ति करून देऊन तात्काळ अत्यंत सुख जें देतें, तें ज्ञान तुह्मांला सांगितलें. सर्व दोष ज्यांच्या पासून निघून गेले आहेत, व वेद व वेदांतामध्यें जे पंडित आहेत, असे हे बुधजनांनो हें ज्ञान तुमच्या हृदयांत ठेवा. (३७) हें सर्व अतिशय मंगलकर असल्यामुळें केवळ करुणेमुळेंच देवाधिदेव शिवप्रसादाच्या जोरावर हें तुह्मांला सांगितलें. आस्तिकहो, यापरतें दुसरें कांहीं सांगावयाचें नाहीं.

(३८) सूत ह्मणाले—याप्रमाणें ब्रह्मदेवानें शुद्ध विज्ञानाचा बोध देवांना केला, व आपण रुद्रध्यानांत निमग्न झाला. नंतर सर्व देवांनीं त्याला साष्टांग नमस्कार केला. (३९) मुनिश्रेष्ठहो, नंतर सर्व देव संतुष्ट होऊन सत्यज्ञानावर निष्ठा ठेवून आपआपल्या स्थलाला निघून गेले. मुनिश्रेष्ठहो, शुद्धज्ञानयुक्त असे तुह्मी ही गीता मजपासून ऐकलीत असो. (४०) माझ्या पासून ऐकलेली ही शुद्ध गीता श्रद्धा व भक्ति असलेल्या प्राण्यांसच सांगावी, इतरानां सांगू नये. याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील ब्रह्मगीताकथननांवाचा अडतिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथैकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ स्कान्दे ॥ सूतसंहितायाम् ॥ यज्ञवैभवखण्डे ॥ प्रणम्य मुनयः सूतं दण्डवत्पृथिवीतले ॥ कृतांजलिपुटो भूत्वा तुष्टुवुः परया मुदा ॥१॥

मुनय ऊचुः ॥ नमस्ते भगवँश्च्छम्भो प्रसादादाप्तवेदन ॥ नमस्ते भगवंश्च्छंभुचरणांभोजवत्सल॥२॥ नमस्ते शंभुभक्तानामतीव हितबोधक ॥ नमस्ते वेदवेदान्तपद्मषंडदिवाकर ॥३॥ नमो नमो नमस्तुभ्यं भूयो भूयो नमो नमः ॥ एवं ते ऋषयः स्तुत्वा सूतं सर्वहितप्रदम् ॥४॥ पूजां प्रचक्रिरे सर्वे सर्वलोकहितैषिणः ॥ सोऽपि सूतः स्वतः सिद्धः स्वरूपानुभवात्परात् ॥५॥ उत्थाय स्वगुरुं व्यासं दध्यौ सर्वहिते रतम् ॥ तस्मिन्नवसरे व्यासः साक्षात्सत्यवतीसुतः ॥६॥ भस्मोध्दूलितसर्वांगस्त्रिपुंड्रांकितमस्तकः ॥ कृष्णाजिनोत्तरीयश्च आषाढेन विराजितः ॥७॥ रुद्राक्षमालाभरणस्तत्रैवाविरभूत्स्वयम् ॥ तं दृष्ट्वा देशिकेंद्राणां देशिकं करुणानिधिम् ॥८॥ सूतः सत्यवतीसूनुं सशिष्यैः सह

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ स्कंदपुराणांत व सूतसंहितेंतील यज्ञवैभवखंडांत सांगितलें आहे. (१) सूताला नमस्कार घालून, हात जोडून सूताचें स्तवन करून—

(२) मुनि ह्मणाले—श्रीशंभूच्या अनुग्रहानें ज्याला उत्तम ज्ञान मिळालें आहे व जो श्रीशंभूच्या चरणकमलांवर वात्सल्य ठेवतो अशा हे भगवन्सूता, तुला नमस्कार असो. (३) शंभूच्या भक्तांना हितकर बोध करणाऱ्या सूतमुने, वेदवेदांतरूपी कमलाला विकास करणाऱ्या सूर्या हे मुने, तुला नमन असो. (४) नमस्कार असो. नमस्कार असो. पुनः पुनः तुला नमन असो, सर्व ऋषींनीं याप्रमाणें सर्व हित देणाऱ्या सूताची स्तुति करून (५) सर्व लोकांचें हितचिंतन करणाऱ्या त्या ऋषींनीं सूताची पूजा केली. श्रेष्ठ अशा स्वस्वरूपाच्या अनुभवानें सूत हा स्वतः सिद्ध झाला होता. (६) त्या सूतानें देखील उठून सर्वांस हित करणाऱ्या व्यासाचें ध्यान केलें. नंतर त्याच क्षणांत सत्यवतीचा मुलगा व्यास (७) सर्वांगाला भस्म लेपन करून कपाळावर भस्माचें त्रिपुंड्र धारण करून अंगावर कृष्णाजिन पांघरून आषाढानें सुशोभित होऊन (८) रुद्राक्षांनीं सुशोभित होऊन तेथें प्रकट झाला. नंतर देशिक श्रेष्ठांमध्यें श्रेष्ठ अशा करुणानिधि व्यासाला पाहून (९) श्रेष्ठ श्रेष्ठ शिष्यांसह सूतानें व्यासाला नमन केलें. प्रसन्नांतःकरणानें दंडवत्

सत्तमैः ॥ प्रणम्य दंडवद्भूमौ प्रसन्नेंद्रियमानसः ॥९॥ यथार्हं पूजयामास दत्वाऽग्रासनमद्भुतम् ॥ भगवानपि सर्वज्ञः साक्षात्सत्यवतीसुतः ॥१०॥ प्राह गंभीरया वाचा सशिष्यं प्रति सत्तमः ॥ तवैषामपि किं कार्यं मया तद्ब्रूहि मेऽनघ ॥११॥ एवं व्यासवचः श्रुत्वा सूतः पौराणिकोत्तमः ॥ उवाच मधुरं वाक्यं लोकानां हितमुत्तमम् ॥१२॥

सूत उवाच ॥ इमे हि मुनयः सर्वे सत्यधर्मपरायणाः ॥ मद्गीताश्रवणे चैषामस्ति श्रद्धा महत्तरा ॥१३॥ भवत्प्रसादे सत्येव शक्यते सा हि भाषितुम् ॥ यदि प्रसन्नो भगवन्वदेत्याज्ञापयाद्य माम् ॥१४॥ इति सूतवचः श्रुत्वा भगवान्करुणानिधिः ॥ त्वदीयामद्य तां गीतां वदैषामर्थिनां शुभाम्॥१५॥ इत्युक्त्वा शिष्यमालिंग्य हृदयं तस्य संस्पृशन्॥ सांबं सर्वेश्वरं ध्यात्वा निरीक्ष्यैनं कृपाबलात् ॥१६॥ स्थापयित्वा महादेवं हृदये तस्य संस्थितम् ॥ तस्य मूर्धानमाघ्राय भगवानगमद्गुरुः ॥१७॥सोऽपि सूतः पुनः सांबं ध्यात्वा देवं त्रियंबकम् ॥ प्रणम्य दंडवद्भूमौ स्मृत्वा व्यासं च सद्गुरुम् ॥१८॥ कृतांजलिपुटो भूत्वा मंत्रमाद्यं

---

नमस्कार करून (१०) उत्तम व अद्भुत अग्रासन देऊन योग्यतेनुसार त्यानें त्याची पूजा केली. भगवान सर्वज्ञ सत्यवतीसुत व्यास (११) गंभीरवाणीनें शिष्यसहित सूताला ह्मणाला. हे निष्पाप सूता, तुला आणि या तुझ्या शिष्यांना काय पाहिजे आहे, तें सांग. (१२) याप्रमाणें व्यासाचें बोलणें ऐकून पुराणवेत्ता सूत लोकांच्या हिताकरितां मधुर वाणीनें ह्मणाला—

(१३) सूत ह्मणाला—हे व्यासगुरो, हे मुनि सर्व सत्यधर्मामध्यें आसक्त आहेत, माझ्या गीतेच्या श्रवणा विषयीं यांची मोठी श्रद्धा आहे. (१४) तुझा अनुग्रह जर माझ्यावर होईल तर यांना सांगण्यास मी समर्थ होईन. जर आपण प्रसन्न आहांत, तर मला सांगण्याविषयीं आज्ञा द्या. (१५) करुणानिधि व्यासानें सूतवाक्य ऐकून ह्मटलें कीं, सूता, तुझी शुभ गीता ऐकावी अशी इच्छा करणाऱ्यांना सांग. (१६) याप्रमाणें बोलून आपला शिष्य सूत याला आलिंगन देऊन त्याचें हृदय शिवून (स्पर्श करून) सर्वेश्वर सांबाचें ध्यान करून कृपाबलानें त्याच्याकडे पाहून (१७) त्या सूताच्या हृदयांत असलेल्या महादेवाची प्रतिष्ठा चांगल्या प्रकारें तेथेंच करून त्या सूताचें मस्तक हुंगून भगवान गुरु व्यास तेथून निघून गेला. (१८) त्या सूतानें देखील पुनः एकवार त्रियंबक श्रीशिवाचें ध्यान केलें, व सद्गुरूला दंडवत नमस्कार केला. (१९) नंतर हात जोडून

षडक्षरम् ॥ जपित्वा श्रद्धया सार्धं निरीक्ष्य मुनिपुंगवान् ॥१९॥ कृतप्रणामो मुनिभिः स्वगीतामतिनिर्मलाम् ॥ वक्तुमारभते सूतः सर्वभूतहिते रतः ॥२०॥

सूत उवाच ॥ शृणुत ब्रह्मविच्छ्रेष्ठा भाग्यवन्तः समासतः ॥ वक्ष्यामि परमं गुह्यं विज्ञानं वेदसंमतम् ॥२१॥ अस्ति कश्चित्स्वतः सिद्धः सत्यज्ञानसुखाव्हयः ॥ विश्वस्य जगतः कर्ता पशोरन्यः परः शिवः ॥२२॥ भोक्तारः पशवः सर्वे शिवो भोजयिता परः ॥ सुखदुःखादिसंसारभोग्यं सर्वमिदं जगत् ॥२३॥ सोऽयं सांबस्त्रिनेत्रश्च सोमार्धकृतशेखरः ॥ स्वात्मतत्वसुखस्फूर्तिः प्रमोदात्ताण्डवप्रियः ॥२४॥ ईदृशी परमा मूर्तिर्यस्य साधारणी सदा ॥ तद्धि साक्षात्परं तत्वं नान्यत्सत्यं मयोदितम् ॥२५॥ विष्णुं ब्रह्माणमन्यं वा स्वमोहान्मन्वते परम् ॥ न तेषां मूर्तिरेषास्ति ततस्तेन परं पदम् ॥२६॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रस्य स्वसाधारणरूपतः॥स्वविभूत्यात्मना चापि कुर्यास्तामेव सेवनम्॥२७॥शि-

---

षडक्षर आद्य मंत्राचा जप श्रद्धेनें करून मुनिश्रेष्ठांकडे एकवार पाहून (२०) त्या मुनींकडून नमस्कार करून घेऊन निर्मल अशी गीता सांगावयास सर्व प्राण्यांचें हित करण्यांत तत्पर अशा सूतानें आरंभ केला.

(२१) सूत ह्मणाला— ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असे ब्राह्मणहो, तुह्मी भाग्यवान आहांत; संक्षेपानें मी जें सांगतों, तें वेदसंमत असून श्रेष्ठ आहे, असें तें विज्ञान फार गुह्य आहे (२२) सत्य ज्ञान सुख या नांवाचा कोणी एक स्वतःसिद्ध पुरुष आहे, तो सर्व जगाचा कर्ता असून सर्व पशूंहून निराळा आहे. त्यालाच परशिव असें ह्मणतात. (२३) सर्व पशु कर्मांचे भोक्ते असून परशिव हा सर्वांना भोग देतो. हें सर्व जग सुखदुःखरूपी संसाराला भोगणारें आहे. (२४) अर्धचंद्र ज्याच्या डोक्यावर आहे, तीन डोळे ज्याला आहेत, असा तो परशिव निजानंदाच्या स्फूर्तीनें व आनंदानें नेहमीं नर्तन करीत असतो. (२५) अशी ज्याची मूर्ति श्रेष्ठ असून साधारणी ह्मणून प्रसिद्ध झालेली आहे, तेंच साक्षात परतत्व होय दुसरें कोणतेंही नाहीं, हें मी अगदी खरें खरें सांगतों. (२६) विष्णु, ब्रह्मा, किंवा दुसरा कोणी देव यांना श्रेष्ठपणा जे देतात, ते मोहानें अंध झालेले असतात. त्यांची मूर्ति अशा तऱ्हेची नाहीं, ह्मणूनच परशिवाच्या योगानेंच पर पद मिळतें (२७) ब्रह्मा, विष्णु हे आपापल्या साधारणरूपांनीं व स्वविभूतींनीं त्या परशिवाच्या मूर्तीचीच उपासना करतात. (२८) शिवाच्या आज्ञेच्या बळानें विष्णु उत्प

यस्याज्ञाबलाद्विष्णुर्जायते म्रियतेऽपि च ॥ ब्रह्मा सर्वजगत्कर्ता वि-
राट् सम्राट् स्वराडपि ॥२८॥ खरोष्ट्रतरवः क्षुद्रा ब्रह्मविष्ण्वादयोऽभव-
न् ॥ विष्णुप्रजापतीन्द्राणामुत्कृष्टं शंकरादपि ॥२९॥ प्रवदंति च वा-
क्यानि श्रौतानि प्रतिभांति न ॥ पौराणिकानि वाक्यानि स्मार्तानि च
विभांति न ॥३०॥ रुद्रादुत्कर्षमन्येषां ये वांच्छन्ति विमोहिताः ॥ पच्य
न्ते नरके तीव्रे सदा ते न हि संशयः॥३१॥ रुद्रेण साम्यमन्येषां ये वां-
च्छंति विमोहिताः ॥ ते महापातकैर्युक्ता यास्यंति नरकार्णवम् ॥३२॥
केचिदद्वैतमाश्रित्य वैडालव्रतिका नराः ॥ साम्यं रुद्रेण सर्वेषां प्रव-
दंति विमोहिताः ॥३३॥ देहाकारेण चैकत्वे सत्यपि द्विजपुंगवाः ॥ शि
रसः पादयोः साम्यं सर्वथा नास्ति हि द्विजाः ॥३४॥ यथास्यापानयोः
साम्यं छिद्रत्वेऽपि न विद्यते ॥ तथैकत्वेऽपि सर्वेषां रुद्रसाम्यं न वि-
द्यते ॥३५॥ शिवाद्वरिष्ठो नैवास्ति मया सत्यमुदीरितम् ॥ शिवस्वरूप-
मालोड्य प्रवदामि समासतः ॥३६॥ अनेकजन्मसिद्धानां श्रौतस्मार्ता-

---

न होतो, व मरतो. सर्व जगाचा कर्ता ब्रह्मदेव विराट असून सम्राट असून स्वरा-
ट असून शिवाच्या आज्ञेनें मरतो, व जगतो. (२९) ब्रह्मा विष्णु वगैरे गाढव,
उंट, झाड यांच्या जन्माला जातात, व गेले होते. विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र यांना
शंकरापेक्षां श्रेष्ठत्व (३०) जीं वाक्यें प्रतिपादन करतात, तीं श्रुतिप्रमाण नाहींत,
पुराणसंमत नाहींत, अथवा स्मृतिसंमतही नाहींत, असें समजावें. (३१) रुद्रा-
पेक्षां इतरांना श्रेष्ठत्व जे मोहित होऊन कबूल करतात, ते मूढ तीव्र अशा घोर
नरकांत दुःख भोगतात. यांत संशय नाहीं (३२) रुद्राची बरोबरी इतरांशीं जे
करतात, ते लोक महापातकांनीं युक्त होऊन नरकसमुद्राला जातात. (३३) कांहीं
लोक अद्वैताचा आश्रय करून वैडालव्रत (मांजरा प्रमाणें स्तब्ध बसणें) करीत
असतात. असे लोक मोहित होऊन रुद्राची बरोबरी इतरांशीं करतात. (३४)
ब्राह्मणश्रेष्ठहो, देहाच्या अकृतीवरून सर्व शरीर एक जरी आहे, तथापि डो-
क्याचें साम्य पायाला कधींही यावयाचें नाहीं. (३५) मुख आणि अपान (गुद-
द्वार) हीं दोन्हीं छिद्रें आहेत, ह्मणून मुखाचें साम्य अपानाला येत नाहीं तद्वत
सर्व जरी एक आहे, तरी सर्वांला रुद्राचें साम्य येत नाहीं. (३६) शिवापेक्षां श्रेष्ठ
देव कोणीही नाहीं असें मी खरें खरें सांगतों. शिवस्वरूपाचा विचार करून संक्षे-
पानें सांगतों. (३७) श्रौत स्मार्तांचें अवलंबन करून आचरण करणारे लोक अ-

नुवर्तिनाम् ॥ हरः श्रेष्ठो हरेः साक्षादिति बुद्धिः प्रजायते ॥३७॥ हरिब्रह्मादिदेवेभ्यः श्रेष्ठं पश्यंति ये हरम् ॥ ते महाघोरसंसारान्मुच्यन्ते नात्र संशयः ॥३८॥ विष्णुप्रजापतीन्द्रेभ्यो रुद्रस्योत्कर्षमास्तिकाः ॥ वदंति यानि वाक्यानि तानि सर्वाणिं भो द्विजाः ॥३९॥ श्रुतिः सनातनी शंभोरभिव्यक्ता न संशयः ॥ शंकरेण प्रणीतेति प्रवदंति विपश्चितः ॥४०॥ यथा सा शंकरेणोक्ता तथापि श्रुतिरास्तिकाः॥ प्रमाणं सुतरामाप्ततर एव महेश्वरः॥४१॥तस्माद्वेदोपदिष्टार्थौ यथार्थौ नास्ति संशयः॥ सत्यं सत्यं पुनस्सत्यमुध्दृत्य भुजमुच्यते ॥४२॥ प्रसादादेव सर्वेषां सर्वसिद्धिर्महेशितुः ॥ इहैतावान्मया प्रोक्तो ह्यद्वितीयः परः शिवः ॥४३॥ शिवंकरत्वं संपूर्णं शिवस्यैव परात्मनः ॥ सांबमूर्तिधरस्यास्य जगतः कारणस्य हि ॥४४॥ अतोऽपि स शिवो ध्येयः प्राधान्येन शिवंकरः ॥ सर्वमन्यत्परित्यज्य दैवतं परमेश्वरात् ॥४५॥ शिखा चाथर्वणी साध्वी

---

नेक जन्मांनीं सिध्द झाले ह्मणजे हरीपेक्षां हरच श्रेष्ठ आहे अशी बुद्धि त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होते. (३८) हरि, ब्रह्मा वगैरे देवांपेक्षां श्रीशिव श्रेष्ठ आहे, असें जे समजतात, ते लोक महाघोरसंसारापासून मुक्त होतात, यांत संशय नाहीं. (३९) विष्णु, प्रजापति, इंद्र यांच्यापेक्षां रुद्राचें आधिक्य जे आस्तिक पाहतात, तेच श्रेष्ठ होत. जीं वाक्यें रुद्राचें आधिक्य प्रतिपादन करतात, तीं वाक्येंच खरीं वाक्यें होत. (४०) पुरातन श्रुति ही शंभूपासून प्रकट झाली, यांत संशय नाहीं. पंडितलोक ह्मणतात कीं, श्रुतींचा कर्ता श्रीशंकरच आहे. (४१) ज्याप्रमाणें शंकरानें श्रुति सांगितली आहे तद्वतच आस्तिकलोक श्रुतीचा स्वीकार करतात, अर्थात सर्व श्रुति आप्तवाक्याप्रमाणें प्रमाणभूत आहेत, असें मानतात. अर्थात महेश्वरच सर्वांचा आप्त आहे असें सिध्द झालें. (४२) यावरून वेदांनीं सांगितलेला अर्थ यथार्थ आहे, असें सिद्ध झालें, यांत संशय नाहीं. वर हात उचलून खरें खरें तीन वेळ सांगतों कीं, वेदार्थ खरा आहे. (४३) सर्व लोकांना महेशाच्या प्रसादानेंच सर्व सिद्धि मिळतात. येथें मी सांगतों कीं, शिवच अद्वितीय असून श्रेष्ठ आहे. (४४) चिदानंदरूपी, सांबमूर्तिधारी, जगत्कारण शिवाच्या ठिकाणींच संपूर्ण शिवंकरत्व आहे ( शिवच सर्वांचें कल्याण पूर्णपणें करतो. ) (४५) याकरितां शिवंकर ( मंगलकर ) शिवाचेंच मुख्यत्वेंकरून ध्यान करावें. परमेश्वराव्यतिरिक्त इतर देवांना सोडून द्यावें. (४६) सर्व वेदांमध्यें अथर्वणी श्रुति श्रेष्ठ आहे. अशा

सर्ववेदोत्तमोत्तमा ॥ अस्मिन्नर्थे समाप्ता सा श्रुतयश्चापरा अपि ॥४६॥ बहुनोक्तेन किं विप्राः शिवो ध्येयः शिवंकरः ॥ शिवादन्यत्परित्यज्य दैवतं भुक्तिमुक्तये ॥ सर्वमुक्तं समासेन सारात्सारतरं बुधाः ॥४७॥ वृत्तम् ॥-अतो हि वेदोदितवर्त्मनैव विहाय देवान्तरमन्यबुद्धिम् ॥ विमुक्तिकामः परमाद्वितीयं समापयेदेव शिवस्वरूपम् ॥४८॥ इति सकलं कृपया मयोदितं वः श्रुतिवचसा कथितं यथा तथैव ॥ यदि हृदये निहितं समस्तमेतत्परमगतिर्भवतामिहैव सिध्दा ॥४९॥ वक्तव्यं सकलं प्रोक्तं मयाऽतिश्रध्दया सह ॥ अतःपरं तु वक्तव्यं न पश्यामि मुनीश्वराः ॥५०॥ मयोक्ता परमा गीता पठिता येन तस्य तु ॥ आयुरारोग्यमैश्वर्यं विज्ञानं च भविष्यति ॥ शिवप्रसादः सुलभो भविष्यति न संशयः ॥५१॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने सूतगीता नाम एकोनचत्वारिंशोऽध्यायः

---

अर्थांतच सर्व इतर श्रुति विराम पावल्या आहेत. (४७) ब्राह्मणहो, फार काय? शिवंकर शिवाचें ध्यान करणें हाच मार्ग श्रेयस्कर आहे. इतर देवतांचा त्याग करून भुक्तिमुक्तीच्या साधनासाठीं शिवाचीच आराधना करावी. हे पंडितहो, संक्षेपानें सारांतलें सार काढून सर्व मीं सांगितलें. (४८) याकरितां वेदोक्त मार्गानें इतर देवतेचा त्याग करून व इतरांविषयीं बुद्धि न ठेवितां परम अद्वितीय शिवस्वरूपाचें चिंतन करावें, ह्मणजे मुक्ति मिळते. (४९) श्रुतीची वाणी लक्षांत ठेवून तुमच्यावर कृपा करून सर्व यथास्थित जसें होतें तसेंच मीं सांगितलें जर हा अर्थ तुह्मी हृदयांत ठेवाल, तर तुह्मांला श्रेष्ठगति सिद्ध आहे, असें समजा. (५०) अतिशय श्रद्धेनें जें सांगावयाचें तें मीं सांगितलें. मुनीश्वरहो, आतां सांगावयाचें कांहीं राहिलें नाहीं, असें मला वाटतें (५१) मी सांगितलेली ही गीता जो वाचतो जो पठन करतो, त्याचें आयुष्य ऐश्वर्य विज्ञान हीं वाढतात. व शिवप्रसाद सुलभपणें मिळतो; यांत संशय नाहीं.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं केलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील सूतगीता नांवाचा एकोणचाळिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ चत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शिवधर्मे ॥ यः स्वपन् प्रातरुत्थाय प्राणांते वाऽपि संस्मरेत् ॥ भक्त्योंनमः शिवायेति स गच्छेत्परमां गतिम् ॥१॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं नित्यमेव वा ॥ ये स्मरंति विरूपाक्षं विज्ञेयास्ते गणेश्वराः ॥२॥ लाभस्तेषां मनुष्याणां ये शिवं शरणं गताः ॥ येषां दिवा च रात्रौ च नित्यं शिवगता स्मृतिः ॥३॥ ये स्मरंति सदाकालमीशानं पूजयंति वा ॥ रुद्रलोकात्परिभ्रष्टास्ते रुद्रा नात्र संशयः ॥४॥ अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा॥यः स्मरेत्सततं रुद्रं न स पापैः प्रलीयते ॥५॥ सा हानिस्तन्महच्छिद्रं स मोहः सान्धमूकता॥ यत्क्षणं वा मुहूर्तं वा शिवमेकं न चिंतयेत् ॥६॥ नाममात्रप्रपन्नस्तु क्षणार्धमपि यः शिवे ॥ स मुनिः स महान्साधुः स योगी शिवतां व्रजेत् ॥७॥ स्मरणादेव रुद्रस्य पापसंघातपंजरम् ॥ शतधा भेदमायाति

---

श्रीशिवास नमस्कार असो. शिवधर्मांत असें सांगितलें आहे. (१) जो प्राणी दर दिवशीं सकाळीं उठून किंवा मरणाच्या वेळेस तरी भक्तीनें "ॐ नमःशिवाय" या मंत्राचें स्मरण करतो, तो उत्तम गतीला जातो. (२) एकवेळ, दोन वेळ, तीन वेळ किंवा निरंतर शिवाचें स्मरण जे करतात, ते साक्षात गणेश्वर होत. (३) जे शिवाला शरण जातात, व जे रात्रंदिवस शिवस्मरण करतात त्यांना परम लाभ होतो. (४) जे लोक सर्वदा ईशाची पूजा व स्मरण करतात, ते रुद्रलोकापासून भ्रष्ट झालेले (कैलासाहून शेषपुण्यांशानें भूमीवर आलेले) रुद्रच होत, यांत संशय नाहीं. (५) अशुद्ध असो, शुद्ध असो, व संकटांत असो जो प्राणी शिवस्मरण सतत करतो, तो पापांनीं लिप्त होत नाहीं. (६) एखाद्या घटकेंत अथवा क्षणांत शिवनामस्मरण झालें नाहीं म्हणजे तो वेळ व्यर्थ गेला. असें झालें तर तीच मोठी हानि होय, तीच मोठी चूक होय, तोच मोठा मोह होय, तोच आंधळेपणा व तोच मुकेपणा होय. (७) अर्ध क्षणपर्यंत शिवनामस्मरण करून जो शिवाला शरण जातो, तोच मोठा मुनि असून तोच योगी आहे, तोच मोठा साधु आहे. (८) रुद्राच्या स्मरणमात्रानें पापजालाचे शेंकडो तुकडे होतात. व-

गिरिर्वज्रहतो यथा ॥८॥ शिवभक्तिपरा ये च शिवप्रणतचेतसः ॥ शि-
वसंस्मरणोद्युक्ता न ते दुःखस्य भागिनः ॥९॥ स्कांदे ॥ वृत्तम् ॥ हरम-
मरगणार्चितांघ्रिपद्मं स्मरति च यः परमार्थतोऽत्र मर्त्यः ॥ विनिहतक-
लिकल्मषः सुचेता व्रजति स एव परं पदं हि शंभोः ॥१०॥ शिवसं-
स्मरणात्क्षीणसमस्तक्लेशसंचयः ॥ मुक्तिं प्रयाति स्वर्गोप्तिस्तस्य वि-
घ्नोऽनुमीयते ॥११॥ स्वर्गस्य मार्गा बहवः प्रदिष्टास्ते कृच्छ्रसाध्याः कु-
टिलाः सविघ्नाः ॥ निमेषमात्रेण महाफलोऽयमृजुश्च पंथाः स्मरणं स्मरारेः
॥१२॥ शिवचरणस्मरणेन पूजया च स्वकतमसः परिमुच्यते हि जंतुः॥
नहि मरणप्रभवप्रणाशहेतुः शिवचरणस्मरणादृतेऽस्ति किंचित् ॥१३॥
शाठ्येनापि नरा नित्यं ये स्मरंति महेश्वरम् ॥ तेऽपि यांति तनुं त्य-
क्त्वा शिवलोकमनामयम् ॥१४॥ ब्रह्मपुराणे ॥ यो जातु नार्चयेल्लिंगं न
स्मरेन्न च कीर्तयेत् ॥ किं तेन जातमात्रेण भूभारेणान्नशत्रुणा ॥१५॥ शि-

---

व्राचा आघात झाल्यावरोबर पर्वताचे जसे तुकडे होतात, तसें पाप नष्ट होतें. (९) शि-वावर भक्ति करणारे, शिवावर मन आसक्त करणारे व शिवस्मरण करणारे जे असतील ते सर्व दुःखभागी होत नाहींत. (१०) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, अमर-गण ज्याच्या पायांची सेवा करतात, अशा हराचें स्मरण वास्तविक जो मानव करतो, त्या मानवाचीं कलियुगांत घडलेलीं पापें नष्ट होऊन जातात, व तो उत्त-म मनाचा होऊन शंभूच्या परपदाला जातो. (११) शिवस्मरणानें समस्त दुः-खांचा नाश होतो. व मुक्ति मिळते, स्वर्गसुख मिळतें, व त्या शिवस्मरण करणा-राला कोणतीहीं विघ्नें येत नाहींत. (१२) याशिवाय स्वर्गप्राप्तीचे मार्ग पुष्कळ आहेत परंतु ते सर्व कुटिल असून पुष्कळ विघ्नांचे आहेत, व कष्टसाध्य आहेत. शिवाचें स्मरण करण्याचा मार्ग सरळ असून निमिषांत मोठें फल निर्विघ्नपणें देतो. (१३) शिवचरण स्मरणानें व शिवपूजेनें आपल्या अज्ञानापासून प्राणी मुक्त होतो. जननमरणरूप संसाराचा नाश करणारा शिवचरणावांचून दुसरा रस्ता नाहीं. (१४) जे मानव शाठ्यानें कां होईना ? शिवाचें स्मरण करतील ते देखील शरीर सोड-ल्या नंतर आरोग्यकारक शिवलोकाला जातात. (१५) ब्रह्मपुराणांत ह्मटलें आहे कीं,—जो जन्म घेऊन लिंगपूजा एकदांही करीत नाहीं, व जो शिवस्मरण ए-कदांही करीत नाहीं, तो जन्माला येवून भूमीला भार मात्र झाला, व अन्नाचा शत्रु झाला, असें ह्मणतात. (१६) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं, सहवासानें,

वधर्मे ॥ संपर्कात्कौतुकाल्लोभाद्भयाद्वा यः शिवं स्मरेत् ॥ कीर्तयेदर्चयेद्वापि सोऽप्यवश्यं गणो भवेत् ॥१६॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने शिवनामस्मरणमाहात्म्यं नाम चत्वारिंशोऽध्यायः ॥

---

थट्टेनें, लोभानें अथवा भीतीनें जो शिवाचें स्मरण करतो, कीर्तन करतो पूजाकरतो, तो प्राणी अवश्य गणेश्वर होतो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील शिवनामस्मरणमाहात्म्य नांवाचा चाळिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथैकचत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शिवधर्मोत्तरे ॥ नामानि ये महेशस्य गृणंत्यज्ञातोऽपि वा ॥ तेषामपि शिवो मुक्तिं ददाति किमतः परम् ॥१॥ ज्ञात्वा यः कीर्तयेच्छंभोर्नामान्यमिततेजसः ॥ मुक्तिः करतले तस्य स्थितेति मुनयो जगुः ॥२॥ स्कान्दे ॥ शिवरहस्ये ॥ वृत्तम् ॥ त्रिपुरहर शिवादिदेव शंभो त्रिनयन शंकर रुद्र शूलपाणे ॥ भव शरणमितीरयन्ति येऽस्मिन्भवजलधौ न पतंति ते मनुष्याः ॥३॥ शैवे ॥ ॐ नमो नीलकण्ठायेति पुण्याक्षराष्टकम् ॥ मंत्रमाह सकृद्वा यः पातकैः स प्रमुच्यते ॥४॥ ग्रंथान्तरे ॥ भवांबुनिधिसंतारयानपात्रं दृढीकृतम् ॥ स्वर्गारोहणनिःश्रेणिमहादेवेति कीर्तनम् ॥५॥ आमोचनं हि बद्धानामन्धानां नयनौषधम् ॥ दीनानामाश्रयस्थानं महादेवेति कीर्तनम् ॥६॥ महादेवेति वाग्वल्ली चतुरक्षरपल्लवा ॥ भक्तिसिक्ता फलत्येषा चतुर्वर्गफलान्यहो ॥७॥ महादेव महादेव महादेवेति वादिनम् ॥ वत्सं गौरि-

---

श्रीशिवास नमस्कार असो ॥ शिवधर्मोत्तरांत ह्मटलें आहे कीं,—(१) महेश्वराचीं नांवें जीं असतील तीं न जाणतां जरी घेतलीं ( नामस्तवन केलें ), तरी त्यांना शिव मुक्ति देतो. याच्यापेक्षां आतां सांगावयाचें काय राहिलें? (२) अपरंपार तेजाच्या श्रीशिवाचीं नांवें जाणून जो कीर्तन करतो, त्याच्या तळहातावर मुक्ति असते, असें श्रेष्ठ मुनि सांगतात. (३) स्कंदपुराणांतील शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं,—त्रिपुरसंहारा, शिवा, आदिदेवा, शंभो, त्रिनयना, शंकरा, रुद्रा, शूलपाणे, आह्मांस तूं शरण हो, अशी शिवाची प्रार्थना जे करतात, ते मानव संसारसागरांत कधींही पडत नाहींत. (४) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं,—ॐ नमो नीलकंठाय " हा पुण्यकर अक्षराष्टकमंत्र ( आठ अक्षरें ज्यांत आहेत असा- मंत्र ) एक वेळ जो ह्मणतो, तो प्राणी सर्व पापापासून मुक्त होतो. (५) दुसऱ्या ग्रंथांत सांगितलें आहे कीं,– " महादेव " या नांवाचें कीर्तन संसारसमुद्र तरावयाचें मजबूत जहाज आहे, किंवा स्वर्गाला जाणाऱ्या पायऱ्या आहेत, असें समजावें. (६) महादेवाचें स्मरण बद्ध झालेल्या लोकांना बंधापासून सोडवितें, आंधळ्या लोकांच्या डोळ्याचें औषध आहे, दीनांचें आश्रयस्थान आहे. (७) " महादेव " या नांवाच्या वाणीरूप वेलीला चार अक्षररूपी पानें आहेत. या वेलीला भक्तिरूप पाणी शिंपडलें ( घातलें ) असतां धर्म, अर्थ काम, मोक्ष अशीं चार फळें येतात (८) महादेव, महादेव, महादेव याप्रमाणें त्रिवार नामघोष जो

व गौरीशो धावन्तमनुधावति ॥८॥ महादेव महादेव महादेवेत्ययं ध्वनिः ॥ सुधियो मुक्तिकांतायाः पाणिग्रहणडिंडिमः ॥९॥ महादेवेति यो ब्रूयात्प्रातरुत्थाय नित्यशः ॥ जन्मांतरसहस्रेषु कृतं पापं विनश्यति ॥१०॥ कोटयो ब्रह्महत्यानामगम्यागमकोटयः ॥ सद्यः प्रलयमायांति महादेवेति कीर्तनात् ॥११॥ शिवेति मंगलं नाम यस्य वाचि प्रवर्तते ॥ भस्मीभवंति तस्याशु महापातककोटयः ॥१२॥ प्राणप्रयाणपाथेयं संसारव्याधिभेषजम् ॥ अनन्तदुःखशमनं शिव इत्यक्षरद्वयम् ॥१३॥ सकृदुच्चरितं येन शिव इत्यक्षरद्वयम् ॥ बद्धः परिकरस्तेन मोक्षाय गमनं प्रति ॥१४॥ भूतप्रेतपिशाचाश्च डाकिन्यो ग्रहराक्षसाः ॥ सर्वे दुष्टाः प्रणश्यंति शिवसंकीर्तनाद्यतः ॥१५॥ पुत्रस्वजनबंधूनां कुर्यान्नाम शिवात्मकम् ॥ तस्य संकीर्तनाद्याति पापं मुक्त्वा शिवां गतिम् ॥१६॥ स्कांदे ॥ शिव इत्येव शब्दोऽस्ति वागस्ति वशवर्तिनी ॥ तथाऽपि नरके

---

करितो, त्याच्या पाठीमागें परमेश्वर हा पळणाऱ्या वांसराला पाहून जशी गाय धांवत्ये तसा धांवून येतो. (९) महादेव, महादेव, महादेव, या नांवाचा ध्वनि-मुक्तिरूप वधूचें पाणिग्रहण (विवाह) करणाऱ्या ज्ञानी वरापुढें मंगलवाद्य होय. (१०) प्रातःकालीं उठून निरंतर महादेवाचें स्मरण जो करतो, त्याचीं हजारों जन्माचीं पापें जळून जातात. (११) कोट्यावधि ब्राह्मणांचा वध करून पातकें सांचलेलीं असलीं, व अगम्यगमनाचीं पातकें हजारों सांचलेलीं असलीं, तथापि महादेवाचें कीर्तन केल्या बरोबर तीं सर्व पापें तात्काळ जळून जातात. (१२) ज्याच्या वाणींत मंगलकर शिवनाम आहे, त्याचीं जरी कोट्यावधि पातकें असलीं; तरी तीं तात्काळ भस्म होऊन जातात. (१३) "शिव" हीं दोन अक्षरें प्राणप्रयाणाची शिदोरी आहे, संसाररोगाचें उत्तम औषध आहे. अनंत दुःखांला शमन करणारें साधन आहे. (१४) ज्यानें "शिव" या दोन अक्षरांचा पाठ एक वेळ जरी केला, तरी त्यानें मोक्षाला जावयाकरितां कंबर बांधिलीच ह्मणून समजावें. (१५) भूत, प्रेत, पिशाच, डाकिनी, ग्रह, राक्षस, सर्व दुष्ट प्राणी शिवकीर्तनानें तत्काळ नष्ट होतात. (१६) मुलाचें, स्वजनाचें, बंधूचें नांव "शिव" असें ठेविलेलें असलें तर त्या शिवनामाच्या कीर्तनानें मनुष्य पापापासून मुक्त होतो, व उत्तम गतीला जातो. (१७) स्कांदपुराणांत सांगितलें आहे कीं जगांत "शिव" हा शब्द असून व आपल्या ताब्यांत वाणी (वाचा) असून मानव नरकांत पड-

मर्त्याः पतंतीत्यतिसाहसम् ॥१७॥ शोचन्ते ते परं दीनाः स्वभाग्यानि दिने दिने ॥ प्रमादेनापि यैर्नोक्तं शिव इत्यक्षरद्वयम् ॥१८॥ शिवेति वाचं यो नित्यं चंडालोऽपि वदेन्नरः ॥ सह तेन वदेद्वाचं सह तेन वसेत्सदा ॥१९॥ आदित्यपुराणे ॥ कीर्तयिष्यंति ये रुद्रं सकृदप्याशु ते नराः ॥ सर्वपापैः प्रमुच्यंते सप्तजन्मकृतैरपि ॥२०॥ प्रसंगात्कौतुकाल्लोभाद्भयादज्ञानतोऽपि वा॥हर इत्युच्चरन्मर्त्यः सर्वपापैः प्रमुच्यते॥२१॥ ग्रंथान्तरे ॥ आहर प्रहर संहरेति वा व्याहरन्सकृदघैः प्रमुच्यते ॥ मोचयेत्प्रकृतिकामकर्तृतो नामकीर्तनमुमापतेः सदा ॥२२॥ पद्मपुराणे ॥ शिवराघवसंवादे ॥

ईश्वर उवाच ॥ पुरा त्रेतायुगे राजा विदलो नाम वीर्यवान् ॥ मृते पितरि बालोऽसौ गुरुराज्येऽभिषेचितः ॥२३॥ समानवयसः सर्वान् समीपस्थांश्चकार सः॥ये वृद्धा ये च विद्वांसस्ते च तस्य न संमताः॥२४॥

---

तात, हें त्यांचें अति साहसकर्म होय. (१८) ज्यांनीं चुकून देखील "शिव" हीं दोन अक्षरें तोंडांतून काढिलीं नाहींत, ते दीन लोक दर दिवशीं आपल्या नशिबाकरितां शोक करतात. (१९) शिवनामोच्चार चांडाळ जरी करीत असला तरी त्याच्याशीं भाषण करावें, व त्याचा सहवास नेहमीं करावा. (२०) आदित्यपुराणांत ह्मटलें आहे कीं,—जे लोक एकवार श्रीरुद्राचें कीर्तन करतात, त्यांचीं सात जन्मांतील पातकें जरी असलीं, तरी तीं लौकर जळून जातात. (२१) जो प्रसंगामुळें, उमेदीनें, लोभानें, भीतीनें, अज्ञानानें हर नामाचें स्मरण करतो, तो सर्व पापापासून मुक्त होतो. (२२) दुसऱ्या ग्रंथांत ह्मटलें आहे कीं,—एकाद्या चोरानें आपल्या मूळस्वभावाला अनुसरून "आहर" (आण) "प्रहर" (मार) "संहर" (प्राण घे) असें जरी ह्मटलें तरी तो चोर तात्काळ पापापासून मुक्त होतो. कारण त्या बोलण्यामध्यें अनायासें हर नामाचें कीर्तन होतें.

(२३) पद्मपुराणांत शिवराघवाच्या संवादाच्या वेळेस ह्मटलें कीं, ईश्वर बोलले— पूर्वी त्रेतायुगांत मोठा पराक्रमी विदल नांवाचा राजा होऊन गेला. अल्पवयांतच बाप परलोकाला गेल्यामुळें त्याच्या शिरावर राज्याचें मोठें ओझें पडलें. (लोकांनी त्याला गादीवर बसविलें) (२४) नंतर आपल्या बरोबरीच्या पोरांना मोठमोठें अधिकार देऊन त्यांना त्या बालराजानें आपल्याजवळ केलें, व जे ह्मातारे विद्वान अधिकारी होते, त्यांचा अधिकार काढून घेऊन त्यांना दूर केलें,

युवानः संमता दुष्टा अकार्यकरणस्थिताः ॥ वेश्यानयनदक्षाश्च चोरकर्मविशारदाः॥२५॥भण्डवादरता हास्यनिपुणास्तस्य ते प्रियाः॥ वशीकरणमंत्रज्ञा वश्यौषधविदस्तथा ॥२६॥ एतादृशांस्तथा चान्यान् दुष्टान्स नियुयोज ह ॥ एतदुक्तमथालंब्य शिष्टसद्वृत्तिमत्यजत् ॥२७॥ पितृसंमतसर्वेषां त्यागं चक्रे स पार्थिवः ॥ विचार्य च स तैः सार्धं दुष्टैः कार्यमकारयत् ॥२८॥ राजनीतिविहीनं तद्राज्यं समभवत्तदा ॥ रत्नानि वसुधान्यानि गोमहिष्यादिकं तथा ॥२९॥ तत्सर्वं नाशमापन्न-मपहारात्ततस्ततः ॥ अथ भूपान्तरेणासौ निर्जितश्च पलायितः ॥३०॥ महारण्यमथो गत्वा गिरिदुर्गमकल्पयत्॥ तत्र चाल्पपरीवारश्चोरवृत्तिं समाश्रितः ॥३१॥ तत्र तत्र च निर्दिश्य चोरानाप्तानवंचकान् ॥ निंद्या-नसभ्यानादाय द्रव्याहरणकर्मणि ॥३२॥ यदाहारो न विद्येत तदाहार-मकल्पयत् ॥ गोमहिष्यादिमांसेन यदि तन्नोपलभ्यते ॥३३॥ अश्वीय-

---

(२५) असे तरुण हलकट लोक नेहमीं जवळ राहत असल्यामुळें मोठ मोठीं वाईट कर्में त्याच्या हातून होऊं लागलीं. त्या बालराजाजवळचे लोक, वेश्यास्त्रि-यांना आणून देणारे, चौर्यकर्म करणारे, (२६) वितंडवाद करणारे, अति हंसणारे, वशीकरणमंत्र जाणणारे, वश्य औषधि जाणणारे असे होते. हे लोक त्याचे आव-डते होते. (२७) असले व यांशिवाय इतर दुष्ट त्याच्या जवळ होते. अर्थात यां-च्या वचनावर विश्वास ठेवून त्यानें सभ्यवृत्ति झुगारून दिली. (२८) त्याच्या पि-त्याचे जे आवडते होते, त्या सर्वांचा त्यानें त्याग केला. त्या दुष्टांच्या विचारांनीं तो वागूं लागला. (२९) अर्थात् त्या राज्यांत थोडक्या कालांतच नीति नाहींशी झाली. रत्नें, खजिना, धान्य, गायी, म्हशी वगैरे. (३०) लोकांनीं लुटून नेल्यामुळें तीं सर्व नाहींशीं झालीं. इतक्यांत दुसरा एक राजा त्याचा शत्रु होऊन त्यानें त्याचा पराभव करून त्याला राज्यांतून पळवून लाविलें. (३१) नंतर तो विदल एका मोठ्या जंगलामध्यें जाऊन तेथें डोंगरी किल्याचा आश्रय करून राहिला. तेथें राहून आपल्या त्या थोड्याशा दुष्ट परिजनांच्या मदतीनें तो बालराजा चोऱ्या करूं ला-गला. (३२) आपल्याशीं निष्कपटपणें वागणाऱ्या आप्त चोरांना तें तें स्थळ नें-मून देऊन निंद्य असंभावित अशा त्या चोरांच्या संगतीनें तो लोकांचें द्रव्य लुटूं लागला. (३३) जेव्हां खावयास न मिळे, तेव्हां गायी, म्हशी वगैरे प्राण्यांच्या मां-साचा उपयोग आहारासाठीं तो करी. तेंही कदाचित मिळेनासें झालें म्हणजे (३४) घोड्याचें व माणसाचें मांस तो खाई. अर्थात् अशा तऱ्हेच्या हलकट आ-

नरमांसेन भोजनं पर्यकल्पयत् ॥ एतादृशमभूद्वृत्तं संध्योपास्यादिव-
र्जितम् ॥३४॥ एकस्तु सचिवस्तस्य सुरापो नाम राक्षसः ॥ नियुक्तः
सर्वकालं स आहर प्रहरेति च ॥३५॥ एवं रक्षोमते स्थित्वा नानादेश
नरानतः ॥ नृसहस्रपरीवारो ह्यखाददक्रूपालसः ॥३६॥ स स्वाभिमत-
योषाश्च तत्र तत्र समाहरत् ॥ कंचित्कालं च ता भुक्त्वा ताश्चापि स-
मभक्षयत् ॥३७॥ एवं हत्वा नरान्नारी राज्यं चक्रे सुदुःसहम् ॥ निर्जी-
वमभवत्स्थानं समंताद्दशयोजनम् ॥३८॥ एवं वर्षसहस्रं तु राज्यं कृ-
त्वा नरादनः ॥ जराशिथिलसर्वांगो वलीपलितदूषितः ॥३९॥ अथ मृ-
त्युदिनं प्राप्तं राज्ञस्तस्य दुरात्मनः ॥ मृत्युकाले च संप्राप्ते स्थितं भू-
मिगतं नृपम् ॥४०॥ तस्य चानुचरास्सर्वे परिवार्योपतस्थिरे ॥ सुरापः
सचिवः प्राह किं कार्यं मम चादिश ॥४१॥ अथ राजा तदाशक्तो निर्ग-

---

चरणामुळें संध्योपासना वगैरे कर्मे नष्ट होत गेलीं. (३५) पुढें कांहीं कालानें अशी गोष्ट घडून आली कीं, सुराप नांवाचा राक्षस एक त्याचा मंत्री होता, त्याला त्या वालराजानें सांगितलें कीं, राक्षसा, तूं वाटसरूंच्या वाटा सर्व रोंखून तेथें आलेल्या पांथस्थांना इकडे आण (आहर) आणि त्यांना यथेच्छ मारदे. (प्रहर) (३६) याप्रमाणें त्या राक्षसाला सांगून त्याच्या मतानें अनेक देशांतल्या लोकांना लुटून आपल्या हजारो दुष्ट परिजनांसह तो निर्दयपणानें आळस न करितां खाऊं पिऊं लागला. (३७)शिवाय आपल्यास आवडणाऱ्या अशा परक्या बायकांना आणून कांही कालपर्यंत त्यांचा उपभोग घेऊन शेवटीं त्या बायकांना मारून त्यांचें मांस खात तो कालक्रमणा करूं लागला. (३८) याप्रमाणें पुरुषांना व बायकांना मारून दुर्धर कृत्यें करून त्या अरण्यांतच तो विदल राज्य करूं लागला. यामुळें त्या अरण्याभोंवतालचा चाळीस कोस प्रदेश माणसांवांचून ओस पडला. (३९) याप्रमाणें हजार वर्षेपर्यंत त्या विदलराजानें राज्य केलें. नंतर नरमांस खाणाऱ्या त्या राजाचें शरीर म्हातारपणामुळें गळून गेलें. त्याच्या अंगाला सुरकुत्या पडल्या, केस पांढरे झाले. (४०) एकूण त्या दुरात्म्या राजाचें मरण जवळ जवळ येत चाललें. खरोखरच तो राजा मरणोन्मुख होऊन जेव्हां जमिनीला खिळून राहिला. (४१) तेव्हां त्याचे सेवक लोक त्या राजाभोंवतीं बसून राहिले होते; व इतक्यांत त्याच्या सुरापनांवाच्या मंत्र्यानें त्या राजाला म्हटलें कीं, हे विदला, मी आतां काय करूं हें सांग. (४२) नंतर तो राजा अति अशक्त झाल्यामुळें, आयुष्य सरल्या-

तायुस्तथाश्रितः॥ नाभेरधस्तात्क्षीणायुः कथंचिद्वाक्यमुक्तवान् ॥४२॥ त्वं नित्यकाले दैत्येन्द्र आहर प्रहराहर ॥ इत्युक्त्वाथ ममारासौ यमदूताः समागताः ॥४३॥ विचित्रबंधने यत्नं चक्रुस्ताडनतत्पराः ॥ चूर्णिता बद्धपाशाश्च पातिदण्डाश्च चूर्णिताः ॥४४॥ तद्गात्रस्पर्शनादेव तदद्भुतमिवाभवत् ॥ अथागत्य स्वयं मृत्युः पाशेनैनमयोजयत् ॥४५॥ मृत्युपाशमविच्छिन्नं वीक्ष्य मृत्युरचिंतयत् ॥ सर्वे मत्तो मृताश्चायमतिमृत्युमवेक्ष्यते॥४६॥इति चिन्तापरे मृत्यौ ज्वालावक्त्रः प्रतापवान् ॥ वीरभद्रेण निर्दिष्टः शवमादाय शूलभृत् ॥४७॥ ज्वालावक्त्रमथालोक्य तदा मृत्युः पलाययौ ॥ पलायमानं तं दृष्ट्वा मृत्युं वन्हिमुखस्तदा॥४८॥ अरेरे चोर चोर त्वं तिष्ठ तिष्ठ क्व यास्यसि ॥ एनसा मुच्यसे चोर शूलारोपणमात्रतः ॥४९॥ एवमाभाष्य मृत्युं तं शूलप्रोतमकल्पयत् ॥ शूलं स्कंधगतं कृत्वा दूतान्संगृह्य रज्जुना ॥५०॥ पादशृंखलविन्यस्ता-

---

मुळें, क्षीण झाल्यामुळें कसेंही करून बेंबीच्या खालपासून जोर काढून खोल अवाजानें बोलला. (४३) दैत्येंद्रा, सुरापा, रोजच्या नियमाप्रमाणें रोजच्या वेळेस जाऊन मार दे (प्रहर) प्राण घे (संहर). मांस आण (आहर). असें बोलून राजानें प्राण सोडिले, इतक्यांत यमदूत आले. (४४) व त्या राजाला मारमारून चित्रविचित्रपणें पाशानें बांधून ओढावयाचे प्रयत्न करूं लागले. तों ते बांधलेले पाश आपोआप तुटून पडले, व त्यांच्या हातांतील दंड मोडून चूर्ण होऊन पडले. (४५) त्या राजाच्या शरीराचा स्पर्श केल्यावरोबर असें जेव्हां झालें, तेव्हां सर्वांना त्याचें अतिशय आश्चर्य वाटलें. नंतर यम स्वतः येऊन पाशांनीं त्याला बांधूं लागला. (४६) तेव्हां त्याचे पाशही तुटून पडले, तें पाहून यम विचार करूं लागला, आणि ह्मणाला सर्व लोक माझ्या हातून मरतात हा मात्र माझ्या पलीकडे गेला आहे, असें वाटतें. (४७) असा विचार तो यम करीत असतां प्रतापशाली ज्वालावक्त्र तेथें एकदम प्रकट झाला. त्याला वीरभद्रानें पाठविलें होतें, त्या ज्वालावक्त्रानें शव हातांत घेतलें, व तो त्रिशूल फिरवीत तेथें राहिला. (४८)ज्वालावक्त्राला पाहून तो मृत्यु पळून गेला. पळत असलेल्या मृत्यूला पाहून ज्वालामुख ह्मणाला. (४९) रे चोरा, चोरा, उभा रहा, कोठें जातोस? अरे चोरा, माझ्या त्रिशूलाच्या अग्रांत तुला गोंवून टाकतों, ह्मणजे तूं अपराधापासून मुक्त होशील (५०) असें बोलून मृत्यूला ज्वालामुखानें शूलावर गोंवून टाकिलें तों शूल खांद्यावर टाकून दोरीनें त्या दूतांना बांधून. (५१) त्या दूतांच्या पायांत बेड्या

ग्रादाय नृपमभ्यगात् ॥ विमानवरमारोप्य गीतवाद्यसुशोभितम् ॥५१॥ वीरांतिकमथो गत्वा सर्वमेतन्न्यवेदयत् ॥ वीरभद्रोऽपि तत्सर्वं शंकराय न्यवेदयत् ॥५२॥ नानामुनिगणैर्देवैर्ब्रह्मविष्णुपुरःसरैः ॥ सेव्यमानाय देवाय पार्वतीसहिताय च ॥५३॥ प्रणिपत्य निवेद्याथ शूलस्थं मृत्युमेव च ॥ तूर्ष्णीं बभूव विश्वात्मा वीरभद्रः प्रतापवान् ॥५४॥ वृत्तम्॥ प्रणम्य तं वन्हिमुखोऽपि रोषान्मृत्युं समालोक्य ननर्त हर्षात् ॥ उवाच चौर्यं कृतमेव मृत्युना तदेष शूलेऽपि मया प्ररोपितः ॥५५॥ विमोचयामास शिवोऽपि मृत्युं दूतानशेषानरुजांश्चकार॥ मृत्युं समालोक्य शिवो बभाषे मन्नाम येषां मरणे समास्ते ॥५६॥ मच्चेतसामन्यधियां च नाम हीनाक्षरं वाऽप्यधिकाक्षरं वा ॥ ममैव लोकं प्रददाति भाषितं त्वनेन नाम प्रहरेति भाषितम् ॥५७॥ प्रशब्दमात्रं त्वधिकं हरेति गतिप्रदं ये पदमीरयंति ॥ आरादमून्वर्जय तान्नमस्व मदीय

---

ठोकून, ज्वालामुख त्यांना घेऊन राजाजवळ आला. नंतर राजाला श्रेष्ठ विमानांत बसवून त्याच्यापुढें मंगलवाद्यांचा घोष करवीत. (५२) वीरभद्राजवळ येऊन सर्व हकीकत त्याच्यापुढें ज्वालामुखानें सांगितली. नंतर वीरभद्रानें हीच हकीकत श्रीशिवापुढें सांगितली. (५३) अनेक मुनिगणांनीं युक्त होऊन व ब्रह्मविष्णु वगैरे देवांनीं युक्त होऊन त्याच्याकडून सेवा घेत पार्वतीसह श्रीशिव बसले होते, त्या शिवास (५४) नमस्कार करुन सर्व वर्तमान सांगून शूलावर असलेल्या मृत्यूची हकीकत सांगितली. नंतर प्रतापी विश्वात्मा वीरभद्र स्वस्थ बसला. (५५) इकडे ज्वालामुखही सर्व वृत्तांत शिवापुढें निवेदन करुन रागानें मृत्यूकडे पाहून आनंदानें नाचूं लागला. शिवाला त्यानें सांगितलें कीं, हे शिवा, हा मृत्यु राजाला चोरुन नेत होता, ह्मणून याला शूलावर गोंवून आपल्यापुढें आणिलें आहे. (५६) नंतर शिवानें मृत्यूला सोडून दिलें, व त्या दूतांच्या वेड्या काढून व्यथारहित करुन त्यांनाही सोडून दिलें. नंतर मृत्यूला ह्मटलें कीं, बा मृत्यो, मरणसमयीं ज्यांच्या तोंडांतून माझें नामस्मरण निघतें, (५७) व माझ्या ठिकाणीं ज्यांचें मन मरणसमयीं गुंतून राहील, किंवा बुद्धि दुसरीकडे असून अर्ध्या अक्षरानें किंवा पूर्ण अक्षरांनीं माझें स्मरण जे करतील ते माझ्या लोकाला येत असतात. तसें या राजानें मरणसमयीं "प्रहर" असें आपल्या मंत्र्याला ह्मटलें. (५८) तथापि त्यांत 'प्र' एवढें अक्षर अधिक असून बाकीचें माझें नांव आहे. जे लोक 'हर' असें स्मरण

वाक्यं च यमं वदस्व ॥५८॥ नतिं यतिं कीर्तिमुपास्तिमाश्रितं दास्यं च कैंकर्यमथ श्रुतिंवदम् ॥ शिवस्य कुर्वन्ति न ते विचार्याः पंचाक्षरोक्ति शतरुद्रियोक्तिम् ॥५९॥ मन्नामरुद्राक्षविभूतिधारिणो ममाग्रतश्चापि पुराणवक्ता ॥ सर्वेषु पाप्मस्वपि तेषु सत्सु प्रशास्म्यहं नैव यमाधिकारः ॥६०॥ इदं मया गीतमथो हरेण मद्वाक्यतो ब्रूहि यमाय मृत्यो ॥६१॥

मृत्युरुवाच ॥ तथा करिष्ये देवेश नमस्ते शंकराव्यय ॥ त्रिपुरघ्न महेशान योगिहृत्पद्ममंदिर ॥६२॥ त्रियंबक विरूपाक्ष सोमसोमार्धभूषण ॥ त्रेतानेत्रत्रयीनेत्र सोमसूर्याग्निलोचन ॥६३॥ नमस्ते देवतानाथ नमस्ते दिव्यमूर्तये ॥ सर्वज्ञाय नमस्तुभ्यं पशूनां पतये नमः ॥६४॥ अथ देवो महादेवो मृत्युं प्राह वरं वृणु ॥ स्तोत्रेणानेन तुष्टोऽस्मि मृत्युर्वरमयाचत ॥६५॥ त्वदीयं मामपि विभो कुरु शंकर पापिनम् ॥ तथेत्यु-

---

करतात, त्यांना उत्तम गति मिळते. या करितां लौकर याला नमस्कार कर. अशा लोकांना सोडून देत जा. माझें वाक्य यमाला सांग. (५९) नमन, यतिं, कीर्ति, उपास्ति, आश्रय, दास्य, कैंकर्य, श्रवण, वंदन वगैरे शिवाला जे करतील त्यांचा विचार तुमच्या पुढें होत नाहीं. पंचाक्षरजप, शतरुद्रीयजप, (६०) करणारे जे असतील, व नाम रुद्राक्ष, विभूति ह्यांचें धारण करणारे जे असतील व माझेपुढें पुराण सांगणार जे असतील या सर्वांचा विचार मी स्वतः करीत असतों ; याविषयीं यमाचा अधिकार नाहीं. (६१) मी जें हें गीत तुझ्यापुढें सांगितलें, हें माझ्या हुकुमानें तुझ्या यमाला सांग.

(६२) मृत्यु ह्मणाला—देवेशा, शंकरा, अव्यया, आपल्या हुकुमाप्रमाणें सर्व यमाला सांगतों. त्रिपुरघ्ना, महेशाना, योग्यांच्या हृदयकमलमंदिरांत राहणाऱ्या देवा, (६३) त्रियंबका, विरूपाक्षा, सोमा, सोमार्धभूषणा, त्रेतानेत्रा, त्रयीनेत्रा, सोम, सूर्य, अग्नि असे तीन नेत्र असणाऱ्या देवा, (६४) देवतानाथा, तुला नमन असो. दिव्यमूर्ते, तुला नमन असो. सर्वज्ञा, तुला नमन असो. पशुपते, तुला नमन असो. (६५) नंतर महादेव मृत्यूला ह्मणाले. हे मृत्यो, वर माग. या तुझ्या स्तोत्रानें मी संतुष्ट झालों, असें ऐकून मृत्यूनें वर मागितला, (६६) हे विभो, मी जरी पापी आहें तरी मला तुझा असा कर. असें

क्त्वा मृत्युमीशो गच्छ वत्सेति चाब्रवीत् ॥६६॥ यमलोकं गतः सोऽथ यमायाशेषमुक्तवान् ॥६७॥

ईश्वर उवाच ॥ नामकीर्तनमाहात्म्यं प्रसंगात्परिकीर्तितम् ॥ शिवभक्तिप्रदं पुण्यं यस्य कस्यापि नेरयेत् ॥६८॥ य इदं श्रृणुयान्नित्यं पुण्याख्यानमनुत्तमम् ॥ विमुक्तः सर्वपापेभ्यो याति शंकरमंदिरम् ॥६९॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने शिवनामोच्चारणमाहात्म्यं नामैकचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

ऐकून तथास्तु असें ह्मणून मृत्यूला जा असें शिवानें ह्मटलें. (६७) नंतर तो मृत्यु यमलोकाला जाऊन सर्व हकीकत त्यानें यमापुढें सांगितली.

(६८) शिव ह्मणाले—नाम कीर्तनाचें माहात्म्य सर्व प्रसंगानुसार सांगितलें. हे शिवभक्ति देणारें असल्यामुळें कोणत्याही प्राण्याला सांगू नये. (६९) जो प्राणी हें पुण्यकर आख्यान ऐकतो, तो, प्राणी सर्व पापांपासून मुक्त होतो व शेवटीं शिवमंदिराला जातो.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील शिवनामोच्चारणमाहात्म्य नांवाचा एकेचाळिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥लैंग्ये॥ यः प्रातर्देवदेवेशं शिवलिंगस्वरूपिणम्॥ पश्येत्स याति सर्वस्मादधिकां गतिमुत्तमाम् ॥१॥ मध्यान्हे च महादेवं दृष्ट्वा यज्ञफलं लभेत् ॥ सायान्हे सर्वयज्ञानां फलं प्राप्य विमुच्यते ॥२॥ प्रदोषे शंकरं दृष्ट्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥ मानसैर्वाचिकैः पापैः कायिकैश्च महत्तरैः ॥३॥ तथोपपातकैश्चैव पातकैः संप्रमुच्यते ॥४॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ न प्रदोषे हरिं पश्येद्यदि पश्येत्प्रमादतः ॥ चत्वारि तस्य नश्यंति ह्यायुःप्रज्ञायशोबलम् ॥५॥ न प्रदोषे हरिं पश्येत्त्रयोदश्यां विशेषतः ॥ यदि प्रमादात्पश्येद्वा द्वादशाब्दवृषक्षयः ॥६॥ कौर्मे ॥ त्रयोदश्यां तथा रात्रौ सोपहारस्त्रिलोचनम् ॥ दृष्ट्वेशं प्रथमे यामे मुच्यते सर्वपातकैः ॥७॥ ग्रंथान्तरे ॥ एककालं द्विकालं वा त्रिकालं नित्यमेव वा॥ यः पश्यति विरूपाक्षं सर्वपापाद्विशुध्यति ॥८॥ कोटिजन्मकृतं पापं विरूपाक्षस्य दर्शनात् ॥ तत्सर्वं नश्यति क्षिप्रमग्नौ प्रक्षिप्ततूलवत्॥९॥

---

श्रीशिवास नमस्कार असो. लिंगपुराणांत असें सांगितलें आहे. (१) जो प्राणी प्रातःकाली उठून शिवलिंगस्वरूपी देवेशाला पाहतो, त्याला सर्वांपेक्षां उत्तम गति होते. (२) माध्यान्हाच्या वेळेस महादेवाचें दर्शन जो घेतो, त्याला यज्ञाचें फल मिळतें. सायंकाळीं दर्शन घेतलें तर सर्व यज्ञांचें फल मिळून शेवटीं मुक्ति मिळते. (३) प्रदोषकाळीं शंकराचें दर्शन जो घेतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो; मग तें पातक कायिक असो, मानसिक असो, वाचिक असो, कितीहीं मोठें असलें तरी, तें नष्ट होतें. (४) तसेंच उपपातकें व पातकें असलीं तरी त्यांपासून तो मुक्त होतो. (५) ब्रह्मांडपुराणांत ह्मटलें आहे कीं,—प्रदोषाच्या वेळेस हरिदर्शन घेऊं नये, कदाचित् चुकून जर घेतलें, तर आयुष्य, बुद्धि, कीर्ति, बळ अशा चार वस्तु नष्ट होतात. (६) प्रदोषवेळेस हरीला पाहूं नये. त्यांत विशेषेंकरून त्रयोदशीच्या दिवशीं प्रदोषकालीं तर मुळींच पाहूं नये. कदाचित् प्रमादानें पाहिलें तर बारा वर्षांचें पुण्य नष्ट होतें. (७) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं,—त्रयोदशीच्या रात्रीं पहिल्या यामांत उपहारासह त्रिलोचनाचें दर्शन जो घेतो, तो सर्व पातकांपासून मुक्त होतो. (८) ग्रंथांतरांत सांगितलें आहे कीं,—एकवेळ दोनवेळ, तीनवेळ किंवा निरंतर जो विरूपाक्षाला पाहतो, तो पापांपासून मुक्त होतो. (९) विरूपाक्षाच्या दर्शनानें कोट जन्मांतलें पाप नाहींसें होतें. व दुसरीं पातकें

गंगापुष्करकेदारनैमिषादिष्वनेकशः ॥ तीर्थस्थानेन यत्पुण्यं शिवं दृष्ट्वैव तल्लभेत् ॥१०॥ उमामहेश्वरसंवादे ॥ पर्वतान्दश यद्दत्वा महादानानि षोडश ॥ धेनूश्च दश यद्दत्वा तद्दृष्ट्वा लिंगमाप्नुयात् ॥११॥ लिंगस्य दर्शनादेव निर्मलः पापवर्जितः ॥ शुद्धस्फटिकसंकाशः शुद्धचामीकरोपमः ॥ शुद्धदेहो भवेद्देवि नरो मेऽभ्यर्चने रतः ॥१२॥ ग्रंथान्तरे ॥ अभक्ष्यभक्षको वाऽपि ब्रह्महा यदि मातृहा ॥ पितृहा बालघाती च गोघ्नः स्त्रीशूद्रघातकः॥१३॥वक्ता च परदोषस्य परस्य गुणदूषकः॥ कृपणोऽनृतवादी च मणिरत्नापहारकः॥ सर्वपापमयः पुत्र मुच्यते लिंगदर्शनात् ॥१४॥ जातिस्मरत्वमैश्वर्यं विद्याज्ञानं प्रजासुखम् ॥ अज्ञानाद्वा भयाद्वाऽपि दृष्ट्वा प्राप्नोति शंकरम् ॥१५॥ लैंग्ये ॥ अर्चितं परमेशानं भवं शर्वमुमापतिम् ॥ सकृत्प्रसंगात्तं दृष्ट्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥१६॥ शिवधर्मे ॥ लिंगस्य दर्शनं पुण्यं दर्शनात्स्पर्शनं शुभम् ॥ शिव-

---

असलीं तरी अग्नींत घातलेल्या कापसाप्रमाणें जळून जातात. (१०) गंगा, पुष्कर, केदार, नैमिष, वगैरे अनेक क्षेत्रांमध्यें तीर्थोदकानें स्नान केलें असतां जें पुण्य मिळतें, तें पुण्य नुसत्या शिवदर्शनानें मिळतें. (११) उमामहेश्वरांचा संवाद सोन्याचे दहा पर्वत दिले असतां, किंवा सोळा महादानें दिलीं असतां, किंवा दहा गायी दिल्या तर, जें पुण्य मिळतें, तें पुण्य शिवलिंग दर्शनानें मिळतें. (१२) शिवलिंग दर्शनानें प्राणी निर्मल व पापरहित होऊन शुद्ध स्फटिकाप्रमाणें निर्मळ होऊन, शुद्ध सोन्याच्या कांतीप्रमाणें त्याची अंगकांति होते. हे देवी, माझी पूजा जो करतो तो निर्मळ शरीराचा होतो. (१३) ग्रंथांतरांत ह्मटलें आहे कीं, अभक्ष्य भक्षण करणारा असो, ब्रह्महत्या करणारा असो, मातृहत्या करणारा असो, पिता, बाल, गायी, स्त्री, शूद्र यांचा घात करणारा असो, (१४) परक्याचे दोष काढणारा, परगुणाची निंदा करणारा, कृपण, खोटें बोलणारा, मणि, रत्न, चोरणारा यांपैकीं कोणी असो, हे पुत्रा, तो जरी सर्व पापमय असला तरी त्यानें शिवलिंग दर्शन घेतलें तर तो तात्काळ मुक्त होतो; (१५) व त्याला पूर्व जातीचें स्मरण होतें व ऐश्वर्य, विद्या, ज्ञान, प्रजा, सुख वगैरेंचा लाभ होतो अज्ञानानें किंवा भीतीनें जरी शंकराचें दर्शन घेतलें, तरी त्याला ऐश्वर्य वगैरे सर्व मिळतें. (१६) लिंगपुराणांत लिहलें आहे कीं,—परमेशान, भव उमापति, शर्व यांची पूजा एकवार किंवा प्रसंगानुसार करून जो दर्शन घेतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो. (१७) शिवधर्मांत ह्मटलें आहे कीं,—लिंगाचें दर्शन मोठें पुण्यकर आहे, दर्श-

लिंगं महापुण्यं सर्वदेवनमस्कृतम् ॥१७॥ यः स्पृशेदपि पाणिभ्यां न स पापैः प्रलिप्यते ॥१८॥ उमामहेश्वरसंवादे ॥ करांगन्यासशुद्धिश्च देहशुद्धिस्तथैव च ॥ सर्वशुद्धिर्भवेन्नित्यं लिंगस्पर्शनदर्शनात् ॥१९॥ मातृहा पितृहा चैव वीरहा भ्रूणहाऽपि वा ॥अमंत्रो वा शिवं स्पृष्ट्वा सर्वपापैः प्रमुच्यते ॥२०॥

इति श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने शिवलिंगदर्शनस्पर्शनमाहात्म्यं नाम द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

नापेक्षां स्पर्श शुभकर आहे, शिवलिंग मोठें पुण्यकर असून शिवलिंगाला सर्व देव नमस्कार करतात. (१८) नुसत्या हातानें शिवलिंगाचा स्पर्श केला तरी तो पापापासून मुक्त होतो. (१९) उमामहेश्वरांचा संवादः— लिंगाच्या दर्शनानें व स्पर्शनानें करन्यासशुद्धि होते. व अंगन्यासाची शुद्धि होते, देहशुद्धि होते, व सर्व शुद्धि होते. (२०) मातृहत्या करणारा, पितृघाती, वीरघाती, बालघाती, मंत्रग्रहण न केलेला यांपैकीं कोणीही शिवलिंग स्पर्श केला तर ते सर्व पापांपासून मुक्त होतात.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील शिवलिंगदर्शनस्पर्शनमाहात्म्य नांवाचा बेचाळिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ एकपादपुराणे ॥ कैलासशिखरासीनं देवदेवं जगद्गुरुम् ॥ कमलोदरसंकाशं कमलाक्षं शुभाननम्॥१॥कालपाशनिबद्धानां कालनिर्नाशनं परम् ॥ कालाधारं कलातीतं कालरूपं शिवं परम् ॥२॥ काली कला स्वयं गौरी कांता कमललोचना ॥ करौ च मुकुलीकृत्वा कमलालक्षितेक्षणा॥३॥चरणे पतिता देवी सानंदोवाच पार्वती ॥४॥
गौर्युवाच ॥ भगवन्देवदेवेश सर्वज्ञ परमेश्वर ॥ पृच्छामि संशयं देव माहेश्वरहिताय वै ॥५॥ लिंगस्य दर्शनादेव स्पर्शनेनापि किं फलम् ॥ अर्चितेष्टे स्तुते लिंगे फलमाख्याहि शंकर ॥६॥
महेश्वर उवाच ॥ साधु साधु महाभागे भक्तानां भक्तवत्सले ॥ लिंगस्य दर्शनात्पापं क्षयं गच्छति वै प्रिये ॥७॥ स्पृष्टे चैव सदा लिंगे गाणपत्यं भवेत्ततः ॥ अर्चितं भक्तिभावेन दद्यान्मोक्षं न संशयः ॥८॥ अर्चयित्वा तु यो लिंगं स्तुवते भक्तिभावितः ॥ स्तूयमानः स गच्छेत

---

श्रीशिवास नमस्कार असो. एकपादपुराणांत असें सांगितलें आहे. (१) कैलासशिखरावर जगद्गुरु देवाधिदेव शिव बसले होते, तेव्हां ते कमलाच्या गाभ्याप्रमाणें शोभत असून देवाचे डोळे कमलाप्रमाणें दिसत होते. व देवाचें मुख अतिशय सुंदर दिसत होतें. (२) कालपाशांनीं जखडलेल्या लोकांना कालापासून जो सोडवितो, व जो कालाला आधार असून जो कलांच्या पलीकडे आहे, जो कालरूप असून ज्याला परशिव ह्मणतात, त्या शिवाला (३) कमलाप्रमाणें डोळे असणाऱ्या काली, कला, गौरी अशा शिवभार्येनें हात जोडून कमलावर नजर ठेवून (४) त्या देवाला नमस्कार करून, आनंदानें ती ह्मणाली.

(५) पार्वती ह्मणाली—देवाधिदेवा, सर्वज्ञा, परमेश्वरा, भगवन्, देवा, माहेश्वरलोकांच्या हिताकरितां, मी एका शंकेविषयीं प्रश्न करित्ये. (६) तो प्रश्न असा कीं, लिंगाच्या दर्शनानें व स्पर्शनानें काय फल मिळतें? हे शंकरा, इष्टलिंगाची स्तुति केली पूजा केली तर काय फल मिळतें? तें सांगा.

(७) महेश्वर ह्मणाले—महाभागे, भक्तवत्सले, पार्वती, फार चांगलें. हे प्रिये, लिंगाचें दर्शन घेतलें तर पाप नष्ट होतें. (८) शिवलिंगाचा नेहमीं स्पर्श केला तर गाणपत्य मिळतें. भक्तिपूर्वक शिवलिंगपूजा केली तर मोक्ष मिळतो. यांत संशय नाहीं. (९) शिवलिंगपूजा करून जो त्याची भक्तीनें स्तुति करतो, तो स्तुति करणारा

रुद्रलोकं हि मानवः ॥९॥ श्रृणु देवि प्रवक्ष्यामि लिंगाराधनतः फलम्॥ सर्वदानफलं देवि सर्वतीर्थफलं च यत् ॥१०॥ सर्वयागफलं यच्च यच्च पुण्यं तपोधिके ॥ तत्सर्वं समवाप्नोति परत्र सुखमेधते ॥११॥ लिंगस्याभ्यर्चनेनैव सर्वपापक्षयो भवेत् ॥ सर्वदानफलावाप्तिर्भवतीह न संशयः ॥१२॥ तीर्थकोटिसहस्रेषु कृतस्नानस्य यत्फलम् ॥ तत्फलं समवाप्नोति लिंगस्याभ्यर्चने कृते ॥१३॥ यानि कानि च तीर्थानि चासमुद्रात्सरांसि च ॥ स्नाने यत्फलमाप्नोति लिंगस्याभ्यर्चनेन तत् ॥१४॥ मेरुपृष्ठे प्रयागे च गंगासागरनैमिषे ॥ हिमवन्ते तपस्तप्तं तत्फलं लिंगपूजने ॥१५॥ चांद्रायणसहस्राणि तप्तकृच्छ्रशतानि च ॥ सर्वव्रतानि जीर्णानि लिंगस्याभ्यर्चने कृते॥१६॥ गवां कोटिसहस्रस्य यज्ञकोटिशतस्य च ॥ दाने तत्फलमाप्नोति सकृदभ्यर्चिते शिवे ॥१७॥ सकृदभ्यर्चिते लिंगे दिवि शुध्यंति मानवाः॥ सिद्धाः शिवपुरं यांति क्रीडन्ते कालमक्षयम् ॥१८॥भूलोकोऽथ भुवर्लोकः स्वर्लोकश्च महस्तथा ॥ जनस्त-

---

मानव आपण स्वतः लोकांकडून स्तुति करवून घेत रुद्रलोकाला जातो. (१०) हे देवी, लिंगाराधनेचें फळ सांगतों ऐक. सर्व दानांचें फळ जें असेल, व सर्व तीर्थांचें फळ जें असेल, (११) सर्व यागांचें फळ जें असेल, व सर्व तपांचें फळ जें असेल तें सर्व फळ एका शिवलिंगपूजेनें मिळतें ; व परलोकीं सुख मिळतें. (१२) लिंगाच्या पूजेनेंच सर्व पापांचा क्षय होतो. सर्व दानफलाची प्राप्ति लिंगपूजेनें होते यांत संशय नाहीं. (१३) कोटि हजार तीर्थांमध्यें स्नान केलें तर जें फळ मिळतें, तें फळ लिंगपूजेनें मिळतें. (१४) जीं कांहीं तीर्थें असतील, व समुद्रापर्यंत सरोवरें जितकीं असतील तितक्यांत स्नान केलें तर जें कांहीं फळ मिळतें, तें फळ शिवपूजेनें मिळतें. (१५) मेरुपृष्ठावर, प्रयाग, गंगासागरसंगम, नैमिष, हिमालय, वगैरे ठिकाणीं तप केलें तर जें कांहीं फळ मिळतें, तें फळ लिंगपूजेनें मिळतें. (१६) सहस्र चांद्रायणांचें फळ, शंभर तप्त कृच्छ्रांचें फळ, सर्व व्रतांचें फळ शिवलिंगपूजेनें मिळतें. (१७) कोटि हजार गोदानांचें फळ जें असेल, शंभर कोटियज्ञांचें फळ जें असेल, तें फळ एकवार केलेल्या शिवपूजेनें मिळतें (१८) एकवार शिवलिंगपूजा जे मानव करतील, ते स्वर्गसुख भोगतील. शिवपूजेनें जे सिद्ध झालेले असतात ते शिवपुरांत अक्षय कालपर्यंत क्रीडा करतात. (१९) भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक, सत्यलोक असे हे सात लोक

पस्ततस्सत्यं सप्त लोकाः प्रकीर्तिताः॥१९॥सकृदभ्यर्चिते लिंगे तेषु वासो विधीयते॥ जन्मकोटिसहस्राणि संचरन्तश्च योनिषु॥२०॥सकृदभ्यर्चिते लिंगे मुक्ताः संसारबंधनात्॥ त्रुटिः कला निमेषांशकाष्ठार्धप्रहरं तथा॥२१॥येऽर्चयंति महादेवं ते यांति परमां गतिम्॥ सकृदभ्यर्चितेलिंगे गर्भजन्म न विद्यते॥२२॥ सदा समर्चयेद्यस्तु स याति परमां गतिम्॥ संसारे दुःखकांतारे निमग्नश्च महातपे॥२३॥ चक्रवद्भ्रमते देवि लिंगार्चनविवर्जितः॥न पूजयंति ये लिंगमिष्टापूर्त्यै तु मोहिताः॥२४॥योनिकोटिसहस्रेषु निर्गच्छन्ति विशन्ति ते॥ स्वर्गे यज्ञफलं मुक्त्वा दाता यज्ञस्य यत्फलम्॥२५॥ गर्भवासेषु जायेत लिंगार्चनविवर्जितः॥ गाणपत्यं तथा मोक्षो न तु पूर्त्यै न जायते॥२६॥लिंगार्चनरतानां च गर्भजन्म न विद्यते॥ गर्भवासभयाद्भीता लिंगार्चनपरायणाः॥२७॥ एते मम गणा देवि भवंति च सुशोभने॥ गर्भवासे महद्दुःखं यस्त्विदं च्छेत्तुमिच्छति॥२८॥ सोऽभ्यर्चयेत्सदा लिंगं भक्तिभावेन शांकरम्॥ वैवस्वतभयं क्वास्ति तथा मरणजन्मनोः॥२९॥ यस्तु पूजयते देवि

---

होत. (२०) कोटिहजार योनींत संचार करणाऱ्या प्राण्यानें एकवार शिवपूजा केली तर तो वर सांगितलेल्या लोकांत राहतो. (२१) एकवार लिंगपूजा केली असतां प्राणी संसार बंधनापासून मुक्त होतात. त्रुटि, कला, निमिष, अंश काष्ठा, अर्धप्रहरपर्यंत. (२२) जे शिवपूजा करतात, ते उत्तम गतीला जातात. एकवार लिंगपूजा केली तर पुनः मनुष्य जन्माला येत नाहीं. (२३) नेहमीं जो शिवपूजा करतो, तो उत्तम गतीला जातो. दुःखरूपी अरण्य अशा संसारांतल्या मोठ्या उन्हांत (२४) जो चक्राप्रमाणें फिरतो, त्यानें शिवपूजा केली नाहीं ह्मणून त्याची अशी अवस्था झाली. इष्टापूर्तीला मोहित होऊन जे शिवलिंगपूजा करीत नाहींत, (२५) ते लोक कोटिहजार योनींत जातात, व येतात. यज्ञाचें फळ स्वर्गांत भोगून व दाता यज्ञाचें फळ भोगून (२६) गर्भवासाला जातो; कारण त्यानें लिंगपूजा केली नाहीं. यज्ञयाग केल्यानें गाणपत्य किंवा मोक्ष मिळत नाहीं. (२७) शिवलिंगपूजेंत रत असलेल्या लोकांना पुनर्जन्म नाहीं. गर्भवासाच्या भीतीनें लोक शिवपूजा करतात. (२८) हे मंगलकर देवी, ते माझे भक्त माझे गण होतात. गर्भवासाचें मोठें दुःख नाश करूं इच्छिणाऱ्या प्राण्यानें (२९) नेहमीं भक्ति ठेऊन शिवलिंगपूजा करावी. मग त्याला यमाची भीति व जननमरणाची भीति कोठून राहील बरें! (३०) हे देवी सुरगणांनीं पूजिलेल्या शिवलिंगाची पूजा जे

लिंगं सुरगणार्चितम्॥ ते जीवंति वरारोहे ये च लिंगार्चने रताः ॥३०॥ नार्चयंति च ये लिंगं जीवन्तो मृतकास्तु ते॥ शिवलिंगं तु यो भक्त्या पूजयेद्भावितात्मना॥३१॥छिन्नपाशो गणो भूत्वा गच्छेच्छिवपुरं नरः॥ अशुचिर्भिन्नमर्यादः सर्वावस्थोऽपि मानवः॥३२॥योऽर्चयेद्भावितो लिंगं स याति परमां गतिम् ॥ कुतः पापं नराणां तु लिंगार्चनरतात्मनाम् ॥३३॥ शुद्धस्फटिकसंकाशाः शिवलोकं व्रजन्ति ते ॥ योऽन्याननुस्मरेत्कामांल्लिंगाराधनतत्परः ॥३४॥ तांस्तान्सर्वानवाप्नोति मानुषो दिवि काम्यया ॥ देवत्वं लोकपालत्वमृषित्वं दानवेशता ॥३५॥ नागत्वमसुरत्वं च लिंगस्याभ्यर्चनाद्भवेत् ॥ यक्षविद्याधरत्वं च पातालं वा नभःस्थलम् ॥३६॥ यक्षिण्याश्चैव भोगश्च लिंगस्याभ्यर्चनाद्भवेत् ॥ ब्रह्माण्डाभ्यंतरे देवि सर्वसर्वोत्तमं फलम् ॥३७॥ तिर्यगूर्ध्वमधश्चैव लिंगस्याभ्यर्चनाद्भवेत् ॥ ब्रह्माण्डाभ्यन्तरे यत्तद्भोगस्थानं प्रकीर्तितम्॥३८॥ लिंगस्याभ्यर्चनाद्देवि लभते नात्र संशयः ॥ विधिना पूजयेल्लिंगं भावेन च सुरेश्वरि ॥३९॥ विमानशतकोटीभिर्वृषारूढः सुपुण्यकृत् ॥ स-

---

करतात, व शिवलिंगपूजेंत रत होतात, ते लोक पुष्कळ कालपर्यंत जीवंत राहतात. (३१) जे लोक इष्टलिंगपूजा करीत नाहींत, ते जीवंत असूनही मेल्यासारखे आहेत. भक्तिभावानें जो शिवलिंगपूजा करतो, (३२) त्याचे सर्व पाश तुटून तो मानव गण होऊन शिवपुराला जातो. अशुचि, मर्यादा सोडलेला, सर्व संकटांत असलेला (३३) अशा प्राण्यानें भक्तीनें शिवपूजा केली, तर तो सद्गतीला जातो. लिंगार्चनांत रत असलेल्या लोकांना पाप कोठून लागेल बरें? (३४) ते लोक शुद्ध स्फटिकाप्रमाणें निर्मळ होऊन शिवलोकाला जातात. लिंगाराधनेंत तत्पर असलेला मानव जे जे मागेल, (३५) ते ते त्याचे मनोरथ स्वर्गांत पूर्ण होतील. देवत्व, लोकपालत्व, ऋषित्व, दानवेशत्व, (३६) नागत्व, असुरत्व वगैरे शिवलिंगार्चनानें मिळतात. यक्षविद्याधरत्व, पाताल, आकाश, (३७) यक्षिणीशीं भोग, वगैरे शिवलिंगपूजेनें मिळतात. हे देवी, ब्रह्मांडामध्यें सर्वांत उत्तम फल जें असेल. (३८) तें खालीं असो, वर असो, मध्यंतरीं असो लिंगार्चनेचें फल ह्मणून समजावें. ब्रह्मांडामध्यें जें भोगस्थान असेल, (३९) तें स्थान शिवलिंगपूजेनें मिळतें, यांत संशय नाहीं. विधिपूर्वक भक्तीनें लिंगपूजा केली असतां (४०) त्या पुण्यकर्म्याला शेंकडों कोट्यावधि विमानें बसावयास मिळतात, व तो वृषावर बसतो

गच्छति परं स्थानं यत्र देवो महेश्वरः ॥४०॥ क्रीडते विविधैर्देवैर्वर्षकोटिशतत्रयम् ॥ यक्षाणां तु सहस्रेण अप्सराणां शतैस्तथा ॥४१॥ क्रीडते शिवलोके तु यो लिंगं चार्चयेत्प्रिये ॥ कामासक्तोऽपि यो देवि लिंगाराधनभावितः ॥४२॥ कामरूपमवाप्नोति क्रीडते च शिवाग्रतः ॥ यं यं कामयते कामं तं तं लिंगार्चनाल्लभेत् ॥४३॥ न लिंगेन विना सिद्धिर्दुर्लभं परमं पदम् ॥ गतिर्न जायते देवि यावल्लिंगं तु नार्चयेत् ॥४४॥ स्नानं जपश्च सत्यं च नियमाराधनानि च ॥ शिवलिंगार्चनस्यैतत्कलां नार्हन्ति षोडशीम् ॥४५॥ धर्ममाचरितं यच्च त्रैलोक्ये दिवि च स्थितम् ॥ शिवलिंगार्चनस्यैतच्चाण्वंशं न च पूरयेत् ॥४६॥ वैष्णवे च तथा ब्राह्मे लोकपालाष्टकें तथा ॥ पैतृकेषु च लोकेषु दिवि देवालयेषु च ॥४७॥ विद्याधरे च गांधर्वे यक्षरक्षःपिशाचके ॥ गणे गरुडनागेषु तथा वै किन्नरेषु च ॥४८॥ पातालेष्वथ स्वर्गेषु दानवेषु च सुंदरि ॥ आराधितो महादेवि लिंगमूर्तिर्महेश्वरः ॥४९॥ ब्रह्मा विष्णुस्तथा शक्रो लोकपालास्सदेवताः ॥ लिंगार्चनरता एते मानुषेषु च का

---

नंतर जेथें महेश्वर आहे, त्या श्रेष्ठ स्थानाला तो जातो. (४१) तीन शंभर कोटि वर्षेपर्यंत नाना तऱ्हेचे खेळ खेळत राहतो. हजारो यक्षांसह शेंकडो अप्सरांसह (४२) शिवलोकांत क्रीडा करीत राहतो. हे प्रिये, शिवलिंगपूजा केली तर हें सुख मिळतें. हे देवी, मनुष्य कामासक्त (विषयलंपट) होऊनही लिंगाराधनेंत तत्पर राहील तर (४३) तो वाटेल तसें रूप घेऊन शिवासमोर क्रीडा करीत राहतो. जें जें मागावयाचें असेल, तें तें शिवलिंगार्चना केली तर मिळतें. (४४) शिवलिंगार्चनावांचून सिद्धि मिळत नाहीं, व परम दुर्लभ पद मिळत नाहीं. हे देवी, शिवलिंगाची पूजा केल्यावांचून सद्गति मिळत नाहीं. (४५) स्नान, जप, सत्य, नियम, आराधना वगैरे शिवलिंगपूजेच्या सोळाव्या अंशाची बरोबरी करूं शकत नाहींत.(४६) त्रैलोक्यामध्यें किंवा स्वर्गामध्यें जें कर्माचरण केलें असेल, तें शिवलिंगपूजेच्या अणु अंशाच्या (फार थोड्या अंशाच्या) बरोबरीचें होत नाहीं. (४७) विष्णुलोक, ब्रह्मलोक, अष्टलोकपालांचे लोक, पितृलोक, स्वर्गलोक, देवालय, (४८) विद्याधरलोक, गंधर्वलोक, यक्षलोक, राक्षसलोक, पिशाचलोक, गणलोक, गरुडलोक, नागलोक, किन्नरलोक, (४९) पाताल, स्वर्ग, दानवलोक यां लोकांमध्यें वास करणाऱ्या प्राण्यांनीं शिवलिंगमूर्ति महेश्वराची पूजा केली आहे. (५०) ब्रह्मा, विष्णु, इंद्र, लोकपाल, इतर देवता वगैरे शिवलिंगपूजा करतात, तर यःकश्चित मानवांची किंमत काय ?

कथा ॥५०॥ असुरैर्दानवैश्चैव पिशाचोरगराक्षसैः ॥ आराधितं परं लिंगं प्राप्तास्ते सिद्धिमुत्तमाम् ॥५१॥ स्थावरे जंगमे चैव भूतग्रामे चतुर्विधे ॥ स्वर्गेऽप्यथ च पाताले त्रैलोक्ये सचराचरे ॥५२॥ नास्ति लिंगात्परं देवि मूढाः क्लिश्यन्ति चान्यथा ॥ एष वै कथितो देवि लिंगार्चनविनिर्णयः ॥५३॥ लिंगार्चनात्परं श्रेष्ठं न भूतं न भविष्यति॥५४॥ शिवधर्मे ॥ पूर्वमेकार्णवे घोरे नष्टे स्थावरजंगमे ॥ मध्ये समुत्थितं लिंगमैश्वरं तैजसं परम् ॥ ज्वालामालावृतं दिव्यमप्रमेयमनामयम् ॥५५॥ कल्पान्ते तत्र लीयंते वर्धन्ते सर्वदेवताः ॥ दक्षिणे लीयते ब्रह्मा वामतश्च जनार्दनः ॥५६॥ हृदये चैव गायत्री सर्ववेदोत्तमोत्तमा ॥ लीयन्ते मूर्ध्नि वै वेदाः सषडंगपदक्रमाः ॥५७॥ जठरे लीयते सर्वं जगत्स्थावरजंगमम् ॥ पुनरुत्पद्यते तस्माद्ब्रह्माद्यं सचराचरम् ॥५८॥ आकाशं लिंगमित्याहुः पृथिवी तस्य पीठिका ॥ आलयः सर्वभूतानां लयनाल्लिंगमुच्यते ॥५९॥ यस्तु पूजयते नित्यं लिंगं त्रिभुवनेश्वरम् ॥ स स्व-

---

(५१) असुर, दानव, पिशाच, सर्प, राक्षस, यांनीं शिवलिंगाची आराधना केली ह्मणून त्यांना उत्तम सिद्धि मिळाली. (५२) स्थावर, जंगम, चतुर्विध ( चारप्रकारचे ) प्राणी, स्वर्ग, पाताल, चराचर लोकपाल या सर्वांना (५३) शिवलिंगाशिवाय गति मिळतच नाहीं. हे देवी हे मूर्ख निष्कारण क्लेश भोगतात. हे देवी, ह्या शिवलिंगार्चनाचा निर्णय तुला सांगितला. (५४) शिवलिंगपूजेपेक्षां श्रेष्ठ दुसरें कोणतेंही झालें नाहीं, आतां सध्यां नाहीं, पुढें होणार नाहीं. (५५) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं,—पूर्वी जिकडे तिकडे समुद्रच झाला असतां, स्थावर जंगम सर्व नष्ट होत असतां, समुद्राच्या मध्यभागीं तेजस्वी असें ईश्वराचें लिंग प्रकट झालें. त्याच्या सभोंवतीं ज्वाळा पसरलेल्या असून तें सर्वोत्कृष्ट दिसत होतें, व त्याचें प्रमाण करितां येत नसून तें अनामय होतें. (५६) प्रलयाच्या वेळीं त्या लिंगांतच सर्व देवता लीन होतात, व सृष्टीच्या वेळेस तेथूनच वाढावयास लागतात. उजवीकडे ब्रह्मा लीन होतो, व डावीकडे विष्णु लीन होतो. (५७) सर्व वेदांत श्रेष्ठ अशी सावित्री गायत्री त्याच्या हृदयांत लीन होते. षडंग पदक्रमांसह सर्व वेद त्याच्या डोक्यांत लीन होतात. (५८) स्थावर जंगमरूप जग त्याच्या पोटांत लीन होतें. त्याच्यापासून पुनः ब्रह्मादिदेवांसह चराचर जग उत्पन्न होतें. (५९) आकाशाला लिंग असें ह्मणतात, व पृथ्वीला पीठ असें ह्मणतात. सर्व प्राण्यांचें तें घर असून तेथेंच सर्व लीन होतात, यामुळें त्याला लिंग असें नांव पडलें. (६०)त्रि-

र्गमोक्षराज्यस्य क्षिप्रं भवति भाजनम् ॥६०॥ इंद्रनीलमयं लिंगं विष्णुरर्चयते सदा ॥ विष्णुत्वं प्राप्तवांस्तेन साद्भुतैकं सनातनम् ॥६१॥ ब्रह्मा पूजयते नित्यं लिंगं शैलमयं शुभम् ॥ तस्य संपूजनात्तेन प्राप्तं ब्रह्मत्वमुत्तमम् ॥६२॥ शक्रोऽपि देवराजेंद्रो लिंगं मणिमयं शुभम् ॥भक्त्या पूजयते नित्यं तेन शक्रत्वमाप्तवान् ॥६३॥ लिंगमन्नमयं पुण्यमग्निर्यजति भावितः ॥ अग्नित्वं प्राप्तवांस्तेन तेजोभूतमनिंदितम् ॥६४॥ स्फाटिकं निर्मलं लिंगं वरुणोऽर्चयते सदा ॥ तेन तद्वरुणत्वं हि प्राप्तं बुद्धिबलान्वितम् ॥६५॥ वायुः पूजयते भक्त्या लिंगं पैत्तलजं शुभम् ॥ वायुत्वं तेन संप्राप्तमनौपम्यगुणान्वितम्॥६६॥ लिंगं हेममयं कान्तं धनदोऽर्चयते सदा ॥ तेनासौ धनदो देवो धनदत्वमवाप्नुयात्॥६७॥ ताम्रं लिंगं सदा कालं भक्त्या देवो दिवाकरः ॥ यजते विधिवत्तेन प्राप्तं सूर्यत्वमुत्तमम्॥६८॥ मुक्ताफलमयं लिंगं सोमः पूजयते सदा ॥तेन सोमोऽपि संप्राप्तः सोमत्वं सततोज्ज्वलम् ॥६९॥ विश्वेदेवा महात्मानो रौप्यं लिंगं मनोहरम् ॥ यजन्ते विधिवद्भक्त्या तेन विश्वत्वमाप्नुयुः ॥७०॥ वसवः कांस्यकं लिंगं पूजयंति विधानतः ॥ प्राप्तवन्तो महात्मानो व-

---

भुवनाधिपति शिवलिंगाची पूजा जो करतो, तो स्वर्ग, मोक्षाचा, व राज्याचा मालक लौकरच होतो. (६१) इंद्रनीलमय लिंगाची पूजा विष्णु नेहमीं करतो. ह्मणूनच अद्भुत सनातन असें विष्णुपद त्याला मिळालें. (६२) शैलमय लिंगाची पूजा ब्रह्मदेव निरंतर करतो, ह्मणून त्याला उत्तम ब्रह्मपद मिळालें. (६३) मणिमय लिंगाची पूजा इंद्र भक्तीनें निरंतर करतो, ह्मणून त्याला इंद्रपद मिळालें. (६४) अन्नमयलिंगाची पूजा अग्नि निरंतर करतो ह्मणून तेजस्वी अनिंदित असें अग्निपद त्याला मिळालें. (६५) निर्मळ स्फटिकाचें लिंग घेऊन वरुण निरंतर पूजा करतो, ह्मणून बुद्धि बल यांनीं युक्त असें वरुणपद त्याला मिळालें. (६६) पितळेचें लिंग घेऊन वायु निरंतर पूजा करतो, ह्मणून अनुपम गुणांनीं युक्त असें वायुपद त्याला मिळालें. (६७) कुबेर सोन्याच्या लिंगाची पूजा करतो ह्मणून कुबेराला कुबेरत्व मिळालें. (६८) सूर्य नेहमीं तांब्याच्या लिंगाची पूजा विधिपूर्वक करतो ह्मणून त्याला सूर्याची उत्तम पदवी मिळाली. (६९) चंद्र हा मोत्याच्या लिंगाची पूजा नेहमीं करतो, ह्मणून परमप्रकाशमान सोमपदवी त्याला मिळाली. (७०) रुप्याचें सुंदर लिंग करून महात्मे विश्वेदेव विधिपूर्वक भक्तीनें पूजा करतात ह्मणून त्यांना विश्वेदेवत्व मिळालें. (७१) अष्टवसु विधानपूर्वक काशाच्या लिंगाचीं

सुत्वं सुभहोदयम् ॥७१॥ अश्विनौ पार्थिवं लिंगं पूजयन्तौ विधानतः ॥ तेन तावश्विनौ देवौ दिव्यदेहं गताबुभौ ॥७२॥ सर्वलोहमयं लिंगं यजन्ते मातरः सदा ॥ मातृत्वं प्राप्नुयुस्तेन सर्वलोकेषु दुर्लभम् ॥७३॥ कृष्णायसमयं लिंगं पूजयन्त्यसुरोत्तमाः ॥ राक्षसाश्च महात्मानस्तेन तेऽमितविक्रमाः ॥७४॥ त्रपुसीसमयं लिंगं पिशाचाः पूजयंति ते ॥ दिव्यैश्वर्यसमायुक्ताः प्रयांति परमं पदम् ॥७५॥ त्रैलोहकमयं लिंगं यजन्ते गुह्यकादयः ॥ तेन भोगफलोपेताः प्रयांति परमं पदम् ॥७६॥ प्रवालकमयं लिंगं यजंते पन्नगोत्तमाः ॥ तेन नागाः सुभोगाढ्याः प्राप्तास्ते परमं पदम् ॥७७॥ एवं देवाः सगंधर्वाः सयक्षोरगराक्षसाः ॥ पूजयंति सदाकालमीशानं सुरनायकम् ॥७८॥ ये वांच्छंति महाभोगान्राज्यं वा त्रिदशालयम् ॥ तेऽर्चयंतु सदा भक्त्या हरस्य चरणांबुजम् ॥७९॥ ब्रह्मणः सृष्टिकर्तृत्वं विष्णोर्दानवमर्दनम् ॥ इंद्रस्य स्वर्गराज्यं च शिवपूजाविधेः फलम् ॥८०॥ व्यासस्य कपिलस्यापि विद्याप्राप्तिर्यदद्भुतम् ॥ अप्राप्यं प्राप्यते यैस्तच्छिवपूजाविधेः फलम् ॥८१॥ द्वारे-

---

पूजा करतात, ह्मणून अत्युत्कृष्ट वसुपद त्यांना मिळालें. (७२) विधानपूर्वक पार्थिवलिंगाची पूजा अश्विनीदेव करतात ह्मणून अश्विनीदेवांचें शरीर अतिशय सुंदर झालें. (७३) सर्व लोहमय लिंगाची पूजा मातृगण करतात ह्मणून सर्व लोकांत दुर्लभ असें मातृपद त्यांना मिळालें. (७४) काळ्या लोखंडाच्या लिंगाची पूजा दैत्य करतात, ह्मणून व राक्षसही त्याचीच पूजा करतात ह्मणून ते मोठे पराक्रमी झाले. (७५) शिशाचें लिंग करून पिशाच पूजा करतात ह्मणून उत्तम ऐश्वर्यानें युक्त होऊन परपदाला ते जातात. (७६) गुह्यक वगैरे त्रिलोहाचें लिंग करून पूजा करतात, ह्मणून भोगरूप फलांनीं युक्त होऊन परपदाला जातात. (७७) मोठ मोठे सर्प पोंवळ्याच्या लिंगाची पूजा करतात ह्मणून उत्तम भोगांनीं युक्त होऊन परपदाला जातात. (७८) याप्रमाणें गंधर्व, यक्ष, राक्षस, सर्प वगैरे प्राणी नेहमीं सुरश्रेष्ठ ईशाची पूजा करतात. (७९) जे लोक महाभोगाची, राज्याची, स्वर्गाची इच्छा करतात, त्यांनीं सर्वदां भक्तीनें शिवचरणांची पूजा करावी. (८०) ब्रम्ह्याला सृष्टिकर्तृत्व, विष्णूला दानव मारण्याचा अधिकार, इंद्राला स्वर्गाचा अधिकार हे सर्व शिवपूजा केल्यामुळें मिळालेले आहेत. (८१) व्यास, कपिल यांना विद्याप्राप्ति शिवपूजेनेंच झाली आहे. अप्राप्यवस्तूची प्राप्ति शिवपूजेनेंच होत असते. (८२) दारांत मदोन्मत्त हत्ती असणें, घरांत वायुवेगासारखे वेगवान

षु मत्तमातंगा वायुवेगास्तुरंगमाः ॥ पूर्णेन्दुवदना नार्यः शिवपूजाविधेः फलम् ॥८२॥ भवनानि मनोज्ञानि विभ्रमाभरणाः स्त्रियः ॥ धनं च तृप्तिपर्यन्तं शिवपूजाविधेः फलम् ॥८३॥ सौभाग्यं कांतिमद्रूपं सत्यं त्यागः प्रवक्तृता ॥ शौर्यं च जगति ख्यातिः शिवपूजाविधेः फलम् ॥८४॥ विद्या रूपं धनं सौख्यं सत्कुलं रोगनाशता ॥ स्वर्गो राज्यं च मोक्षश्च शिवपूजाविधेः फलम् ॥८५॥ यो न पूजयते मोहाल्लिंगं त्रिभुवनेश्वरम् ॥ न च स्वर्गस्य मोक्षस्य न राज्यस्य च भाजनम् ॥८६॥ नास्ति लिंगार्चनात्पुण्यमन्यदभ्यधिकं क्वचित् ॥ अग्निहोत्राश्च वेदाश्च यज्ञाश्च बहुदक्षिणाः ॥८७॥ शिवलिंगार्चनस्यैते कोट्यंशेनापि नो समाः ॥ यो ददाति गवां लक्षं दोग्ध्रीणां वेदपारगे ॥८८॥ एकाहमर्चयेल्लिंगं तस्य पुण्यं ततोऽधिकम्॥मासे मासे तु योऽश्नीयाद्यावज्जीवं द्विजोत्तमाः ॥८९॥ योऽर्चयेच्च सकृल्लिंगं सममेतन्न संशयः॥ सदा यजति यज्ञेन सदा दानं प्रयच्छति ॥९०॥ सदा वै वायुभक्षः स्यात्सकृदभ्य-

---

घोडे असणें, पूर्ण चंद्रासारखें मुख असलेल्या बायका घरांत असणें हें शिवपूजेचें फल आहे, असें जाणावें. (८३) सुंदर सुंदर घरें, विलासवती बायका, विपुल धन इत्यादि पदार्थ जवळ असणें शिवपूजेचें फल आहे, असें जाणावें. (८४) सौभाग्य, सुंदर रूप, सत्य, औदार्य, वक्तृत्व, शौर्य, जगांत ख्याति, हे सर्व शिवपूजेचें फल आहे. (८५) विद्या, रूप, धन, सौख्य, सद्वंश, रोगनाश, स्वर्ग, राज्य, मोक्ष हीं सर्व शिवपूजेनें मिळतात. (८६) त्रैलोक्याधिपति शिवलिंगाची जो मोहामुळें पूजा करीत नाहीं, तो प्राणी स्वर्ग, मोक्ष, राज्य, यांला पात्र होत नाहीं. (८७) शिवलिंगार्चनापेक्षां जास्त पुण्य कशानेंही मिळत नाहीं. अग्निहोत्र, वेद, पुष्कळ दक्षिणा असलेले यज्ञ हे सर्व (८८) शिवलिंगपूजेच्या कोटि अंशाची देखील बरोबरी करीत नाहींत. वेदपारंगत ब्राह्मणाला जो एक लाख दुभत्या गायी देतो, (८९) त्याचे पुण्यापेक्षां एक दिवस केलेल्या शिवलिंगपूजेचें पुण्य अधिक आहे. ब्राह्मणहो आयुष्य असेपर्यंत महिन्याला एकदां आहार घेऊन तप करणाऱ्या मुनीचें पुण्य (९०) व एकवार शिवलिंगपूजा केलेल्या मानवाचें पुण्य हीं दोन्हीं बरोबर आहेत, यांत संशय नाहीं. सर्वदां यज्ञ करणारा, सर्वदां दान करणारा, (९१) सर्वदां वायुभक्षण करणारा, यांचें जें पुण्य असेल, तें पुण्य एकवार शि-

र्चयेच्छिवम् ॥ दीक्षितः स तु मंत्रज्ञो योऽर्चयेत सदाशिवम् ॥९१॥ स यत्फलमवाप्नोति तदेकाग्रमनाः शृणु ॥ सर्ववेदेषु यत्पुण्यं सर्वयज्ञेषु यत्फलम् ॥९२॥ तत्फलं कोटिगुणितं लभते नात्र संशयः ॥ स स्नातः सर्वतीर्थेषु सर्वयज्ञेषु दीक्षितः ॥९३॥ यः पूजयेन्महादेवं स गच्छेत्परमां गतिम् ॥ अप्येकदिवसं भक्त्या यः पूजयति शंकरम् ॥९४॥ सोऽपि याति शिवस्थानं किं पुनर्बहुशोऽर्चनात् ॥ सततं पूजयेद्यो हि मानवस्तु दिने दिने ॥९५॥ न तस्य पुनरावृत्तिः संसारे भवति क्वचित् ॥ येऽर्चयन्ति सदा रुद्रं न ते प्रकृतिमानुषाः ॥९६॥ रुद्रलोकात्परिभ्रष्टास्ते रुद्रा नात्र संशयः ॥ यः सर्वदाऽर्चयेल्लिंगं स रुद्र इव भूतले ॥९७॥ पापहा सर्वमर्त्यानां दर्शनात्स्पर्शनादपि ॥ स्त्री वाथ पुरुषः षंढश्चंडालो द्विजवंशजः ॥९८॥ न जातिभेदो लिंगार्चे सर्वे रुद्रसमाः स्मृताः ॥ यः शिवं पूजयेन्नित्यं चंडालोऽपि जितेंद्रियः ॥९९॥ भवभावसमायुक्तः सोऽपि गच्छेत्परां गतिम् ॥ लिंगार्चनरतो नित्यं महापातकसं-

---

वपूजा केल्यानें मिळतें. जो सदाशिवाची पूजा करतो, तोच मंत्रज्ञ असून तोच दीक्षित आहे. (९२) शिवपूजा करणाऱ्याला जें फल मिळतें, तें सांगतों, लक्ष्य देऊन ऐक. सर्व वेदांमध्यें जें पुण्य आहे, सर्व यज्ञांमध्यें जें पुण्य आहे (९३) त्या पुण्यफलापेक्षां कोटिपटीनें जास्त फल मिळतें, यांत संशय नाहीं. ज्यानें शिवपूजा केली आहे, त्यानें सर्व तीर्थांत स्नान केलें आहे, व सर्व यज्ञांत दीक्षा घेतली आहे, असें समजावें. (९४) जो महादेवाची पूजा करतो, तो श्रेष्ठ गतीला जातो. एकच दिवस भक्तीनें शंकराची पूजा जो करतो, (९५) तो देखील शिवस्थानाला जातो मग पुष्कळ दिवस पूजा करणारा जातोच ह्मणून काय सांगावयाचें आहे? प्रतिदिवशीं सतत जो मानव शिवपूजा करतो (९६) त्याला संसारांत पुनर्जन्म कधींही येत नाहीं. जे सर्वदां रुद्रपूजा करतात, ते कांहीं मूळचे मनुष्य नव्हेत; (९७) परंतु रुद्रलोकापासून भ्रष्ट झालेले रुद्रच आहेत, यांत संशय नाहीं. जो सर्वदां रुद्रपूजा करतो, तो भूमीवरचा रुद्रच होय. (९८) त्याच्या दर्शनानें व स्पर्शनानें सर्व मानवांचीं पापें आपोआप जळून जातात. स्त्री, पुरुष, षंढ, चंडाल, ब्राह्मण कोणी असो, (९९) लिंगपूजेंत जातिभेद मुळींच नाहीं. सर्व रुद्रसमच आहेत. जो चंडाल असून इंद्रियें ताब्यांत ठेवून निरंतर शिवपूजा करतो, (१००) तो देखील श्रीशिवाच्या ठिकाणीं भाव ठेवून श्रेष्ठगतीला जातो. लिंगपूजेंत निरंतर रत असले-

भवैः ॥१००॥ दोषैः कृतैर्न लिप्येत पद्मपत्रमिवांभसा ॥ छित्वा भित्वा च भूतानि हत्वा सर्वमिदं जगत् ॥१०१॥ यजेदेकं विरूपाक्षं न स पापैः प्रलिप्यते ॥ मेरुमंदरसाम्योऽपि राशिः पापस्य कर्मणः ॥१०२॥ ईश्वरं वैद्यमासाद्य नश्यते दुष्टरोगवत् ॥ सर्वावस्थां गतो वापि युक्तो वा सर्वपातकैः ॥१०३॥ शिवमिष्ट्वा नरः सोऽपि प्रयाति परमां गतिम् ॥ न तत्प्रदेशे दुर्भिक्षं न च मारी प्रवर्तते ॥१०४॥ नाकाले म्रियते राजा पूज्यते यत्र शंकरः ॥ क्रीडाल्लोभाद्भयाद्वापि दंभेन कपटेन वा ॥१०५॥ येन केन प्रकारेण धन्यः पूजयते शिवम् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन यथाविभवविस्तरैः ॥१०६॥ पूजनीयः शिवो नित्यं महापुण्यजिगीषया ॥ पूजया सदृशं पुण्यं नास्ति लोकत्रयेऽपि च ॥१०७॥ पूजयैव महादेवः शंकरः परमेश्वरः ॥ नीलकण्ठो विरूपाक्षः शिवो नित्यं प्रसीदति ॥१०८॥ तस्मादेकमना भूत्वा यावज्जीवं प्रतिज्ञया ॥ शिवपूजाविधिं कुर्याद्यदीच्छेत्सिद्धिमात्मनः ॥१०९॥ लिंगे देवो महादेवः साक्षादेव व्यव-

---

त्या प्राण्याचें पातक कितीही मोठें असलें तरी (१०१) त्या पातकाचा लेप त्याला पाण्यांतल्या कमळाप्रमाणें होत नाहीं. सर्व प्राण्यांना तोडून, चिरून, मारून, सर्व जगाचा संहार करून पातक सांचलें असलें तरी (१०२) एकदां शिवाची-पूजा केली तर प्राणी त्या पातकानें लिप्त होत नाहीं. पापकर्मांचे ढीग मेरु किंवा मंदर याच्या प्रमाणें असले तरी, (१०३) ईश्वर नांवाच्या वैद्याकडे गेल्या बरोबर दुष्ट रोगांप्रमाणें तें पाप नष्ट होतें. सर्व संकटांमध्यें पडला असला तरी, सर्व पातकांनीं युक्त असला तरी,(१०४) त्यानें शिवपूजा केली असतां तो मनुष्य देखील श्रेष्ठ गतीला जातो. त्या प्रदेशांत दुष्काळ पडत नाहीं महामारी होत नाहीं. (१०५) अकालमरण येत नाहीं ; कारण तेथें नेहमीं शिवपूजा होत असते. खेळण्यांत, लोभानें, भीतीनें, दंभानें, कपटानें,(१०६)आणखी कोणत्याही प्रकारांनीं जो शिवपूजा करतो, तो धन्य होय. याकरितां आपल्या वैभवाला अनुसरून सर्व प्रयत्नपूर्वक शिवपूजा करावी. (१०७) मोठें पुण्य संपादण्या करितां निरंतर शिवपूजा करावी. तीनही लोकांत शिवपूजेसमान पुण्य दुसऱ्या कशांतही नाहीं. (१०८) महादेव, शंकर, परमेश्वर, नीलकंठ, विरूपाक्ष, शिव हा निरंतर पूजेनेंच प्रसन्न होतो. (१०९) आपल्यास सिद्धीची इच्छा असेल तर जीव असेपर्यंत एकमनानें प्रतिज्ञापूर्वक शिवपूजा करावी. (११०) लोकांवर अनुग्रह करावयाकरितांच महादेव लिंगांमध्यें रा-

स्थितः ॥ अनुग्रहाय लोकानां तस्माल्लिंगं प्रपूजयेत् ॥११०॥ पृथिव्यां यानि तीर्थानि पुण्यान्यायतनानि च ॥ लीयन्ते लिंगमूले तु तस्माल्लिंगं प्रपूजयेत् ॥१११॥ सर्वं लिंगमया लोकाः सर्वं लिंगे प्रतिष्ठितम् ॥ तस्मात्संपूजयेल्लिंगं यदीच्छेत्सिद्धिमात्मनः ॥११२॥ त्वरितं जीवितं याति त्वरितं याति यौवनम् ॥ त्वरितं व्याधिरभ्येति तस्मात्पूज्यः सदाशिवः ॥११३॥ यावन्नायाति मरणं यावन्नाक्रमते जरा ॥ यावन्नेंद्रियवैकल्यं तावत्पूजय शंकरम् ॥११४॥ हन्यात्क्रुद्धोऽपि चाकाशं क्षुधार्तः खादयेत्तुषम् ॥ त्यक्त्वा लिंगार्चनं मूढो मुक्त्यर्थी त्रितयं वृथा ॥११५॥ जातेनात्महृदा येन नार्चितो भगवांच्छिवः ॥ स चिरं संचरत्यस्मिन्संसारे दुःखसागरे ॥११६॥ दुर्लभं प्राप्य मानुष्यं येऽर्चयन्ति सदाशिवम् ॥ तेषां हि सफलं जन्म कृतार्थास्ते नरोत्तमाः ॥११७॥ स्कांदे ॥ शिवरहस्ये ॥ ये नराः सकृदप्यत्र पूजयंति त्रिलोचनम् ॥ ते धन्यास्ते महात्मानस्ते कृतार्थाश्च पंडिताः ॥११८॥ मोहनिद्राप्रसुप्तेऽस्मिन्पशुपाश-

---

हिला आहे, याकरितांच शिवलिंगाची पूजा करावी. (१११) पृथ्वीमध्यें जितकीं तीर्थें आहेत, पुण्यकर क्षेत्रें आहेत, तितकीं सर्व लिंगाच्या मूळांत राहतात, ह्मणूनच शिवलिंगाची पूजा करावी. (११२) आपल्यास सिद्धीची इच्छा असेल तर शिवलिंगपूजा करावी. कारण सर्व लोक लिंगमय असून सर्व कांहीं लिंगाच्या आश्रयानेंच राहिलें आहे. (११३) जीवित लौकरच जातें, तारुण्य लौकरच जातें, लौकरच शरीराला रोग जडतात, ह्मणून सदाशिवाची पूजा करावी. (११४) जोंवर मरण आलें नाहीं, जोंवर जरा आली नाहीं, जोंवर इंद्रियें शिथिल झालीं नाहींत, तोंवरच शंकराची पूजा करून घे. (११५) जो रागावून आकाशाला मारतो, जो भुकेनें व्याकुळ होऊन कोंडा खातो, जो मूर्ख होऊन लिंगपूजा सोडतो, तो जर मोक्षाची इच्छा करील तर वरील तीनही प्रकार जसे व्यर्थ ठरतात, तद्वत ही इच्छा व्यर्थ ठरते. (११६) जो जन्माला येऊन प्रेमानें भगवान् शिवाची पूजा करीत नाहीं, तो पुष्कळ कालपर्यंत दुःखसमुद्र अशा संसारामध्येंच संचार करतो. (११७) दुर्लभ मनुष्यजन्माला येऊन जे सदाशिवाची पूजा करतात, त्यांचें जनन सफल होय, व तेच कृतार्थ होत. (११८) स्कांदपुराणांतील शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, जे मानव एकवार तरी त्रिलोचनाची पूजा करतात, तेच कृतार्थ, धन्य, महात्मे, पंडित होत. (११९) पशुपाशांनीं व्याकुळ

समाकुले ॥ पुरुषाः कृतकृत्यास्ते ये शिवं शरणं गताः ॥११९॥ देशः स एव ता नद्यस्ते च ते च महायनाः ॥ ता एव तिथयः शस्ता यत्र संपूज्यते शिवः ॥१२०॥ उपसर्गाः क्षयं यांति छिद्यन्ते विघ्नपल्लवाः ॥ मनः प्रसन्नतां याति पूज्यमाने महेश्वरे ॥१२१॥ कीर्तिर्जने गतिः स्वर्गे रतिर्मनसि चोत्तमा ॥इति सर्वार्थकृन्नूनं शिवः कस्मान्न सेव्यते॥१२२॥ दृष्टः संपूजितो ध्यातः संस्कृतोऽथ स्तुतोऽपि वा॥यो ददाति नृणां सिद्धिं कस्मान्नार्चयते नृभिः ॥१२३॥ केवलेनांवुना योऽत्र तृष्णातुर इवेश्वरः ॥ तुष्यत्यैश्वर्यदस्तुष्टः स कस्मान्नार्च्यते नृभिः ॥१२४॥ न भीषयति दण्डेन न वाचा वारयत्यपि ॥ ददाति चेप्सितान्भोगान्देवः किं नार्च्यते हि सः ॥१२५॥ अक्रुद्धे सर्वसामान्ये स्वाराध्ये सर्वकामदे ॥ भवे सत्यपि सीदन्ति भविनो यत्तदद्भुतम् ॥१२६॥ वृत्तम् ॥ अम्लाननिर्वाणपदाधिकानि सुधारसेनैव विनिर्मितानि ॥ पुण्यात्मनः कस्यचिदेव यांति शिवार्चनाव्यग्रतया दिनानि ॥१२७॥ नाधन्यः शंकरं स्तौति

---

होऊन मोहनिद्रेनें व्याप्त होऊन गाढ झोपेंतून उठून जे लोक शिवाला शरण जातात, तेच कृतार्थ होत. (१२०) ज्या ठिकाणीं शिवपूजा होते, तोच देश, त्याच नद्या, तेंच मोठें स्थान, व त्याच तिथि होत. (१२१) महेश्वराची पूजा केली असतां उपसर्ग लय पावतात, विघ्नें दूर होतात, मन प्रसन्न होतें. (१२२) लोकांत कीर्ति होते, स्वर्गांत गति मिळते, व मनाला उत्तम रति (सुख) मिळते; असे सर्वार्थ जर साधतात, तर शिवाची पूजा कां करीत नाहीं? (१२३) दर्शनानें, ध्यानानें, अभिषेकादि संस्कार केल्यानें, स्तोत्र केल्यानें जर मानवांना तो सिद्धि देतो, तर त्या शिवाची सेवा कां करूं नये? (१२४) तहानेनें व्याकुळ झालेल्या मानवाला केवळ पाणी दिलें तर त्याची जशी तृप्ति होते, त्याप्रमाणें केवळ जलाभिषेक शिवलिंगावर केला तर तो शिव तृप्त होतो व पाहिजे तें ऐश्वर्य देतो, तर अशा शिवलिंगाची पूजा कां करूं नये? (१२५) शिक्षा देऊन भीति दाखवीत नाहीं, बोलून तिरस्कार करीत नाहीं, मनांत इच्छिलेली वस्तु विन तक्रारीनें देतो, मग त्याशिवाची सेवा कां करूं नये? (१२६) न रागावतां सर्वांस सारखेपणानें इच्छिलेले मनोरथ देणाऱ्या शिवाची आराधना सुखसाध्य असून देखील भविलोक दुःखांत पडतात, याहून आश्चर्य कोणतें आहे? (१२७) रोज ताजें सुख देणारे, अमृतरसानेंच निर्मिलेले, असे दिवस शिवपूजेमध्येंच कोणा पुण्यात्म्याचे जात असतील ते जावोत. (१२८) दुर्दैवी प्राणी शंकराची स्तुति करीत नाहीं,

नाधन्योऽर्च्यते शिवम् ॥ नमत्यधन्यो न त्र्यक्षं नाधन्यो वेत्युमापतिम् ॥१२८॥ लुब्धा व्यसनिनोऽज्ञाश्च न यजंति जगत्पतिम् ॥ अजरामरवन्मूढाश्चेष्टन्ते नरकीटकाः ॥१२९॥ इत्थं सर्वात्मकं लिंगं धर्मकामार्थमोक्षदम् ॥ न यजन्तीह ये मर्त्या ज्ञेयास्ते नररासभाः ॥१३०॥ वृत्तम् ॥ उत्पत्तिसंहारवदेतदध्रुवं निशम्य विश्वं न यजंति ये द्विजाः ॥ ब्रह्माच्युतेंद्रार्चितमव्ययं शिवं कृतांतधुर्याः पशवस्तु तेऽधमाः ॥१३१॥ धर्मार्थकामेष्टफलप्रदं तं स्वर्गापवर्गास्पदहेतुभूतम् ॥ सर्वामयघ्नं न शिवं भजन्ते मुमूर्षवः पथ्यमिवात्र मर्त्याः ॥१३२॥ कामेनालं मोहनिद्राकुलोऽयं हा हा कष्टंदुष्ट एवार्यलोकः॥ नष्टैश्वर्यो नष्टचेष्टाधिकारः क्रोधोन्मत्तो नार्चयत्यष्टमूर्तिं ॥१३३॥ न तत्तपोभिः फलमत्र लभ्यते न वा मखैर्नापि च तीर्थयात्रया ॥ यदाप्यते निर्गुणमेकमव्ययं यथावदाराध-

---

दुर्दैवी प्राणी शिवपूजा करीत नाहीं, दुर्दैवी प्राणी शिवाला नमन करीत नाहीं, व दुर्दैवी प्राणी शिवाला जाणत नाहीं. (१२९) लोभी, व्यसनी, अज्ञानी असे लोक शिवपूजा करीत नाहींत. असे मूर्ख मानवरूपी किडे अजरामराप्रमाणें खुशाल खेळतात. (१३०) धर्म, काम, अर्थ, मोक्ष या चार पुरुषार्थांना देणाऱ्या सर्वात्मक शिवलिंगाची पूजा जे मानव करीत नाहींत, ते प्रत्यक्ष मनुष्यरूपी गाढव आहेत, असें समजावें. (१३१) जननमरणानें युक्त असलेलें हें जग खोटें आहे, असें ऐकूनही जे ब्राह्मण ब्रह्मा, विष्णु, इंद्र इत्यादिकांनीं पूजित झालेल्या शिवाची पूजा करीत नाहींत, ते अधम लोक यमाचें ओझें वाहणारे शुद्ध पशु आहेत. (१३२) धर्म, अर्थ, काम यांत वाटेल तें देणारा, व स्वर्ग मोक्षप्राप्तीला कारण असलेला, सर्व रोग नाश करणारा अशा शिवाचें भजन जे करीत नाहींत, ते लोक पथ्याचा अनादर करणाऱ्या मुमुर्षु (मरणोन्मुख) रोग्याप्रमाणें होत. (१३३) प्रबळ कामाच्या योगानें मोहरूपी झोंप घेत हे लोक व्याकुळ होऊन अजून संसारांत राहिले आहेत, ही फार शोचनीय गोष्ट आहे. सर्व ऐश्वर्य जाऊनही, आपआपल्या व्यापाराचे अधिकार नष्ट झाले असूनही, अजून अष्टमूर्ति शिवाची पूजा करीत नाहींत काय ? अरे अरे अतिशय दुःखाची गोष्ट आहे. (१३४) जें फल तपश्चर्येनें मिळूं शकत नाहीं, जें फल पुष्कळ यज्ञ करूनही मिळत नाहीं, जें फल तीर्थयात्रा करून मिळत नाहीं, तें फल ह्मणजे निर्गुण अव्यय अशा शिवाची प्राप्ति होय. ही शिवप्राप्ति केवळ शिवाराधनेनेंच होत असते या करितां तुह्मी शिवाची

यतां सदाशिवम् ॥१३४॥ ये यजन्ति न देवेशं विषयैश्च विमोहिताः ॥ शोचन्ते ते मृताः पंके लग्ना वनगजा इव ॥१३५॥ कर्मभूमौ हि मानुष्यं जन्मनां नियुतैरपि॥स्वर्गापवर्गफलदं कदाचित्प्राप्यते नरैः ॥१३६॥ तदिदं दुर्लभं प्राप्य नार्चयंतीह ये शिवम् ॥ तेषां हि हस्तिमूर्खाणां विवेकः कुत्र तिष्ठति ॥१३७॥ वृत्तम् ॥ न स्तौति शैलेंद्रसुतापतिं यस्तं पंडितं मूर्खमिवाभिमन्ये ॥ मूर्खोऽपि तत्स्तोत्रकथाप्रवृत्तौ वाचस्पतेरप्यधिको मतो मे ॥१३८॥ तस्मात्तडिल्लतालोलं मानुष्यं प्राप्य दुर्लभम् ॥ शिवं संपूजयेन्नित्यं भक्तिमान्मुक्तिलब्धये ॥१३९॥ वृत्तम् ॥ पितुः पिता तस्य पिता क्व यातो माता क्व याता सुहृदस्तथान्ये ॥ एवं विचिंत्य प्रसभं हि विद्वान्यजेन्महेशानमनिंदितात्मा ॥१४०॥ पुत्रदारागृहक्षेत्रधनधान्यविमोहिनीम् ॥ लब्ध्वैव मा कृथा दर्पं रे रे मां क्षणभंगुराम् ॥१४१॥ कायः सन्निहितापायः संपदः पदमापदाम् ॥ समागमाः सापगमाः सर्वमुत्पादिभंगुरम् ॥१४२॥ आध्यात्मिकं चाधिदैवं

---

आराधना करा. (१३५) विषयांनीं मोहित होऊन शिवाची आराधना जे करीत नाहींत, ते लोक चिखलांत रुतलेल्या वनगजाप्रमाणें (रानहत्ती प्रमाणें) मेले ह्मणून समजावेत. (१३६) स्वर्गमोक्षरूप फल देणारा हा मानवजन्म कर्मभूमींत कोट्यावधि जन्मांनीं केव्हांतरी एकदा क्वचित मिळतो. (१३७) असा दुर्लभ मानवजन्म मिळूनही जे शिवपूजा करीत नाहींत, त्या मदांध लोकांचा विवेक कोठें जातो, हें समजत नाहीं. (१३८) विद्वान असून गिरिजापति शिवाची स्तुति करीत नसेल तर त्याला मूर्ख असें मी समजतों, आणि मूर्ख असून शिवाची स्तुति करीत असेल तर त्याला वृहस्पतीपेक्षांही जास्त विद्वान मानतों. (१३९) याकरितां विजेप्रमाणें चंचल असलेल्या दुर्लभ मानवजन्माला येऊन भक्तिमान प्राण्यानें मुक्ति मिळविण्याकरितां शिवाची सेवा करावी. (१४०) आजा कोठें गेला? पणजा कोठें गेला? आई कोठें गेली? स्नेही कोठें गेले? इतर बंधुवर्ग कोठें गेला? याचा चांगला विचार करून विद्वान प्राण्यानें पुण्यात्मा होऊन शिवपूजा करावी. (१४१) पुत्र, बायको, घर, जमीन, धन, धान्य त्यांच्या योगानें मायापाशांत पाडणाऱ्या माझा लाभ तुला झाला ह्मणून गर्व करूं नको-कारण मी क्षणभंगुर (घटकेंत नाहींसा होणारा) आहे. (१४२) शरीराच्या भोंवतालीं अगदीं जवळ रोग बसलेले असतात, संपत्ति ह्मणजे विपत्तीचें घर आहे, परस्परांचा समागम केव्हांही तुटणार आहे, उत्पन्न होणारे सर्व पदार्थ नाशवंत आहेत. (१४३) आ-

दुःखं चैवाधिभौतिकम् ॥ देवादीनां विदित्वैवं श्रेयस्कामो यजेच्छिवम् ॥१४३॥ पुनर्जन्म पुनर्मृत्युः पुनः क्लेशपरंपराः॥ स घरट्टघटीन्यायो न कदाचिदनीदृशम् ॥१४४॥ तदस्य दग्धसंसारग्रन्थेरत्यन्तदुर्भिदः ॥ परं निर्मूलविच्छेदि क्रियतां तद्भवार्चनम् ॥१४५॥ विपाककटुकान्रम्यान् विषयान् विषसन्निभान्॥ संत्यक्त्वाराधयेद्देवं शंकरं लोकशंकरम् ॥१४६॥ त्यक्त्वा क्रोधं च कामं च लोभं मोहं मदं तथा ॥ जना यजध्वमीशानं समीहितफलप्रदम् ॥१४७॥ व्यापारान्सकलान्त्यक्त्वा पूजयध्वं सदाशिवम् ॥ निकटा इव दृश्यन्ते कृतान्तनगरद्रुमाः ॥१४८॥ क्रियतां मद्वचः कर्णे श्रेयस्यात्मा नियुज्यताम् ॥आदीप्ते भवने कूपः खनितुं नैव शक्यते ॥१४९॥ सत्यं वच्मि हितं वच्मि सारं वच्मि पुनः पुनः ॥ असारे चात्र संसारे सारं देववरार्चनम् ॥१५०॥ एवं प्रलपतोऽत्युच्चैर्यैं न शृण्वंति मे वचः ॥ संधुक्ष्यन्ते कृतान्तेन तदर्थं नरकाग्नयः ॥१५१॥ किमत्र ग्रंथमालाभिः संक्षेपादुपदिश्यते ॥ विमुक्तसर्वव्यापा-

---

ध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक दुःखें देवांना देखील सुटलीं नाहींत, असें जाणून कल्याणेच्छु मानवानें शिवपूजा करावी. (१४४) पुनःजन्मास येणें, पुनः मरणें, पुनः दुःखें भोगणें, याला घरट्टघटीन्याय ( राहटगाडगें ) ह्मणतात. अशी स्थिति दुसऱ्या कशांतही पाहिली नाहीं. (१४५) अत्यंत दुर्भेद्य अशा दुष्ट संसाररूपी ग्रंथीला ( गांठीला ) मुळासह सोडविणारी एक शिवपूजाच आहे, ह्मणून शिवपूजा करा. (१४६) परिणामाला विषाप्रमाणें कडू फळ देणाऱ्या विषयाला सोडून, लोकहो, सुखकर श्रीशंकराची आराधना करा. (१४७) क्रोध, काम, लोभ, मोह, मद हे सर्व सोडून इच्छित फल देणाऱ्या शिवाची पूजा करा. (१४८) सर्व व्यापार सोडून सदाशिवाची पूजा करा. कारण यमराजधानीजवळचीं झाडें फारच जवळ असल्याप्रमाणें दिसतात. (१४९) माझी गोष्ट ऐका तुमचें कल्याण करून घ्या. कारण घराला आग लागल्या नंतर विहीर खणून काय उपयोग? (१५०) खरें सांगतों, हित सांगतों, सर्वांतलें सार पुनः पुनः सांगतों कीं, निःसार संसारांत सार पदार्थ ह्मणजे एक शिवपूजाच आहे. (१५१) याप्रमाणें उंच स्वरानें ओरडणाऱ्या माझें वाक्य ऐका. जे कोणी ऐकत नसतील त्यांच्या करितां यम हा नरकरूपी अग्नीला फुंकून मोठा जाळ करून ठेवतो आहे. (१५२) ग्रंथांच्या माळा घेऊन काय करावयाचें आहे ? ( पुष्कळ ग्रंथ घेऊन काय करावयाचें आहे) ह्मणून थोडक्यांत सांगतों कीं, लोकहो, सर्व व्यापार सोडून ईश्वराची

था जनाः पूजयतेश्वरम् ॥१५२॥ किं वेदैः किं ततः शास्त्रैः किं तपोभिरथ व्रतैः ॥ शिवः संपूज्यतां नित्यमुपदेशोऽयमुत्तमः ॥१५३॥ अयमेव परो धर्मश्चीर्णमेतत्परं तपः ॥ इदमेवाखिलं ज्ञानं पूज्यते यत्सदाशिवः ॥१५४॥ मनस्तद्विद्धि धर्मज्ञं शंकरे यत्प्रवर्तते ॥ सा वाणी वाक्पतिं देवं यस्तौत्यद्भुतमच्युतम् ॥१५५॥ श्रवणौ तौ श्रुतौ याभ्यां सततं तत्कथाः शुभाः ॥ पादौ तौ सफलौ पुंसां शिवायतनगामिनौ ॥१५६॥ ते च नेत्रे शुभायालं याभ्यां संदृश्यते शिवः ॥ अवेहि धर्मज्ञ तथा तत्पूजाकारिणौ करौ ॥१५७॥ तदेव सफलं कर्म शंकरार्चाय यत्कृतम् ॥ यजंति ये विदित्वैवं लिंगमूर्तिं महेश्वरम् ॥१५८॥ लभन्ते तेऽखिलान्कामानिह चामुत्र चाक्षयान् ॥ तस्माद्भक्तिं समास्थाय पूजनीयो महेश्वरः ॥१५९॥ एककालं द्विकालं वा त्रिचतुश्चाष्टमेव वा ॥ यथाशक्त्या यथाकामं तथा संपूजयेच्छिवम् ॥१६०॥ वृत्तम् ॥ ये वामदेवं हि यजंति नित्यं सद्वृत्तशीलाः किल लिंगमूर्तिम्॥ ते ध्वस्तदुःखा हि भवंति मर्त्या भवांबुराशिं विषमं तरंति ॥१६१॥ तस्मात्सर्वैषणां त्यक्त्वा

---

सेवा करा. (१५३) वेदांनीं काय उपयोग होतो ? शास्त्राध्ययनानें काय उपयोग होतो ? तपानें व्रतांनीं, काय होणार आहे ? याकरितां शिवाची पूजा करा, असा माझा उपदेश तुह्मांला आहे. (१५४) हाच श्रेष्ठ धर्म होय हेंच मोठें तप आहे. हेंच मोठें ज्ञान होय. सर्व कांहीं शिवपूजेंतच आहे. (शिवपूजाच सर्व आहे असें जाणावें.) (१५५) शंकराच्या ठिकाणीं जें मन प्रवृत्त होतें; त्यालाच धर्म जाणणारें मन ह्मणतात. जी वाणी ईशाची स्तुति करिते, तीच वाणी होय. (१५६) शुभकर शिवकथा श्रवण करणारे कानच कान होत, शिवालयाला जाणारे पायच सफल पाय होत. (१५७) शिवाला पाहणारे डोळेच डोळे होत, व हे धर्मज्ञा, शिवपूजा करणारे हातच हात आहेत, असें समज. (१५८) शिवपूजेकरितां जें कर्म केलें जातें, तेंच कर्म सफल होय. याप्रमाणें समजून जे लिंगमूर्ति महेशाचीपूजा करतात, (१५९) त्यांना इहलोकीं व परलोकीं सर्व इच्छिलेल्या वस्तु मिळतात ह्मणून भक्ति ठेवून महेश्वराची पूजा करावी. (१६०) एकवेळ, दोनवेळ, तीनवेळ, चारवेळ, आठवेळ यथाशक्तीनें इच्छानुसार शिवपूजा करावी. (१६१) उत्तम वर्तनाचे जे लोक लिंगमूर्ति वामदेवाची पूजा करतात, त्यांच्या सर्व दुःखांचें निरसन होतें व ते या वाईट संसारसमुद्राला तरून जातात. (१६२) याकरितां

शिवैकगतमानसैः ॥ धर्मार्थकाममोक्षार्थं पूज्यो ध्येयश्च शंकरः ॥१६२॥

इति श्रीमन्नीलकण्ठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे शिवाधिक्यकथने शिवलिंगपूजामाहात्म्यं नाम त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥

---

सर्व इच्छा सोडून शिवाच्या ठिकाणीं एकाग्र मन करून धर्म, अर्थ, काम, मोक्ष मिळविण्याकरितां शंकराचें ध्यान करावें व त्याचीच पूजा करावी.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहांतील शिवाधिक्यकथनांतील शिवलिंगपूजामाहात्म्य नांवाचा त्रेचाळिसावा अध्याय संपला.

---

## ॥ अथ चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शिवज्ञानविद्यायाम् ॥ ईश्वर उवाच ॥ सदाचारं प्रवक्ष्यामि सम्यग्ज्ञानस्य साधनम् ॥ यस्मादाचारहीनस्य ज्ञानं निष्फलतां व्रजेत् ॥१॥ सदाचारेण देवत्वमृषित्वं च वरानने ॥ उपागताः कुयोनित्वं मनुष्यास्तद्विपर्यये ॥२॥ आचारहीनः पुरुषो लोके भवति निंदितः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन सम्यगाचारवान्भवेत् ॥३॥ वातुलतंत्रे॥यः शिवाचारसंपन्नो ह्यनाचारेण मिश्रितः ॥ न प्रसादी न चाचारी सर्वभक्षीव वायसः ॥४॥ सती सुतश्च भृत्यश्च दासी गोपस्तथैव च ॥ सर्वे लिंगार्चकं श्रेष्ठमन्यच्चण्डालवद्भवेत् ॥५॥ गृहं क्षेत्रं च बीजं च धान्यानि च धनानि गौः ॥ एतल्लिंगांकितं शुद्धमन्यथा नरकं व्रजेत् ॥६॥ रहस्ये ॥ भक्तहस्तगतं द्रव्यं धनवस्त्रविभूषणम् ॥ नन्दिमुद्रांकितं ग्राह्यं द्रव्यशुद्धिरिहोच्यते ॥७॥ नन्दिमुद्रांकितं क्षेत्रं युक्तं शिवशरण्यकैः ॥ तदेव पावनं क्षेत्रं क्षेत्रशुद्धिरिहोच्यते ॥८॥ भक्तेन यत्कृतं वेश्म लिंग-

---

श्रीशिवास नमन असो. शिवज्ञानविद्येंत सांगितलें आहे कीं, ईश्वर ह्मणाले— (१) चांगल्या ज्ञानाचें साधन अशा सदाचाराला सांगतों. कारण आचारहीन पुरुषाचें ज्ञान निष्फल आहे. (२) सुंदरि पार्वति, सदाचाराच्या योगानें देवत्व येतें, व ऋषित्व येतें. सदाचारानें हीन झाल्यामुळें मानव कुयोनीला जातात. (३) आचारहीन पुरुषाची निंदा सर्व लोक करतात. ह्मणून सर्व प्रयत्नानें चांगला आचार करावा. (४) वातुलागमांत सांगितलें आहे कीं,—जो प्राणी शिवाचारानें संपन्न असून अनाचारही करतो, तो प्राणी प्रसादी नव्हे, व आचारशीलही नव्हे. तो सर्व भक्षण करणाऱ्या कावळ्याप्रमाणें आहे, असें समजावें. (५) सती (बायको), पुत्र, भृत्य (नोकर), दासी, गुराखी वगैरे हे इष्टलिंगपूजा करणारे असतील तर श्रेष्ठ होत नाहींतर त्यांस चांडालाप्रमाणें समजावें. (६) घर, जमीन, बीज, धान्य, धन, गायी हीं सर्व लिंगचिन्हित असतील तर शुद्ध समजावींत नाहीं, तर अशुद्ध व अशा पदार्थांचा उपभोग घेतला तर मनुष्य नरकाला जातो. (७) रहस्यांत सांगितलें आहे कीं,—भक्ताच्या हातांतलें द्रव्य, धन, वस्त्र, दागिने वगैरे हे पदार्थ नंदीच्या चिन्हांनीं युक्त असतील तर ते घ्यावेत, याला द्रव्यशुद्धि ह्मणतात. (८) ज्या क्षेत्राला नंदीचें चिन्ह केलें आहे, व ज्या क्षेत्रांत (शेतांत) शिवभक्त शरण येत असतील तें क्षेत्र शुद्ध होय याला क्षेत्रशुद्धि ह्मणतात. (९)भक्तानें

मुद्रासमन्वितम् ॥ अभक्तस्पर्शनाभावाद्वेश्मशुद्धिरिहोच्यते ॥ ९ ॥ भक्तेन कृतभांडानि शिवमुद्रांकितानि च ॥ जलपाकक्रियायां च भांडशुद्धिरिहोच्यते ॥१०॥ विभूतिसंस्कृतं काष्ठं भक्तानीतं च सुव्रते ॥ तदेव योग्यं काष्ठेषु काष्ठशुद्धिरिहोच्यते ॥११॥ तृणगुल्मलतादीनि भक्तानीतानि चैव हि ॥ संस्कृत्य भस्मना देवि तृणशुद्धिरिहोच्यते॥१२॥ भक्तदारसमुत्पन्नं फलं पत्रादिकं समम् ॥ अथ स्वहस्तपक्वं च शुद्धिस्तांबूलिका मता ॥१३॥ अभक्तदर्शनाभावात्पक्वमन्नं वरानने ॥ शाकं तैलादिकं सर्वं पाकशुद्धिरिहोच्यते ॥१४॥ घृतं दधि पयस्तक्रं माक्षिकं वर्जयेत्ततः ॥ तद्वर्जनं च वै देवि रसशुद्धिरिहोच्यते ॥१५॥ गुरुसंस्कारंमाहात्म्यसंप्रदाययुतो भवेत् ॥ अथवा भवसंस्कारे भवशुद्धिरिहोच्यते ॥१६॥ सर्वभूतदया नित्यं पंचभूतेषु संस्क्रिया ॥ स्वभूतपोषणाभावो भूतशुद्धिरिहोच्यते ॥१७॥ लिंगार्चनविधौ भक्तः काष्ठमौनं स-

---

घर बांधलें तर तें घर लिंगचिन्हानें युक्त करावें. अभक्त लोक त्या घराला न येतील तर त्याला वेश्मशुद्धि ह्मणतात. (१०) भक्तानें केलेल्या भांड्यांवर शिवचिन्ह करावें, व नंतर त्या भांड्यांचा उपयोग स्वयपाकांत व पाणी भरण्यांत करावा. याला भांडशुद्धि ह्मणतात. (११) सुव्रते, देवि भक्तानें आणलेल्या सर्पणावर विभूति टाकून सर्पण घेतलें तर तें कामास योग्य होतें. याला काष्ठशुद्धि ह्मणतात. (१२) भक्तानें आणलेलें गवत, गुल्म, वेली वगैरेवर विभूति टाकून ते पदार्थ घ्यावेत. याला तृणशुद्धि ह्मणतात. (१३) भक्तानें उत्पन्न करून आणलेलीं पानें सुपारी वगैरे घेतलीं असतां किंवा स्वतःच्या हातानें तयार करून घेतलीं असतां, त्याला तांबूलशुद्धि असें ह्मणतात. (१४) स्वयपाक करून तयार केलेलें अन्न अभक्तानें न पाहिलें तर आणि भाज्या तेल वगैरे अभक्तांनें न पाहिलें तरच तें सर्व शुद्ध होय. याला पाकशुद्धि ह्मणतात. (१५) तूप, दहिं, दूध, ताक, मध हे पदार्थ अभक्ताच्या हातून घेऊं नयेत याला रसशुद्धि ह्मणतात. (१६) गुरूच्या संस्कार माहात्म्याच्या सांप्रदायाला अनुसरून (वडिलांच्या आचाराला अनुसरून) किंवा शिवसंस्कारानें युक्त होऊन नेहमीं शुद्ध रहावें. याला भवशुद्धि ह्मणतात. (१७) सर्व प्राण्यांचे ठिकाणीं दया करणें, पंचमहाभूतांचें ठिकाणीं शिवमंत्राचा संस्कार करणें, अभक्त लोकांचें पोषण न करणें याला भूतशुद्धि ह्मणतात. (१८) लिंगपूजा करतांना काष्ठाप्रमाणें मौन धरून बसावें. लिंगावर भावना ठेवावी. याला भाव-

माचरेत् ॥ दत्वा च भावनां लिंगे भावशुद्धिरिहोच्यते ॥१८॥ समयाराधनं नित्यं धनप्राणाभिमानकैः ॥ त्रिसंध्यं ध्यानतो देवि मार्गशुद्धिरिहोच्यते ॥१९॥ रात्रौ मध्ययामे तु सुप्तेष्वखिलजंतुषु ॥ प्रौढप्रसादभोगश्च कालशुद्धिरिहोच्यते ॥२०॥ विनयः सर्वभक्तानां क्रियते हितया गिरा ॥ तद्वाचश्चानुकूल्यं च नयशुद्धिरिहोच्यते ॥२१॥ आसने शयने याने गमनागमने स्थितौ ॥ भक्तेन सह सांगत्यं जनशुद्धिरिहोच्यते ॥२२॥ संस्काराः षड्विधाः प्रोक्ता जलं पुष्पं फलानि च ॥ पत्रं पात्रं तथा गोत्रं भक्तानां भक्तवत्सले ॥२३॥ भक्तहस्तभवे कूपे प्रत्यहं तरुणं जलम् ॥ भस्ममंत्रपवित्रं च गृहीतं जलसंस्कृतिः ॥२४॥ नवकुंभगतं तोयमदृष्टं भविनामपि ॥ तज्जलं लिंगयोग्यं च तथान्यद्वर्जयेत्सुधीः ॥२५॥ अदुष्टानि च पुष्पाणि विमुक्तानि शिलीमुखैः ॥ अन्यान्युपहतान्येवं पुष्पसंस्कारसंभवः ॥२६॥ यानि तानि फलान्येव भक्तहस्तगतानि वै ॥ अभक्तदर्शनाभावात्कथ्यते फलसंस्कृतिः ॥२७॥ प-

---

शुद्धि ह्मणतात. (१९) धन, प्राण, अभिमान यांनीं तिन्ही वेळ योग्य समयाला शिव ध्यान करावें. याला मार्गशुद्धि ह्मणतात. (२०) सर्व प्राणी निजल्या नंतर रात्री मध्ययामाचे वेळेस प्रौढ प्रसादाचा उपभोग करणें याला कालशुद्धि ह्मणतात. (२१) गोड भाषण विनयपूर्वक भक्तांबरोबर करणें, व त्याच्या भाषणाला अनुकूलता दाखविणें याला नयशुद्धि ह्मणतात. (२२) आसन, शयन, यान, गमन, आगमन, स्थिति (बसणें) संगति वगैरे व्यवहार भक्तां बरोबर केला असतां याला जनशुद्धि ह्मणतात. (२३) हे भक्तवत्सले, देवी, जल, पुष्प, फल, पत्र, पात्र, गोत्र असे सहा संस्कार भक्तांचे आहेत. (२४) भक्तानें खणून काढलेल्या आडांतून दर दिवशीं ताजें पाणी आणून भस्मानें व मंत्रानें अभिमंत्रण करून त्या पाण्याचा उपयोग करावा, याला जलसंस्कार ह्मणतात. (२५) नवीन घागरींत पाणी आणून तें भवीला न दाखवितां घरांत ठेविलें तर तें लिंगाच्या अभिषेकाला योग्य होतें, याहून दुसरें असलें तर तें पाणी लिंगाभिषेकाला योग्य होत नाहीं. (२६) दूषित न झालेलीं फुलें काढून देवाच्या पूजेला आणून ठेवावीत, आणि त्यांचा वास दुसऱ्याला जाऊं देऊं नये, याला पुष्पसंस्कार ह्मणतात. (२७) कोणतींही फळें असोत, तीं भक्तांनीं आणलेलीं असून त्यांवर अभक्तांची नजर पडलेली नसावी. याला फलसंस्कार ह्मणतात. (२८) चक्रवर्ति वगैरे पत्रें (भाजी पाला)

त्राणि चक्रवर्त्यादिभक्तहस्तभवानि वै ॥ तत्र शाकादिपाकोऽथं कथ्यते पत्रसंस्कृतिः ॥२८॥ पात्राणि जंगमादीनि तत्पादरजसा शिवे ॥ तेनैव पावितं विश्वं कथ्यते पात्रसंस्कृतिः ॥२९॥ गोत्राणि शिवगोत्राणि तत्र संवंधकारणम् ॥ भयभक्तिः परा तत्र कथ्यते गोत्रसंस्कृतिः ॥३०॥ वातुलतंत्रे ॥ दासत्वं वीरदासत्वं भृत्यत्वं वीरभृत्यता ॥ समयः सकलावस्थः सज्जनः षड्विधस्तथा ॥३१॥ आदौ नियमसंयुक्तो गुरुपादांबुजार्चने ॥ कर्मयोगयुतः प्रोक्तो दासभावस्तु सज्जनः ॥३२॥ स्वामिभृत्यसमोपेतं परदैवविवर्जितम् ॥ मद्भक्ताकांक्षितं चित्तं वीरदासत्वसज्जनः ॥३३॥ अकुलं कुलवंतं वा नमस्कृत्य तु भोजयेत् ॥ शेषान्नं भुज्यते देवि भृत्यभावस्तु सज्जनः ॥३४॥ अष्टसिद्धियुतं प्रोक्तमीषणत्रयसंयुतम् ॥ आसुरं कर्म योगेन वीरभृत्यत्वसज्जनः ॥३५॥ स्वगृहं स्वधनं चैव स्वदेहं भक्तिसंयुतः ॥ जंगमे स्थावरे दद्यात्समयाचारसज्ज-

---

भक्तांनीं आणलेलीं असून त्याची भाजी केली असतां त्याला पत्रसंस्कार ह्मणतात. (२९) पात्र ह्मणजे जंगम होत. त्यांच्या पादधूळीनें हें सर्व जग पुनीत झालें आहे. याला पात्रसंस्कार ह्मणतात. (३०) गोत्र ह्मणजे शिवगोत्रें होत. त्या गोत्रांशीं संबंध करतांना भीति व भक्ति बाळगावी. याला गोत्रसंस्कार ह्मणतात. (३१) वातुलागमांत सांगितलें आहे कीं, दासत्वसज्जन, वीरदासत्वसज्जन, भृत्यत्वसज्जन, वीरभृत्यत्वसज्जन, समयभावसज्जन, सकलावस्थसज्जन असे सज्जनांमध्यें सहा प्रकार आहेत. (३२) गुरुपादपूजा करावयाच्या आरंभीं नियम धरून नंतर कर्मयोगानें युक्त होईल तर त्याला दासभावसज्जन ह्मणतात. (३३) शिव माझा प्रभु असून मी त्याचा नोकर आहें, अशा भावनेनें ज्या भक्तांचें मन युक्त झालें आहे, व शिवाशिवाय दुसरी देवता ज्या भक्तांच्या मनांत येत नाहीं, असें ज्या भक्ताचें मन झालें असेल त्याला वीरदासत्वसज्जन ह्मणतात. (३४) कुलीन असो, किंवा अकुलीन असो त्यांला (अशा भक्तांला) नमस्कार करून भोजन घालून मग शिष्टान्न (स्वयपाकांतलें अन्न) जो भोजन करतो, त्याला भृत्यभावसज्जन ह्मणतात. (३५) जें कर्म अष्टसिद्धींनीं युक्त असून (अष्टसिद्धि मिळण्या करतां जो कर्म करतो) ईषण त्रयांनीं युक्त आहे, (पुत्रेषणा, दारेषणा, अर्थेषणा यांनीं युक्त आहे,) असें आसुर कर्मयोग करून जो करतो, त्याला वीरभृत्यत्वसज्जन ह्मणतात. (३६) आपलें घर, आपलें धन, आपलें शरीर हें सर्व भक्तीनें युक्त होऊन जंगमाला

नः ॥३६॥ अणिमादिगुणैश्वर्यमीषणत्रयवर्जितम् ॥ निर्मलं निरहंकारं सकलावस्थसज्जनः ॥३७॥ गुरौ लिंगे दृढं भक्तः सत्यवादी जितेंद्रियः॥ सुव्रतः सुनयश्चैव दासभावार्चनाक्रमः ॥३८॥ शुद्धलिंगार्चनं नित्यं सज्जनः समयान्वितः ॥ अन्यथा दैवतं नास्ति वीरदासार्चनक्रमः ॥३९॥ पुष्पानुलेपनं वस्त्रं पाद्याद्याभरणान्वितम् ॥ तांबूलागरुकर्पूरसुगंधामोदपूरितम् ॥४०॥ यो यजेद्गेयनृत्तादिधवलैश्छत्रचामरैः ॥ नतिं स्तोत्रं प्रकुर्वीत भृत्याचारार्चनक्रमः ॥४१॥ प्राणलिंगव्रते लुप्ते हस्तखड्गादवंचयन् ॥ मुखं पंकजवच्छिद्याद्वीरभृत्यार्चनक्रमः ॥४२॥ तैलाभ्यंगं च वस्त्रं च मिष्टान्नं जंगमार्पितम् ॥ सुखसंभाषणं प्रीत्या समयाराधनक्रमः ॥४३॥ चित्तं समरसं शांतं भावपुष्पांबुनिर्मलम् ॥ आत्मलिंगार्चनं नि-

---

(जंगमलिंगाला) व स्थावराला (स्थावरलिंगाला) जो अर्पण करतो, त्याला समयाचारसज्जन ह्मणतात. (३७) अणिमादि अष्टैश्वर्य ज्यामध्यें असून जो ईषणत्रयरहित आहे (पुत्रेषणा, दारेषणा, अर्थेषणा, करीत नाहीं.), व निर्मल असून जो अहंकाररहित आहे, त्याला सकलावस्थसज्जन ह्मणतात. (३८) गुरूच्या ठिकाणीं व लिंगाच्या ठिकाणीं ज्याची दृढ भक्ति असून जो सत्य बोलतो, व जितेंद्रिय आहे, व उत्तम व्रत करीत असून उत्तम नीतीनें जो वागतो, त्याच्या कृत्याला दासभावार्चनाक्रम असें ह्मणतात. (३९) योग्य समयाला अनुसरून शुद्ध इष्टलिंगाची पूजा निरंतर करणें, व दुसऱ्या देवतेवर भक्ति न ठेवणें याला वीरदासार्चनक्रम ह्मणतात. (४०) फुलें, चंदन, वस्त्र, पाद्य, आभरण, तांबूल, अगरु, कर्पूर, सुगंधद्रव्य, (४१) गायन, नर्तन, शुभ्र छत्र, चामर, वगैरे शिवास अर्पण करून नमस्कार स्तोत्र वगैरे जो करतो, त्याच्या या क्रमाला भृत्याचारार्चनक्रम ह्मणतात. (४२) प्राणलिंगव्रताचा (इष्टलिंगपूजेचा) लोप झाला असतां हातांत तरवार घेऊन निष्कपटपणें शिरच्छेद जो करून घेतो, त्याच्या त्या क्रमाला वीरभृत्यार्चनक्रम ह्मणतात. (४३) तैलाभ्यंग (न्हाऊं घालणें), वस्त्र, मिष्टान्न वगैरे जंगमाला अर्पण करणें, व त्याच्याशीं प्रीतीनें सुखाचीं भाषणें करणें याला समयाराधनक्रम ह्मणतात. (४४) मन सम ठेवून शांत ठेवावें, व तें मन भावरूपी फुलांनीं व पाण्यानें निर्मल झालेलें असलें पाहिजे. अशा तऱ्हेच्या मनानें आत्मलिंगाची पूजा जो करतो, (मन सम व शांत ठेवून मनांत फुलें पाणी यांची कल्पना करून आत्मलिंगाची पूजा आपल्या हृदयांत जो करतो,) त्याच्या त्या क्रमाला सर्वावस्था-

**त्यं सर्वावस्थार्चनक्रमः ॥४४॥ वायवीयसंहितायाम् ॥ सत्यं क्षमा दया शौचं नियमो मार्दवं तथा ॥४५॥ तपस्त्यागो ब्रह्मचर्यं संतुष्टिश्चार्जवं तथा ॥ धर्मा एकादश प्रोक्ता भक्तानां शुभलांछने ॥४६॥ कामं भक्तिरते कामं क्रोधं चाधर्मकर्मणि ॥ लोभं चैवार्चने कुर्यान्मोहं भक्तजने प्रिये ॥४७॥ मात्सर्यं करणेष्वेवं मदं मायापराभवे ॥४८॥ रहस्ये ॥ पुत्रकर्मविवाहादिसंबंधश्च सकर्मभिः ॥ कर्तव्यः शिवभक्तेन यथा लोके स्वजातिभिः ॥४९॥ वायवीयसंहितायाम् ॥ या तु कन्या स्वपित्राद्यैः शिवधर्मे नियोजिता ॥सा भक्ताय प्रदातव्या नापराय विरोधिने ॥५०॥ दत्ता चेत्प्रतिकूलाय प्रमादाद्बोधयेत्पतिम् ॥ भविना शयनाद्यानात्संपर्कात्सहभोजनात् ॥५१॥ संचरंति महाघोरे नरके कालमक्षयम् ॥ पंचाक्षरोपदेशी च नरस्तुतिकरो यदि ॥५२॥ सोऽलिंगी स दुराचारी कुकविः स तु विश्रुतः ॥ चर्मपात्रे जलं तैलं न ग्राह्यं भक्तवत्सले ॥ गृ-**

---

र्चनक्रम ह्मणतात. (४५) वायवीयसंहितेंत सांगितलें आहे कीं—सत्य, क्षमा, दया, शौच, नियम, मार्दव, (४६) तप, त्याग, ब्रह्मचर्य, संतोष, आर्जव वगैरे हे अकरा धर्म भक्ताचे आहेत, असें हे पार्वती, तूं जाण. (४७) शिवाची भक्ति करण्याविषयीं काम (इच्छा) मनांत धरावा, अधर्मकृत्यावर क्रोध (राग) करावा. शिवपूजेविषयीं लोभ धरावा, हे प्रिये, भक्तांविषयीं मोह (कळकळ) बाळगावा, (४८) व इंद्रियां बरोबर मत्सर करावा, मायेचा पराभव करण्याविषयीं मद (गर्व) बाळगावा. (४९) रहस्यांत सांगितलें आहे कीं,—जगामध्यें परस्पर जातींतच जसे व्यवहार होतात, तसे दत्तक घेणें, लग्न करणें, व आपण लग्न करून घेणें, वगैरे व्यवहार शिवभक्तांशींच करावेत. (५०) वायवीयसंहितेंत ह्मटलें आहे कीं,—बापानें आपल्या मुलीला शिवसेवा करण्यांतच घातलें असलें तर तिचें लग्न शिवभक्तांशींच लावून द्यावें, इतरांशीं लग्न करून देऊं नये. (५१) चुकून जर इतराला देऊन लग्न लाविलें तर त्या मुलीनें आपला नवऱ्यास शिवज्ञानाचा बोध करून जागें करावें. भविलोकां बरोबर निजणें, विचार करणें, सहवास करणें, सहभोजन करणें, वगैरे व्यवहार केला असतां (५२) महाघोर अशा नरकांत अक्षय काल पर्यंत दुःख भोगीत फिरतात. पंचाक्षराचा उपदेश करणाऱ्यानें मानवाची स्तुति केली तर (५३) त्याला दुराचारी, अलिंगी, कुकवि (दुष्ट कवि) अशीं विशेषणें देतात. भक्तवत्सले देवी, चर्मपात्रांतलें (कातड्यांतलें) पाणी, तेल इत्या-

द्यते यदि भक्तेन रौरवं नरकं व्रजेत् ॥५३॥ बृहत्कालोत्तरे ॥ देवार्चनादिकं कर्म कार्यं दीक्षान्वितैः सदा ॥ नास्ति शावं ततस्तेषां सूतकं वा यतात्मनाम् ॥५४॥ शिवधर्मे ॥ लिंगार्थं जंगमार्थं वा पचनं नात्मकारणात् ॥ आत्मार्थं यत्पचेदन्नं नरकार्थं स जीवति ॥५५॥ ब्रह्मपुराणे ॥ अनाराध्य महादेवं न भुंजीयात्कदाचन॥ एष धर्मः परो ज्ञेयः शेषो भवतु वा न वा ॥५६॥ असंपूज्य न भुंजीत शिवमाप्राणसंचरात् ॥ यदि पापेन भुंजीत स्वैरं तस्य न निष्कृतिः ॥५७॥ अपूजयित्वा चेशानं यो हि भुंक्ते नराधमः ॥ पापानामन्नरूपाणां तस्य भोजनमुच्यते ॥५८॥ यस्तु लिंगार्चनं त्यक्त्वा भुंक्ते विट्क्रिमिकीटभुक् ॥ नरो नरकगामी स्यात्सर्वलोकबहिष्कृतः ॥५९॥ अकृत्वा पूजनं शंभोर्यो भुंक्ते पापकृद्द्विजः ॥ कुणपं च मलं चैव समश्नाति दिने दिने ॥६०॥ शिवधर्मे ॥ शिवपूजापरो भूत्वा पूर्वकर्म विवर्जयेत् ॥ अथवा पूर्वकर्मी स्यात्पूजा

---

दि घेऊं नये. जर भक्तानें घेतलें तर तो भक्त रौरव नरकाला जातो. (५४) बृहत्कालोत्तरांत सांगितलें आहे कीं,—दीक्षा घेऊन शिवार्चना करावी, अशा दीक्षित जितेंद्रिय लोकांना मृताशौच नाहीं. (५५) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं— इष्टलिंगाकरितां किंवा जंगमाकरितां स्वयपाक करावा. आपल्या पोटा करितांच करूं नये. आपल्या करितांच स्वयपाक करून जो जेवतो, तो प्राणी जगून नरकाचें साधन करून घेतो, असें समजावें. (५६) ब्रह्मपुराणांत सांगितलें आहे कीं- —शिवाची आराधना केल्याशिवाय भक्तानें जेऊं नये. बाकीचा धर्म आपल्या हातून होवो, अगर न होवो परंतु एवढा धर्म श्रेष्ठ मानून पाळगावा. (५७) प्राण असेपर्यंत शिवपूजा केल्याशिवाय जेऊं नये. पापी प्राणी तसेंच जेवील तर त्याला दुसरें प्रायश्चित्तच नाहीं. (५८) जो नीच मनुष्य शिवपूजा केल्यावांचून जेवतो, तो प्राणी अन्नरूपी पापच खातो, असें समजावें. (५९) जो प्राणी इष्टलिंगपूजा केल्याशिवाय जेवतो, तो किडे, विष्ठा, क्रिमि खातो, असें समजावें. तो प्राणी सर्व प्राण्यांकडून बहिष्कृत होऊन नरकाला जातो. (६०) पूजा केल्यावांचून जो जेवतो, तो ब्राह्मण पाप करणारा आहे, असें समजावें, व रोज तो प्रेत फाडून खातो, व आपला मळ खातो, असें जाणावें. (६१) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं,—शिवपूजेंत जो रत असेल, त्यानें आपलें पूर्वकर्म सर्व सोडून द्यावें. कदाचित तो पूर्वी प्रमाणेंच कर्म करूं लागला तर त्याची ती पूजा निष्फल होते.

सा निष्फला भवेत् ॥६१॥ उत्तमां वृत्तिमाश्रित्य नीचां वृत्तिं समाश्रितः ॥ आरूढपतितो ज्ञेयः सर्वकर्मबहिष्कृतः ॥६२॥ सूर्यपुराणे ॥ आरोपयंति ये कर्म शिवाश्रमगमानुषान् ॥ कुंभीपाकाग्निना दग्धा जायन्ते नोचयोनिषु ॥६३॥ सर्वज्ञानोत्तरे ॥ न च मुख्यतया स्कंद लोकधर्मं समाश्रयेत् ॥ नान्यशास्त्रसमादिष्टं न चान्यां देवतां स्मरेत् ॥६४॥ वीरभद्रीये ॥ पतिव्रतास्वभावेन विहायान्यत्तु दैवतम् ॥ शिवमेकं भजेद्भक्त्या सर्वशांतिकरं परम् ॥६५॥ आदित्यपुराणे ॥ शिवभक्तो नरो राजन् भक्तोऽन्येषु सुरेषु यः ॥ स्वपतिं युवतिस्त्यक्त्वा यथैवान्येषु रज्यते ॥६६॥ ब्रह्मगीतायाम् ॥ शिवपूजापरो भूत्वा योऽन्यं दैवमनुस्मरेत् ॥ अष्टाविंशतिकोट्यस्तु नरके यातना ध्रुवम् ॥६७॥ लिंगसारे॥ लिंगार्चनैकशरणो योऽन्यं देवं तु पश्यति ॥ नायकं नरकं गत्वा शुनां गर्भेषु जायते ॥६८॥ लिंगार्चनैकशरणो योऽन्यं देवं तु वंदते ॥ नरकं नायकं गत्वा चित्रदोषश्च जायते ॥६९॥ ग्रंथान्तरे ॥ शंभोर्नैवेद्यकं शुद्ध-

---

(६२) उत्तम पदाला जाऊन नीच वृत्तीचें अवलंबन केलें तर त्याला 'आरूढपतित' (वरचढून पडणारा) असें ह्मणतात. कारण तो सर्व कर्मांपासून बहिष्कृत झालेला असतो. (६३) सूर्यपुराणांत सांगितलें आहे कीं,—शिवाश्रमांत राहणाऱ्या प्राण्यावर जे कर्मांचा आरोप करतात, ते कुंभीपाक नरकांतल्या अग्नीनें जळून शेवटीं नीच योनींत जन्म घेतात. (६४) सर्व ज्ञानोत्तरांत सांगितलें आहे कीं,—हे स्कंदा, मुख्यत्वेंकरून लोकधर्मांचा आश्रय करूं नये. अन्य शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें करूं नये. इतर देवतेचें स्मरण करूं नये. (६५) वीरभद्रीयपुराणांत सांगितलें कीं, स्वभावानें जी पतिव्रता असेल तिच्या वृत्तीप्रमाणें आपली वृत्ति ठेवून इतर देवतेचा त्याग करून शांति देणाऱ्या श्रेष्ठ शंकराचेंच भजन करावें. (६६) आदित्यपुराणांत सांगितलें कीं,—हे राजा शिवभक्त असून, जो इतर देवतेची सेवा करील त्या शिवभक्ताला, नवऱ्याला सोडून जार कर्म करणाऱ्या तरुणी प्रमाणें समजावें. (६७) ब्रह्मगीतेंत सांगितलें आहे कीं,—शिवपूजा रत होऊन इतर देवतेचें स्मरण करील तर तो अठ्ठावीस कोटि नरकांमध्यें यातना भोगून जिवाला निश्चयानें ताप करून घेतो. (६८) लिंगसारांत सांगितलें आहे कीं,— लिंगपूजा करीत असून इतर देवाला पाहील तर तो श्रेष्ठ नरकांत दुःख भोगून शेवटीं कुत्र्याच्या जन्माला जातो. (६९) लिंगपूजा करीत असून इतर देवाला नमस्कार करील तर तो श्रेष्ठ नरकांत दुःख भोगून विचित्र पातकी होतो. (७०) ग्रंथांतरांत सांगितलें आहे

मन्योच्छिष्टं विमिश्रितम् ॥ तद्गृहं शिवभक्तानां वर्जनीयं न संशयः ॥७०॥ वातुलतंत्रे॥यद्गृहेष्वन्यदेवोऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥ यद्गृहेषु भवित्प्राप्तिस्तद्गृहाणि परित्यजेत्॥७१॥यत्र चाचारनिंदाऽस्ति कदाचित्तत्र न व्रजेत्॥यद्गृहे शिवनिंदाऽस्ति तद्गृहाणि परित्यजेत् ॥७२॥ स्कांदे ॥ यः सर्वभूताधिपतिं विश्वेशानं विनिंदति ॥ न तस्य निष्कृतिः शक्या त्कर्तुं वर्षशतैरपि ॥७३॥ शिवधर्मे॥ यो लिंगं द्वेष्टि संमोहात्सर्वदेवनमस्कृतम् ॥ नरो नरकगामी स्यात्तस्य संभाषणादपि ॥७४॥ वृत्तम् ॥ जगत्पतेर्वेदपुराणवेदिभिर्न तस्य लोकैकगुरोः पिनाकिनः ॥ श्रुण्वन्ति निंदामनुमोदयंति वा गच्छंति तेऽप्याशु सुदारुणां गतिम् ॥७५॥ शैवे॥ शिवनिंदाकरं दृष्ट्वा घातयेदथवा शपेत्॥ स्थानं वा तत्परित्यज्य गच्छेद्यद्यक्षमो भवेत् ॥७६॥ शिवनिंदाकरान् हंतुमशक्तोऽपि स्वयं हतः ॥ सद्य एव विमुच्येत त्रिसप्तकुलसंयुतः ॥७७॥ शिवधर्मे ॥ एवमादिस

---

कीं—शंभूचा नैवेद्य शुद्ध आहे, तो जर दुसऱ्या देवतेला दाखवून उच्छिष्ट केला तर असें करणाऱ्या त्या प्राण्याचें घर शिवभक्तांनीं अवश्यमेव सोडावें. (७१) वातुलागमांत सांगितलें आहे कीं ज्या घरीं दुसऱ्या देवता आहेत, तें घर वर्ज्य करावें. ज्या घरीं भविलोक येतील तें घर शिवभक्तांनीं आवश्य वर्ज्य करावें. (७२) ज्या ठिकाणीं आचाराची निंदा चालली असेल, तें घर सोडावें. ज्या घरीं शिवनिंदा चालली असेल तें घर सोडावें. (७३) स्कांदपुराणांत सांगितलें आहे कीं, – सर्व प्राण्यांचा स्वामी अशा शिवाची निंदा जो करतो, त्याला प्रायश्चित्त शेंकडो वर्षें बसून काढलें तरी सांपडत नाहीं. (७४) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं,––सर्वदेवनमस्कृत अशा इष्टलिंगाची निंदा किंवा द्वेष जो करतो, त्या प्राण्याशीं नुसतें भाषण केलें· तर, भाषण करणारा नरकाला जातो. (७५) वेदपुराण जाणणारे लोक नेहमीं ज्याची प्रशंसा करतात, जगत्प्रभु, व लोकांचा मुख्य गुरु, अशा शिवाची निंदा जे ऐकतात, व त्या निंदेला जे अनुमोदन देतात, हे दोघेही भयंकर नरकाला जातात. (७६) शैवपुराणांत ह्मटलें आहे कीं—शिवनिंदा करणाऱ्या प्राण्याला पाहून त्याला जिवानिशीं मारून टाकावें, किंवा त्याला शाप द्यावा किंवा वर सांगितल्याप्रमाणें करावयास असमर्थ असेल तर ती जागा सोडून दुसरीकडे जावें. (७७) शिवनिंदा करणाऱ्याला मारण्याची शक्ति नसेल तर स्वतः मरून जावें. ह्मणजे तो एकवीस कुळांला उद्धरून स्वतः आपणही सद्गतीला जातो. (७८) शिवधर्मांत सांगितलें आहे कीं वर जो आचार

माचारमनुतिष्ठेच्छिवाश्रमी ॥ अशेषपापनिर्मुक्तः शिवलोके महीयते ॥७८॥ आदित्यपुराणे ॥ नान्यो विमुक्तये पंथाः सदाचारमृते नृणाम् ॥ तस्मात्कुर्यात्सदाचारं तुष्टये गिरिजापतेः ॥७९॥

इति श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यविरचिते श्रीमद्वीरमाहेश्वराचारसंग्रहे सदाचारनिरूपणे वीरमाहेश्वरधर्मनिर्णयो नाम चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥

---

सांगितलेला आहे त्या आचाराला अनुसरून शिवाश्रमी मनुष्यानें राहावें. ह्मणजे तो सर्व पापांतून मुक्त होऊन शिवलोकांत पूज्य होतो. (७९) आदित्यपुराणांत सांगितलें आहे कीं----मुक्तीला साधन सदाचाराशिवाय दुसरा मार्ग नाहीं. याकरितां शिवप्रीतीकरितां सदाचार करावा.

याप्रमाणें श्रीमन्नीलकंठनागनाथाचार्यवर्यांनीं रचलेल्या श्रीमद्वीरमाहेश्वराचार संग्रहांतील सदाचारनिरूपणांतील वीरमाहेश्वरधर्मनिर्णय नांवाचा ४४ वा अध्याय संपला.



## ॥ अथ पंचचत्वारिंशोऽध्यायः ॥

श्रीशिवाय नमः ॥ शैवे धर्मसंहितायाम् ॥ नंदिकेश्वर उवाच ॥ उपमन्युरिति ख्यातो ह्यमन्युर्द्विजसत्तमः ॥ कुमार इव तेजस्वी क्रीड-मानो यदृच्छया ॥१॥ कदाचित्पीतवान् क्षीरमत्यल्पं मातुलाश्रमे॥ मुने तत्रागलं पीतं सन्निधौ मातुलात्मजैः ॥२॥ ईर्ष्यया मातुलसुतांस्तृप्तान् क्षीरमनुत्तमम् ॥ पीत्वाऽऽगलं यथाकामं दृष्ट्वा प्राहाथ मातरम् ॥३॥

उपमन्युरुवाच ॥ मातर्मातर्महाभागे मम देहि मनस्विनि ॥ गव्यं क्षीरमतिस्वादु नाल्पमुष्णं नमास्यहम् ॥४॥ प्रलापितैवं पुत्रेण पुत्रमा-लिंग्य सादरम् ॥ दुःखिता विललापालं स्मृत्वा भावं तपस्विनी॥५॥ स्मृत्वा पुनःपुनः क्षीरमुपमन्युर्महाद्युतिः॥देहि देहीति तामाह रोदमा-नो महामुने ॥६॥ वस्त्रं प्रगृह्य तां बालो रोदमानो न्यवारयत् ॥ अति-ष्ठच्चाग्रतस्तस्या बालभावान्महामुने ॥७॥ उंच्छवृत्त्यार्जितान् बीजांस्तृ-णजान्पीड्य सा स्वयम् ॥ बीजपिष्टं तदालोड्य तोयेन कलभाषिणी ॥८॥ एह्येहि वत्स वत्सेति सामपूर्वं तथा सुतम्॥ आहूयालिंग्य दुःखा-

---

श्रीशिवास नमस्कार असो. शैवपुराणांतल्या धर्मसंहितेंत असा कथा भाग आहे नंदिकेश्वर ह्मणतो. (१) क्रोधरहित ब्राह्मणश्रेष्ठ उपमन्यु या नांवानें तो प्रसिद्ध असून कुमाराप्रमाणें (षण्मुखाप्रमाणें) तेजस्वी होता. असा उपमन्यु स्वेच्छेनें खेळतां खेळतां (२) कोणे एके दिवशीं आपल्या मामाच्या आश्रमामध्यें असतांना तो फार थोडें दूध प्याला. मातुलपुत्रांनीं मात्र गळा भरून येईपर्यंत दूध पिऊन त्याच्या जवळ बसून चेष्टा केली. (३) ईर्ष्येनें दूध यथेच्छ पिऊन तृप्त झालेल्या मातुलपुत्रांना पाहून तो उपमन्यु मातोश्रीला बोलला.

(४) उपमन्यु बोलला--आई, आई, भाग्यशालिनी, मनस्विनी ( प्रशस्तमनाची आई,) गोड, ताजें गायीचें दूध कोमट कोमट प्यावयास मला दे .तुला नमस्कार करितों. (५) असें मुलाचें भाषण ऐकून आदरपूर्वक मुलाला आलिंगन देऊन त्याचा भाव जाणून ती तपस्विनी अतिशय रडावयास लागली. (६) तेजस्वी उपमन्यु पुनः पुनः आठवण करून रडत रडत तिच्याजवळ दूध मागूं लागला.(७) तिचा पदर धरून रडत रडत त्यानें तिचें निवारण केलें, व बाळपणाला अनुसरून तिच्यापुढें तो स्वस्थ उभा राहिला. (८) नंतर उंच्छवृत्तीनें मिळविलेलें बीज घेऊन पिळून त्या बियांचा रस तिनें काढला. व त्यांत पाणी मिसळून त्याला ती बोलूं लागली. (९) हे वत्सा, इकडे ये, असें शांतपणें बोलून त्याला आलिंगन देऊन दुःखानें

र्तो प्रददौ कृत्रिमं पयः ॥९॥ पीत्वा वै कृत्रिमं क्षीरं मात्रा दत्तं महामुने ॥ नैतत्क्षीरमिति प्राह मातरं चातिविव्हलाम् ॥१०॥ दुःखिता सा तदा प्राह संप्रेक्ष्याघ्राय मूर्धनि ॥ संमृज्य नेत्रे पुत्रस्य कराभ्यां कमलेक्षणा ॥११॥ क्षीरं वत्स कुतोऽस्माकं वने निवसतां सदा ॥ अधनानां पुराऽस्माभिर्महादेवो न पूजितः॥१२॥पूर्वजन्मनि यद्दत्तं शिवाय परमेष्ठिने ॥ तदेव लभ्यं नान्यत्तु शिवभक्ताय वा पुनः ॥१३॥ निशम्य वचनं मातुरुपमन्युर्महामतिः ॥ बालोऽपि मातरं प्राह प्रणिपत्य तपस्विनीम् ॥१४॥

उपमन्युरुवाच ॥ त्यज शोकं महाभागे महादेवोऽस्ति चेत्कचित् ॥ अचिरादेव तं दृष्ट्वा क्षीरोदं साधयाम्यहम् ॥१५॥ तां प्रणम्यैव मुक्त्वा तु तपश्चर्तुं प्रचक्रमे ॥ तमाह च तदा माता शिवं तेऽस्त्विति सर्वतः ॥१६॥ अनुज्ञातस्तया तत्र तपस्तेपे सुदुश्चरम् ॥ अष्टेष्टकाभिः प्रासादं कृत्वा स्थाप्य शिवं च सः ॥१७॥गते वर्षसहस्रे तु पिशाचाः पर्यवार-

---

पीडित होऊन तें कृत्रिम दूध त्याला तिनें दिलें. (१०) हे महामुने, आईनें दिलेलें तें कृत्रिम दूध पिऊन मग त्यानें ह्मटलें कीं, आई, हें कांहीं दूध नाहीं असें विव्हळ झालेल्या मातोश्रीला त्यानें ह्मटलें. (११) त्याला पाहून दुःखित होऊन त्याचें मस्तक हुंगून हातानें त्याचे डोळे पुसून ती कमलेक्षणा (कमला प्रमाणें डोळे असलेली) ह्मणाली. (१२) बाळा, रानांत राहणाऱ्या दरिद्री आह्मांपाशीं दूध कोठून येईल बरें ? कारण आह्मीं पूर्वजन्मीं श्रीशिवाची आराधना केली नाहीं. (१३) पूर्वजन्मांत परमेष्ठी शिवाला व शिवभक्ताला जें अर्पण केलें असेल, तेंच या जन्मांत मिळत असतें. दुसरें कांहीं मिळत नाहीं. (१४) महाबुद्धिमान उपमन्यु मातेचें भाषण ऐकून जरी पोर होता, तथापि तपस्विनी मातेला नमस्कार करून बोलला—

(१५) उपमन्यु बोलला ----हे महाभागे, शोक सोड, कोठेंतरी महादेव असेल तर लौकर त्याला पाहून (त्याचें दर्शन घेऊन) क्षीरसमुद्राला मी साधतों. (१६) असें तिला बोलून तिला सोडून तपश्चर्या करावयास त्यानें आरंभ केला. तेव्हां त्या मातोश्रीनें मुलाला ह्मटलें कीं, वत्सा, तुला चोहोंकडून सुख मिळो. (१७) तिची आज्ञा घेऊन त्यानें दुश्चर तप केलें. आठ विटा घेऊन त्यांनीं सुरेख माडीचें देवालय बनवून त्यांत शिवाची स्थापना केली. (१८) नंतर एक

यन् ॥ ताडयामासुरत्युग्रा गच्छ गच्छेति तं तदा ॥१८॥ ताडितोऽपि महातेजा न चचाल च संस्मरन् ॥ शिवं नमः शिवायेति प्राह गंभीरया गिरा ॥१९॥ पिशाचास्ते ततः श्रुत्वा मुने पंचाक्षरं तदा ॥ पैशाचं च तदा त्यज्य वपुरास्थाय मानवम् ॥२०॥ प्रणम्य शिरसा जग्मुरुपमन्युं महाद्युतिम् ॥ प्रोचुश्च पाहि पाहीति प्रणेमुश्च महामुने ॥२१॥ प्रजाः प्रजापतेः साक्षात्कृताः शप्ता मरीचिना ॥ पैशाचं तत्यजुर्भावमुपमन्योश्च दर्शनात् ॥२२॥ दृष्ट्वा तान्संस्थितान्सर्वान्मुनिरूपधरान्मुने ॥ उपमन्युः स्वयं प्राह विस्मयोत्फुल्ललोचनः ॥२३॥

उपमन्युरुवाच ॥ ज्ञातः प्रभावो युष्माभिः शिवमंत्रस्य तस्य तु ॥ तस्मादयं सदा जप्यः सर्वकामार्थसिद्धये॥२४॥ततः श्रुत्वाऽऽश्रमे तस्य ब्राह्मणा वचनं मुने ॥ तपस्तेपुः सहैवास्य शिवमंत्रपरायणाः ॥२५॥ उपमन्युस्तदा भाति संवृतो मुनिपुंगवैः ॥ महेश्वरो गणैः सर्वैः शिव-

---

हजार वर्षें त्याचीं तपश्चर्येंत जेव्हां लोटलीं, तेव्हां त्याच्या भोंवतीं पिशाच जमून त्याला भेवडावयास लागले. शिवाय ते अत्युग्र पिशाच त्याला मारून, येथून तूं चालता हो, येथें तूं बसूं नको असें त्याला ह्मणाले. (१९) तो मुनि महातेजस्वी जरी ताडित झाला तरी शिवाचें स्मरण करीत तेथेंच राहिला, परंतु तेथून तो ढळला नाहीं. शिवाय गंभीर वाणीनें "शिवाय" "नमः शिवाय" असें ह्मणूं लागला. (२०) हे मुने, याप्रमाणें त्या मुनीनें ह्मटलेला पंचाक्षरमंत्र ऐकून पिशाचांनीं आपला पिशाचपणा टाकून मनुष्याचें रूप घेतलें. (२१) मग त्याला नमस्कार करून ह्मणाले कीं, हे मुने, आमचें रक्षण कर, आमचें रक्षण कर. असें ह्मणून वारंवार नमस्कार करूं लागले. (२२) ब्रह्मदेवाच्या या प्रजेला मरीचि ऋषीनें शाप दिल्यामुळें पिशाचत्व यांना प्राप्त झालें होतें. आतां उपमन्यूच्या दर्शनानें हे सर्व शापांतून मुक्त झाले. (२३) हे मुने, नंतर मुनिवेष धारण करून उभे राहिलेल्या त्यांना पाहून आश्चर्यानें डोळे चांगले उघडून त्यांना उपमन्यु ह्मणाला.

(२४) उपमन्यु ह्मणाला---या शिवमंत्राचा प्रभाव तुह्मांला समजला, आतां त्या मंत्राचा जप करा, ह्मणजे तुमची मनकामना पूर्ण होईल. (२५) हे मुने, ते ब्राह्मण उपमन्यूचें वाक्य ऐकून शिवमंत्राचा जप करण्यांत रत होऊन त्या ब्राह्मणासह आपणही तप करूं लागले. (२६) त्या श्रेष्ठ श्रेष्ठ मुनींनीं युक्त होऊन तो उपमन्यु शिवभक्त सर्व गणांनीं युक्त असलेला दुसरा महेश्वरच कीं काय ? असा

भक्तैरिवापरः ॥२६॥ द्वितीये वत्सरे पूर्णे सहस्रे वा शतोत्तरे ॥ ववर्षुर्मूर्ध्नि विप्रस्य वर्षं च व्रणजं मुने ॥२७॥ पाषाणैश्च मुनेस्तस्य पुनरंगारराशिभिः ॥ भिंदीपालकुठाराद्यैरायुधैश्चाल्पबुद्धयः ॥२८॥ पीडितो राक्षसैश्चैवमुपमन्युर्महाद्युतिः ॥ पुनर्नमःशिवायेति प्रोवाचार्तस्वरं मुने ॥२९॥ हा रुद्र रुद्र रुद्रेति ललाप निपपात च ॥ पाहि शैलेंद्रजे मातस्तव भृत्योऽहमव्यये ॥३०॥ भुजंगप्रयातवृत्तम् ॥ ततस्तत्क्षणादेव विघ्नाः प्रशांता प्रनष्टं च तेषां तदा राक्षसत्वम् ॥ प्रहृष्टाः प्रणेमुर्मुनींद्रं मुनींद्रा गताः स्वर्गलोकं हि सूत्रप्रभावात् ॥३१॥ किमत्राद्भुतं चेति पंचाक्षरं यः सकृद्वा प्रसंगात्स्मरेत्तस्य विघ्नाः ॥ प्रणष्टा भवंत्यप्रयत्नान्मुनेस्तु समुच्चारणध्वंसिताः सर्वविघ्नाः॥३२॥ तृतीये भौतिकं विघ्नमभवत्तन्निवारितम् ॥ मुनिना तेन मंत्रेण भूताश्चैव दिवं गताः ॥३३॥ वृत्तम् ॥ त्रैलोक्यमेतत्सकलं च भीत्या दंदह्यते तस्य तपोवलेन ॥ मुनेश्चतुर्थे सुरसिद्धसंघाः प्रणेमुरेनं हि मुने सहस्रम् ॥३४॥ ऊचुर्जनाः

---

भासूं लागला. (२७) याप्रमाणें दुसरीं हजार वर्षें तपश्चर्येंत गेलीं, वर शंभर वर्षें जास्त झालीं. इतक्यांत ब्राह्मणाच्या डोक्यावर हीनबुद्धिचे लोक रक्ताची वृष्टि करूं लागले. (२८) व दगड फेंकावयास लागले, व आगीचा लोळ सोडूं लागले. हीनबुद्धीचे लोक भिंदिपाल, कुठार वगैरे आयुधें फेकूं लागले. (२९) याप्रमाणें महातेजस्वी उपमन्यु राक्षसांनीं पीडित होऊन पुनः आर्तस्वरानें "नमः शिवाय" असें ह्मणाला.(३०) हा रुद्रा, रुद्रा, रुद्रा, ह्मणून विलाप करूं लागला, व मूर्च्छित होऊन पडूं लागला व हे पार्वती, मातोश्री, अव्यये, तुझा मी सेवक आहें, माझें रक्षण कर अशी करुणा भाकूं लागला. (३१) त्या वेळेस त्याचीं तीं विघ्नें नष्ट झालीं, व त्यांचें राक्षसत्व नाहींसें झालें, नंतर निजरूप पावून ते मुनि त्या उपमन्यूला नमस्कार करून मंत्राच्या प्रभावानें स्वर्गलोकाला निघून गेले. (३२) त्या मुनीनें प्रंसगाला अनुसरून एकवार मंत्राचें स्मरण केलें; तेव्हां त्यांचीं तीं विघ्नें नाहींशीं झालीं, यांत नवल काय? ह्मणूनच सर्व विघ्नें मंत्रोच्चार केल्यावरोवर विनप्रयत्नानें नष्ट झालीं. (३३) याच प्रमाणें तिसऱ्या हजारांत भौतिक विघ्नें आलीं, तींही उपमन्यूनें निवारण केलीं, त्या वेळेसही मंत्रोच्चाराच्या प्रभावानें तेही मुक्त होऊन स्वर्गाला गेले. (३४) नंतर त्या मुनीच्या तपोवलानें हें त्रैलोक्य भीतीनें जळावयास लागलें. चौथ्या हजारांत सुर, गंधर्व, सिद्ध वगैरे येऊन मुनीला नमस्कार करूं लागले. (३५) कांहीं लोक अपरिमित तेजस्वी नारायणाजवळ येऊन "क-

केचिदनंतवीर्यं नारायणं प्राप्य कथं वदेति ॥ देवाः प्रणम्यैतदहो समस्तमकारणाद्दग्धमभूत्क्षणेन ॥३५॥ श्रुत्वा तेषां तदा वाक्यं भगवान्पुरुषोत्तमः ॥ किमिदं त्विति संचिंत्य ज्ञात्वा वै कारणं च सः ॥३६॥ जगाम मंदरं तूर्णं महेश्वरदिदृक्षया॥ दृष्ट्वा देवं प्रणम्यैतदुवाच च कृतांजलिः ॥३७॥

विष्णुरुवाच ॥ भगवन् ब्राह्मणः कश्चिदुपमन्युरिति श्रुतः ॥ क्षीरार्थमदहत्सर्वं तपसा तन्निवारय ॥३८॥

नंदिकेश्वर उवाच ॥ उपप्लवं मुने केचित्सिद्धा विद्याधराः सुराः ॥ ब्रह्माणमेत्य यद्वृत्तं तज्जगत्यूचुरव्ययम् ॥३९॥ सोऽपि श्रुत्वा हरं प्राप्य मंदरस्थं महामुने ॥ प्रणम्य तेषां हि वचः प्राह विप्र तपोबलम् ॥४०॥ इंद्रोऽपि श्रुत्वा जगति प्रवृत्तं वृत्रहा स्वयम् ॥ वेपमानो हरं प्राप्य प्राह तस्य तपोबलम् ॥४१॥ एतस्मिन्नंतरे देवः पिनाकी नीललोहितः॥ शक्रस्य रूपमास्थाय गन्तुं चक्रे मतिं तदा ॥४२॥ वृत्तम् ॥ अथ जगा-

---

सें करावें ? सांग" असें बोलूं लागले. कांहीं देव त्याला नमस्कार करून ह्मणाले कीं, देवा, एका क्षणांत हें सर्व जग निष्कारण जळालें. (३६) असें देवांचें वचन ऐकून भगवान पुरुषोत्तम हा "हें काय आहे?" असा विचार करून जग जळण्याचें कारण मनांत समजला. (३७) नंतर लौकर उठून महेश्वराचें दर्शन घेण्या करितां मंदरपर्वतावर धांवून आला. तेथें शिवाला पाहून नमस्कार करून हात जोडून बोलूं लागला--

(३८) विष्णु बोलला----भगवन् शंकरा, उपमन्यु नांवाच्या कोणाएका प्रख्यात ब्राह्मणानें दुधा करितां तपश्चर्या करून सर्व जग जाळिलें, याकरितां तपापासून त्याला सोडवा.

(३९) नंदिकेश्वर बोलला--हे मुने, कांही विद्याधर, देव, सिद्ध यांनीं मुनीचा उपद्रव फार झाला ह्मणून अव्यय ब्रह्मदेवाला तीच हकीकत सविस्तर रीतीनें सांगितली. (४०) हे मुने, ब्रह्मदेवानेंही ऐकून मंदरपर्वतावर असलेल्या शिवास नमन करून उपमन्यूचे तपाची हकीकत सांगितली. (४१) जगांत चाललेलें तें ऐकून वृत्रहंत्या इंद्रानेंही स्वतः कांपत कांपत येऊन त्या ब्राह्मणाचें तपोबल शिवास सांगितलें. (४२) इतक्यांत नीललोहित पिनाकधनुर्धारी तो देव (शिव) इंद्राचें रूप घेऊन त्यामुनीचें सत्व पाहण्याकरितां जाण्याचा विचार करूं लागला. (४३) नंतर सदाशिव हा शुभ्र अशा ऐरावत गजावर बसून मुनीच्या तपोवनाला

म मुनेस्तु तपोवनं गजवरेण सितेन सदाशिवः ॥ सह सुरासुरसिद्ध-महोरगैरमरराजतनुं स्वयमास्थितः ॥४३॥ सहैव चारुह्य तदाथ वि-भ्रद्विवेज वालव्यजनं विवस्वान् ॥ वामेन शच्या सहितं सुरेंद्रं करेण चान्येन सितातपत्रम् ॥४४॥ सितातपत्रं रत्नांशुमिश्रितं शक्ररूपिणः ॥ यथोदये हि चंद्रस्य भात्यखण्डं हि मण्डलम् ॥४५॥ सुदुकूला शिवा रक्ता लंबिता भाति मालिका ॥ छत्रान्ते रत्नजाकाशात्पतंतीव सरिद्वरा ॥४६॥ रराज भगवान्सोमः शक्ररूपी सदाशिवः ॥ सितातपत्रेण यथा चन्द्रबिंबेन मंदरः ॥४७॥ रराज पंकजनिभं वालव्यजनवीजितम्॥ मुखमंवापतेस्तस्य सहंसं कमलं यथा ॥४८॥ भुजंगप्रयातवृत्तम् ॥ प्रयान्तं समीक्ष्यादिदेवं ततस्तं समारुह्य नागेंद्रसिंहाश्ववर्यान् ॥ तदानीं सुरास्ते षडर्धाक्षमीशं जयेत्यब्रुवन्नन्वयुर्वै तदानीम् ॥४९॥ समदाः प्रमथाः सुरेश्वरं स्मितसंभिन्नमुखांबुजश्रियः ॥ चलकुण्डलनूपुराः शिवं तुरगैरन्वयुरंचितालकाः ॥५०॥ तं सिद्धगंधर्वमुनींद्रदेवाः सुरेंद्रमिंद्रा-

---

गेला. त्यावेळेस बरोबर सुर, असुर, सिद्ध, मोठ मोठे सर्प यांना घेऊन शिवानें इंद्राचें रूप घेतलें होतें. (४४) त्या ऐरावतावर सूर्य शिवाबरोबर वसून हातांत पंखा घेऊन शिवाला वारा घालीत होता. शिवानें आपल्या डाव्या हातानें शचिवेष धारण केलेल्या पार्वतीस, व उजव्या हातानें श्वेतछत्राचा दंड धरला होता. (४५) इंद्ररूपी शिवाच्या श्वेतछत्राभोंवतीं रत्नाचे किरण पडल्यामुळें चंद्रोदयाचे वेळेस नभोमंडल जसें दिसावें, तसें दिसलें. (४६) छत्राच्या शेवटच्या भागाला उत्तम तांबड्या वस्त्राची माळ लोंबत असल्यामुळें आकाशापासून रत्नांपासून उत्पन्न झालेली नदी पडते कीं काय? असें दिसलें. (४७) उमेसहित इंद्रवेषधारी सदाशिव श्वेतछत्राच्या योगानें चंद्रमंडलानें युक्त मंदरपर्वताप्रमाणें शोभूं लागला. (४८) वाळ्याचे पंखे कमलाप्रमाणें शोभूं लागले. श्रीशिवाचें मुख त्या वेळेस हंससहित कमळासारखें दिसलें. (४९) ऐरावत, सिंह, उत्तम घोडे यांवर बसून चालणाऱ्या आदिदेवाला पाहून त्यावेळेस सर्व देवांनीं त्या त्रिलोचनाचा जयजयकार केला. (५०) मंदहास्य करणारे, मदयुक्त कुरळ केसाचे प्रमथगण कर्णकुंडल पैंजण हालवीत घोड्यावर बसून श्रीशिवाबरोबबर चालले. (५१) सुरेंद्र, वगैरे देवांचा स्वामी अशा इंद्रवेषधारी श्रीशिवाची स्तुति सिद्ध, गंधर्व, मुनींद्र, देव यांनीं केली, व त्यांनीं मनोरथ पूर्ण करणाऱ्या त्या देवाचा

धिपमिंद्रमीशम् ॥ समन्ततस्तुष्टुवुरिष्टदं तं जयेति वाचा वरपुष्पवृष्ट्या ॥५१॥ तदा त्वहल्योपपतिच्छलेन गजेंद्रवर्योपरि देववर्यम् ॥ गणाः समासीनमुमासहायं समावृतं चाप्सरसां प्रणेमुः ॥५२॥ यमपावकवित्तेशा वायुर्निर्ऋतिरेव च ॥ अपांपतिस्तथेशानो भवं चानुसमागमन् ॥५३॥ आस्थायैवं हि शक्रस्य रूपं वै परमेश्वरः ॥ जगामानुग्रहं कर्तुमुपमन्योस्तदाश्रमम् ॥५४॥ तं दृष्ट्वा देवदेवेशं शक्ररूपधरं हरम् ॥ प्रणम्य शिरसा प्राह मुने मुनिवरः स्वयम् ॥५५॥

उपमन्युरुवाच ॥ पावितं चाश्रमं चैतन्मम देवेश्वरात्र तु ॥ यतस्त्वमागतोऽत्यर्थं देवैस्त्वं देवपुंगवः ॥५६॥

नंदिकेश्वर उवाच ॥ एवमुक्त्वा स्थितं वीक्ष्य कृतांजलिपुटं मुने ॥ प्राह गंभीरया वाचा शक्ररूपधरो हरः ॥५७॥ तुष्टोऽस्मि ते वरं ब्रूहि तपसाऽनेन सुव्रत ॥ददामि चेप्सितान्सर्वान्नात्र कार्या विचारणा॥५८॥ एवमुक्तस्तदा प्राह शक्रेण मुनिसत्तमः ॥ वरयामि शिवे भक्तिं मृत्युं वा च दृढव्रत ॥५९॥ वृत्तम् ॥ पशुपतिवचनाद्भवामि सद्यः क्रिमिरथ वा तरुरप्यनेकशाखः ॥ अपशुपतिवरप्रसादजा मे त्रिभुवनराज्य-

---

जयजयकार करीत त्याच्या डोक्यावर पुष्पवृष्टि केली. (५२) अहल्येच्या जाराचा वेष घेतलेल्या गजारूढ उमासहित देवाला अप्सरास्त्रियांनीं नमस्कार केला. (५३) यम, अग्नि, कुबेर, वायु निर्ऋति, वरुण, ईशान वगैरे हे देव शिवाबरोबर चालले. (५४) अशा थाटाचें इंद्राचें रूप घेऊन उपमन्यूवर अनुग्रह करण्याकरितां त्याच्या आश्रमाला श्रीशिव गेले. (५५) मुने, इंद्रवेषधारी देवादिदेव श्रीशिवाला पाहून शिरसा नमस्कार करून स्वतः उपमन्यु बोलला—

(५६) उपमन्यु बोलला —हे देवश्रेष्ठा माझा आश्रम शुद्ध झाला. कारण सर्व देवांसह देवश्रेष्ठ तूं येथें आलास.

(५७) नंदिकेश्वर बोलला—हे मुने, याप्रमाणें बोलून हात जोडून उभा राहिलेल्या उपमन्यूला पाहून इंद्रवेषधारी शिव गंभीरवाणीनें बोलले. (५८) हे सुव्रता, तुझ्या तपाच्या योगानें मी प्रसन्न झालों आहें, वर मागून घे. तुझ्या मनांतल्या सर्व इच्छा पूर्ण करितों, यांत विचार करूं नको. (५९) हे मुनिश्रेष्ठा, असें इंद्राचें वाक्य ऐकून तो ह्मणाला कीं, हे देवा, शिवावर दृढ भक्ति दे, नाहींतर मृत्यु दे. (६०) श्रीशिवाच्या वचनावरून तत्काळ किडा किंवा अनेक शाखांनीं युक्त एखादें झाड होईन, परंतु शिवाशिवाय इतर देवतेच्या प्रसादानें मिळालेलें त्रैलोक्याचें राज्यै-

विभूतिरप्यनिष्टा ॥६०॥ अपि कीटः पतंगो वा भवेयं शंकराज्ञया ॥ न तु शक्र त्वया दत्तं त्रैलोक्यमपि कामये ॥६१॥ ततो निशम्य वचनमुपमन्योर्महात्मनः ॥ संक्रुद्ध इव संप्रेक्ष्य तुष्टश्चान्तस्ततोऽब्रवीत् ॥६२॥ शक्र उवाच ॥ मां न जानासि विप्रर्षे देवराजानमागतम् ॥ त्रैलोक्याधिपतिं शक्रं सर्वदेवनमस्कृतम् ॥६३॥ मां दृष्ट्वा सर्वदं बाल्यात्प्रार्थ्यसे भक्तिमीश्वरे ॥एकाकिनि भिक्षुके च नग्ने मत्ते कपालिनि ॥६४॥ मद्भक्ताः स्वर्गलोके तु दिव्यस्त्रीपरिवारिताः ॥ लभन्ते विविधान्भोगान् तद्भक्तानां सुखं शृणु ॥६५॥ आलिप्य च चिताभस्म श्मशाने प्रेतसंकुले ॥ अस्थिमाल्यैरशुभदैः संवेष्ट्यांगं समंततः ॥६६॥ कदन्नं भिक्षितं रात्रौ कपाले मुनिसत्तम ॥ भुक्त्वा ह्यटन्ति रुद्रेण भूताः प्रेता इतस्ततः ॥६७॥ ईदृशान्भोक्तुमनिशं दुःखान्वै प्रार्थ्यसे मुने ॥ भक्तिं महेश्वरे चेष्टां न सहे तव चेदृशीम् ॥६८॥ मद्भक्तो भव विप्रर्षे मामेवा-

---

श्वर्य मला नको आहे. (६१) श्रीशिवाच्या आज्ञेनें किडा किंवा पतंग होईन, परंतु हे इंद्रा, त्रैलोक्य जरी मला त्वां दिलेंस, तथापि तें नको आहे. (६२) महात्म्या उपमन्यूचें वाक्य ऐकून रागावल्याप्रमाणें करून अंतर्यामांत संतुष्ट होऊन श्रीशिव बोलले—

(६३) इंद्रवेषधारी शिव बोलले---हे ब्राह्मणश्रेष्ठा, आलेल्या देवराजाला तूं जाणत नाहींस काय? सर्व त्रैलोक्याचा स्वामी मी असून मला सर्व देव नमन करतात. (६४) वाटेल तें देणाऱ्या मला पाहून मूर्खासारखा शिवाची भक्ति मागतोस काय? तो शिव एकटाच नागवा होऊन भीक मागत वेड्यासारखा फिरतो, त्याची भक्ति तुला काय करावयाची आहे? (६५) माझे भक्त स्वर्गामध्यें उत्तम उत्तम स्त्रियांशीं अनेक उपभोग घेत सुखानें राहिले आहेत, शिवभक्तांचें सुख सांगतों, ऐक (६६) जेथें नेहमीं प्रेतें पडतात, अशा श्मशानांत राहून सर्वांगास चितेची राख फांसून अंगावर अमंगळ हाडांच्या माळा घालून (६७) भीक मागून मिळविलेलें वाईट अन्न माणसांच्या डोक्यांच्या करटींत खात त्या रुद्राबरोबर भूत प्रेत होऊन इकडे तिकडे फिरत असतात. (६८) अहोरात्र असें दुःख भोगण्याची इच्छा करतोस, अशी अमंगळ भक्ति मला सहन होत नाहीं, याकरितां महेश्वराची भक्ति सोडून दे. (६९) हे विप्रर्षे, माझा भक्त होऊन माझी पूजा सतत करीत रहा. माझ्याशिवाय दुसऱ्याला शरण न जातां नि-

र्चय सर्वदा ॥ अनन्यशरणो भूत्वा त्यज रुद्रं हि निर्गुणम् ॥६९॥ सखा पुरा तव पिता मम वाल महामते ॥ तस्मादिहागतः स्नेहात्त्वयि पुत्रार्चयाशु माम् ॥७०॥

नंदिकेश्वर उवाच ॥ ततः शक्रस्य वचनं श्रुत्वा श्रोत्रविदारणम् ॥ उपमन्युरिदं प्राह जपन्पंचाक्षरं शुभम् ॥७१॥

उपमन्युरुवाच ॥ मन्ये शक्रस्वरूपेण नूनमत्र समागतः ॥ कर्तुं दैत्याधमः कश्चिद्धर्मविघ्नो ममेत्यहो ॥७२॥ पैशाचं च मया तीर्णं ततो वै पिशिताशिनाम् ॥ भौतिकं च तुरीयं मे दैत्यविघ्नमिहागतम् ॥७३॥ तेषु विघ्नेषु सर्वेषु शिवनिंदा च न श्रुता ॥ मया तव मुखादद्य श्रुता पापाद्धि दुर्मते ॥७४॥ त्वयैकं कथितं सत्यं शिवनिंदारतेन च ॥ प्रसंगाद्देवदेवस्य निर्गुणत्वं महात्मनः ॥७५॥ शृणु धर्मादयश्चैव ह्यव्यक्तादिचतुष्टयम् ॥ ब्रह्मादिस्तंवपर्यन्तं जगद्वै निर्गुणस्य तु ॥७६॥ गुणाः शिवस्य दुर्बुद्धे पादमूले व्यवस्थिताः ॥ स एव निर्गुणः सर्वे सगुणाश्च सुरासुराः ॥७७॥ देही नो निष्कलः शंभुः कथं हि गुणवान्भवेत् ॥ त्रै-

---

र्गुणी रुद्राला सोडून दे. (७०) हे बुद्धिमान बाळा, तुझा बाप माझा स्नेही होता, ह्मणून मी येथें तुला वर देण्याकरितां आलों आहे, याकरितां माझी पूजा कर.

(७१) नांदिकेश्वर बोलला---इंद्रवेषधारी शिवाचें तें कर्णकठोर वाक्य ऐकून, पंचाक्षराचा जप करीत इंद्राला तो उपमन्यु बोलला---

(७२) उपमन्यु बोलला--अरे,तूं इंद्राच्या रूपानें कोणी एक नीच दैत्य माझ्या धर्माला विघ्न करण्याकरितां आला आहेस, असें मला वाटतें. (७३) पिशाचांच्या विघ्नांतून मी पार पडलों, नंतर मांसाहारी प्राण्यांच्या तडाक्यांतून वांचलों, भूतांच्या झपाट्यांतून निभावलों, परंतु आतां दैत्यांचें हें चौथें विघ्न आलें, असें मला वाटतें. (७४) त्या सर्व विघ्नांमध्यें शिवनिंदा मात्र ऐकिली नव्हती, हे दुर्बुद्धे, तुझ्या मुखानें आज शिवनिंदा ऐकिली. (७५) परंतु शिवनिंदा करीत असतांना देखील प्रसंगानुसार एक मात्र खरें सांगितलेंस, तें असें कीं महात्मा शिव हा निर्गुण आहे. (७६) ऐक, सांगतों. धर्म वगैरे तत्वें, अव्यक्त वगैरे चार तत्त्वें ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व जग निर्गुण शिवापासून झालें आहे. (७७) हे दुर्बुद्धे, गुण हे शिवाच्या पायाखालीं पडलेले आहेत. तो एकटाच निर्गुण असून बाकी सर्व सुरासुर सगुण आहेत. (७८) निष्कल शंभु हा देहधारी नसून गुणवान

गुण्यविषया देवाः सर्वेदैत्याश्च दुर्मते ॥७८॥ निस्त्रैगुण्यो महादेवो ह्यादिमध्यान्तवर्जितः ॥७९॥ वृत्तम् ॥ एकं स्थूलं सूक्ष्ममेकं सुसूक्ष्मं भव्यं शांतं रौद्रमेकं वपुर्यत् ॥ तस्माद्राजंस्त्वादृशैर्बुद्धिहीनैर्ज्ञेयं सौम्यं निर्गुणं नाल्पवीर्यैः ॥८०॥ चेष्टा विरुद्धा परमेश्वरस्य स्वयं शिवोऽप्यर्धकपालपाणिः ॥ नग्नः प्रमत्तः सितभस्मदिग्धो नृत्तप्रियश्चैव स भिक्षुकश्च ॥८१॥ जगद्विरुद्धं परमेश्वरस्य विचेष्टितं शैलसुतापतेर्यत् ॥ सुरेंद्र तस्माच्छृणु लौकिकैस्तु युष्मद्विधैः सर्वत एव निंद्यम् ॥८२॥ बहुनात्र किमुक्तेन मयेत्यनुमितं महत् ॥ जन्मान्तरे कृतं पापं श्रुता निंदा शिवस्य यत् ॥८३॥ श्रुत्वा निंदां शिवस्याथ तत्क्षणादेव यस्त्यजेत् ॥ स्वदेहं तन्निहत्याशु रुद्रलोकं स गच्छति ॥८४॥ दृष्ट्वा पूजाविहीनं तु लिंगं त्याज्यं शिवात्मकम् ॥ स्वदेहं किं पुनः श्रुत्वा शिवनिंदामशोभनाम् ॥८५॥ दृष्ट्वा तु तत्क्षणादेहं शिवनिंदारतं नरम् ॥ त्याज्यं भक्तैः शिवे

---

कसा होईल बरें ? हे दुर्मते, त्रिगुणांचे विषय देव आणि दैत्य हे आहेत. (७९) त्रिगुणरहित असा महादेव आदि, मध्य अंत यांनीं रहित आहे. (८०) तें शिवतत्त्व स्थूल असून सूक्ष्म आहे. तें एकच अव्यय आहे, शांत असून सूक्ष्म आहे, असें तें शिवाचें निर्गुण सौम्य शरीर समजून घ्यावयास तुझ्यासारिखे बुद्धिहीन व अल्प सामर्थ्याचे लोक समर्थ होत नाहींत. (८१) परमेश्वराच्या सर्व चेष्टा विरुद्ध आहेत, स्वतः मंगलकर असून अर्धकपाल हातांत त्यानें घेतलें आहे, व नागवा असून तो वेड्यासारखा हिंडतो, व पांढरें चिताभस्म लावून खुशाल नाचतो, व भीक मागतो. (८२) गिरिजापति श्रीशिवाचें कर्म जगापेक्षां विरुद्ध आहे. हे इंद्रा ह्मणूनच तूं ऐक. कारण तुमच्यासारख्या प्राकृत लोकांना तें शिवाचें कर्म निंद्यच दिसतें. (८३) फार काय बोलावयाचें आहे ? मोठी कल्पना माझ्या मनांत अशी आली कीं, जन्मांतरामध्यें मोठें पापकृत्य माझ्या हातून घडलें होतें, यामुळें शिवनिंदा माझ्या कानावर आली. (८४) शिवनिंदा ऐकून तत्काळ जो प्राणत्याग करितो, तो लौकर रुद्रलोकाला जातो. (८५) एक दिवस जर शिवलिंगाची पूजा चुकली तर देह त्याग करावा, असें जर धर्मशास्त्र आहे, मग शिवनिंदा ऐकून विटाळलेला देह कसा ठेवावा, बरें ? (८६) शिवनिंदा करीत असलेल्या मनुष्याला नुसतें पाहिलें तर प्राण सोडावेत, ह्मणून जर धर्मशास्त्र सांगत आहे, तर प्रत्यक्ष शिवनिंदा कानानें ऐकिली तर देह सोडला पाहिजे, ह्मणून काय सांगावयाचें

मर्त्यैः श्रुत्वा निंदां च किं पुनः ॥८६॥ दृष्ट्वापि नष्टं धर्मं च त्याज्यं देहं क्षणात्स्वकम् ॥ शिवभक्तैर्महाभागैः श्रुत्वा निंदां हि किं पुनः ॥८७॥ श्रुत्वा प्रसंगाद्वा वाक्यं विनिंद्य परमेश्वरम् ॥ कथितं नारकी स्याद्धि निश्चलश्चेन्न संशयः ॥८८॥ तस्मादुत्पाटयेज्जिव्हां शिवनिंदारतस्य तु ॥ यो वा चोत्पाटयेज्जिव्हां शिवनिंदारतस्य तु ॥८९॥ त्रिसप्तकुलमुध्दृत्य शिवलोकं स गच्छति ॥ संताड्य पादहस्ताभ्यां शिवनिंदारतं नरम् ॥९०॥त्यजेत्स्वदेहं तृणवत्स याति परमं पदम्॥ अशक्तो ह्यात्मनः श्रोत्रे हस्ताभ्यां वाथ ताडयेत् ॥९१॥ रुद्रलोके चिरं कालं रुद्रैः सार्द्धं प्रमोदते ॥ अस्तु तावन्ममेच्छा या क्षीरं प्रति सुराधम॥९२॥ निहत्य च शिवास्त्रेण त्यजाम्येतत्कलेवरम् ॥ पुरा मात्रा तु कथितं सत्यमेव न संशयः ॥९३॥ पूर्वजन्मनि चास्माभिरपूजित इति प्रभुः ॥९४॥

नंदिकेश्वर उवाच ॥ एवमुक्त्वा तु भगवानुपमन्युर्निहत्य तम् ॥ शक्रं चक्रे मतिं मर्तुमघोरास्त्रेण मंत्रवित् ॥९५॥ भस्माधारान्महातेजा भ-

---

आहे. (८७) शिवधर्म नष्ट झाला असतां तत्क्षणींच आपलें शरीर सोडून द्यावें, असें जर पंडित सांगतात, तर महाभाग्यशाली शिवभक्तांनीं शिवनिंदा ऐकिल्यानंतर देह सोडावा, असें सांगावयासच नको आहे. (८८) प्रसंगानुसार शिवनिंदापर वाक्य ऐकिलें तर व परमेश्वराची निंदा करील, तर तो नरकांत निश्चलपणें राहतो, यांत संशय नाहीं. (८९) याकरितां शिवनिंदा करणाऱ्याची जीभ समूळ उपटून काढावी. जो प्राणी शिवनिंदा करणाऱ्याची जीभ उपटून काढील. (९०) तो प्राणी आपल्या एकवीस कुलांचा उद्धार करून स्वतः आपण शिवलोकाला जातो. शिवनिंदा करणाऱ्याला जो हातानें मारतो, व पायानें लाथ देतो, (९१) व आपण तत्काळ प्राण सोडतो, तो उत्तम गतीला जातो. असें करण्यास अशक्त असेल तर त्यानें हातांनीं आपले कान झांकून घ्यावेत. (९२) म्हणजे तो चिरकाल रुद्रलोकांत रुद्रगणासह सुख भोगतो. हे सुराधमा, पुरे आतां मला कांहीं दूध नको आहे. (९३) आतां शिवास्त्राच्या योगानें माझा हा देह सोडून देतों. पूर्वी माझ्या आईनें सांगितलें होतें तें खरेंच आहे, यांत संशय नाहीं. तें असें कीं, (९४) पूर्वजन्मामध्यें आह्मी शिवाराधना मुळींच केली नाहीं.

(९५) नंदिकेश्वर बोलला--असें बोलून त्या इंद्राला मारून भगवान मंत्रवेत्त्या उपमन्यूनें आपले प्राण अघोरास्त्रानें सोडण्याचा निश्चय केला. (९६) नंतर भ-

स्ममुष्टिं प्रगृह्य च ॥ अघोरास्त्रं जपंस्तस्मै ससर्ज च ननाद च ॥९६॥ दग्धुं स्वदेहमाग्नेयीं ध्यात्वा वै धारणां तदा ॥ अतिष्ठच्च महातेजाः शुष्केंधन इवानलः ॥९७॥ एवं व्यवस्थिते विप्रे धारणां तस्य योगिनः ॥ वारयामास सौम्येन भगवान्भगनेत्रहा ॥९८॥ अघोरास्त्रं तु विप्रस्य गृहीतं नंदिकेन तु ॥ कालाग्निसन्निभं रौद्रं नियोगाच्छूलिनस्तदा ॥९९॥ रूपं स्वमेव भगवानास्थायाथ पिनाकधृक् ॥ दर्शयामास बालाय बालेंदुकृतशेखरम् ॥१००॥ वत्तम् ॥ अनाहता दुंदुभयश्च मूर्धनि निनेदुरुच्चैर्हि बलाहकाश्च ॥ ववर्षुरीशस्य मुनेस्तदानीं तथा मुने पुष्पमयीं हि वृष्टिम् ॥१०१॥ जगुर्मुनींद्रस्य तदा प्रभावं गंधर्वमुख्या ननृतुश्च नार्यः ॥ देवा निनेदुश्च मुनींद्रसंघाः प्रणेमुरीशं च मुनीश्वरं च ॥१०२॥ द्रष्टुं सुतं तं च तदाथ माता शैलेंद्रपुत्र्याः सहसा नियोगात् ॥ समागता सर्वसुरासुरेंद्रैः संपूज्यमाना च पिता च शंभोः ॥१०३॥ मातुलस्य तदा पत्नी मातुलश्च मुनेस्तथा ॥ नियोगाद्देवदेवस्य स्वपुत्रैश्च

---

स्मपात्रांतील मूठभर भस्म घेऊन अघोरास्त्रमंत्राचा जप करावयास आरंभ करून तें अस्त्र त्याच्यावर सोडून उपमन्यूनें सिंहनाद केला. (९७) नंतर आपला देह जाळण्याकरितां आग्नेयी धारणेचें ध्यान करून महातेजस्वी उपमन्यु वाळलेल्या लांकडाला जाळणाऱ्या अग्नीप्रमाणें तटस्थ उभा राहिला (९८) योगाच्या द्वारें धारणा केल्यानंतर तटस्थ राहिलेल्या उपमन्यूस पाहून भगनेत्र काढणाऱ्या श्रीशंकरानें सौम्यपणें उपमन्यूला मरणापासून परावृत्त केलें. (९९) तेव्हां ब्राह्मणाचें तें अघोरास्त्र शिवाच्या आज्ञेनें नंदिकेश्वरानें धरिलें. तें अस्त्र कालाग्नीप्रमाणें भासत असून फार भयंकर होतें. (१००) असो. नंतर तो वेष टाकून निजरूप प्रकट करून हातांत पिनाक धनुष्य धरून डोकीवर अर्धचंद्र धारण करून त्या उपमन्यूला शिवांनीं आपलें दर्शन दिलें. (१०१) हे मुने, तेव्हां देव दुंदुभि वाजवूं लागले, व मेघगर्जना करूं लागले. व देवांनीं शिवाच्या शिरावर पुष्पवृष्टि केली. (१०२) मुख्य मुख्य गंधर्व मुनीचा प्रभाव गाऊं लागले, व अप्सरा स्त्रिया नाचूं लागल्या. देव व मुनींचा समुदाय यांनीं शिवाचा व उपमन्यूचा गर्जनेच्या रूपानें जयजयकार करून त्या दोघांना नमस्कार केला. (१०३) तेव्हां आपल्या मुलाला पहावें या इच्छेनें पार्वतीच्या आज्ञेनें तेथें उपमन्यूची माता आली. तेव्हां सुरासुर शंभूजवळ तिचा व मुनीच्या बापाचा धन्यवाद करूं लागले. (१०४) श्रीशिवाच्या

समागतः ॥१०४॥ ये चान्ये बांधवास्तस्य बालस्याथ महात्मनः ॥ स-
माहूता महेशेन ह्यतिष्ठन् तस्य सन्निधौ ॥१०५॥ ब्रह्मादिस्तंवपर्यन्तं च-
राचरमिदं जगत्॥सन्निधौ तस्य बालस्य वेष्टितं हि शिवाज्ञया ॥१०६॥
क्षीरार्णवसहस्रं च क्षीरोदार्णव एव च ॥ दध्योदनार्णवश्चैव घृतोदा-
र्णव एव च ॥१०७॥ फलार्णवश्च बालस्य भक्ष्यलेह्यार्णवाश्च ये ॥ अपूप-
गिरयश्चैव तदातिष्ठन्समंततः ॥१०८॥ वृत्तम् ॥ उपमन्युमुवाच स-
स्मितो भगवान्बन्धुजनैः समावृतम् ॥ गिरिजामवलोक्य सस्मितः स-
घृणं प्रेक्ष्य च तं तथा घृणी ॥१०९॥

ईश्वर उवाच ॥ भुंक्ष्व भोगान्यथाकामं बांधवैर्वत्स पश्य माम् ॥ उ-
पमन्यो महाभाग तवांबां पश्य चांबिकाम् ॥११०॥ मया पुत्रीकृतो ह्यद्य
दत्तः क्षीरार्णवस्तव ॥ क्षीरोदनार्णवश्चैव दध्यन्नार्णव एव च ॥१११॥
आज्योदनार्णवश्चापि फललेह्यार्णवस्तथा ॥ अपूपगिरयश्चैव भक्ष्यभो-
ज्यार्णवस्तथा ॥११२॥ मातुलेन सहैवाशु मातुलस्य च पुत्रकैः ॥पत्न्या
च मातुलस्यापि पिब क्षीरार्णवं मुने ॥११३॥ तृणपिष्टं यया दत्तं तोये-

---

आज्ञेनें उपमन्यूचा मामा आपल्या बायकोला मुलांला घेऊन तेथें आला. (१०५) शिवाय त्या उपमन्यूचे जे कोणी बांधव होते, त्या सर्वांना तेथें शिवानें बोलावून आपल्याजवळ आणिलें. (१०६) ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत सर्व चराचर जग शिवाज्ञेनें त्या उपमन्यूच्या सभोंवतीं जमलें. (१०७) हजारो क्षीरसमुद्रांनीं युक्त क्षीरसमुद्र, दध्योदन समुद्र (दहिंभाताचा समुद्र), घृतोदार्णव (तुपाचा समुद्र), (१०८) फळाचा समुद्र, भक्ष्यलेह्यांचा समुद्र, तळलेल्या पदार्थांचे पर्वत हे सर्व उपमन्यूच्या सभोंवतीं जमले. (१०९) बांधवांमध्यें असलेल्या उपमन्यूला हंसत हंसत श्रीशिव बोलले, व गिरिजेकडे पाहून मंदहास करीत दयेच्या दृष्टीनें दयाळु शिवानें उपमन्यूकडे पाहिलें.

(११०) शिव बोलले—हे वत्सा, या तुझ्या बांधवांसह यथेच्छ उपभोग घे, इकडे माझ्याकडे पहा, हे महाभागा, तुझी मातोश्री अशा अंबिकेकडे पहा. (१११) आज तुला पोटच्या मुलाप्रमाणें समजून क्षीरसमुद्र दिला आहे, घे. तसेंच क्षीरोदनार्णव, दध्योदनार्णव, (११२) आज्योदनार्णव, फललेह्यार्णव, अपूपाचे पर्वत, भक्ष्यभोज्यांचा समुद्र, वगैरे दिलें आहेत. (११३) तुझ्या मामासह व त्याच्या मुलाबायकांसह यथेच्छ दूध पी. (११४) हे सुव्रता, जिनें तुला तृणधा-

नालोड्य सुव्रत ॥ मात्रा तव तया सार्द्धं भुंक्ष्व भोगान् यथासुखम् ॥११४॥ पिता तव महातेजाः पिता वै जगतां मुने ॥ माता तव महाभाग जगन्माता न संशयः ॥११५॥ अमरत्वं मया दत्तं गाणपत्यं च शाश्वतम् ॥ वरान्वरय दास्यामि नंदीश्वरसमो ह्यसि ॥११६॥ एवमुक्त्वा महादेवः कराभ्यां परिगृह्य तम् ॥ आलिंग्याघ्राय संमृज्य ददौ देव्याः करांबुजे ॥११७॥ देवी तनयमालोक्य ददौ तस्मै गिरींद्रजा ॥ मुनये वीतरागाय कुमारत्वं हि सर्वदा ॥११८॥ सोऽपि लब्ध्वा वरान्विप्रो नमस्कृत्वा महेश्वरम् ॥ तुष्टाव वाग्भिरिष्टाभिर्महादेवमुमां तदा ॥११९॥ वरयामास च वरं वरेण्यं वारिजेक्षणम् ॥ कृतांजलिपुटो भूत्वा प्रणिपत्य मुहुर्मुहुः ॥१२०॥ प्रसीद देवदेवेश त्वयि चाव्यभिचारिणीम्॥ देव्याः पादांबुजे चैव भक्तिमग्र्यां नमाम्यहम् ॥१२१॥ सान्निध्यं च महादेव देव्याः सार्द्धं प्रसीद मे ॥ सर्वदा तु गणैः सार्द्धं वृषेंद्रवरवाहन ॥१२२॥

---

त्याचें पीठ कालवून दूध ह्मणून दिलें होतें, त्या तुझ्या आईसह सुखानें यथेच्छ भोगांचा उपभोग घे. (११५) हे मुने, महातेजस्वी असा जगाचा बापमी, हा (सृष्टि करणारा मी) तुझा बाप आहें, व जगाची आई पार्वती, ही तुझी आई आहे. (११६) तुला अमरत्व दिलें आहे, व शाश्वत गाणपत्य दिलें आहे. मला तूं नंदीश्वरा प्रमाणें आहेस, वाटेल तें मागून घे. (११७) असें बोलून हातांनीं त्याला घेऊन आलिंगन देऊन मस्तक हुंगून अंगावर हात फिरवून नंतर शिवानें त्याला देवी पार्वतीच्या हातांत दिलें. (११८) देवी गिरिकन्या आपल्या मुलाला (उपमन्यूला) पाहून त्या निर्लोभी मुनीला तिनें अक्षय्य कुमारत्व दिलें. (११९) याप्रमाणें महेश्वरापासून वर मिळवून शिवाला नमन करून सुंदर वाणीनें उमेचें व शिवाचें स्तोत्र त्या मुनीनें केलें. (१२०) कमलनेत्र श्रेष्ठ शिवाला हात जोडून वारंवार नमस्कार करून मुनीनें वर मागून घेतले. (१२१) देवाधिदेवा, मजवर प्रसन्न हो, आणि तुझ्या ठिकाणीं अढळ अशी भक्ति दे. तसेंच देवीच्या ठिकाणींही श्रेष्ठ भक्ति दे. तुला नमन करितों. (१२२) देवा, मजवर प्रसन्न होऊन देवीसहित तूं नेहमीं माझ्याजवळ रहा. आणि हे नंदिवाहना, सर्व गणांसह माझ्याजवळ रहा.